यक्षप्रश्न :—

—दैवानें दिलेला मित्र कोण ?

युधिष्ठिराचें उत्तर :—पत्नी [ म. भा. अरण्यक पर्व

जिनें मला हा ग्रंथ लिहिण्याइतकें स्वास्थ्य दिलें ]

सौ. गोपिकाबाई हणमंते

यांस—



**'संकेत कोशकार' श्री. शा. हणमंते**

**जीवन परिचय**

- जन्म–सन १८८८, वळसग, ( जि. सोलापूर )
- शिक्षण–प्रवेशपरिक्षेपर्यंत, रेल्वे नौकरी–१९०७ ते १९४१ स्टेशन मास्तर म्हणून–सेवानिवृत्ति.
- आवड––धार्मिक व अभिजात ग्रंथवाचन, तीर्थयात्रा व प्रवास.
- साहित्यविषयक कार्य.
  1. मराठी रेल्वे गाईड अथवा वाटेचा सोबती सन १९११
  2. भारतवर्ष अथवा हिंदुस्थानचे संक्षिप्त गॅझेटियर स. १९२६ डे. व्ह. ट्रे. सोसायटी, पुणे व महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक मंडळ, इंदूर यांजकडून पारितोषिक मिळाले.
  3. व्यवहार आणि शिष्टाचार आवृत्ति पहिली १९४१
     आवृत्ति दुसरी १९४८
     आवृत्ति तिसरी १९५२
  4. श्री रघुनाथ नारायण हणमंते चरित्र सन १९४९
  5. सन्तवाणी - प्रथमावृत्ति सन १९५८ आवृत्ति दुसरी १९६४
     डे. व्ह. ट्रा. सोसायटी पुणे यांजकडून पारितोषिक मिळाले.
- सार्वजनिक कार्य–समर्थ सेवा संघ–हिंदुसभा इत्यादि संस्थेच्या कार्यांत भाग घेतला.

# पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना

[ लोकनायक माधव श्रीहरि उपाख्य बापूजी अणे ]

श्रीधरपत हणमते यांनीं 'सकेत-कोश'-( सख्यात्मक ) या त्याच्या नवीन ग्रथास प्रस्तावनेदाखल मीं चार शब्द लिहावे, अशी मे महिन्यांत माझा पुणें मुक्कामीं वास्तव्य असताना इच्छा प्रदर्शित केली, व त्याच्या त्या इच्छेस माझे सन्माननीय मित्र व महाराष्ट्रातील एक वेदाभ्यासी थोर पडित श्री. विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनीं मजकडे मुद्दाम भेटीस येऊन पुष्टी दिली, त्यामुळें मला श्री. श्रीधरपतास रुकार देण्याशिवाय गत्यतरच राहिले नाहीं. त्याच्या पुस्तकाचे सपूर्ण मुद्रित मजकडे आल्यासहि बरेच दिवस झाले, प्रस्तावना लिहून पाठविण्यास विलब झाला, याबद्दल मी ग्रथकर्त्यांची क्षमा मागतो.

२. ग्रथकार श्री. श्रीधरपत हणमते हे एक व्यासगी लेखक आहेत. त्यांनीं आतापर्यंत लिहिलेल्या ग्रथात 'हिंदुस्थानचें सक्षिप्त गॅझेटियर' व 'व्यवहार आणि शिष्टाचार' हे ग्रथ लोकप्रिय झाले आहेत.

३. मराठी भाषा हिंदुस्थानात प्रचलित असलेल्या राजमान्य चौदा मुख्य भाषात कोशग्रथदृष्ट्या अधिक समृद्ध आहे असे मला वाटतें. व्याकरण-विपुलता व कोशसपन्नता हे मायेच्या प्रतिष्ठेचे आधारस्तभ व तिच्या भावी प्रगतीचे मार्गदिग्दर्शक दीपस्तभच होत. व्याकरण व कोश हीं भाषा अधिकाधिक सुसस्कृत व प्रौढ आणि व्यापक विचारवाहनक्षम करण्याचीं महत्त्वाचीं साधनें आहेत. वेदपुरुषाच्या षडगात व्याकरण व 'निघण्टु' याचा समावेश महत्त्वाची अग म्हणून करण्यात आला आहे, हें विद्वज्जनास विदित आहेच. यास्काचार्यांनीं आपला पूर्वोत्तर षट्कल्प द्विखडात्मक द्वादशाऽध्यायी निरुक्त ग्रथ, 'निघण्टु' या शब्द समाम्नायावर भाष्य म्हणून रचला. यावरून शब्दकोशाचें महत्त्व प्राचीन वैदिक सस्कृति-प्रवर्तक ऋषीना केवढें वाटत होतें, याची आपणास काहींशी कल्पना करता येण्यासारखी आहे. पाणिनीय गणपाठ, धातुपाठ हे देखील विशिष्ट दृष्टीने तयार झालेले शब्दकोशच आहेत. किंबहुना 'गण' शब्दाचा

अर्थ शब्दसंग्रह किंवा वाक्यसंग्रह किंवा वैदिक तत्त्वसंग्रह असा असावा. या सर्व कोशांचें ज्ञान वेदार्थ उपबृंहित करण्यास उपयोगी असल्यामुळें त्याचा अभ्यासहि वेदवेत्त्यांस करावा लागत होता. 'गणानां त्वां गणपतिम्' या प्रसिद्ध मंगलाचरणाच्या वैदिक मंत्रांतील 'गण' शब्द अशा कोशाचाच वाचक असावा. त्या मंत्रात गणपति देवतेच्या अनुचरसमूहाचा वाचक तो नाहीं असें मला वाटतें; म्हणूनच गणपति अथवा ब्रह्मणस्पति या देवतेचें दुसऱ्या एका ऋचेंत 'बृहस्पतिं सर्वगणम्' असें वर्णन करून सर्व तऱ्हेचे कोश जाणणारी गणपति किंवा ब्रह्मणस्पति हीच एक देवता आहे अशी तिची विशेष स्तुति केलेली आहे. प्राचीन काळापासून भाषेच्या अध्ययनाची या देशांत जी परंपरा चालत आली आहे तींत कोशनिर्मिति हें त्याचें एक प्रधान अंग आहे. वैदिक कालानंतरच्या काळांत देखील संस्कृत भाषेंत निर्माण झालेली कोशसमृद्धि विपुल आहे, हें विद्वानांस सांगण्याची जरूर नाहीं.

४. कोशनिर्मितीचें किंवा व्याकरण-रचनेचें कार्य हें जितकें महत्त्वाचें तितकेंच बिकट व दीर्घोद्योग आणि दृढव्यासंगाचें आहे. कांहीं विशिष्ट हेतु मनांत धरून कोशरचनेस जो बसतो त्याला वाङ्मयमहोदधीचें मंथन करून आपलीं रत्नें मिळवून तीं एकत्र करावीं लागतात; म्हणून बृहत्कोशरचनेसारखीं कार्यें एकट्या-दुकट्याच्या हातून होणें फार कठीण असतें.

५. मराठींत हें कार्य श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांच्या राज्यव्यवहारकोश-रचनेपासून सुरू झालें असें म्हणावयास हरकत नाहीं. इंग्रजी भाषेचा अभ्यास जसजसा वाढूं लागला तसतसा त्यांच्या वाङ्मयांत असलेल्या भिन्न भिन्न कोशांचा परिचय आपल्याकडील विद्वानांस होऊं लागला व तत्सदृश ग्रंथनिर्मिति करण्याची इच्छाहि त्यांच्यांत उत्पन्न झाली. संस्कृत भाषेच्या पंडितांनीं पूर्वकाळीं केलेल्या कोशांत शब्दसंग्रह प्रायः विषयवर्गीकरणपद्धतीवर केलेला दृष्टीस पडतो वर्णानुक्रमानें शब्दसंग्रह किंवा कल्पनासंग्रह करण्याचा प्रघात त्यांच्या काळांत असल्याचें मला तरी निदान माहीत नाहीं. यांशिवाय ते कोशवाङ्मयदेखील कंठगत करण्यास सुलभ जावें म्हणून प्रायशः पद्यात्मक म्हणजे श्लोकबद्ध असेंच होतें. इंग्रजांच्या किंवा पाश्चात्यांच्या उत्तेजनानेंच प्रथमतः वर्णानुक्रमानें जुन्या मुंबई इलाख्यांत शब्दकोश रचण्याचा उपक्रम झाला व मोल्स्वर्थ, कँडी इत्यादिकांच्या नांवानें प्रसिद्ध असलेले मराठी भाषेचे

कोश हे प्रथमतः मुख्यत्वें करून इंग्रजांना आमच्या भाषेचा अभ्यास करण्यासाठींच लिहिले गेले होते, म्हणून इंग्रजी मराठी व मराठी–इंग्रजी अशा द्विभाषिक रूपात ते प्रसिद्ध करण्यात आले होते, असे मला वाटते.

पण कोशरचना ही केवळ शालेय शिक्षण घेणाऱ्या व देणाऱ्याकरिता नसून ती भाषा बोलणाऱ्या यच्चयावत् जनतेच्या उपयोगासाठीं व तिच्या ज्ञानवृद्धीसाठी करावयास पाहिजे, हा विचार विद्वानात निर्माण होऊन मराठी भाषेचे कोश केवळ मराठींतून अर्थ देणारे असे रचण्यात येऊ लागले. कोश हे ज्ञानाचे साधन आहे, हे ठसल्यावर कोणत्याहि विषयाचे ज्ञान त्या विषयावर कोश रचून देण्याचाहि पायंडा मराठींत पडायला लागला. इतकेंच नव्हे तर विश्व ज्ञान कोशद्वारे तें लोकास देशी भाषतून देण्याचा मान, भारतात मराठी भाषेचे जाडे पंडित–ज्याना लोक मराठीचे डॉ. जॉन्सन असे विनोदानें पण एक्परी यथार्थतेनें म्हणत त्या माझे दिवंगत मित्र डॉ. श्रीधर वेंकटेश केतकर यानीं मराठी ज्ञानकोश हा प्रचंड ग्रंथ प्रसिद्ध करून मराठी भाषेस मिळवून दिला. कोणी जर मराठी वाङ्मयासंबधाचा विभूतियोग लिहायला लागला, तर त्याला कोशकर्त्यांत ' श्रीधरः कोशकारेषु ' असे वाक्य घालून त्यांच्या महत्त्वाबद्दलचा आपला आदर व्यक्त करणें भाग पडेल.

६. विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री यानीं तयार केलेले प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन चरित्रकोश हे तीन ग्रंथ त्याच्या प्रचंड व्यासंगाची आणि लोकोत्तर उद्योगाची साक्ष देतात. भारताचा वेदकालापासून तों १९४० पर्यंतचा इतिहास या चरित्रकोशात चरित्ररूपाने मोठ्या मार्मिक रीतीनें सांगितला गेला आहे. मराठींतील म्हणींचे व वाक्प्रचाराचेहि कोश तयार करण्यात आले आहेत.

७. ज्याला न्याय म्हणतात, त्याचाहि कोशरूपानें संग्रह करण्यात आला आहे. न्यायांप्रमाणेंच संकेताचाहि उपयोग प्रौढ वाङ्मयामध्यें वारंवार करण्यात येतो त्या संकेताच्या मागें असणाऱ्या विशेष अर्थाचें जर स्पष्टीकरण झालें नाहीं तर वाचकास त्या वाक्याच्या खऱ्या अर्थाचा बोध होणें कठीण जाईल. तेव्हा त्याचाहि संग्रह कोशरूपानें सार्थ अथवा स्पष्टीकरणासुद्धा उपलब्ध असणें हे भाषाभ्यासाच्या दृष्टीनें अवश्य आहे.

या ग्रंथात संख्यात्मक संकेताचाच संग्रह केला आहे शून्यापासून १०८

# पुरस्कार

[ म. म. दत्तो वामन पोतदार, कुलगुरु, पुणे विद्यापीठ ]

श्री. द्या. हणमंते यांनीं केलेला संकेत कोश जनतेच्या उपयोगी पडला. त्याच्या एकाहून अधिक आवृत्ति निघाल्या, ही आवृत्ति सुधारून वाढविलेली आहे. आजच्या जनता शिक्षणाच्या युगांत श्री. हणमंते यांचा हा कोश अधिकाधिक लोकप्रिय होत जाईल हें उघड आहे. संकेत कशाला म्हणावें ह्या आणि अशा तात्त्विक प्रश्नाचा विचार करून ह्या अशा कोशाला कांहीं बांधीव स्वरूप आणून देण्याची वेळ आली आहे असें वाटतें. याकरीं तज्ज्ञ अभ्यासू आणि लोकप्रतिनिधी यांचे परिसंवाद घडवून आणावेत आणि मग जाणकारांच्या पुढें सूचना आणि निष्कर्ष मांडून पुढील बांधणी करावी असें मला वाटतें. श्री. श्रीधर शामराव हणमंते हे स्टेशन मास्तरच्या व्यवसायांत होते आज त्यांचें वय सुमारें ८० वर्षांचें आहे अशा स्थितींत श्री. श्रीधरराव यांनी आपला उत्साह आणि सौजन्य टिकवून धरलें आहे त्याबद्दल फार संतोष वाटतो.

पुणें विद्यापीठ सौर
माघ १०, १८८५
दि. ३०।१।१९६४

दत्तो वामन पोतदार

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

**माननीय श्री न. वि. तथा काकासाहेब गाडगीळ, भूतपूर्व राज्यपाल पंजाब.**
**अध्यक्ष मराठी साहित्य संमेलन**

श्री. हणमते यांनी सकेत कोशाची दुसरी आवृत्ति प्रसिद्ध केली आहे. पहिल्या आवृत्तींत पुष्कळ भर टाकून ही दुसरी आवृत्ति यांनी काढली आहे. या दुसऱ्या आवृत्तीत काहीं ठिकाणीं टीपा जोडल्यानें यात सुबोधता अधिक आली आहे. द्वितीय आवृत्ति काढताना त्याची व्यासंगी व व्यवहारी दृष्टि स्पष्ट दिसून येते एक प्रकारें सकेत कोश म्हणजे शब्दकोशाचाच भाग असतो तथापि या कार्यात अधिक चिकट काम करावें लागतें. व्यासंग व उद्योग याशिवाय हे कार्य शक्य नाहीं आणि ह्या दोन्ही गोष्टी श्री. हणमते यांच्याजवळ असल्यानें त्यांना हें कार्य करता आलें.

प्राचीन काळापासून कोश रचना करणें हे महान् कार्य मानले जात आहे. वैदिक वाङ्मयाचे काळींहि व नतर निर्माण झालेले कोश ग्रंथ आहेत. पाणिनीनें रचलेले गणपाठ व धातुपाठ हेहि रचलेले ग्रंथ-शब्दकोशच आहेत. अमरकोश व अन्य ग्रंथ तर प्रसिद्धच आहेत. श्रीछत्रपति शिवाजी महाराजांनी तयार करविलेला राज्यव्यवहारकोश हा प्रसिद्ध आहेच.

एकोणीसाव्या शतकात इग्रजी अमलाखाली अनेक शब्दकोश निर्माण झाले. मोल्सवर्थ, कँडी त्याचप्रमाणें ज्ञानप्रकाश छापखान्यानें छापलेले मराठी शब्द कोश प्रसिद्ध आहेत. तथापि या सर्व शब्दकोशापेक्षा सकेत कोश हा अगदीं निराळा आहे डा. केतकर यांनी मराठी ज्ञानकोश प्रसिद्ध केला. त्याहीपेक्षा हा कोश निराळा आहे. या कोशात सामाजिक किंबहुना मानवी जीवनात काहीं सकेत निर्माण झालेले असतात व ते सास्कृतिक जीवनाचे अविभाज्य भाग बनलेले असतात. आणि म्हणून त्याचें ज्ञान असणें आवश्यक नव्हे इष्ट असतें.

या कोशात सख्या धरून रचना केली आहे. त्याचप्रमाणें विषय धरूनहि रचना केली आहे आणि त्यामुळे याची सार्थकता दिसून येते. हा कोश सर्वसामान्य वाचकाप्रमाणे मराठी भाषेच्या विद्यार्थ्याला इतकेच नव्हे तर

पर्यंत ज्या संख्यांचे संकेत प्राय ग्रंथांतून वा समाजांतून उल्लेखिले जातात त्यांचा या ग्रंथात ग्रंथकर्त्यांनें शोधपूर्वक संग्रह केलेला आहे. याशिवाय संकीर्ण या सदराखालीं १०० संख्येच्यावर असलेल्या 'चौऱ्यायशी लक्ष योनि', 'अठरा पद्म वानर' अशासारख्या काहीं थोड्या संकेतांचा निर्देश करून त्यासंबंधानें आधारभूत श्लोक उद्‌धृत केले आहेत. याशिवाय चार परिशिष्टांतून काहीं शब्दसंकेत, कविसंकेत 'विविध संकेत' आणि इतर वरील सदरात न बसणारे काहीं संकेत 'संकीर्ण' या शीर्षकाखालीं देऊन ग्रंथकर्त्यानें ग्रंथाची व्याप्ति व उपयुक्तता वाढविली आहे. हा संख्यात्मक संकेतांचा कोश असल्यामुळें याची रचना वर्णानुक्रमानुसार न करता संख्यानुक्रमानें म्हणजे १, २, ३ या क्रमानें केली आहे, हें वाचकांस आढळून येईल.

८. संख्यात्मक संकेत जर माहीत नसेल तर संस्कृतमधून अभ्यास करणाऱ्यास छंदःशास्त्र व ज्योतिषशास्त्र यांत संख्यांबद्दल योजिलेल्या परिभाषेचा बोध होणार नाहीं. उदाहरणार्थ, 'गायत्र्या वसव, जगत्या आदित्या, विराजो दिश, त्रिष्टुभो रुद्रा' इ. यांत पिंगल नागानें आपल्या ग्रंथांतील संख्यात्मक परिभाषेचा उपयोग 'अष्टौ वसव' या एका सूत्रानें केला आहे. वसु आठ आहेत, हा संकेत-निर्देश तत्सदृश इतर संख्यात्मक संदेशाचा प्रतीक म्हणून त्यांनीं वरील सूत्रांत केला आहे, व त्याला अनुसरून गायत्री, जगती, विराट्, त्रिष्टुप् इत्यादि छंदांतील पादांतील अक्षरसंख्या अंकानें न सांगता वसु, आदित्य, दिशा, रुद्र या सांकेतिक अंकांना सांगितले आहेत या पद्धतीमुळें सूत्रांतील ऱ्हस्वता कायम ठेवून अंकाची माहिती वाचकास यथार्थतेनें देता आली. कारण आठ वसु, बारा आदित्य, दहा दिशा, अकरा रुद्र इत्यादि संकेत वाङ्मयाभ्यासकांच्या परिचयाचे होते. ज्योतिष ग्रंथांतून पुष्कळदा संख्या-निर्देश वरील सांकेतिक शब्दांचा उपयोग करूनच करतात. संस्कृत ग्रंथांतून ग्रंथाच्या निर्मिति व समाप्तीच्या कालाच्या शकाचा निर्देश कित्येक ग्रंथकारांना केलेला आहे, पण त्यांत अंक व आंकडे यांचा उपयोग न करता संकेत शब्दांनींच केलेला आढळून येतो. लोकमान्य टिळकांनीं गीतारहस्याचें समर्पण करतांना कालनिर्देश "शाके मुन्यग्निवसुभूसंमिते शाल्विाहने" असा केला आहे. त्याचा अर्थ शके

१८२७ हा आहे. तेव्हां अभ्यासूंस व संशोधकांस सल्यात्मक संकेत व इतर संकेत यांचें यथार्थ ज्ञान अवश्य आहे, हें विस्तारानें सांगण्याची जरूर नाहीं.

९. कोश हे संदर्भ ग्रंथांत मोडतात. त्यांचा करमणुकीकरितां उपयोग होत नसतो. म्हणूनच अशा ग्रंथाचा ग्राहकवर्ग फार मर्यादितच असतो. परंतु संकेत-कोश किंवा चरित्र-कोश हे ग्रंथ असे आहेत कीं, विद्यार्थ्यांनीं फुरसतीच्या वेळीं अशा ग्रंथांचीं पानें सहज चाळलीं तरी त्यांचें मनोरंजनहि होईल व त्यांचा बहुश्रुतपणाहि वाढेल. भारतीय संस्कृतीविषयींच्या त्यांच्या ज्ञानात त्यामुळें भर पडल्याशिवाय राहणार नाहीं. उदाहरण म्हणून जर त्यांनीं १८ या आंकड्याखालीं दिलेले संकेत वाचले तर त्यांना अज्ञात पण उपयुक्त अशी कितीतरी माहिती मिळेल. विशेषतः पान २११ वरील अठरा संख्याविशेष ( महाभारतान्तर्गत ) या सदराखालीं दिलेल्या माहितीकडे फक्त अंगुलिनिर्देश करतों. ती माहिती वाचणाऱ्यास महाभारत ग्रंथाविषयीं व त्याच्या निर्मात्या व्यास ऋषीविषयीं कौतुकपूर्ण आदर वाटल्याशिवाय राहणार नाहीं.

१०. असले कोश म्हणजे आमच्या संस्कृतीतील बहुमूल्य रत्नांनी भरलेले हंडेच होत. म्हणून वाङ्मयरूपानें आमच्या सांस्कृतिक वैभवाची ओळख करून देणाऱ्या ग्रंथकारांचें मी मनःपूर्वक अभिनंदन करतों व त्यांच्या परिश्रमाचें मराठीचे सहृदय व रसिक आणि स्वाभिमानी वाचक आणि मराठी मुलखावर राज्य करणारें शासनें हे त्यांच्या या परिश्रममय सेवेचें योग्य आश्रय देऊन चीज करतील अशी आशा प्रकट करून आणि ग्रंथकर्त्यांनें हा ग्रंथ मजकडे पाठविल्याबद्दल त्यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानून हे प्रस्तावनारूप स्वल्प विवेचन संपवितो.

सिव्हिल लाईन्स, नागपूर
दि. २४-८-५८

माधव श्रीहरि अणे

# पुरस्कार

[ म. म. दत्तो वामन पोतदार, कुलगुरु, पुणे विद्यापीठ ]

श्री. शा. हणमंते यांनी केलेला संकेत कोश जनतेच्या उपयोगी पडला. त्याच्या एकाहून अधिक आवृत्ति निघाल्या, ही आवृत्ति सुधारून वाढविलेली आहे. आजच्या जनता शिक्षणाच्या युगांत श्री. हणमंते यांचा हा कोश अधिकाधिक लोकप्रिय होत जाईल हें उघड आहे. संकेत कशाला म्हणावें ह्या आणि अशा तात्त्विक प्रश्नाचा विचार करून ह्या अशा कोशाला कांहीं बांधीव स्वरूप आणून देण्याची वेळ आली आहे असें वाटतें. यासाठीं तज्ज्ञ अभ्यासू आणि लोकप्रतिनिधी यांचे परिसंवाद घडवून आणावेत आणि मग जाणकारांच्या पुढें सूचना आणि निष्कर्ष मांडून पुढील बांधणी करावी असें मला वाटतें. श्री. श्रीधर शामराव हणमंते हे स्टेशन मास्तरच्या व्यवसायांत होते आज त्यांचें वय सुमारें ८० वर्षांचें आहे अशा स्थितींत श्री. श्रीधरराव यांनी आपला उत्साह आणि सौजन्य टिकवून धरलें आहे त्याबद्दल फार संतोष वाटतो.

पुणें विद्यापीठ सौर<br>माघ १०, १८८५<br>दि. २०।१।१९६४

दत्तो वामन पोतदार

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

मान्नीय श्री न वि. तथा काकासाहेब गाडगीळ, भूतपूर्व राज्यपाल पंजाब.
अध्यक्ष मराठी साहित्य संमेलन

श्री. हणमते यांनी संकेत कोशाची दुसरी आवृत्ति प्रसिद्ध केली आहे. पहिल्या आवृत्तींत पुष्कळ भर टाकून ही दुसरी आवृत्ति यांनी काढली आहे. या दुसऱ्या आवृत्तींत काहीं ठिकाणीं टीपा जोडल्याने यात सुबोधता अधिक आली आहे द्वितीय आवृत्ति काढताना त्यांची व्यासंगी व व्यवहारी दृष्टि स्पष्ट दिसून येते एक प्रकारें संकेत कोश म्हणजे शब्दकोशाचाच भाग असतो तथापि या कार्यात अधिक किचकट काम करावें लागतें. व्यासंग व उद्योग याशिवाय हें कार्य शक्य नाहीं आणि ह्या दोन्ही गोष्टी श्री. हणमते यांच्याजवळ असल्यानें त्याना हें कार्य करता आलें.

प्राचीन काळापासून कोश रचना करणें हें महान् कार्य मानलें जात आहे. वैदिक वाङ्मयाचे काळींहि व नंतर निर्माण झालेले कोश ग्रंथ आहेत. पाणिनीनें रचलेले गणपाठ व धातुपाठ हेहि रचलेले ग्रंथ–शब्दकोशच आहेत. अमरकोश व अन्य ग्रंथ तर प्रसिद्धच आहेत. श्रीछत्रपति शिवाजी महाराजांनी तयार करविलेला राज्यव्यवहारकोश हा प्रसिद्ध आहेच.

एकोणीसाव्या शतकात इंग्रजी अमलाखाली अनेक शब्दकोश निर्माण झाले. मोल्सवर्थ, कॅंडी त्याचप्रमाणे ज्ञानप्रकाश छापखान्यानें छापलेले मराठी शब्द कोश प्रसिद्ध आहेत. तथापि या सर्व शब्दकोशापेक्षा संकेत कोश हा अगदीं निराळा आहे डॉ. केतकर यांनी मराठी ज्ञानकोश प्रसिद्ध केला. त्याहीपेक्षा हा कोश निराळा आहे. या कोशात सामाजिक किंबहुना मानवी जीवनात काहीं मन्त निर्माण झालेले असतात व ते सांस्कृतिक जीवनाचे अविभाज्य भाग बनलेले असतात. आणि म्हणून त्यांचे ज्ञान असणें आवश्यक नव्हे इष्ट असतें.

या कोशात संख्या धरून रचना केली आहे. त्याचप्रमाणे विषय धरूनहि रचना केली आहे आणि त्यामुळें याची सार्थकता दिसून येते. हा कोश सर्वसामान्य वाचकाप्रमाणें मराठी भाषेच्या विद्यार्थ्याला इतकेंच नव्हे तर

मराठी भाषेच्या विद्वानालाही उपयुक्त ठरणारा आहे. या कोशाच्या वाचनानें वाचकाच्या अंगीं बहुश्रुतता येईल, त्याच्या विदेचा आधार रुंद व सखोल होईल हे सकेत म्हणजे समाजातील वृत्तींचा व प्रवृत्तीचा इतिहास आहे. म्हणून सामाजिक दृष्टीनें सुद्धा याचें ऐतिहासिक महत्त्व कमी नाहीं.

प्राचीन काळापासून चालत आलेल्या परंपरा या सकेत शब्दानें व्यक्त होतात. त्याचप्रमाणें कांहीं सामाजिक भाव याचा इतिहास या सुप्सुटीत शब्दात दिसून येतो. उदा. चौघांनीं मसलत करू नये. यात "एक, मदगर्ती, दोन चेंगट, तीन, हर्पानें हुरळून जाणारा व चार, स्तुतिपाठक" यातील उपदेश व मार्गदर्शन श्रेष्ठ दर्जाचें आहे. या सकेत–कोशाच्या वाचनानें वाचकाला चातुर्य लाभेल तो अधिक व्यवहारदक्ष होईल यात शंका नाहीं. या दुसऱ्या आवृत्ती-बद्दल श्री. हणमते याचें मी अभिनदन करतो व मराठी जनता या ग्रंथाचें कौतुक करील अशी आशा करतो.

पुणें दि. २३ जानेवारी १९६४ — न. वि. गाडगीळ

# निवेदन

तरी न्यून तें पुरतें । अधिक तें सरतें ।
करूनि घेयावें हें तुमतें । विनवितु असे ।।

ज्ञानेश्वरी ११-८०

" व्यवहार आणि शिष्टाचार " या आमच्या पुस्तकाची द्वितीयावृत्ति (इ. सन १९४९) प्रसिद्ध करताना कांहीं गृहीत गोष्टी म्हणजे संकेत ध्यानात आले. असे काहीं संकेत त्याच पुस्तकात देण्याचा प्रथम विचार होता. परंतु जसजसा संकेतविषयक अभ्यास होऊ लागला तसतसे या विषयाचें क्षेत्र सत्यात्मक व सत्येतिरहितहि फार मोठें आहे असे आढळून आलें, म्हणून स्वतंत्र रीतीनें संकेताचें संकलन करून एक कोशच तयार करण्याचा प्रयत्न करावा ही कल्पना आली आणि सतत अभ्यासानें ती दृढ झाली. तिचेंच पर्यवसान म्हणजे प्रस्तुतचा ग्रंथ होय.

२ संकेत म्हणजे काय ? कोणत्याहि भाषेंत काहीं शब्द फार गूढार्थ-सूचक आणि बहुयसूचक असतात अशापैकींच संकेत हा एक शब्द आहे. याचे खूण, चिन्ह, इशारा वगैरे सर्वसाधारण अर्थ कोशांत दिले आहेत. पण यांसेरीज सूचक सिद्धान्त (महानुभावीय वाङ्मय), मूक संमति किंवा रूढी ( Social Conventions ), गृहीत व सर्वमान्य झालेल्या रूढ कल्पना, सिद्ध किंवा ठरलेल्या गोष्टी, काहीं विशिष्ट अलिखित नियम, सर्ल्येत परिगणित वा एखादें सूचक सांगितलेलें ज्ञान ( Figurative and Symbolical knowledge ), इत्यादि अर्थ समजतात व तसे संभाषणांत व वाङ्मयात उपयोजिलेलेहि आढळतात.

३ आपलें म्हणणें भाषेंत कितीहि शब्द घालून स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला तरी एखाद्या शब्दाचे पुष्कळ अर्थ गृहीत धरण्याची आपल्याला सवय असल्याने तो गृहीत धरलेला विशेष अर्थ ठरलेला असला तरी सर्वांना सहज कळत नाहीं. अशा शब्दानें गृहीत धरला जाणारा विशेष अर्थ म्हणजेच संकेत.

४ प्रत्यक्ष शब्दांत जो अर्थ नाहीं पण जो दूरान्वयानें ध्वनित होतो म्हणजे त्या शब्दानें ध्वन्यर्थानें व लक्षणेनें दर्शित केला जातो, तेथें संकेत उत्पन्न होतो.

काहीं शब्द, शब्दसमूह, संख्या आणि वाक्यें इत्यादींनीहि संकेत व्यक्त होतात. त्याचप्रमाणें कांच्या अक्षरांनीहि ते व्यक्त केलेले आढळतात. कांहीं संकेत तर नुसत्या शारीरिक हालचालींनीं दाखविले जातात. त्यांतच नेत्रपल्लवी, करपल्लवी इत्यादि भाषांचा समावेश होतो. इतका संकेत हा शब्द व्यापक आहे. इतकेच नव्हे तर शब्दाच्या पूर्वीची मानवी भाषा अशीच अंगविक्षेपाची असली पाहिजे असे म्हणतात.

५. संकेताची काटेकोर व्याख्या करणें कठीण आहे. तथापि क्वचित्‌कल क्वचित् म्हणजे सर्वत्र मानिलेलें ज्ञान किंवा एखादा सर्वमान्य असलेली गोष्ट अशा संकेताचा अर्थ आम्ही या ग्रंथात स्वीकारलेला आहे. उदा. आधुनिक संत चिरंजीव या सदरात दिलेल्या नावांना आज सर्वमान्यत्व आलें नसलें, तरी कालांतरानें तीं रूढ होणारच. समाजांत स्त्रीपुरुषांना परस्परांचा सन्मान करणें झाल्यास पुष्पमाला हातात द्यावी गळ्यात घालूं नये, ही उचित अशी एक सामाजिक रूढि आहे. सतत उपयोगामुळें कांहीं अक्षरांना व शब्दांना निराळाच सांकेतिक अर्थ प्राप्त होतो. उदा. ' ग ' ची बाधा यांतील 'ग ' काराचा अर्थ सांगण्याची गरज नाहीं. 'कस करूं ? काय करूं ' हा शब्दप्रयोग अनेक अस्थिर मनोवृत्तीच्या माणसांच्या तोंडीं वेळोवेळीं आढळतो. तो आम्ही व्यावहारिक दृष्ट्या " आंखरा मंत्र " म्हणून यांत समाविष्ट केला आहे. अशा रीतीनें संकेत या शब्दाचा विनियोग अनेक प्रकारें होतो 'मंत्र' शब्दाचा प्रत्यक्ष अर्थ निराळा व सांकेतिक अर्थ निराळा.

६. संकेत दोन प्रकारचे असतात एक श्रद्धाप्रधान व दुसरा कल्पनाप्रधान. श्रद्धाप्रधान संकेत वेद, पुराणें इतिहास वगैरे यांवर आधारलेले असतात. आणि कल्पनाप्रधान संकेत हे कवींनीं निर्माण केलेले असतात. या दोन्ही प्रकारांचा अंतर्भाव या ग्रंथात करण्यांत आलेला आहे.

७ संकेताची व्याप्ति ' संकेताची व्याप्ति व क्षेत्र फार मोठं आहे. सर्वसंख्येपलिकडे संकेत असतात, नव्हे अमाप आहेत. ते समाजांत व्यवहारांत तसेंच आचरणांतहि प्रत्यहीं वापरले जातात. त्या सर्वांचें संकलन हा फार मोठा विस्तार होईल व तें एकट्याटुकट्याच्या आवाक्याबाहेरचें आहे म्हणून सर्व्यात्मक असेच संकेत प्राय: या ग्रंथात दिले आहेत. शिवाय सर्वांविरहित असलेल्या संकेतांचें येथें बहुल परिगणन परिशिष्टपानें केलेलें आहे

तथापि हें क्षेत्रच असे आहे कीं मिळेल तितकी अधिक भर त्यात घालण्या-सारखी आहे. कोशग्रंथ हा वर्धिष्णु असतो.

८. कांहीं संख्यावाचक शब्द नुसतेच वापरले जातात त्या संख्येनें विशिष्ट बोध काय होतो हें प्रत्यक्ष दाखविलें जात नसतानाहि परंपरागत रूढीनें ते समाजास ज्ञात असतात. याचें प्रत्यंतर देवीच्या आरतींत आढळतें तें असें— चारी श्रमले परंतु न बोलवे कांहीं । साही विवाद करता पडले प्रवाहीं ।। या पंक्तींत चार आणि सहा म्हणजे चार वेद आणि सहा शास्त्रें, असा निश्चित अर्थ अभिप्रेत आहे.

९. 'संकेतकोशा'ची प्रथमावृत्ति सन १९५८ मध्यें प्रसिद्ध केली ती भीत भीतच कारण हा एक अगदी नवीन उपक्रम होता. तथापि प्रस्तावनेंत लोकनायक बापूजी अणे यांनीं या ग्रंथाच्या उपयुक्ततेसंबंधीं साधार विवेचन केल्यामुळें महाराष्ट्रांतील रसिक वाचकवर्गानें त्याचें चांगलेंच स्वागत केलें व सर्व प्रती थोड्याच अवधींत संपल्या. यामुळें एक प्रकारचा आत्मविश्वास निर्माण झाला म्हणून सुधारून वाढविलेल्या आवृत्तीचा हा योग आला.

१०. मराठी भाषेत चालू कोशयुगांत अनेक प्रकारचे कोश झाले आहेत व होत आहेत. अशा प्रकारच्या संकेत कोशाचीहि आवश्यकता आहे; कारण अशा संकेतांत संस्कृतीचें अंतरंग दडलेलें असतें व तें जाणून घेण्यास अशा कोशाची नितांत आवश्यकता आहे.

११. ग्रंथ सर्वसमन्वयात्मक आहे. याला कोणताहि विषय वावडा नाहीं. उदाहरणादाखल मृगयेचाच म्हणजे शिकार करणारानें नर मारावा पण मादी मारू नये, असा शिकार शास्त्रांत संकेत आहे, तो आम्हीं मृगयासंकेत म्हणून यांत समाविष्ट केला आहे तो उचित सार्थ आहे असें वाटेल.

१२. या अनेकविध संकेतांची या ग्रंथांत विशेष क्रमानें मांडणी केली आहे. त्याचें जरूर तितकें स्पष्टीकरण शक्य तेथें मुळांतील समानार्थक अवतरणें त्या त्या ग्रंथांतून उद्धृत करून केलें आहे व जरूर तो संदर्भ दिला आहे.

१३. "कोशकर्तैव जानाति कोशग्रंथपरिश्रमम् ।" अशा प्रकारच्या कोशाचें कार्य मोठें बिकट आणि श्रमाचें असतें. त्याकरितां अनेक ग्रंथ विशेष दृष्टीनें दीर्घकाल अभ्यासावे लागतात. प्रांजळपणें सांगावयाचें म्हणजे अक्षरशः शेकडों ग्रंथ अवलोकून माहिती गोळा करण्याची पराकाष्ठा केली

आहे. इतकें करूनहि कांहीं माहिती मिळूं शकली नाहीं तिथें आमचा नाइलाज झाला.

१४. ग्रथाचीं रूपरेषा सांगितल्यावर तो प्रत्यक्षांत कसा उतरला आहे हें ठरविण्याचें काम आम्ही वाचकांवर सोंपवितों. कोशासारखा सदर्भग्रथ रचणाऱ्यांना ललित लेखकाप्रमाणें द्रव्याचा आणि व्यावहारिक प्रसिद्धीचा लाभ सहसा होत नाहीं, हें कटु सत्य आहे. द्रव्यलाभ हा कोशरचनेचा स्थायी-भाव नाहींच मुळीं. केवळ हौस व आत्मसमाधान. या संदर्भात ज्ञानकोशकार डॉ. श्रीधर व्यङ्कटेश केतकर यांचें पुण्यस्मरण होणें अपरिहार्य आहे.

१५. हे सर्व खरें असलें तरी द्रव्याबाचून अडतच. एवढा सुमारें ५०० पृष्ठांचा ग्रंथ सध्याच्या महर्घतेच्या काळांत वैयक्तिक जबाबदारीवर प्रसिद्ध करणें धाडसाचें ठरलें असतें;तथापि महाराष्ट्र राज्य साहित्य आणि सस्कृति मंडळानें या कामीं रु. २५००चें अनुदान देऊन फार मोठें साह्य केलें आहे. त्याबद्दल आम्ही मंडळाचे ऋणी आहोंत. तसेंच पुणे विद्यापीठ व मराठवाडा विद्यापीठ औरंगाबाद यांज-कडूनहि साह्य झालें आहे, त्याबद्दल त्यांचे आम्ही मन पूर्वक आभार मानतों.

१६. प्रस्तुत उपक्रमाला अनेक स्नेह्यांनीं व सुहृदांनीं ग्रंथ देऊन, माहिती पुरवून व विचारविनिमयानें साह्य केलें. त्या सर्वांचीं नावें देणें अशक्य आहे. अशा सर्वांचे आम्ही आभारी आहों.

पुणें विद्यापीठाचे कुलगुरु म. म. दत्तो वामन पोतदार यांना अनेक कामांतून सवड काढून पुरस्कार दिला व माननीय श्री. न. वि. तथा काका साहेब गाडगीळ यांनीं मूल्यगामी विचार मांडणारी प्रस्तावना लिहून दिली. याबद्दल, उभयतांचे हार्दिक आभार. तसेंच डॉ मंगीरथ मिश्र, डॉ. व. ग. राहूरकर, डॉ. ग. गो. हुळपुळे व डॉ. माईणकर या तज्ज्ञांनीं ग्रंथाचें अवलोकन करून मनमोकळेपणानें अभिप्राय लिहून दिल्याबद्दल आम्ही आभारी आहों. *ग्रंथाची छपाई चालू असतांना ग्रंथात आलेले संदर्भ पडताळून पाहाण्याचे* कामीं भारत इतिहास संशोधक मंडळ, केसरी कार्यालय, भारतीय सस्कृति कोशमंडळ व टि. म. विद्यापीठाचें सस्कृत मुद्रणालय ग्रंथालय या संस्थांचा फार उपयोग झाला आहे. त्याबद्दल त्या त्या संस्थांच्या चालक मंडळींचे मन पूर्वक आभार.

१७. आमचे आप्त व सुहृद श्री. मधुकरराव जोशी, संपादक "समता" पुणें व श्री. शामराव शंकर कुलकर्णी, बी. ए. (ऑ.) सोलापूर या उभयताकडून या ग्रंथाचे कामीं अनेक प्रकारें निरपेक्ष साह्य झालें आहे, त्याबद्दल त्यास द्यावेत तेवढे धन्यवाद थोडेच आहेत.

१८ आनंद प्रेसचे मालक श्री. य. गो. जोशी यांनी सुबक छपाई केल्या-बद्दल व उपनिषत्तीर्थ श्री. द. वा. जोग यांनी मुद्रितसंशोधनाचे कामीं केलेल्या साह्याबद्दल त्यांचे मनःपूर्वक आभार. तसेच ज्या ज्या ग्रंथांतून माहिती घेतली त्या सर्व ग्रंथकारांचाहि ऋणनिर्देश करणे आमचे कर्तव्य आहे.

१९ ग्रंथलेखनाचें कार्य कितीहि कसोटीनें व कुशलतेनें केले तरी मानव हा स्खलनशील असल्यामुळे कांहीं दोष व उणीवा राहणारच. म्हणून आरसी म्हटल्याप्रमाणे 'न्यून तें पुरतें' करावें या विनंतीकडे वाचकाचें पुन्हा एकदा लक्ष्य वेधून क्षमा मागतों.

शेवटीं ज्याच्या कृपाप्रसादानें हें कार्य तडीस गेलें त्या श्रीशालाच वंदन करून आम्ही आमचें हें स्वल्प निवेदन येथेंच संपवितो.

दासनवमी, शके १८८५
गोगटे बंगला, सोलापूर.

श्रीधर शामराव हणमंते

# संशोधकांस विनंति

१. एकोणीस संजीवनी महौषधी ( रसार्थदीपिका )—असें म्हणून व्रण विरोपिणी, व्रणघ्नी, सहदेवी, ब्राह्मी व मुर्दा अशीं पाच नावें दिलीं आहेत. बाकी चौदा कोणतीं ?

२. सत्तावीस सांकेतिक लिपी (महानुभावांच्या) (म. शा. को. वि १८) महानुभाव वाङ्मयाचे अभ्यासक २५ आहेत म्हणतात कोणी १६ च म्हणतात. महाराष्ट्र सारस्वतकार सकळी, सुंदरी लिपी, पारमांडल्य लिपी, अंकलिपी, शून्यलिपी, सुभद्रा लिपी व श्रीलिपी अशीं सातच नावें देतात. निश्चित संख्या व नावें कोणतीं ?

३. एकशे सात औषधी—देवदैत्यानीं समुद्र मंथन केलें त्यापासून १०८ व्याधींच्या परिहारार्थ १०७ औषधी निघाल्या व त्यास देवांना हिमालय हें वसतिस्थान नेमून दिलें आणि तुमचें मेघ रक्षण करील असा आशीर्वाद दिला. *अशी माहिती हस्तलिखित बाडावरून मिळते.* कल्पनेनें शंख, प्रवाळ, मोती, मत्स्य, समुद्रफेस असे कांहीं सांगता येतील.

"रस संकेत कलिका" या वैद्यक ग्रंथात खालील श्लोक आढळतात.

पुरा देवैश्च दैत्यैश्च मथितो रत्नसागरः
तस्मादमृतमुत्पन्नं देवैः पीतं न दानवैः ॥ १३ ॥
तदा धन्वन्तरिकरादमृतं पतितं भुवि
तस्मिन् संपील्यमाने दर्भैर्जिह्वा द्विधाकृता ॥ १४ ॥
जिह्वा सर्पविषसंभूता सिद्धमूली महौषधी ॥

**( चामुण्डकृत रससंकेत कलिका उल्लास ३ )**

पण या मथनाचा उगम व निश्चित औषधी कोणत्या ?

☞ संशोधकांनीं याची दखल घ्यावी.

संपादक.

= = =

# ग्रंथ–संक्षेप

अ. रा. – अध्यात्म रामायण
अमर – अमरकोश
अथर्व अनु. मराठी – अथर्व वेदाचा मराठी अनुवाद
अग्नि – अग्निपुराण
आ. सूत्रावली – आन्हिक सूत्रावली
ए. भा. – एकनाथी भागवत
क. क. – कथाकल्पतरु
क. गी. – कपिल गीता
का. नी. – कामदकीय नीतिसार
कौटीलीय – कौटीलीय अर्थशास्त्र
कृ. मा. – कृष्णामहात्म्य
ग. पु. – गणेश पुराण
गरुड – गरुड पुराण
ग. वि. – गजानन विजय
गी. र. – गीतारहस्य
गौतम – गौतम धर्मसूत्रें
चरक – चरकसंहिता
चा. चि. – चातुर्य चितामणि
तत्व – निज–विवेक–तत्व–निजबोध–विवेक
तत्व. चिं. – तत्व चिंतामणि
देवी – देवी भागवत
नासदीय – नासदीय सूक्त भाष्य
नि. र. – निघंटु रत्नाकर
पा. प्र. – पांडव प्रताप
पद्म – पद्मपुराण
प्रा. च. को. – प्राचीन चरित्र कोश
बृ. ना. बृहन्नारदीय
ब्रह्म – ब्रह्मपुराण
भ. गी. – भगवद्गीता
भा. प्र. – भावप्रकाश
भाग. – भागवत
भा. रा. – भावार्थ रामायण
भा. ऐति. च. को. – भारतवर्षीय ऐतिहासिक चरित्र कोश
म. भा. – महा भारत
मा. नि. – माधव निदान
मार्कंडेय – मार्कंडेय पुराण
यो. सू. – योगसूत्रें
लिंग – लिंगपुराण
वि. स्मृ. – विष्णुस्मृति
वा. रा. – वाल्मीकि रामायण
वी. प्र. – वीरशैव प्रदीपिका
रा. गी. – रामगीता
रा. वि. – रामविजय
रा. पां. – राघव पांडवीय
रा. नि. – राज निघंटु
शा नि. – शालिग्राम निघंटु
सि. कौ. – सिद्धांत कौमुदी
सुश्रुत – सुश्रुत संहिता
स. कोश – सरस्वती कोश
सं. को. – संस्कृति कोश
स्कंद – स्कंद पुराण
सु – सुभाषित
हंस – हंसकोश
हितो. – हितोपदेश
ज्ञा. – ज्ञानेश्वरी

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १३ | १० | तुल्यास्य प्रयत्न सवर्णम् । सि. कौ. १।१।९ | यत्नो द्विविधः आभ्यन्तरो बाह्यश्च सि. कौ. १।१।९ |
| ४२ | ५ | पुरुपं | परुपं |
| ७९ | १२ | द्वापरे | द्वापर |
| ११२ | २७ | मापामुद्राश्च | मापमुद्राश्च |
| १५१ | ३ | वीर्यस्य | धर्मस्य |
| २१४ | २४ | १९६२ | १९६१ |
| २२३ | ८ | अष्टभुजा | अष्टमुद्रा |
| २३९ | १० | आठ साधारण | ' आठ साधारण रस. |
| २६६ | १४ | वृत्तहीनाश्च | वृत्तिहीनाश्च |
| ३७८ | १५ | ऐतरेय ब्राह्मण निरुक्त | सकलित |
| ४४३ | ८ | सन्निपाप | सन्निपात |



# अनुक्रमणिका


| संख्या | पृष्ठ |
|---|---|
| ० | १ |
| १ | २ ते ४ |
| २ | ४ ते १७ |
| ३ | १८ ते ५४ |
| ३॥ | ५४ |
| ४ | ५५ ते ८८ |
| ५ | ८८ ते १४७ |
| ६ | १४७ ते १७६ |
| ७ | १७६ ते २१० |
| ७॥ | २१० |
| ८ | २१० ते २४२ |
| ९ | २४२ ते २५५ |
| १० | २५६ ते २७५ |
| ११ | २७५ ते २८० |
| १२ | २८० ते २९५ |
| १३ | २९५ ते २९७ |
| १४ | २९८ ते ३०९ |
| १५ | ३०९ ते ३११ |
| १६ | ३११ ते ३२१ |
| १७ | ३२१ ते ३२२ |
| १८ | ३२२ ते ३३५ |
| १९ | ३३५ ते ३३६ |
| २० | ३३६ ते ३३७ |
| २१ | ३३७ ते ३४० |
| २२ | ३४० |

| संख्या | पृष्ठ |
|---|---|
| २३ | ३४० ते ३४१ |
| २४ | ३४१ ते ३४७ |
| २५ | ३४७ ते ३४९ |
| २६ | ३४९ ते ३५० |
| २७ | ३५० ते ३५१ |
| २८ | ३५२ ते ३५३ |
| २९ | ३५३ ते ३५४ |
| ३० | ३५४ ते ३५५ |
| ३१ | ३५६ |
| ३२ | ३५६ ते ३६२ |
| ३३ | ३६२ ते ३६३ |
| ३४ | ३६३ |
| ३५ | ३६३ |
| ३६ | ३६४ ते ३६८ |
| ३७ | ३६८ |
| ३८ | ३६८ ते ३६९ |
| ४० | ३६९ ते ३७० |
| ४१ | ३७० |
| ४४ | ३७० ते ३७१ |
| ४९ | ३७१ ते ३७२ |
| ५० | ३७२ ते ३७३ |
| ५१ | ३७३ ते ३७४ |
| ५२ | ३७४ ते ३७५ |
| ५५ | ३७६ |
| ५६ | ३७६ ते ३७८ |

| संख्या | पृष्ठ | संख्या | पृष्ठ |
|---|---|---|---|
| ५९ | ३७८ | ८४ | ३९४ ते ३९७ |
| ६० | ३७८ ते ३८० | ९० | ३९७ ते ३९८ |
| ६१ | ३८० | ९२ | ३९८ ते ३९९ |
| ६३ | ३८१ | ९५ | ३९९ ते ४०० |
| ६४ | ३८१ ते ३८६ | ९६ | ४०१ ते ४०२ |
| ६५ | ३८६ | १०० | ४०२ |
| ६८ | ३८६ ते ३८७ | १०१ | ४०२ ते ४०३ |
| ७० | ३८७ ते ३८८ | १०७ | ४०३ |
| ७२ | ३८८ ते ३९२ | १०८ | ४०३ ते ४०४ |
| ७५ | ३९२ ते ३९३ | संकीर्ण | ४०५ ते ४०८ |

| | | | |
|---|---|---|---|
| परिशिष्ट | १ लें | कटपयादि भाषापद्धति | ४०९ |
| ,, | २ रें | नदभाषा | ४१० |
| ,, | ३ रें | संख्या संकेत | ४१० |
| ,, | ४ थें | शब्द-संकेत | ४११ ते ४१५ |
| ,, | ५ वें | कवि-संकेत | ४१६ ते ४१७ |
| ,, | ६ वें | विविध-संकेत | ४१८ ते ४२३ |
| ,, | ७ वें | संकीर्ण | ४२३ ते ४३४ |
| पुरवणी | | | ४३५ ते ४५० |
| परिशिष्ट | | | ४५१ ते ४५२ |
| ग्रंथसूचि | | | ४५३ ते ४५७ |
| रसग्रहण | | | ४५८ ते ४६० |




# संकेत - कोश

## ( संख्यात्मक )

•••०D०•••

### ०

**शून्य** — अभाववाचक शब्द, पूर्ण. हे जगत् असत् आहे म्हणून ते शून्य आहे. या असत् जगाच्या बुडाशी कूटस्थ अधिकारी असे जें एक सत्तत्व वा परमात्मतत्त्व आहे त्यास शून्य, शून्याचा निष्कर्ष व शून्य विशेष अशा संज्ञा आहेत. सर्व संसाराची उत्पत्ति शून्यापासूनच झाली आहे. हे सर्व चराचर विश्व शून्यातून निघाले आहे. " शून्यातील सारें चराचर " हें शून्य " अ-गणित " व " अ-क्षय्य " आहे. ( ज्ञा. अभंग ) शून्याला वृद्धि क्षय होतच नाहींत म्हणून अक्षय्य.

**शून्यकान** – कान नाही असा प्राणी – सर्प ( प्राकृत ग्रंथात त्यास चक्षुः-श्रवा म्हणतात. )

**शून्यचरण** — चरण नाही असा प्राणी – सर्प ( प्राकृत ग्रंथांत त्यास पादोदर किंवा उरग म्हणतात.

**शून्य जिव्हा** — जिव्हा नाहीं असा प्राणी–बेडूक ( द्व. श. कोश )

**शून्यवाद** — जग हे केवळ शून्यापासून–अभावापासून उत्पन्न झाले. त्यास बौद्धाचा शून्यवाद म्हणतात. ( बौद्धदर्शन )

**शून्यशिर** — शिर नाहीं असा प्राणी–खेकडा.

## १

**एक** — एकोऽहम्-एकच ब्रह्म. ब्रह्म हें एकच आहे. एकच 'सत् स्वरूप'. 'एकोऽहम् बहु स्याम्' सर्व सृष्टीतील चराचर वस्तूंच्या उत्पत्तीचें कारकत्व या 'एक' च्या मागें आहे. (अंकशास्त्र)

**एक अग्नि, एक सूर्य आणि एकच उषा** — एकच अग्नि अनेक ठिकाणीं प्रज्वलित होतो, एकच सूर्य जगभर प्रकाश पाडतो व एकच उषा सर्व विश्व प्रकाशित करते. एकापासूनच हा सर्व पसारा झाला आहे. (ऋग्वेद ८-५८-२)

**एक आत्मा** — जगदात्मा.

**एककरपद्धति** — (**अर्थशास्त्र**) – सर्व कर काढून टाकून फक्त जमिनीच्या उत्पन्नावरच कर बसविण्याचें तत्त्व म्हणजे सर्व करांचें एकीकरण. (म. श. को.)

**एक खांबी** — ज्या कुटुंबात फक्त एकच कर्ता माणूस राहिला आहे त्यास म्हणतात. एकटाच कर्ता पुरुष असलेलें घर.

**एक चक्र** — सूर्याचा रथ (प्रामाणिक हिंदी कोश)

**एकतत्त्ववाद** — या जगात फक्त एकच सत्य तत्त्व आहे, मग तें भौतिक असो अथवा आध्यात्मिक असो. या तत्त्वज्ञानविषयक मतास एकतत्त्ववाद म्हणतात. (म. ज्ञा. को. विभाग ९)

**एक तिथि** — अखंड तिथि म्हणजे सूर्योदयापासून कर्मकालपर्यंत असलेली म्हणजे पूर्ण.

**एकदंत** — गणपति. एकदन्ताय विद्महे । वक्रतुंडाय धीमहि । तन्नो दन्ती प्रचोदयात् । (गणपति अथर्वशीर्षम्). 'नमन तुज एकदंता । एकपणें तूंचि आता' (ए. भा. १-२)

**एकनाड** — पुरुषाच्या किंवा स्त्रीच्या जन्मनक्षत्रावरून आद्य, मध्य व अन्त्य अशा तीन नाडी ठरलेल्या असतात. जन्मनक्षत्रानुसार येणारी नाडी एकच असेल तर अशा स्त्री पुरुषाचा विवाह होत नाहीं. त्यास 'एकनाड' आली असें म्हणतात.

**एक परमेश्वर** — परब्रह्म या परमेश्वर ( ईश्वर एकच आहे ).

**एकपाठी** — एकदा वाचून लगेच ज्याचे पाठ होतें असा.

**एकवाणी, एकवचनी आणि एकपत्नी** — मर्यादापुरुषोत्तम श्रीरामचंद्र.

तद् ब्रूहि वचन देवि राज्ञो यदभिकांक्षितम् ।
करिष्ये प्रतिजाने च रामो द्विर्नाभिभाषते ॥
( वा. रा. अयोध्या १९ ३० )

द्वि:शर नाभिसंधत्ते रामो द्विर्नाभिभाषते । ( सु. )

**एक मूळप्रकृति** — आदिमाया.

**एकाक्ष** — एका डोळ्याने आधळा, शुक्राचार्य.

**एकाक्षरी मंत्र** — " ॐ ". हें ईश्वराचे उत्तमोत्तम प्रतीक. यासच एकाक्षर ब्रह्म, शब्द ब्रह्म किंवा ॐकार म्हणतात. ओमिति ब्रह्म । ओमितीद सर्वम् (तैत्तिरीय शिक्षावल्ली) ॐइत्येतदक्षरमिदम् (माडुक्य) (आ) द द द म्हणजे दमन, दान आणि दया. प्रजापतीने अनुक्रमे देव, मनुष्य व असुर या आपल्या तिन्ही अपत्यास हा एकाक्षरी मंत्र दिला. ( बृहदारण्यक अ. ५-२ )

## १

**एक** — एकोऽहम्–एकच ब्रह्म. ब्रह्म हें एकच आहे. एकच 'सत् स्वरूप'. 'एकोऽहम् बहु स्याम्' सर्व सृष्टीतील चराचर वस्तूंच्या उत्पत्तीचें कारकत्व या 'एका' च्या मागें आहे. ( अज्ञात )

**एक अग्नि, एक सूर्य आणि एकच उषा** — एकच अग्नि अनेक ठिकाणी प्रज्वलित होतो, एकच सूर्य जगभर प्रकाश पाडतो व एकच उषा सर्व विश्व प्रकाशित करते. एकापासूनच हा सर्व पसारा झाला आहे. ( ऋग्वेद ८–५८–२ )

**एक आत्मा** — जगदात्मा.

**एककरपद्धति** — ( अर्थशास्त्र ) – सर्व कर काढून टाकून फक्त जमिनीच्या उत्पन्नावरच कर बसविण्याचें तत्त्व म्हणजे सर्व करांचें एकीकरण. ( म. श. को. )

**एक खांबी** — ज्या कुटुंबात फक्त एकच कर्ता माणूस राहिला आहे त्यास म्हणतात. एकटाच कर्ता पुरुष असलेलें घर.

**एक चक्र** — सूर्याचा रथ ( प्रामाणिक हिंदी कोश )

**एकतत्त्ववाद** — या जगात फक्त एकच सत्य तत्त्व आहे, मग तें भौतिक असो अथवा आध्यात्मिक असो. या तत्त्वज्ञानविषयक मतास एकतत्त्ववाद म्हणतात. ( म. ज्ञा. कों. विभाग १ )

**एक तिथि** — अखंड तिथि म्हणजे सूर्योदयापासून धर्मकालपर्यंत असलेली म्हणजे पूर्ण.

**एकदंत** — गणपति. एकदन्ताय विद्महे । वक्रतुण्डाय धीमहि । तन्नो दन्ती प्रचोदयात् । ( गणपति अथर्वशीर्षम् ). 'नमन तुज एकदंता । एकपणें तूंचि आता' ( ए. भा. १–२ )

**एकनाड** — पुरुषाच्या किंवा स्त्रीच्या जन्मनक्षत्रावरून आद्य, मध्य व अन्त्य अशा तीन नाडी ठरलेल्या असतात. जन्मनक्षत्रानुसार येणारी नाडी एकच असेल तर अशा स्त्री-पुरुषाचा विवाह होत नाही. त्यास 'एकनाड' आली असें म्हणतात.

**एक परमेश्वर** — परब्रह्म वा परमेश्वर ( ईश्वर एकच आहे ).

**एकपाठी** — एकदा वाचून लगेच ज्याचे पाठ होतें असा.

**एकवाणी, एकवचनी आणि एकपत्नी** — मर्यादापुरुषोत्तम श्रीरामचंद्र.

तद् ब्रूहि वचनं देवि राज्ञो यदभिकांक्षितम् ।
करिष्ये प्रतिजाने च रामो द्विर्नाभिभाषते ॥
( वा. रा. अयोध्या १९-३० )

द्विःशरं नाभिसंधत्ते रामो द्विर्नाभिभाषते । ( सु. )

**एक मूळप्रकृति** — आदिमाया.

**एकाक्ष** — एका डोळ्याने आंधळा, शुक्राचार्य.

**एकाक्षरी मंत्र** — " ॐ ". हें ईश्वराचें उत्तमोत्तम प्रतीक. यासच एकाक्षर ब्रह्म, शब्द ब्रह्म किंवा ॐकार म्हणतात. ओमिति ब्रह्म । ओमितीदं सर्वम् (तैत्तिरीय शिक्षावल्ली) ॐइत्येतदक्षरमिदम् ( माण्डुक्य ) (आ) द द द म्हणजे दमन, दान आणि दया. प्रजापतीनें अनुक्रमें देव, मनुष्य व असुर या आपल्या तिन्ही अपत्यांस हा एकाक्षरी मंत्र दिला. ( बृहदारण्यक अ. ५ २ )

**एक देव** — देव एकच आहे. एको देवः सर्वभूतेषु गूढः । सर्व व्यापी सर्वभूतान्तरात्मा ( श्वेताश्वेतर ६-११ )

(**एकेरी मार्ग** — मृत्यूचा रस्ता. या रस्त्यानें जाता येतें; पण परत येता येत नाही. )

**एक वेद, एक देव व एकच वर्ण** — पूर्वी एकच वेद, सर्व वाङ्मयात्मक प्रणव ( ओंकार ) एकच, नारायण हा एकच देव, एकच अग्नि, एकच वर्ण व एकच भाषा होती. 'एकवर्णाः समा भाषा एकरूपाश्च सर्वशः ।' ( वा. रा. उत्तरकांड ३०-१९ )

एक एव पुरा वेदः प्रणवः सर्ववाङ्मयः ।
देवो नारायणो नान्य एकोऽग्निर्वर्ण एव च ॥
( भागवत स्कंध ९ अ. १४ ४८ )

**एकाच वृक्षा ( देह ) वरील दोन पक्षी** — १ जीवात्मा आणि २ परमात्मा. 'द्वा सुपर्णा सयुजा सखाया'. ( मुंडकोपनिषत् )

**एक शत्रु** — अज्ञान हा मनुष्य जातीचा एक महान् शत्रु आहे. 'एकः शत्रुर्न द्वितीयोऽस्ति शत्रुरज्ञानतुल्यः पुरुषस्य राजन्।' (म. भा. शान्ति २९७-२८)

**एकात्मवाद** — आत्मा एक आहे व तो सर्वत्र व्याप्त आहे. हा वेदान्त-शास्त्राचा एक मुख्य सिद्धान्त. मूळ सांख्यशास्त्रकारांना एकात्मवाद मान्य नाही. ते आत्मे (पुरुष) अनेक मानतात. "जन्मादि व्यवस्थात: पुरुष बहुत्वम्" (सांख्यसूत्र ६-४५)

**एकाचें आश्रयानें असणारे एकवीस गुण** — १ रूप, २ रस, ३ गंध, ४ स्पर्श, ५. एकत्वम्, ६ पृथक्त्वम्, ७ परिमाण, ८ परत्व, ९ अपरत्व, १० बुद्धि, ११ सुख, १२ दुःख, १३ इच्छा, १४ द्वेष, १५ यत्न, १६ गुरुत्व, १७ द्रवत्व, १८ स्नेह, १९ संस्कार, २० अदृष्ट व २१ शब्द. (शब्द कल्पद्रुम)

**एकाध्यायी गीता** — गीतेचा अठरावा अध्याय. 'अठरावा अध्यावो नोहे। हे एकाध्यायी गीताचि आहे। जें वासरूंचि गाय दुहे। तें वेळु कायसा?'। (ज्ञा. १८ ८४)

**दोन अंगें ( धर्माची )** — ( अ ) १ तत्वज्ञान आणि २ आचार. (आ) ( सार्वकालिक ) १ अभ्युदय आणि २ निश्रेयस.

**दोन अंगें मुक्तीचीं** — १ त्रिविध दुःखनिवृत्ति व २ परमानंद प्राप्ति. ( हरिपाठ रहस्य )

**दोन अधिष्ठानें ( रोगाचीं )** १ शरीर आणि २ मन.

**दोन अधिष्ठानें (लक्ष्मीचीं)** — १ चक्र आणि २ कमल. ( सत्पुरुषांची प्रचिति )

**दोन अवस्था** — ( अ ) १ सुख आणि २ दुःख; ( आ ) १ पूर्वावस्था ( बाल्य आणि तारुण्य ) आणि २ उत्तरावस्था ( प्रौढता आणि वार्धक्य ).

**दोन अवस्था ( जीवाच्या )** — १ साधनावस्था आणि २ सिद्धावस्था. ( परमार्थ मार्ग )

**दोन अवस्था: जीवनाच्या** — १ जीवन आणि २ मृत्यु.

**दोन अवस्था विश्वाच्या** — १ जड व २ चेतन.

**दोन अस्त्रें इंद्राचीं** — १ वज्र आणि २ मदन. ( कुमार संभव )

**दोन अश्विनीकुमार** — अश्विनी नावाच्या अप्सरेचे दोन जुळे मुलगे. हे देवांचे वैद्य होते.

**दोन अक्षरी मंत्र** — "राम", "शिव" हे प्रत्येकी दोन अक्षराचे मंत्र शास्त्रीयरीत्या तारक होतात.

**दोन आदर्श भक्तश्रेष्ठ** — १ हनुमान् आणि २ अर्जुन. यानीं राष्ट्रकार्यार्थ आपलें जीवित अर्पण केलें.

**दोन आदिकारणभूत तत्वें सृष्टीचीं** — १ शिव आणि २ शक्ति किंवा १ पुरुष आणि २ प्रकृति.

**दोन आद्य शाहीर भारतांतले** — १ कुश आणि २ लव. हे श्रीरामाचे पुत्र व वाल्मीकीचे शिष्यवर. हे रामायण गीत ऋषिसमुदाय, यज्ञमंडप, अथवा राजमार्ग यावर बहुजनमनोदीपनार्थ कोठेहि गाऊन दाखवीत असत. ( आर्यारामायण बा. रा. ७-९३-५ )

**दोन ईश्वरी देणग्या ( मानवाला )** — १ स्मृति, आणि २ विस्मृति. ( समग्र सावरकर वाङ्मय. )

**दोन उपाय चित्त नाशाचे** — १ योग आणि २ ज्ञान "द्वौ क्रमौ चित्तनाशस्य योगो ज्ञानं च राघव।". (योगवासिष्ठ)

**दोन उपासना** — १ सगुणोपासना आणि २ निर्गुणोपासना.

(**दोन कारणास्तव परान्नभोजन विहित आहे** — १ परस्पर प्रेम असले तर व २ उपासमार होत असेल तर. (म भा. उद्योग ९१–२५))

**दोन कारणें कार्योत्पत्तीस आवश्यक (अध्यात्म)** — १ निमित्त कारण आणि २ उपादान कारण. द्विकारणात्मकं सर्वकार्यं। (वेदान्तसार)

**दोन गुण संस्काराचे** — १ गुणाची निर्मिति व २ दोषाचे निराकरण. (तंत्रवार्तिक)

**दोन गुप्त गंगा** — १ गयेची फल्गु व २ प्रयागची सरस्वती या दोन गुप्त गंगा होत

**दोन गोष्टी आजन्म संपादण्याच्या** — १ विद्या आणि २ धन. "अजरामरवत् प्राज्ञ विद्यामर्थं च साधयेत्। (म. भा.)

**दोन गोष्टींत भीड धरूं नये** — १ आहार, (भोजन) आणि २ व्यवहार. "आहारे व्यवहारे च त्यक्तलज्ज सुखीभवेत्।" (सु.)

**दोन गोष्टींनीं मानवाचा नाश होतो** — १ चिंता आणि २ चिता.

**दोन गोष्टी रोधता येत नाहीं** — ईप्सितार्थ मिळविण्याचा दृढनिश्चय करणारें मन आणि २ उताराकडे वाहणारा जलप्रवाह. (कुमार संभव)

**दोन गोष्टींत संयम आवश्यक** — १ जिव्हेंद्रिय आणि २ जननेंद्रिय. (गुरुचरित्र पर्व्यमाव)

**दोन चाकें संसाररथाचीं** — १ स्त्री आणि २ पुरुष.

**दोन गोष्टी स्वर्गसुखापेक्षा अधिक होत** — १ जननी आणि २ जन्मभूमि.

> नेय स्वर्णपुरी लङ्का रोचते मम लक्ष्मण ।
> जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी ॥ (सु.)

**दोन गोष्टी स्थिर (चिरंतन राहणाऱ्या)** — १ धर्म आणि २ कीर्ति.

> अस्थिरं जीवितं लोके अस्थिरे धनयौवने ।
> अस्थिरा पुत्रदाराश्च धर्मकीर्तिद्वयं स्थिरम् ॥ (सु.)

**दोन गोष्टी परत जोडतां येत नाहींत** — १ फुटलें मोतीं आणि २ तुटलें मन. 'सोनें अथवा हस्तचरण । मोडिल्या साधिती विचक्षण । फुटलें मोतीं तुटलें मन । साधू न शके विधाता ।' (मुक्तेश्वर म. भा. अ. १८)

**दोन गोष्टींत जन्माची सफलता** — १ अनायासानें मरण व २ विना देन्यानें जीवन. "अनायासेन मरण विना देन्येन जीवनम् ।" (सु.)

**दोन गोष्टींमुळें तीन आपत्ति ओढवतात** — १ अपूज्यांची पूजा आणि २ पूज्यांची अवहेलना या दोन गोष्टी जेथें होतात तेथें १ दुर्भिक्ष, २ मरण आणि ३ भय या तीन आपत्ति ओढवतात.

अपूज्या यत्र पूज्यन्ते पूज्याना तु विमानना ।
त्रीणि तत्र प्रवर्तन्ते दुर्भिक्ष मरण भयम् ॥ (सु.)

**दोन गोष्टी क्षणभंगुर** — १ तारुण्य आणि २ धन.

**दोन ग्रहणें** — १ चंद्रग्रहण आणि २ सूर्यग्रहण.

**दोन चिकित्सा** — १ मानसचिकित्सा आणि २ औषधी चिकित्सा.

**दोन चैतन्यें** — १ जीव चैतन्य आणि २ ब्रह्मचैतन्य.

**दोन तत्त्वें अनादि** — १ प्रकृति आणि २ पुरुष.

"प्रकृति पुरुषं चैव विद्धयनादी उभावपि ।" (भ. गी. १३-१९)

**दोन दोष (चित्ताचे)** — १ रजोगुण व २ तमोगुण हे चित्ताचे दोन दोष. 'रजस्तमश्च मनसो द्वौ दोषौ समुदीरितौ ।' (वाग्भट)

**दोन द्रव्याचे अतिक्रम अथवा दुरुपयोग** — १ कुपात्रीं दान करणें व २ सत्पात्री दान न करणें; हे दोन संपादन केलेल्या द्रव्याचे अतिक्रम होत.

लब्धानामपि वित्ताना बोद्धव्यौ द्वावतिक्रमौ ।
अपात्रे प्रतिपत्तिश्च पात्रे चाप्रतिपादनम् ॥
(म. भा. शांति २७-३१)

**दोन देवर्षि** — १ नारद व २ पर्वत.

**दोन द्वारपाल (श्रीविष्णूचे)** — १ जय आणि २ विजय.

**दोन धर्म** — (अ) १ विश्वधर्म व २ व्यवहारधर्म; (आ) १ सामान्य धर्म आणि २ विशेष धर्म.

**दोन धर्म मनाचे** — १ वासना आणि २ विचार. (नासदीय सूक्त भाष्य उत्तरार्ध)

**दोन धर्मधुरंधर** — १ भीष्म आणि २ श्रीकृष्ण.

**दोन धने** — १ दैवधन ( उपासना आणि कर्म ) आणि २ मनुष्यधन ( भूमि, पशु आणि सुवर्ण ).

**दोन ध्रुव** — १ उत्तर ध्रुव, २ दक्षिण ध्रुव.

**दोन नर** — १ अर्जुन आणि २ अश्व.

**दोन नृत्यें** — १ ताण्डव ( शिव–नृत्य ) आणि २ लास्य ( पार्वती–नृत्य ) असे दोन प्रकार.

**दोन पक्ष** — १ शुक्र पक्ष आणि २ कृष्ण पक्ष. पक्ष म्हणजे पंधरवडा. अमावास्येपासून पौर्णिमेपर्यंत शुक्र पक्ष व पौर्णिमेपासून अमावास्येपर्यंतचा कृष्ण पक्ष.

**दोन परम–सूक्ष्म तत्त्वें** — १ चेतन आणि २ अचेतन ( बृहस्पति तत्त्व श्लोक ६ )

**१. दोन पापपुण्याचे साक्षीदार** — १ माणसाचा आत्मा व २ परमेश्वर.

[ **२. पुराणकालीन पाकशास्त्र प्रवीण** — १ राजा नळ — गोड पदार्थ ( स्वादिष्ट उंची पदार्थांची पाकनिष्पत्ति ) आणि २ भीम — तामस ( तिखट मिठाचे पदार्थ ) यावरून त्या त्या पाकप्रकारांना अनुक्रमें नळपाक आणि भीमपाक अशा संज्ञा मिळाल्या आहेत. ( म. शब्दकोश ) ]

**३. दोन पुरुष** — १ क्षर ( विनाशी ) आणि २ अक्षर ( अविनाशी ) या विश्वांत असे हे दोनच पुरुष आहेत. ( भ. गी. १५, १६ )

**४. दोन पुरुषोत्तम** — १ मर्यादा पुरुषोत्तम – श्री रामचंद्र व २ पुराण पुरुषोत्तम – श्रीकृष्ण.

**५. दोन पुराणकालीन वार्ताहर** — १ नारद व २ संजय.

**६. दोन पुराणकालीन प्रतिज्ञा** — १ कचप्रतिज्ञा आणि २ भीष्मप्रतिज्ञा.

**७. दोन प्रकारचे अलंकार** — १ शब्दालंकार आणि २ अर्थालंकार.

**८. दोन प्रकारचे आचार** — १ शास्त्रीय आचार आणि २ लौकिक आचार.

'आचारो द्विविधः प्रोक्तः शास्त्रीयो लौकिकस्तथा'

( देवी भाग. स्कंध ९ अ १–१६ )

**दोन प्रकार अवलोकनाचे** — १ सिंहावलोकन-मागचे अनुसंधान ठेवून पुढे पाहणें व २ विहंगमावलोकन-सूक्ष्म निरीक्षण.

**दोन प्रकार ( कर्माचे )** — १ सकाम आणि २ निष्काम.

**दोन प्रकार ( सद्गुरूंचे )** — १ ध्यायी-शास्त्र आणि अनुभूति यांनी युक्त आणि २ तत्त्ववित्-हा जन्मतः सिद्ध योगी असतो. 'द्विविध्य सद्गुरूणां च ध्यायितत्त्वविदाविति.' ( योगसंहिता )

**दोन प्रकार ( काव्याचे )** — १ नारिकेलरस-काव्य-कठीण व २ द्राक्षा-रस काव्य-सुगम.

**दोन प्रकारचा काल महा कठीण** — मध्यान्ह काल २ अंतकाल.

**दोन प्रकारची कुंडली** — १ शापित आणि २ अनुगृहीत ( ज्योतिष )

**दोन प्रकार गणिताचे** — १ व्यक्त-अंकगणित व २ अव्यक्त-बीजगणित.

**दोन प्रकार गुरूंचे** — (अ) १ कारण गुरु आणि २ कार्यगुरु (नित्यानंद चरित्र) ( आ ) दीक्षागुरु आणि २ शिक्षागुरु.

(**दोन प्रकार चोराचे** — १ उघड चोर व २ गुप्त म्हणजे चरून न दिसणारा. 'प्रकाशाश्चाप्रकाशाश्च द्विविधास्तस्करा स्मृता' ( स्मृतिचंद्रिका ) /

**दोन प्रकार ग्रंथपरीक्षणाचे** — १ अंतरंग परीक्षण आणि २ बहिरंग परीक्षण.

**दोन प्रकारचे जन्म** — १ दिव्य आणि २ पार्थिव ( भ. गी. ४-९ )

**दोन प्रकार ज्योतिषाचे** — १ फलज्योतिष व २ गणित ज्योतिष.

**दोन प्रकारचे छंद** — १ वैदिक आणि २ लौकिक ( तत्त्व-निज-विवेक )

**दोन प्रकारांनीं धर्म साध्य आहे** — १ द्रव्यरूपानें-यज्ञ वगैरेमुळें व २ देहानें-तीर्थयात्रा वगैरेमुळे.

'धर्मश्च द्विविधः प्रोक्तो द्रव्यदेहद्वयेन च' । ( शिव. पु. अ १३ )

**दोन प्रकार ( धर्माचे )** — १ प्रवृत्तिपर आणि २ निवृत्तिपर.
( म. भा. शांति २४०-६ )

**दोन प्रकार ( ध्यानाचे )** — १ सगुणध्यान व निर्गुणध्यान.

**दोन प्रकार ( नमस्काराचे )** — (अ) १ भावनमस्कार व २ द्रव्य नमस्कार, ( आ ) १ व्यवहारनमस्कार व निश्चयनमस्कार ( रत्न करंडक )

**दोन प्रकार प्रपंचाचे** — १ विद्याप्रपंच आणि २ अविद्या प्रपंच. "प्रपंचो द्विविधः" (वेदांत शास्त्र)

**दोन प्रकार प्रयत्नाचे** — १ शास्त्रीय व २ अशास्त्रीय "उच्छृंखलं शास्त्रितं चेति द्विविधं पौरुषं स्मृतम्" (यो. वा. २-५-४)

**दोन प्रकारची बुद्धि** — १ संशयात्मिका आणि २ निश्चयात्मिका.

**दोन प्रकारचे ब्रह्मचारी** — १ उपकुर्वाणक (जो फिरुन गृहस्थाश्रम स्वीकारतो असा) आणि २ नैष्ठिक ब्रह्मचारी (आजन्मपर्यंतचा) (दक्ष १-८)

**दोन प्रकार भक्ताचे** — १ सकाम भक्त आणि निष्काम भक्त.

**दोन प्रकार भक्तीचे** — १ ज्ञानपूर्व भक्ति व २ ज्ञानोत्तर भक्ति (वामन पंडित) (आ) १ गौणी भक्ति-ज्ञानपूर्व भक्ति व २ पराभक्ति-ज्ञानोत्तर भक्ति. (ज्ञानेश्वरी गूढार्थदीपिका खंड ३)

**दोन प्रकार भ्रमाचे** — १ सवादीभ्रम-चांदी वाटून चांदी सांपडली तर आणि २ विसंवादीभ्रम-चांदी वाटून कर्थाल सांपडलें तर (सावित्रीचरित्र)

**दोन प्रकार मनाचे (अध्यात्म)** — १ शुद्ध-वासनांची भेसळ नसलेलें आणि २ अशुद्ध (ज्यांत काम व संकल्प असतात असें "मनो हि द्विविधं प्रोक्तं शुद्धं चाशुद्धमेव च। अशुद्धं कामसंकल्पं शुद्धं कामविवर्जितम् ॥" (अमृत बिंदु उपनिषद्)

**दोन प्रकार मौनाचे** — १ आकारमौन (उच्चार न करतां खुणेनें व्यक्त करणें) आणि २.वाङ्मौन. (उच्चारहि नाहीं व खुणेनेंहि नाहीं असें.) (अमृतानुभव-टीका)

**दोन प्रकार मंत्रांचे** — १ स्वयंभूमन्त्र आणि २ वरदमन्त्र-(वैदिक-स. पुनर्घटना)

**दोन प्रकारचे योगी** — १ गुप्तयोगी व २ व्यक्तयोगी (श्रीरामकृष्ण वाक्सुधा)

**दोन प्रकारचें विज्ञान** — १ आलय विज्ञान-अहं असें जे ज्ञान होतें त्यास म्हणतात व प्रवृत्ति विज्ञान-इंद्रियांनीं होणारें (बौद्धदर्शन)

**दोन प्रकारचा विनय** — १ स्वाभाविक आणि २ कृत्रिम. "द्विविधो विनयः स्वाभाविकः कृत्रिमश्च" (कौटिल्य)

**दोन प्रकारचे शौच** — १ बाह्य शौच आणि २ आभ्यंतर शौच. हे दोन प्रकारचे शौच अथवा पावित्र्य. " शौच तु द्विविधं प्रोक्तं बाह्यमाभ्यन्तर तथा " ( शिवतत्त्वरत्नाकर ६–९ ), ( दक्षस्मृति )

**दोन प्रकार श्रद्धेचे** — १ प्रयोजिका व २ निश्चयात्मिका,

**दोन प्रकार ज्ञानाचे** — (अ) १ अनुभव व २ स्मृति–पुनः प्रत्यय. ( न्यायदर्शन ) (आ) १ लौकिकज्ञान आणि व २ परमात्मज्ञान ( सुफीसंप्रदाय ) ( इ ) १ शब्दज्ञान आणि २ अनुभवसिद्ध ज्ञान (देवी. भा.) ( ई ) यथार्थ ज्ञान आणि २ अयथार्थज्ञान ( तर्क. )

**दोन प्रज्ञा** — १ स्थितप्रज्ञ व २ अस्थितप्रज्ञ.

**दोन प्रवृत्ति** — १ सत्प्रवृत्ति आणि २ असत्प्रवृत्ति. जगात या दोन्ही सनातन आहेत.

**दोन प्राणी भयंकर सदाची** — १ हंसणारा पुरुष आणि २ रडणारी स्त्री.

**दोन प्रकारचे योग** — १ साध्ययोग आणि २ साधनयोग ( आ ) संप्रज्ञातयोग आणि २ असंप्रज्ञातयोग. ( योगशास्त्र )

**दोन प्रकारची रूपें परमात्म्याचीं** — १ विश्वात्मक आणि २ विश्वोत्तीर्ण–निर्विकार स्थिति ( श्रीशैवागम आणि ज्ञानेश्वर )

**दोन प्रकार वेताळाचे** — १ रुद्रवेताळ आणि २ अग्निवेताळ–(आग्यावेताळ )–एक ग्राम दैवत. ( गाजलेलीं दैवतें )

**दोन प्रकार वैराग्याचे** — १ ज्ञानवैराग्य आणि २ निर्वेदवैराग्य. ( अनुभवामृत–अमृतवाहिनीटीका )

**दोन प्रकारच्या व्याधी** — १ दोषजन्यव्याधि आणि २ कर्मजन्य व्याधि–पूर्वकर्मानें प्राप्त झालेल्या.

**दोन प्रकारचीं शरीरें** — १ पार्थिव शरीर आणि २ मानस शरीर ( रघु २–५७ )

**दोन प्रकारचे संत** — १ कुटुंबसंत आणि २ समाजसंत ( संतसाहित्य )

**दोन प्रकारची संतति प्रजापतीची** – १ देव आणि २ असुर. देव हे ल्हान आणि असुर हे ज्येष्ठ ' द्वया ह प्राजापत्या देवाश्चासुराश्च । ' ( बृहदारण्यक १–३–१ )

**दोन प्रकारचा संन्यास** – १ विविदिषा सन्यास व २ विद्वत् सन्यास.

**दोन प्रकार समाधीचे** – १ संप्रज्ञात अथवा सविकल्प समाधि आणि २ असंप्रज्ञात अथवा निर्विकल्प समाधि.

**दोन प्रकार सिद्धींचे** .... १ कल्पिता व २ अकल्पिता. ( योग शिखोपनिषत् )

**दोन प्रकार शास्त्रांचे** — १ भौतिक आणि २ अभौतिक – मानसशास्त्र, अर्थशास्त्र इ.

**दोन प्रकार संकेतांचे** — १ श्रद्धाप्रधान ( शास्त्राधारावरून ठरविलेले ) आणि २ कल्पनाप्रधान. ( कविप्रतिभाजनित ).

**दोन प्रकार संस्काराचे** – (अ) १ श्रौत आणि २ स्मार्त (आ) ब्राह्म-गर्भादान इ. व २ दैवी–पाकयज्ञ इ. " द्विविधो हि संस्कारो ब्राह्मो दैवश्च " ( हारीत )

**दोन प्रकारची सृष्टि** – १ दैवी आणि २ आसुरी.

" द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन् दैव आसुर एव च " (भ. गी. १६–६)

**दोन प्रकार दास्याचे** – १ कृपादास्य आणि २ मायादास्य. ( गूढार्थ-चंद्रिका ) ( आ ) १ दैवीदास्य व २ विद्रूपत्नीदास्य ( नारदीय सूक्त भाष्य )

**दोन प्रकारचे ज्ञान** – ( अ ) १ जन्मसिद्ध आणि २ अनुभवसिद्ध; ( आ ) १ शाब्दिक ज्ञान आणि २ अनुभवजन्य ज्ञान.

ज्ञान तु द्विविध प्रोक्त शाब्दिक प्रथमं स्मृतम् ।
अनुभवाख्य द्वितीय तु ज्ञान तद्दुर्लभं नृप ॥
( देवी भाग, षष्ठ स्कंध १५–५२ )

**दोन प्रकारच्या माणसांना सुखाचा लाभ होतो** –– १ आगामी संकटाची आगाऊ तरतूद करणारा आणि २ प्रसंगी ज्याला युक्ति सुचते तो.

अनागतविधाता च प्रत्युत्पन्नमतिश्च यः ।
द्वावेव सुखमेधेते दीर्घसूत्री विनश्यति ॥
( म. भा. शांति १३७–१ )

**दोन प्रकारचे पुरुष जगांत विरळा** — १ ज्यानें जे मागितले त्याला तेंच देऊन टाकणारा आणि २ कारण स्वतः कोणापासून काहींहि न मागणारा ( कल्याण–उपनिषद् अंक ).

**दोन प्रकारचें वैर**—१ स्वाभाविक आणि २ कृत्रिम. साप आणि मुंगूस, पाणी व अग्नि, देव आणि दानव, कुत्रा व मांजर, सिंह आणि हत्ती, सज्जन व दुर्जन हीं स्वाभाविक वैराची उदाहरणें (पंचतंत्र)

**दोन प्रतिज्ञा (अर्जुनाच्या)** — १ दैन्य न भाकणें व २ युद्धात पाठ न दाखविणें. 'अर्जुनस्य प्रतिज्ञे द्वे न दैन्यं न पलायनम्' (सु)

**दोन प्रयत्न (व्याकरणशास्त्र)** — १ आभ्यंतर प्रयत्न आणि २ बाह्य प्रयत्न. आभ्यंतर प्रयत्न–वर्णोच्चाराचे वेळी उच्चारस्थानाचे आतील प्रयत्न (हा पांच प्रकारचा आहे) आणि बाह्य प्रयत्न–वर्णोच्चाराचे वेळीं जिव्हा तालु इत्यादि इंद्रियांच्या साह्यानं होणारा (हा अकरा प्रकारचा आहे)
'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' (सि. कौ. १–१–९)

**दोन प्रलय** – १ नित्यप्रलय आणि २ महाप्रलय

**दोन ब्रह्में** – (१) शब्दब्रह्म आणि २ परब्रह्म (आ) १ शब्दब्रह्म आणि २ अशब्दब्रह्म. ध्यान करण्याला योग्य असा दोन ब्रह्म
"द्वे ब्रह्मणी वेदितव्ये" मैत्रायणीयोपनिषद्

**दोन भक्तिसाधनें** — १ नामस्मरण आणि २ कीर्तन

**दोन भाग्यवान माता** – (अर्वाचीन कालीन) १ आंध्रराजा शातकर्णी याची मातोश्री गौतमीदेवी (१० वे शतक) व २ छत्रपती शिवाजी महाराजांची मातोश्री जिजाबाई (१७ वे शतक) (पुण्यश्लोक छत्रपती शिवाजी महाराज)

**दोन भाव मनाचे** — १ संकल्प आणि २ विकल्प. (मणिनावन)

**दोन महामूर्ख** — १ जुनें तेवढें चांगलें व नवीन सर्व त्याज्य म्हणून जुने कवटाळणारा आणि २ जुने सर्व वाईट व नवीन तेवढें चांगलें म्हणणारा (बर्नार्ड शॉ)

**दोन मति** — १ सुमति व २ कुमति.

**दोन मनें** — १ अंतर्मन व २ बहिर्मन. 'चित्तंहि द्विविधम्' (योगशास्त्र) (आ) १ जागृतातील मन आणि २ सुषुप्तीतील मन "द्विविधं हि मनः"

**दोन मार्गदर्शक ऋषि**—(मानव शरीरातले) १ बोध–ज्ञान आणि २ प्रतिबोध–विज्ञान "बोधप्रतिबोधौ ऋषी" (अथर्ववेद कांड ५)

**दोन मंत्री व गुप्तचर रावणाचे** — १ शुक आणि २ सारण. (वा. रा. युद्ध–सर्ग २०–१४)

**दोन मार्ग** — १ अर्चिरादि मार्ग-प्रकाशाचा व २ धूमादिमार्ग—अंधाराचा मार्ग (वेदांत)

**दोन मार्ग (जगांत आयुःक्रमणाचे)** — १ सांख्य (संन्यास मार्ग) आणि २ योग (कर्ममार्ग) (गी. र. ६०५)

**दोन मार्ग धर्मसाधनेचे** — १ प्रवृत्तिमार्ग आणि २ निवृत्तिमार्ग. 'प्रवृत्तिश्च निवृत्तिश्च द्विविध धर्मसाधनम्' (गणेश गीता ३-८)

**दोन मार्ग साधकाला मुक्ति देणारे** — १ विहंगममार्ग आणि २ पिपीलिका मार्ग. यांचे प्रवर्तक अनुक्रमे शुक व वामदेव होत.

> शुकश्च वामदेवश्च द्वे सृती देवनिर्मिते ।
> शुको विहंगम प्रोक्तो वामदेव पिपीलिका ॥
> (वराहोपनिषद् अ ४)

**दोन मीमांसा** — १ पूर्व मीमांसा (कर्मकांड) आणि २ उत्तर-मीमांसा-वेदांतशास्त्र (ज्ञानकांड).

**दोन मूलभूत तत्त्वें भारतीय तत्त्वज्ञानाचीं** — १ मी-विचार करणारा व २ तू-विचाराचा वस्तु. (ब्रह्मसूत्र भाष्य प्रस्तावना)

**दोन मंगलदायक शब्द** — १ ॐ आणि २ अथ. हे दोन्ही शब्द ब्रह्मदेवाच्या कंठांतून प्रथम बाहेर आले म्हणून मंगलदायक गणले आहेत.

> ॐकारश्चाथशब्दश्च द्वावेतौ ब्रह्मण पुरा ।
> कंठं भित्त्वा विनिर्यातौ तस्मान्मांगलिकावुभौ ॥ (स्मृति)

**दोन राष्ट्रीय गीतें (भारतीय)** — १ वंदेमातरम्-बंकिमचंद्र आणि २ जन गण मन (टागोर)

**दोन लक्षणें दोघांचीं (मित्र-शत्रू)** — १ उपकार-मित्रलक्षण व २ अपकार हें शत्रूचें लक्षण.

"उपकारफलं मित्रमपकारोऽरिलक्षणम्" (वा. रा. किष्किंधा ८-२१)

**दोन राष्ट्रीय महाकवि** — १ व्यास आणि २ वाल्मीकि.

**दोन रूपें ब्रह्माचीं** — १ साकार आणि २ निराकार "द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तं च" (वेदान्तशास्त्र)

**दोन लक्षणें (पदार्थाची)** — १ तटस्थ लक्षण-पोषाख वगैरे म्हणजे बदलणारे आणि २ स्वरूप लक्षण-विद्या शील वगैरे-टिकणारे (वेदान्त)

**दोनवाद (अनादि)** — १ भोगवाद आणि २ त्यागवाद (पुरुषार्थ-बोधिनी भ. गी.) (आ) १ प्रतिबिंबवाद व २ अवच्छेद वाद (विचार चद्रोदय) (इ) १ सृष्टि-दृष्टिवाद-सृष्टीवर ज्ञान अवलंबून आहे आणि २ दृष्टि-सृष्टिवाद-दृष्टीवरच सृष्टि अवलंबून आहे.

(**दोन विचारधारांचे प्रतीक असे दोन भारतीय खेळ** — १ सोंगट्या-दैववाद आणि २ बुद्धिबळें-प्रयत्नवाद (यादवी संस्कृति कोश) )

**यादवीची दोन प्रबल कारणें** — १ कनक आणि २ कांता. हीं कोणताहि विग्रह उत्पन्न होण्याचीं दोन मूल कारणें. 'कामिनी कनक कार्य कारण विग्रहस्य वै' (देवी भाग. चतुर्थ स्कंध १०-६).

**दोन विद्या** — (अ) १ पराविद्या-आत्मविद्या-ब्रह्मविद्या आणि २ अपराविद्या-ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्ववेद आणि १ शिक्षा २ कल्प, ३ व्याकरण ४ निरुक्त, ५ छंद, व ६ ज्योतिष ही सहा वेदांगें. "द्वे विद्ये वेदितव्ये" (मुण्डक १-१-४)

(आ) १ शस्त्रविद्या व २ शास्त्रविद्या. "विद्या शस्त्रस्य-शास्त्रस्य द्वे विद्ये प्रतिपत्तये" (हितो.)

(इ) १ बला आणि २ अतिबला. सर्व प्रकारच्या ज्ञानाचें उगमस्थान. अशा या देवनिर्मित दोन विद्या-बला आणि अतिबला विश्वामित्रानें श्रीरामास दिल्या. (वा. रा, बाल. सर्ग २२-१७)

**दोन वैरी यथार्थ ज्ञानाचे** — १ निंदा व २ स्तुति.

**दोन वंश** — १ जन्मवंश आणि २ विद्यावंश.

**दोन शब्दांत दोन संस्कृति** — १ श्रुतिस्मृतिपुराणोक्त-पौरस्त्य आणि २ अद्ययावत्-पाश्चात्य (सावरकर)

**दोन विशेष (लाभ) संस्काराचे** — १ गुणांची निर्मिति व २ दोषांचे निराकरण (तत्वार्तिक)

**दोन शक्ति मायेच्या** — १ आवरण-अधिष्ठानास झाकणारी आणि २ विक्षेप-विपरीत भासविणारी (हरिवरदा १८-४)

**दोन शरीरें (रूपें) रुद्रदेवतेचीं** — १ घोर शरीर आणि २ शिवशरीर (रुद्राध्यायदीपिका)

**दोन शाश्वत नेत्र (मानवाचे)** — १ श्रुति–मत्रामनन्द आणि २ स्मृति—धर्मानुकूल–साहित्य "श्रुतिस्मृती उभे नेत्रे" (सु)

**दोन संपत्ति** — १ दैवी संपत्ति आणि २ आसुरी संपत्ति.

**दोन साधनें दैवाला अनुकूल करून घेण्याचीं** — १ प्रयत्न आणि २ प्रार्थना (विचार पोथी)

**दोन साधनें ज्ञानाचीं** — १ शास्त्राभ्यास व २ गुरूपदेश

**दोनच खरे परदेशी** — १ जीवन आणि २ झाडाचे पान (राजस्थानी लोककथा)

**दोनच खरे यात्रेकरू** — १ सूर्य आणि २ चंद्र (भोज–लोककथा)

**दोनच खरे राजे** — १ इंद्र आणि २ यम (भोज–लोककथा)

**दोघेजण अंगीकारलेलें काम पूर्णतेस नेण्यास बद्धपरिकर होत** — १ राजा (राज्यशासनकर्ते) आणि २ बहुश्रुत ब्राह्मण

'द्वौ लोके धृतव्रतौ राजा च ब्राह्मणश्च बहुश्रुतः' (गौतम धर्मसूत्र ८–१)

**दोघेजण दुर्मिळ** — १ अप्रिय पण हितकर असे सांगणारा व २ ते ऐकून घेणारा 'अप्रियस्य च पथ्यस्य श्रोता वक्ता च दुर्लभः' (वा रा अरण्य ३७–२)

**दोघेजण जलसमाधि देण्यास योग्य** — (अ) १ धनिक असून दान न देणारा आणि २ दरिद्री असून तपस्या (कष्ट) न करणारा

द्वावम्भसि निवेष्टव्यौ गले बद्ध्वा दृढां शिलाम् ।
धनवन्तमदातारं दरिद्रं चातपस्विनम् ॥ (म भा उद्योग ३३–६०)

**दोघेजण जगमित्र** — १ निंदक–पाप हरण करणारा व २ अतिथि–सद्गति मिळवून देणारा

अतिथिश्चापवादी च द्वावेतौ विश्वबान्धवौ ।
अपवादी हरेत्पापमतिथिः स्वर्गसंक्रमम् ॥ (मार्कंडेय पु)

**दोघेजण पराजित होत** — (अ) १ कर्ज घेणारा आणि २ मुलीचा बाप (मारवाडी–लोककथा) (आ) १ लोभी गुरु आणि २ लालची चेला (कबीर)

**दोघेजण विपरीत कर्मांमुळें फजित होतात** — १ गृहस्थाश्रमी असून कर्तव्यपराङ्मुख आणि २ भिक्षुक असून खटपटी.

अनारम्भो गृहस्थश्च कार्यवांश्चैव भिक्षुक ।
उभौ तौ न विराजेते विपरीतेन कर्मणा ॥ ( रामगीता ९–७ )

**दोघेजण सूर्यमंडलाचा भेद करून जाणारे** — १ समाधांत देहत्याग करणारा योगी आणि २ धारातीर्थी मरण आलेला.

( म. भा उद्योग ३३–६१ )

**द्विजिव्ह** — १ सर्प आणि २ चहाडखोर.

**द्वितत्ववाद** — दोन परस्पर विरोधी तत्वांमुळेच जगातील सर्व गोष्टींचा खुलासा करता येतो असें प्रतिपादणारें मत.

**द्विविधनिष्ठा** — १ सांख्ययोग आणि २ कर्मयोग. या दोन निष्ठा म्हणजे अनुष्ठानतत्परतेचे मार्ग. ( भ. गी. ३–३ )

**द्विविध विश्व** — १ जड–२ चेतन, १ पुरुष–२ प्रकृति, १ साकार – २ निराकार, १ स्थूल–२ सूक्ष्म, १ अचेतन–२ सचेतन.
असें हें एकदर विश्व द्विविध आहे.

**द्वैत** — ( पंचभेदवाद ) १ ब्रह्म व जीव २ जीव व जगत् ३ ब्रह्म व जगत् ४ जगातील पदार्थ व ५ जीवाजीवांत भेद मानणारें मत.

**द्वंद्व** — जोडी–युग्म. दोन परस्पर विरुद्ध गोष्टी साहचर्याने राहतात. अशीं अनेक द्वंद्वें या जगांत आहेत. उदा.—जड–चेतन, पुरुष–प्रकृति, देव–दैत्य, प्रपंच–परमार्थ, प्रकाश–अंधकार, राग– लोभ, सुख–दुःख, शीत–उष्ण, धर्म–अधर्म, पुण्य–पाप, ज्ञान–अज्ञान, उत्पत्ति–लय, लाभ–हानि, जय–पराजय, निंदा–स्तुति, मान–अपमान, शत्रु–मित्र, सज्जन–दुर्जन, सत्–असत्, आशा–निराशा, शाप–आशीर्वाद, प्रवृत्ति–निवृत्ति, त्याग–भोग, हिंसा–अहिंसा, दिवस–रात्र, प्रेम–द्वेष, हर्ष–शोक, नीति–अनीति, शुभ–अशुभ, सम–विषम, सगुण–निर्गुण, विधि–निषेध, नित्य–अनित्य, व्यष्टि–समष्टि, द्वैत–अद्वैत, विवेक–वैराग्य, जन्म–मरण, बंध–मोक्ष, आवड–नावड, उत्क्रांति–अपक्रांति, शिव–अशिव, मंगल–अमंगल, शरीर–आत्मा, जुनें–नवें, सनातनी–सुधारक, मृत्यु–जीवन, सापेक्ष–निरपेक्ष, स्त्री–पुरुष इ.

# ३

**तीन अकारण वैरी** — १ हरिण-पारधी, २ मासे-मासेमारू लोक आणि ३ साधु-दुष्टजन. या तिघांना हे तीन अकारण वैरी असतात. ( बृहन्नारदीय पूर्वखंड ३७-३८ )

**तीन अग्नि** — ( अ ) १ ज्ञानाग्नि ( शुभ अशुभ कर्मांतें हें जाणतो तो ), २ दर्शनाग्नि ( रूपादिकाचें दर्शन करवितो ) व ३ कोष्ठाग्नि ( खाल्ले प्यालेले जो पचवितो तो ) असे तीन प्रकार.

( आ ) १ दावाग्नि २ वडवाग्नि व ३ जठराग्नि.

( इ ) १ पिता-गार्हपत्य अग्नि, २ माता-दक्षिणाग्नि व ३ गुरु-आहवनीय अग्नि हे तिघे श्रेष्ठ होत

पिता वै गार्हपत्योऽग्निर्माताग्निर्दक्षिण स्मृत ।
गुरुराहवनीयस्तु साग्नित्रता गरीयसी ॥ ( मनु. २-२३१ )

**तीन अंगें ( धर्माचीं )** — १ आचार, २ व्यवहार व ३ प्रायश्चित्त.

**तीन अतिदानें** — १ गाय, २ भूमि व ३ विद्या

" त्रीण्याहुरतिदानानि गावः पृथ्वी सरस्वती " ( पद्म ३३-१८

**तीन अंतःकरणदोष ( वेदान्त )** — १ मलदोष, २ विक्षेपदोष व ३ आवरण दोष. ( विचारचंद्रोदय )

**तीन अयोनिसंभव स्त्रिया** — १ वेदवती, २ जानकी व ३ द्रौपदी या तिघी अयोनिसंभव होत्या अशी कथा आहे

" संभूता वाङ्मयीकन्या नाम्ना वेदवती स्मृता " (वा. रा. उत्तर, सर्ग १७-९)

**तीन अवस्था** — ( अ ) १ जागृति, २ स्वप्न आणि ३ सुषुप्ति याना अवस्थात्रय म्हणतात, ( आ ) १ उत्पत्ति, २ स्थिति व ३ लय.

**तीन अवस्था ( आत्म्याच्या )** — १ बहिरात्मा, २ अंतरात्मा व ३ परमात्मा. आत्म्याच्या अशा तीन अवस्था जैन धर्मात मानिल्या आहेत. ( कल्याण साधनांक )

**तीन अवस्था ( देहाच्या )** — १ बाल्य, २ तारुण्य आणि ३ वार्धक्य.

**तीन अवस्था नृत्यकलेच्या** — १ लयतालमूलक, २ भावमूलक, आणि ३ रसमूलक. या तिन्ही प्रकाराचा परस्पर सहयोग म्हणजे नाट्य (नवयुग दि. अंक)

**तीन अवस्था (जीवनाच्या)** — १ पुत्र, २ पति आणि ३ पिता.

**तीन अवस्था (स्त्रीजीवनाच्या)** — १ कन्या, २ कांता व ३ माता.

**तीन अवस्था (प्रेमाच्या)** — १ पूर्वराग (गुण ऐकून अथवा चित्र वगैरे पाहून उत्पन्न होणारे प्रारंभिक प्रेम), २ मीलन आणि ३ वियोग. (कल्याण योगांक ६२)

**तीन अवस्था (बाल्यदशेच्या)** — १ कौमार (एक ते पाच वर्षे), २ पौगंड (सहा ते दहा वर्षे) आणि ३ कैशोर (दहा ते पंधरा वर्षे) अशा बाल्यदशेच्या तीन अवस्था असतात.

> कौमारं पञ्चमाब्दान्तं पौगण्डं दशमावधि ।
> कैशोरमापञ्चदशाद्यौवनं तु ततः परम् ॥
> (भाग. स्कं १० अ. १२ तळटीप)

**तीन अवस्था मानवी जीवनांतील** — १ संकल्प २ साधना व ३ सिद्धि.

**तीन अवस्था (सृष्टीतील पदार्थांच्या)** — १ घनरूप, २ द्रवरूप आणि ३ वायुरूप. यच्चावत् सृष्टीतील सर्व पदार्थांच्या या तीन अवस्था असतात.

**तीन अर्थ** — १ वाच्यार्थ, २ लक्ष्यार्थ आणि ३ व्यंग्यार्थ असे तीन प्रकारचे अर्थ एकाच शब्दापासून बोधित होतात, असे अलंकारशास्त्रात मानले आहे.

**तीन अमावास्या** — १ आषाढ वद्य अमावास्या (दीपपूजा), २ श्रावण वद्य (पिठोरी) आणि ३ भाद्रपद वद्य (सर्वपित्री) या तीन अमावास्या विशेष प्रसिद्ध आहेत.

**तीन अवतार (वायुदेवतेचे)** — १ श्रीहनुमान, २ भीमसेन व ३ पूर्णप्रज्ञ (श्रीमध्वाचार्य.)

> प्रथमो हनुमन्नाम द्वितीयो भीम एव च ।
> पूर्णप्रज्ञस्तृतीयस्तु भगवत्कार्यसाधकः ॥ (वायुस्तुति–फलश्रुति)

**तीन अश्रु** — १ आनंदाश्रु, २ दुःखाश्रु आणि ३ नदाश्रु.

**तीन अक्षरी मंत्र** — ( १ ) श्रीराम, ( २ ) ॐ हा, अ, उ, म हा तीन अक्षरे मिळून झाला आहे. " ॐकार । वेदानासी आधार । हा राज राजेश्वर । अवघ्या मंत्रांचिया " ( शंकराचार्य चरित्र अ ३१–१०० ) अ ( सत्त्व ), उ ( रज ), म् ( तम ), अर्धमात्रा हे शिवाचे स्वरूप. ( हे वर्णत्रय म्हणजे या त्रिगुणांचे निदर्शक शक्तिस्वरूप होय. ( ३ ) ' ॐ राम् ' हा एक महान् बीज मंत्र. वैदिक काळी सीमा प्रदेश ॲलाटण्याच्या आक्रमकांशी लढत असताना याच मंत्राचा उद्घोष करीत असत. ( रोहिणी जून १९६३ ) ( ४ ) " ॐ तत् सत् " ही ब्रह्म वाचक तीन अक्षरे आहेत असता ज्याचे उत्पत्तिस्थान आणि विश्रांतिस्थान, नाम–जाति–रहित, आरंभरहित अशा परब्रह्मासच ॐ तत् सत् हे नाव आहे. ( प्रसाद आगस्ट १९६३ )

**तीन अक्षरात तीन गोष्टींचे प्रतिनिधित्व** — १ भ–र–त. भ–भाव ( भावाविष्कार ) २ र–राग ( रागाविष्कार ) ३ त–ताल ( प्रमाणबद्धता ) ( नवयुग दि. अंक १९५० )

**तीन अलंकार** — १ शब्दालंकार, २ अर्थालंकार व ३ उभयालंकार हे मुख्य तीन यात वाणीचे सर्व प्रकार येतात. अलंकाराची संख्या ६८ आहे. ( म. शब्द कोश )

**तीन अवतारांची तीन मूल्ये** — श्रीराम–सत्य, श्रीकृष्ण–प्रेम व श्रीगौतमबुद्ध–करुणा. ( महाराष्ट्रात विनोबा )

**तीन आदर्श ( स्त्रियांचे )** — १ सती, २ सीता आणि ३ सावित्री.

**तीन आदर्श पतिव्रता** — १ अनसूया, २ द्रौपदी व ३ दमयंती. अनसूया द्रुपदात्मजा दमयन्ती दुख–दीन । निजसतीत्वके तेजसे चमक उठीं ये तीन । ( कल्याण–हिंदुसंस्कृति अंक )

**तीन आद्य महाकवि** — १ ब्रह्मा, २ वाल्मीकि व ३ व्यास

**तीन आधार धर्माचे ( वैदिक )** — ( अ ) १ यज्ञ, २ अध्ययन व ३ दान

त्रयो धर्मस्कधा यज्ञोऽध्ययन दानमिति ( छा. उप. २–२३–१ )

( आ ) १ श्रुति, २ स्मृति व ३ पुराणे हे तीन आधार धर्मशास्त्रात

माननात. म्हणून कोणत्याहि कर्मांचे आरंभी ' श्रुतिस्मृतिपुराणोक्त " असा सकल्प म्हटला जातो

**तीन आधारस्तंभ शरिराचे** — १ आहार, २ निद्रा व ३ ब्रह्मचर्य. या तिन्हींच्या उचित उपयोगावर शरिरात बल, वर्ण व आयुष्य यांची वृद्धि होते. ( चरक. सूत्रस्थान अ. ११ ).

**तीन आनंद ( वेदांत )** — १ ब्रह्मानद, २ वासनानद व ३ विषयानद. ( पचदशी ११–८७ )

**तीन आविर्भाव एकमात्र महाजीवनाचे** — १ जन्म, २ मृत्यु आणि ३ पुनर्जन्म. ( धवलगिरि )

**तीन उपदेशपद्धति ( वाङ्मयात )** — ( अ ) १ वेद–प्रभुसमित उपदेश–जा. २ पुराणें–मित्रसमित उपदेश–आयला पाहिजे. ३ काव्यबोध–कांतासमित उपदेश–जयचे ना ? ( आ ) १ प्रभुवाक्य–( स्वत प्रमाण ) २ मित्रवाक्य ( परत प्रमाण ) व ३ कांतावाक्य ( प्रमाण–अप्रमाणाचा प्रश्न नाही. )

**तीन उपमाता** — १ दाई, २ पालन करणारी मातेशिवाय दुसरी बाई आणि ३ सावत्र आई.

**तीन उपाय मोक्ष प्राप्तीचे** — १ वैराग्य, २ आत्मज्ञान आणि ३ भक्ति. ( प्रबोधसुधाकर )

**तीन एषणा ( इच्छा )** — ( अ ) १ पुत्रैषणा, २ वित्तैषणा आणि ३ लोकैषणा. ( आ ) १ प्राणैषणा, धनैषणा व परलोकैषणा या तीन ईषणा सफल करण्याच मानवी जीवनाचे उद्दिष्ट असते ( चरक सूत्रस्थान ) ( इ ) १ आहारसंज्ञा, २ परिग्रहसंज्ञा व ३ मैथुनसंज्ञा ( जैन दर्शन ) ( ई ) १ भवतृष्णा, २ विभवतृष्णा व ३ कामतृष्णा ( बौद्धदर्शन ) ( उ ) १ इज्जत, २ दौलत व ३ हुकुमत ( फारशी ) ( ऊ ) १ वाईन २ वेल्थ व ३ वुमेन ( इंग्रजी ) ( ए ) १ आहारेच्छा, २ धनेच्छा व ३ स्त्रीच्छा ( देवी भागवत ).

**तीन ऋतु** — १ उन्हाळा, २ पावसाळा व ३ हिवाळा.

**तीन ऋणें** — ( अ ) १ देवऋण, २ ऋषिऋण आणि ३ पितृऋण. मनुष्य जन्मास येतो ता हीं तीन ऋणें घेऊन येतो. तीं यज्ञ, स्वाध्याय व

पुत्रोत्पादन इत्यादींनीं फेडावयाचीं असतात. 'ब्रह्मचर्येण ऋषिभ्यो यज्ञेन देवेभ्य प्रजया पितृभ्य' ' (वै. संहिता). चवथें समाजऋण (भक्तिरसायन) (आ) १ मातृऋण, २ पितृऋण व ३ पत्नीऋण–(श्रीरामकृष्ण).

**तीन ऐकांतिक भक्तश्रेष्ठ** — १ *विवस्वत्* २ *मनु आणि* ३ *इक्ष्वाकु* यांना ऐकांतिक भक्तीचें गुह्य ज्ञान नारायणानें सांगितलें (भ. गी. ४–१)

(**तीन 'क' कार** — १ कनक, २ कांता आणि ३ कादंबरी हे तीन क'कार प्रभावी आहेत.)

**तीन ललितकला** — १ नर्तन २ गायन, आणि ३ वादन.

'नृत्य गीत च वाद्य च त्रय ललितमुच्यते' (भ. ना.)

**तीन कर्में मनुष्याला पावन करणारीं** — १ यज्ञ, २ दान, व ३ तप. (भ गी. १८–५)

**तीन कर्मांनीं पुत्रधर्माची सार्थकता** — असेतोपर्यंत मातापित्यांचे आज्ञापालन २ कालतिथीस त्यांचे स्मृतीप्रीत्यर्थ अन्नदान व ३ गयेंत पिंडदान.

जीवतो वाक्यकरणात् क्षयाहे भूरिभोजनात् ।
गयायां पिण्डदानाच्च त्रिभि पुत्रस्य पुत्रता ।

(देवी ६४१०)

**तीन कारणें कर्म घाडण्याचीं** — १ उपादान कारण, २ निमित्तकारण आणि ३ मूलकारण (वेदान्त)

**तीन काळ** — (अ) १ सकाळ, २ दुपार आणि ३ संध्याकाळ. (कालविभाग), (आ) १ भूतकाळ, २ वर्तमानकाळ आणि ३ भविष्यकाळ

**तीन कायिक (शारीरिक) पापें** — (अ) १ दिल्याविना एखादी वस्तु घेणें, २ निषिद्ध हिंसा आणि ३ परस्त्रीसंगम हीं तीन शारीरिक पाप होत. (आ) १ हत्या, २ चौर्य व ३ परदारागमन.

अदत्तानामुपादान हिंसा चैवाविधानत ।
परदारोपसेवा च कायिक त्रिविध स्मृतम् ॥

(मनु १२–७)

**तीन किरणयुक्त अथवा प्रकाशमान देव** — १ अग्नि, २ वायु आणि ३ सूर्य. (अथर्व अनु–मराठी)

**तीन क्रिया (प्राणायामाच्या)** — १ पूरक–श्वास आत घेणे, २ कुंभक–श्वास स्थिर करणे व ३ रेचक–श्वास बाहेर सोडणे या तीन क्रियांनी प्राणायाम पूर्ण होतो.

**तीन काळचीं तीन नावें (गायत्रीचीं)** — १ गायत्री, २ सावित्री आणि ३ सरस्वती.

गायत्रीनाम पूर्वाह्णे सावित्री माध्यमे दिने ।
सरस्वती च सायाह्ने एवं सन्ध्या त्रिधा स्मृता ॥ (वेदव्यास श्रुति)

**तीन 'ग' कार** — १ गणक, २ गणिका आणि ३ गणिती.

**तीन गण** — १ देवगण, २ मनुष्यगण आणि ३ राक्षसगण अशा मनुष्याच्या तीन कोटी, प्रकार अथवा गण आहेत (कुंडली)

**तीन गति (द्रव्याच्या)** — १ दान, २ भोग आणि ३ नाश. या तीन प्रकारांनी द्रव्याचा विनियोग होतो.

दानं भोगो नाशस्तिस्रो गतयो भवन्ति वित्तस्य । (भर्तृ. नीति ४३)

**तीन गति नाडीच्या** — १ वक्र, २ त्वरित व ३ स्थिर (नाडीविज्ञान)

**तीन गया** — १ मातृगया (सिद्धपूर–गुजराथ), २ पितृगया (गया–बिहार) व ३ शिवगया–काशी (काशीखंड)

**तीन गुण** — १ सत्त्वगुण, २ रजोगुण आणि ३ तमोगुण

'सत्त्व रजस्तमश्चेति प्रसिद्ध हि गुणत्रयम्' (रा. गी. ११–३). जगत जें जें आहे तें तें सर्व या तीन गुणांनी व्याप्त आहे.

त्रिविधस्त्रिविध कृत्स्न संसार सार्वभौतिक (मनु. १२–५१)

**तीन गुण–(काव्याचे)** — १ उपमा, २ अर्थगौरव आणि ३ पदलालित्य असा तीनहि गुणसंपन्न संस्कृतवाङ्मयांत माघ कवि होऊन गेला.

"उपमा कालिदासस्य भारवेरर्थगौरवम्
दण्डिनः पदलालित्यं माघे सन्ति त्रयो गुणाः" (सु.)

**तीन गुण (वाङ्मयातले)** — १ माधुर्य, २ ओज व ३ प्रसाद.

**तीन गुण मायेचे** — १ उत्पत्ति २ पालन आणि ३ संहार.

माया के गुण तीन है । उत्पत्ति पालन संहार ॥ (कबीर),

**तीन गुण स्त्रीचें मूल्य वाढविणारे** — १ रूप, २ शील आणि ३ स्वभाव (योगीश्वर याज्ञवल्क्य)

**तीन गोष्टी ( दु:ख परिहार करणाऱ्या )** — १ सुभाषितरसास्वाद, २ प्रौढपत्नी–समागम व ३ विरक्त अधिकाऱ्याची सेवा

सुभाषितरसास्वाद: प्रौढस्त्रीसमागमस्तथा ।
सेवा विवाक्तना राज्ञा दु:खनिर्मूलन त्रयम् ॥ ( सु. )

**तीन गोष्टी ( देवाधीन )** — १ अन्न, २ मान, ३ धन

अन्न मान धन । हें तो प्रारब्ध–आधीन ॥ ( तुकाराम )

**तीन गोष्टी (निरर्थक होत)** — १ किमयेनें द्रव्यप्राप्ति, २ शास्त्र मार्गानें मोक्ष व ३ जावयाचे ठिकाणीं पुत्रत्वबुद्धि—

धातुवादेन वित्ताशा मोक्षाशा कौलिके मते ।
जामातरि च पुत्राशा त्रयमेतन्निरर्थकम् ॥ ( सु. )

**तीन गोष्टी ( परत येत नाहींत )** — १ सुटलेला बाण, २ बोललेला शब्द आणि ३ गेलेली नष्ट झालेली सत्कर्म करण्याची संधि

**तीन गोष्टी पहाटे उठणारास प्राप्त होतात** — १ आरोग्य, २ लक्ष्मी आणि ३ शहाणपणा

**तीन गोष्टी ( पुरुषार्थे विडंबन करणाऱ्या )** — ( अ ) १ अधवट ज्ञान, २ द्रव्यसंपादित मैथुन आणि ३ पराधीन भोजन ( आ ) १ वृद्धपणीं भार्यावियोग, २ नातलगांच्या हातीं संपत्ति जाणें व ३ परस्वाधीन भोजन

खण्ड खण्ड च पाण्डित्य क्रयकीत च मैथुनम् ।
भोजन च पराधीन तिस्र: पुंसां विडम्बनम् ॥( सु. )

**तीन गोष्टींचा प्रभाव ( अतर्क्य असतो )** — १ रत्नें, २ मंत्र व ३ औषधी

" अचिन्त्यो हि मणिमन्त्रौषधीनां प्रभावः ( माणिक्य )

**तीन गोष्टींनीं प्रापंचिकास सुख होतें** — १ सुंदर अपत्य, २ हसतमुखी सुंदर स्त्री व ३ सज्जनसमागम ( वृद्ध चाणक्य ४–१० )

**तीन गोष्टींमुळें मनुष्य गुरफटला जातो** — १ लोभ, २ प्रमादीपणा आणि ३ विश्वास

लोभात्प्रमादाद्विश्रम्भात् पुरुषो बध्यते त्रिभि: ।
तस्माल्लोभो न कर्तव्यो न प्रमादो न विश्वसेत् ॥

( सुभाषित–सागर ८१–७७ )

**तीन गोष्टी यावज्जीव वंदनीय** — १ वेदान्त, २ श्रीगुरु आणि ३ ईश्वर.

यावज्जीव त्रयो वन्द्या वेदान्तो गुरुरीश्वरः ।
आदौ ज्ञानाप्तये पश्चात् कृतघ्नत्वापनुत्तये ॥ ( म. प्रदीप )

**तीन गोष्टी प्रकट करूं नयेत** — १ वित्त, २ विद्या आणि ३ मैथुन ( स्मृतिशेष )

**तीन गोष्टी लहरी असतात** — १ निद्रा, २ प्रिया आणि ३ कला ( मजधार )

**तीन गोष्टी वर्ज्य ( स्नेह टिकविण्यास )** — १ वाद, २ देवघेव आणि ३ पतीचे अपरोक्ष त्याच्या स्त्रीशीं संभाषण.

वाग्वादमर्थसंबंधं तत्पत्नीपरिभाषणम् ।
यदीच्छेद् विपुलां मैत्रीं त्रीणि तत्र न कारयेत् ॥
( गरुड १ १४–६ )

**तीन गोष्टी वेदानेंच जाणावयाच्या** — १ परमेश्वर, २ परलोक व ३ पुनर्जन्म. या तीन गोष्टी केवळ वेदानेच जाणल्या जातात.

**तीन गोष्टी श्राद्धकालीं पवित्र आणि तीन गोष्टी वर्ज्य** — १ कन्यापुत्र, २ दर्भ आणि ३ तीळ. हे तीन पवित्र आणि १ कोप, २ प्रयाण व ३ त्वरा ( घाई ) या तीन गोष्टी श्राद्धसमयीं वर्ज्य सांगितल्या आहेत.

त्रीणि श्राद्धे पवित्राणि दौहित्रं कुतपास्तिलाः ।
वर्ज्यानि चाहुर्विप्रेन्द्रै कोपोऽध्वगमनं त्वरा ॥ ( मार्कंडेय ३१–६४ )

**तीन गोष्टींमुळें रोगाचा उद्भव होत नाहीं** — १ भोजनानंतर ताक पिणें, २ रात्रीं दूध घेणें व ३ उषःपान.

भोजनान्ते पिबेत्तक्रं वासरान्ते पिबेत्पयः ।
निशान्ते च पिबेद्वारि त्रिभी रोगो न जायते ॥ ( सु. )

**तीन गोष्टी स्त्रीधर्मास आवश्यक** — १ पतिभक्ति, २ अदुष्टत्व आणि ३ अवाग्दुष्टत्व ( हरिवंश अ ८० )

**तीन गोष्टींत संतोष असावा** — १ स्वपत्नी, २ भोजन आणि ३ धन. " संतोषस्त्रिषु कर्तव्यः स्वदारे भोजने धने " ( वृ. चा. ७–४ )

**तीन गुण ( शास्त्र जाणणारास आवश्यक )** -- १ ग्रंथाचें संपूर्ण ज्ञान, २ तात्पर्याचें निरूपण करता येणें व ३ ग्रंथाच्या मागासंबधीं विवेचन करता येणें.

ग्रंथार्थस्य परिज्ञानं तात्पर्यार्थनिरूपणम् ।
आद्यन्तमध्यव्याख्यानशक्तिः शास्त्रविदां गुणाः ॥

( स. समयसार ८–२७ )

**तीन गुरु** — ( अ ) १ जन्मदाता, २ विद्यागुरु व ३ मोक्षगुरु ( आ ) १ पिता, २ माता व ३ आचार्य

पुरुषस्येह जातस्य भवन्ति गुरवः सदा ।
आचार्यश्चैव काकुत्स्थ पिता माता च राघव ॥

( वा. रा. अयोध्या १११–२ )

**तीन गोष्टी ( अतींद्रिय ज्ञान्यासहि कळणें कठीण )** — १ आयुष्य, २ वय आणि ३ गर्भिणाचें लक्षण.

आयुर्ज्ञानं वयोज्ञानं गर्भिणानां च लक्षणम् ।
ऋषयश्चापि मुह्यन्ति किं पुनर्मांसचक्षुषः ॥

( गो. धर्मसूत्र. अ. ९ )

**तीन गोष्टी अविश्वासार्ह** — सर्पाचा मित्र, २ विषप्राशन व ३ शत्रूवर विश्वास ठेवणें (शिवभारत अ १३)

**तीन गोष्टी ( आयुष्यात उपकारक पण तितक्याच कठीण)** -- १ दारिद्र्यात औदार्य, २ एकान्तात इंद्रियनिग्रह व ३ संकटसमयी सत्य

**तीन गोष्टी ( एकेकदा होतात )** -- (अ) १ मोठा माणस एकदाच बोलतात, २ विद्वान् एकदाच बोलतात आणि ३ कन्यादान (आ) १ वडिलांनि मालमत्तेची वाटणी, २ कन्यादान आणि ३ वचन.

सकृज्जल्पन्ति राजानः सकृज्जल्पन्ति पण्डिताः ।
सकृत्प्रदीयते कन्या त्रीण्येतानि सकृत् सकृत् ॥

( स्कं. पतिव्रताविनी–कथा )

**तीन गोष्टी ( कालाधीन )** — १ विवाह, २ जन्म आणि ३ मरण. या तीन गोष्टी कालाधीन म्हणून नवें व त्याच्याशीं होणें असतील त्या ठिकाणीं अवश्य होतील.

नयः शाल्कृताः पाशा शक्यन्ते न निवर्तितुम् ।
विवाहो जन्म मरणं यथा यत्र च येन च ॥
(पद्म.-भूमि ८१-३४)

**तीन गोष्टींत कुतूहल वाटणारा स्त्रीस्वभाव** -- १, जन्म, २ मरण आणि ३ विवाह (श्रीसरस्वती दीपावली १९६२)

**तीन गोष्टी (केवळ नामधारी होत)** -- १ धान्य नसलेला गाव, २ पाणी नसलेली विहीर आणि ३ अध्ययन न केलेला ब्राह्मण.

धान्यशून्यो यथा ग्रामो यथा कूपश्च निर्जलः ।
ब्राह्मणश्चानधीयानस्त्रयस्ते नामधारकाः ॥ (सु.)

**तीन गोष्टी (क्लेशदायक)** -- १ बालपणी मातृवियोग, २ तरुणपणीं भार्यावियोग आणि ३ म्हातारपणीं पुत्रशोक.

**तीन गोष्टी तिरस्कारार्ह** -- १ दुर्जन, २ परस्त्री व ३ परधन. (प्रश्नोत्तर रत्नमालिका)

**तीन गोष्टी (दाबून ठेवतां येत नाहींत)** -- १ प्रेम, २ खोकला आणि ३ स्फूर्ति.

**तीन गोष्टी (दुरूनच चांगल्या)** -- १ डोंगर, २ वेश्येचे मुखकमल आणि ३ युद्धवार्ता.

दूरस्थाः पर्वता रम्या वेश्या च मुखमंडने ।
युद्धस्य वार्ता रम्या च त्रीणि रम्याणि दूरतः ॥ (सु.)

**तीन गोष्टी (दुर्लभ)** -- (अ) १ विषयत्याग, २ तत्वदर्शन व ३ अपरोक्ष साक्षात्कार. (आ) १ मनुष्यत्व, २ मुमुक्षुत्व आणि ३ सत्पुरुष सहवास.

दुर्लभं त्रयमेवैतद्देवानुग्रहहेतुकम् ।
मनुष्यत्वं मुमुक्षुत्वं महापुरुषसंश्रयः ॥ (विवेकचूडामणि)

**तीन गोष्टी (देतां येत नाहींत)** -- १ पुरुषानें आपली अब्रू, २ स्त्रीनें आपलें पातिव्रत्य आणि ३ राष्ट्रानें आपलें स्वातंत्र्य. या तीन गोष्टी कोणी कितीहि उपकार केला म्हणून कृतज्ञतेचें मोल म्हणून देतां यावयाच्या नाहींत. (डॅनिअल ओकोनेल)

**तीन गोष्टींत संतोष असूं नये** — १ ज्ञानसाधना, २ उपासना व ३ दान. " त्रिषु चैव न कर्तव्योऽध्ययने तपदानयोः " ( चा. ७-४ )

**तीन गोष्टींना स्वतंत्र अस्तित्व नसतें** — १ व्यापारावाचून वैभव नाहीं, २ वादाशिवाय विद्वत्ता नाही आणि ३ सत्तेशिवाय राज्य नाही. ( शेखसादी )

**तीन गोष्टी तिघांत स्वभावसिद्ध असतात** — १ कमलाचा लाल वर्ण, २ सत्पुरुषाचें परोपकारित्व आणि ३ दुष्टाचें निर्दयत्व.

रक्तत्व कमलानां सत्पुरुषाणां परोपकारित्वम् ।
असतां निर्दयत्वं स्वभावसिद्धस्त्रिषु नियतम् ॥ ( भर्तृ. नीति १२५ )

**तीन गोष्टी क्षणभंगुर** — १ यौवन, २ धन आणि ३ जीवित.
" यौवनं धनमायुष्यं पावनीजलबिन्दुवत् " ( स्कंद-काशी ८२-८३ )

**तीन ग्रंथि ( मानवी शरीरांतल्या )** — १ रुद्रग्रंथि–मूलाधार चक्राजवळ, २ विष्णुग्रंथि — मणिपूर चक्राजवळ म्हणजे नाभीजवळ व ३ ब्रह्मग्रंथि–अनाहत चक्राजवळ म्हणजे हृदयस्थानीं. या तीन ग्रंथि अथवा शक्ति मानव शरीरांत असतात. ( अक्कल्कोट स्वामी चरित्र आणि कार्य )

**तीन ग्राम ( गायनशास्त्र )** —षड्ज, २ मध्यम आणि ३ गांधार. सप्तस्वराच्या समुदायास ग्राम म्हणतात. यांची उत्पत्तिस्थानें अनुक्रमें भूलोक, भुवर्लोक आणि स्वर्ग अथवा मेघलोक हीं आहेत. ( कल्याण–नारद विष्णु पुराणांक )

**तीन घटक ग्रंथालयाचे** —१ ग्रंथ, २ ग्रंथपाल व ३ वाचक. (ग्रंथालय शास्त्राचीं पांच सूत्रं )

**तीन चांडाळ** — १ मद्यपि, २ जुगारी आणि ३ वेश्यागामी. हे तीन सामाजिक जीवनांतले चांडाळ होत.

**तीन जीवनमूल्यें** — १ सत्य, २ शिव आणि ३ सुंदरम्

**तीन ठिकाणीं गंगास्नान दुर्लभ** — १ गंगाद्वार, २ प्रयाग आणि ३ गंगासागर.

सर्वत्र सुलभा गङ्गा त्रिषु स्थानेषु दुर्लभा ।
गङ्गाद्वारे प्रयागे च गङ्गासागरसंगमे ॥ ( पद्म. क्रिया ३-१४ )

**तीन ढोंगीपणाचीं लक्षणें** — १ खोटे बोलणे, २ दिलेले वचन न पाळणे व ३ विश्वास ठेवणाराशी बेईमान होणे. ( इस्लाम आणि नीतिशास्त्र )

**तीन तत्त्वें सृष्टींत असलेलीं** — १ चित् २ अचित आणि ३ ईश्वर ( श्रीरामानुजदर्शन )

**तीन तंट्याचीं कारणें** — १ कनक, २ कांता आणि ३ कृषि. ही तीन प्राय. तंट्याची मूळ कारणे असतात.

**तीन दानें** — १ विद्यादान, २ धनदान आणि ३ कन्यादान. ही तीन प्रकारचीं दानें.

**तीन दुःखें ( जीवनांतील )** — १ जरा ( म्हातारपण ), २ व्याधि ( आजार ) आणि ३ मरण.

**तीन देवता** — ( अ ) १ ब्रह्मा, २ विष्णु आणि ३ महेश, ( आ ) १ अग्नि, २ वायु आणि ३ सूर्य, ( इ ) १ महाकाली, २ महालक्ष्मी आणि ३ महासरस्वती, ( ई ) १ सत्ता, २ सपात्त आणि ३ सरस्वती, ( उ ) १ मातृभूमि, २ मातृभाषा आणि ३ मातृसंस्कृति. ( ऋग्वेद ७-२-८ )

**तीन दोष अंतःकरणाच्या ठायीं असणारे** — १ मळ, २ विक्षेप आणि ३ आवरण ( विचार सागर रहस्य )

**तीन दोष ( विनाशाप्रत नेणारे )** — १ परद्रव्यहरण, २ परदारा मिलाप व ३ सुहृदाचा अविश्वास.

परस्वानां च हरणं परदाराभिमर्षणम् ।

सुहृदामतिशङ्का च त्रयो दोषा क्षयावहा ॥ ( वा. रा. युद्ध. ८७-२३ )

परद्रव्याचें ज्यासी हरण । परदाराभिलापण । सुहृदाचा द्वेषपूण । तेथ मरण सहजचि. ॥ ( भा. रा. युद्ध. ३८-५९ )

**तीन दंड** — ( अ ) १ राजदंड, २ नैसर्गिक दंड आणि ३ दैवी दंड, (आ) १ समाजदंड, २ राजदंड आणि ३ यमदंड, ( इ ) १ वाग्दंड ( मौन ), २ मनोदंड ( आशाहीन मन ) व ३ देहदंड ( स्वधर्माचरण ).

योग हा मनोदंड । मौन होय वाग्दंड । निरिच्छता देहदंड । हे अगदंड असावें ॥ ( द. महात्म्य अ. ३५ )

" वाग्दंड कर्मदंडश्च मनोदंडश्च ते त्रय " ( सु. )

**तीन द्वारें आत्मशक्तीचा नाश करणारीं** — १ काम, २ क्रोध आणि ३ लोभ ( भ. गी. १६–२१ )

[ **तीन दृष्टि** — १ चाक्षुषी दृष्टि, २ विचारी दृष्टि आणि ३ अनुभव दृष्टि कोणत्याहि पदार्थाकडे पहाण्याच्या अशा तीन दृष्टि असतात. ( *अमृतानुभव अमृतवाहिनी टीका* ) ]

**तीन धर्मलक्षणें** — १ वेदविहित धर्म, २ धर्मशास्त्रान्तर्गत स्मार्त धर्म व ३ शिष्टाचा आचार. विधात्यानें सृष्टीच्या सर्गसमयीं असे तीन धर्म निर्मिले; व ते सनातन आहेत.

वेदोक्त प्रथमो धर्मः स्मृतिशास्त्रान्तर्गतोऽपरः ।
शिष्टाचीर्णोऽपरः प्रोक्तस्त्रयो धर्माः सनातनाः ॥ ( म. भा. अनु १४१–६५ )
वेदोक्त परमो धर्मो धर्मशास्त्रेषु चापरः ।
शिष्टाचारश्च शिष्टानां त्रिविधं धर्मलक्षणम् ॥ ( म. भा. वन. २०७–८४ )

**तीन नयन ( श्री शिवाचे )** — ( अ ) १ कृशानु ( अग्नि ) २ भानु ( सूर्य ) व ३ हिमकर ( चंद्र ) म्हणून त्रिनयन हें एक शिवाचें नाव आहे. ( आ ) १ श्वेतभानु–सोम, २ वृद्धभानु–अग्नि आणि ३ भानु–सूर्य हे शिवाचे–महादेवाचे तीन नेत्र होत. ( स्तुतिकुसुमांजलि )

**तीन धूर्तलक्षणें** — १ मुख–कमलाप्रमाणे, २ वाणी–चंदनाप्रमाणें शीतल आणि ३ पोटांत राग हीं धूर्तांचीं तीन लक्षणें होत.

मुखं पद्मदलाकारं वाणी चंदनशीतला ।
हृदयं क्रोधसंयुक्तं त्रिविधं धूर्तलक्षणम् ॥ ( सु. )

**तीन नाडीसंस्था मानवी शरिरांतल्या** — १ रक्तवहा, २ वातवहा आणि ३ मनोवहा ( स्वर्गदर्शन )

**तीन नाड्या** — ( अ ) १ इडा, पिंगला व ३ सुषुम्ना ( योगशास्त्र ); ( आ ) १ वात, २ पित्त आणि ३ कफ ( वैद्यक ), ( इ ) १ आद्य, २ मध्य व ३ अन्त्य ( ज्योतिष ).

**तीन नाशहेतु ( दानाचे )** — १ दिल्यानंतर वाईट वाटणें, २ अपात्रीं दान देणें आणि ३ देताना श्रद्धा नसणें, हे तीन दानाचे नाशहेतु म्हणून सांगितले आहेत.

यद्त्वा तप्यते पश्चादपात्रेभ्यस्तथा च यत् ।
अश्रद्धया च यद्दानं दाननाशास्त्रयस्त्वमी ॥ ( स्कंद कुमा. २-६९ )

( **तीन नीतिशास्त्रप्रवर्तक** — १ शुक्र, २ विदुर आणि ३ चाणक्य. हे तीन जगातले आद्यनीतिशास्त्रप्रवर्त्ते होत.

नीतितत्वप्रवक्तारस्त्रय: सन्ति धरातले ।
शुक्रश्च विदुरश्चाथ चाणक्यस्तु तृतीयक: ॥ ( नीति मयूख ) )

**तीन परिणाम** — १ निरोध परिणाम, २ समाधि परिणाम व ३ एकाग्रता परिणाम. या तिन्ही परिणामात संयम केल्यानें भूत व भविष्य काळाच्या गोष्टीचे ज्ञान होतें. परिणामत्रयसंयमादतीतानागतज्ञानम् । ( पातंजल, विभूति पाद सूत्र १६ )

**तीन पायऱ्या ज्ञानविकासाच्या** — १ धार्मिक, २ आध्यात्मिक आणि ३ शास्त्रीय ( कँट )

**तीन पिते** — १ परमात्मा २ गुरु आणि ३ जनकपिता ( अथर्व-अनु. मराठी )

( **तीन पीठें** — ( अ ) १ व्यासपीठ, २ पूजापीठ आणि ३ दीपपीठ; ( आ ) १ वाक्पीठ, २ व्यासपीठ आणि ३ मुद्रापीठ. ( Press ) हीं तीन पीठें आधुनिक प्रचारतंत्रात प्रभावी आहेत. )

**तीन पुरुष जगांत दुर्लभ** — १ जननिंदेला पात्र न झालेला श्रीमान्, २ स्वत:ची प्रौढी न सांगणारा शूर आणि ३ सर्वत्र समदृष्टि असणारा राजा अथवा शासनाधिकारी.

श्रीमानजननिंद्यश्च शूरश्चाप्यविकत्थन ।
समदृष्टि: प्रभुश्चैव दुर्लभा: पुरुषास्त्रय. ॥ ( यो. वा. १-१३-११ )

( **तीन पुराणकालीन महाक्रोधी** — १ दुर्वास, २ जमदग्नि आणि ३ विश्वामित्र. हे प्राचीन कालचे महाक्रोधी म्हणून प्रसिद्ध आहेत. )

**तीन पुराणकालीन लोभी आणि महत्त्वाकांक्षी** — १ कंस २ जरासंध आणि ३ दुर्योधन ( म. भा. उपसंहार )

( **तीन पुराणकालीन मामा** — १ कंसमामा, २ जागीळमामा ( घटोत्कचाचा कारभारी ) व ३ शकुनिमामा. हे तीन कपटनीतिनिपुण मामा होत.

**तीन पुरुष** — १ प्रथम पुरुष–मी, २ द्वितीय पुरुष–तू व ३ तृतीय पुरुष–तो. ( व्याकरण )

**तीन पुरुष** — १ विश्वव्यापी विराट् पुरुष, २ पृथ्वीवरील सर्व मानव समाजरूपी राष्ट्रपुरुष, आणि ३ मानव व्यक्तिरूप–व्यक्ति पुरुष. पुरुषसूक्तात पहिल्या दोन पुरुषांचे वर्णन आहे. तिसऱ्या पुरुषाचा संकेत आहे. ( पु. सूक्त स्पष्टीकरण ).

**तीन प्रकारचे अर्थ ( शब्दाचे )** — १ वाच्यार्थ, २ लक्ष्यार्थ आणि ३ व्यंग्यार्थ. ( अलंकार शास्त्र )

**तीन प्रकार अवताराचे** — १ आवेश अवतार–नरसिंह, २ अंश अवतार–श्रीरामचंद्र आणि ३ पूर्ण अवतार–श्रीकृष्ण.

**तीन प्रकारचीं आकाशें** — १ चिदाकाश, २ चित्ताकाश आणि ३ भूताकाश ( यो वा ३–९७–१४ )

**तीन प्रकार आगम ग्रंथाचे** — १ वैष्णवागम ( पांचरात्र ), २ शैवागम आणि ३ शाक्तागम

**तीन प्रकार आहाराचे** — १ सात्त्विक–नित्याचा साधा आहार, २ राजस–उंची पक्वान्नें वगैरे व ३ तामस–तळकट वगैरे.

**तीन प्रकारचे उत्पात** — १ दिव्य–उल्कापात, २ अंतरिक्ष–धूमकेतु व आणि ३ पार्थिव–भूकंप ( म भा सभा ४६–९ )

**तीन प्रकारच्या उपासना** — १ ब्रह्मोपासना, २ मनोपासना आणि ३ प्रतिमोपासना.

(**तीन प्रकारच्या ओढी** — १ विषयी माणसाची विषयासंबंधीचा, २ मातेची मुलासाठी असलेली व ३ सतीचा पतीविषयी असलेली या तीन प्रकारच्या ओढींची शक्ति एकत्रित झाल्यास भगवद्दर्शन होते. ( श्रीरामकृष्ण ) )

**तीन प्रकारचे ऋषि** — १ ब्रह्मर्षि, २ देवर्षि आणि ३ राजर्षि

**तीन प्रकारचे कवि** — १ धीट, २ धीटपाठ आणि ३ प्रासादिक. ( दासबोध १४–३–८ )

**तीन प्रकारचीं कर्मे** — १ संचित, २ क्रियमाण आणि प्रारब्ध

**तीन प्रकार कर्मफलाचे** — १ इष्ट, २ अनिष्ट आणि ३ संमिश्र "अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम्" ( भ. गी. १८–१२ )

**तीन प्रकारचे किरण सूर्याचे** — १ ताप देणारे २ प्रकाश देणारे व ३ आरोग्य देणारे.

किरणास्त्रिविधाः सूर्ये तापाऽरोग्यप्रकाशदाः ।
हरन्ति स्वप्रभावेण दैन्य ताप च पातकम् ॥ (सु.)

**तीन प्रकार कीर्तनभक्तीचे** — १ गुणसंकीर्तन, २ लीलासंकीर्तन आणि ३ नामसंकीर्तन. (कीर्तन तरंगिणी भाग २)

**तीन प्रकारची कृपा** — १ गुरुकृपा, २ शास्त्रकृपा व ३ आत्मकृपा (बोधामृत)

**तीन प्रकार खडकाचे** — १ स्तरित, २ अग्निजन्य व ३ रूपांतरित. (सुलभ भू विज्ञान)

**तीन गति पृथ्वीला** — १ परिवलन–स्वतःभोवती फिरणे २ परिभ्रमण–सूर्याभोवती फिरणें व ३ सहचलन–सूर्य जात आहे त्या दिशेनें जावें लागणे. (सुलभ भू-विज्ञान)

**तीन प्रकार गाथांचे** — १ भक्तिपर, २ उपदेशपर आणि ३ अनुभवपर.

**तीन प्रकारचे गुरु** — (अ) १ उपदेशगुरु, २ कुलगुरु आणि ३ जगद्गुरु. (आ) १ लौकिक ज्ञान देणारे, २ वैदिक ज्ञान देणारे आणि ३ आध्यात्मिक ज्ञान देणारे. (इ) १ दिव्य, २ सिद्ध आणि ३ मानव (ललिता सहस्र नाम).

**तीन प्रकार ग्रहणाचे** — १ खंडग्रहण २ कंकणग्रहण आणि ३ खग्रास ग्रहण.

**तीन प्रकार (चित्रांचे)** — १ शिल्पचित्र, २ अर्धशिल्प व ३ चित्राभास (शिल्परत्न)

**तीन प्रकार जपाचे** — १ वाचिक जप–मोठ्यानें उच्चार, २ उपांशु जप–हळू उच्चार व ३ मानस जप–फक्त मनानेंच शब्दोच्चार करणें (नृसिंह पुराण)

**तीन प्रकारचे ताप** — १ आध्यात्मिक–वेड लागणें, खरूज इ. २ आधिभौतिक–धरणीकंप, अग्निपीडा इ. व ३ आधिदैविक–विद्युत्पतन, अतिवृष्टि–अनावृष्टि इ.

**तीन प्रकार दानांचे** — १ अभयदान, २ उपकारदान व ३ द्रव्यदान.

**तीन प्रकारच्या दीक्षा ( वीरशैव संप्रदाय )** — १ वेधादीक्षा, २ क्रियादीक्षा आणि ३ मंत्रदीक्षा.

सा दीक्षा त्रिविधा प्रोक्ता शिवागमविशारदैः ।
वेधारूपा क्रियारूपा मन्त्ररूपा च तापस ॥ ( सि. शि. )

**तीन प्रकार दीक्षेचे** — १ ईक्षण ( दृष्टिविक्षेप ) २ भाषण (शब्दानें) व ३ स्पर्शन–देहास स्पर्श करून. ( साधुमताचा देवयानपंथ )

**तीन प्रकारचे दूत** — १ स्वतंत्रपणें कार्य साधणारा, २ सांगितलें तेवढेंच करणारा आणि ३ नुसता निरोप पोहोंचविणारा. ( का. नीति. )

**तीन प्रकारचीं दुःखें** — १ परिणाम दुःख, २ ताप दुःख व ३ संस्कार-दुःख ( परमानुभव बोध ).

**तीन प्रकारचे दोष भोजनांत टाळावेत** — १ जातिदोष ( पदार्थांचा स्वाभाविक दर्प वगैरे ), २ आश्रयदोष ( पदार्थ शुद्ध असला तरी अपवित्र स्थानीं ठेविल्यामुळें ) आणि ३ निमित्तदोष ( कुत्रें वगैरेंच्या स्पर्शामुळें ). ( कल्याण साधनांक )

**तीन प्रकारची दृष्टि** — १ सूक्ष्मदृष्टि, २ विज्ञानदृष्टि व ३ दिव्यदृष्टि.

**तीन प्रकारचे धर्म** — १ सन्याश्याचा यतिधर्म २ कर्मयोग्याचे निष्काम कर्म व ३ एकान्त धर्म ( ज्ञानेश्वरी गूढार्थ दीपिका खंड ३, म. भा. शान्ति. अ. ३४८ )

**तीन प्रकारचा ध्वनि** — १ अलंकारध्वनि, २ वस्तुध्वनि व ३ रसध्वनि ( साहित्यशास्त्र ) ( हिंदी संत वाङ्मयाचा परमार्थ मार्ग )

**तीन प्रकारचे नास्तिक** — १ क्रियादुष्ट ( कर्म न करणारे ), २ मनोदुष्ट ( मनानेंच बिघडलेले ) आणि ३ वाग्दुष्ट ( वाणीनें दोष देणारे ).

नास्तिकास्त्रिविधाः प्रोक्ता धर्मतत्त्वदर्शिभिः ।
क्रियादुष्टो मनोदुष्टो वाणीदुष्टस्तथैव च ॥ ( सु. )

**तीन प्रकार नाशाचे ( अध्यात्मशास्त्र )** — १ स्वभावनाश, २ परत. नाश आणि ३ आश्रयनाश. या तिन्हींहि प्रकारचा नाश आत्म्याचे ठिकाणीं नाहीं म्हणून तो अविनाशी आहे.

**तीन प्रकार कावळ्यांचे** — १ साधा कावळा, २ डोम कावळा आणि ३ पाण कावळा. ( आपले मानवेतर मित्र पक्षी )

**तीन प्रकारचीं पापें** — १ कायिक, २ वाचिक आणि ३ मानसिक ( धर्मशास्त्र )

**तीन प्रकार पारायणाचे** — १ योजित, २ पल्लवित व ३ सपुटित ( तन्त्रशास्त्र )

**तीन प्रकारच्या पीडा** — १ स्वस्थ बसल्यावेळी याचकापासून होणारी कटकट, २ भोजनसमयीं मुलाचा नाश व ३ निद्राकाळीं स्त्रीहट्ट. या तीन प्रकारच्या पीडा नित्याच्या असतात व त्या तशा मोठ्या माणसाना असाव्यात असा आशीर्वाद दिल्याची कथा आहे.

आसने विप्रपीडा च सुतपीडा च भोजने ।
शयने स्त्रीपीडा च त्रिभिः पीडा दिने दिने ॥ ( सु. )

**तीन प्रकार प्रतिज्ञेचे** — १ दर्पमूलक प्रतिज्ञा-सद्‌बुद्धि, २ स्वार्थमूलक प्रतिज्ञा व ३ परार्थमूलक प्रतिज्ञा-परार्थहितबुद्धीनें केलेली.

**तीन प्रकारची प्रकृति मनुष्याची** — १ दैवी, २ आसुरी आणि ३ राक्षसी.

" दैव्यासुरी राक्षसी च " ( ग. गी. १०-१ )

**तीन प्रकार प्रारब्धाचे** — १ इच्छा प्रारब्ध, २ अनिच्छा प्रारब्ध व ३ परेच्छा प्रारब्ध. ( पचदशी )

**तीन प्रकारचीं बेटें** — १ उपखंड बेटें-मुख्य भूमि लगतचीं, २ सामुद्रिक बेटें व ३ प्रवाळ द्वीपें ( सुलभ भू विज्ञान ).

**तीन प्रकारची भूतसृष्टि** — १ असज्ञ-पाषाण वगैरे २ अत.सज्ञ-वृक्ष इ. आणि ३ ससज्ञ-पुरुष पशु इ. ( कल्याण मानवता अक. )

**तीन प्रकार मानवाचे** — १ ज्ञानी मानव, २ भक्त-मानव आणि ३ कर्मनिष्ठ मानव. ( भ. गी. अ ३ व १८ )

**तीन प्रकार मानवी अनुभूतीचे** — १ भावना २ विचार आणि ३ आचार ( परिचय )

**तीन प्रकार माणसाचे** — १ वीर माणूस-दुर्दम्य महत्त्वाकांक्षी, २ पशुमाणूस-कोणतीहि महत्त्वाकांक्षा नसलेला आणि ३ दिव्य ( शाक्ततंत्र )

**तीन प्रकार मंगलाचरणाचे** — १ वस्तुनिर्देशरूप, २ आशीर्वादरूप आणि ३ नमस्काररूप-(अमृतानुभव-कौमुदी)

**तीन प्रकार मृत्यूचे** — १ आध्यात्मिक (कालमृत्यु), २ आधिभौतिक (कुपथ्यामुळें होणारे) आणि ३ आधिदैविक (गडातर वगैरे स्वरूपाचे)

या तिघा मार्गी वलिप्रदेस । आध्यात्मिक मृत्यु असे ॥ (ग. वि. ३-८५)

**तीन प्रकार मंत्राचे** — १ बीजमंत्र, २ मूलमंत्र व ३ मालामंत्र (मंत्रशास्त्र)

**तीन प्रकारची यात्रा** — गुरुयात्रा, २ देवयात्रा व ३ तीर्थयात्रा.

'गुरुयात्रा देवयात्रा तीर्थयात्रेति च त्रिधा' (वी. प्र. १० ३७)

**तीन प्रकार रोगाचे** — १ तीव्र-नवज्वर, अधिक सन्निपात इ. २ सौम्य-पटसें, खेकल्य इ. व ३ विलंबी-क्षय मधुमेह इ.

**तीन प्रकारचे लोक** — १ हौसे २ नौसे आणि ३ गौसे असे तीन प्रकार जगात असतात.

**तीन प्रकारचे वाद** — १ वाद (गुरुशिष्यसंवाद), २ जल्प (युक्तिप्रमाण कुशल पंडिताचा वाद) व ३ वितंड (मूर्खांचा प्रमाणरहित वाद). (मो. प्रदीप)

**तीन प्रकार वेदवाणीचे** — १ यथार्थ, २ भयानक आणि ३ पुष्पित. (एकनाथ दर्शन खंड २ रा)

**तीन प्रकार विधींचे** — १ अपूर्वविधि २ नियमविधि आणि ३ परिसंख्याविधि.

**तीन प्रकार विवाहाचे** — १ श्रौतविवाह, २ आर्षविवाह आणि ३ कुमविवाह. (द्व. ज्ञा. को.)

**तीन प्रकारची विषें** — १ स्थावर विष, २ जंगम विष आणि ३ कृत्रिम विष. (निघंटु)

(**तीन प्रकारचे वैराग्य** — १ पुराणवैराग्य, २ प्रसूतिवैराग्य आणि ३ स्मशानवैराग्य.)

**तीन प्रकारांनीं शहाणपण प्राप्त होतें** — १ शास्त्राचा अभ्यास केल्यानें, २ संप्रदायांत वावरल्यानें व ३ निरीक्षणानें.

**तीन प्रकार शास्त्रग्रंथाचे** — १ आकरग्रंथ, २ प्रकरणग्रंथ व ३ वाद ग्रंथ. ( लक्षण रत्नाकर )

**तीन प्रकार ( शिवयोगींचे )** — १ क्रियायोगी, २ तपोयोगी आणि ३ जपयोगी. ( कल्याण विशेषांक १९६२ )

**तीन प्रकारची शुद्धि** — १ अंतःशुद्धि, २ बहिःशुद्धि आणि ३ सन्निधितशुद्धि–मन्निधित दोषांपासून मुक्त होणें. ( अथर्व–अनु.–मराठी )

**तीन प्रकार श्रद्धेचे** — १ सात्विक, २ राजस आणि ३ तामस. ( भ. गी. १७–२ )

**तीन प्रकार सद्गुरूस शरण जाण्याचे** — १ प्रणिपात, २ प्रश्न आणि ३ सेवा.

**तीन प्रकार ( संगीताचे )** — १ गीत, २ वाद्य आणि ३ नृत्य असे संगीताचे तीन प्रकार.

"गीतं वाद्यं तथा नृत्यं त्रयं संगीतमुच्यते ॥" ( स. रत्नाकर अ. १ )

**तीन प्रकार स्वभावाचे** — १ पूर्व बालस्वभाव, २ वडिलार्जितस्वभाव व ३ कष्टार्जित स्वभाव. ( परिसरात )

**तीन 'प्र–कार' समर्थांच्या उपदेशाचे** — १ प्र–बोध, २ प्र–यत्न व ३ प्र–चीति.

**तीन प्रकार सूर्य किरीटाचे ( ज्योतिःशास्त्र )** — १ वैपुव किरीट, २ ध्रुवीय किरीट आणि ३ उभयान्वयी किरीट. ( राहुकेतु–ग्रहणे )

**तीन प्रकार सूत्रग्रंथाचे** — १ शब्दप्रधान, २ अर्थप्रधान आणि ३ व्यवहारप्रधान.

**तीन प्रकारचें स्वयंवर** — इच्छास्वयंवर, २ पण लावून आणि ३ पराक्रम करून. अशा तीन प्रकारांनी प्राचीन काळीं स्वयंवरें होत असत.

इच्छास्वयंवरश्चैको द्वितीयश्च पणाभिधः ।
तृतीयं शौर्यशुल्कश्च शूराणां परिकीर्तितः ॥
( देवी. भाग. तृतीयस्कंध १८–४२–४३ )

**तीन प्रकार स्वराचे** — १ तार = वरचा षड्ज = निषाद, २ मद्र = मधला षड्ज, मध्यम, व ३ घोर = खालचा षड्ज, खर्ज.

**तीन प्रकारचीं स्नानें** —– १ नित्य, २ नैमित्तिक व ३ काम्य. (आचारमयूख)

**तीन प्रकार हिरड्याचे** — १ बाळहिरडा, २ सुरवारी हिरडा आणि ३ चामार हिरडा.

**तीन प्रतीति (अनुभव)** —– १ गुरुप्रतीति, २ शास्त्रप्रतीति व ३ आत्मप्रतीति (दा. बो. ५–९)

**तीन प्रतिज्ञा महत्त्वाच्या (स्त्रीजीवनांत)** —– १ आज्ञापालन २ चारित्र्य आणि ३ दारिद्र्य. (सेंटटेरेसी–स्पॅनिश स्त्री) (जीवन विकास, मासिक)

(**तीन प्रधान विषय महाकाव्याचे** —– १ प्रेम, २ धर्म व ३ संग्राम.)

**तीन प्रपंच** —– १ स्थूल प्रपंच (कुटुंबपोषण), २ सूक्ष्म प्रपंच (कुटुंब पोषणाविषयींचें मनोराज्य) आणि ३ कारण प्रपंच (परोपकारबुद्धि).

**तीन प्रमाणें** —– (अ) १ प्रत्यक्ष, २ अनुमान आणि ३ शास्त्र (मनु. १२–१०५); (आ) १ श्रुति, २ धर्मशास्त्र आणि ३ लोकसंग्रह.

" धर्मजिज्ञासमानानां प्रमाणं प्रथमं श्रुतिः ।
द्वितीयं धर्मशास्त्रं तु तृतीयं लोकसंग्रहः ॥ " (सु.)

**तीन प्रमेयें (सांख्य दर्शन)** —– १ अव्यक्त, २ व्यक्त आणि ३ ज्ञ म्हणजे जाणणारा पुरुष. (सांख्यकारिका)

**तीन प्रमेयसिद्धान्त (अद्वैत–वेदांत)** — १ ब्रह्म हेंच सत्य आहे, २ जगत् हें मिथ्या आहे व ३ जीव हा वस्तुतः परमात्माच आहे.

श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः ।
ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या, जीवो ब्रह्मैव नापरः ॥ (श्रीशंकराचार्य)

(**तीन प्रमुख गुण (धनुर्विद्येचे)** —– १ अति लहान वस्तूचा वेध करणें, २ अति दूरग्राही वेध करणें आणि ३ अति कठीण पदार्थ फोडणें. धनुर्धर अर्जुन हा अशा तिन्ही गुणांत प्रवीण होता.

लक्ष्मणो लघुसन्धानः दूरपाती च राघवः ।
कर्णो दृढप्रहारी च पार्थस्त्वेते त्रयो गुणाः ॥ (सु.))

**तीन प्रयोजनें परमेश्वरी अवतारांचीं** — सज्जनांचें पालन, २ दुर्जनांचा नाश आणि ३ धर्म-संस्थापना. (भ. गी. ४–८)

**तीन प्राचीन संस्कृत व्याकरण-ग्रंथकार** — १ पाणिनी–सूत्रकार, २ कात्यायन–वार्तिककार, आणि ३ पतंजलि–भाष्यकार.

**तीन प्राचीन भारतीय ज्योतिर्वेत्ते** — १ आर्यभट्ट, २ वराहमिहिर आणि ३ भास्कराचार्य.

(**तीन प्राचीन महायुद्धें** — १ देव–दानव युद्ध, २ राम–रावण युद्ध आणि ३ कौरव–पांडव युद्ध. यांतील प्रमुख नायकांस युद्धावर पाठविण्यापूर्वी ब्रह्मोपदेश करण्यात आला. ब्रह्मदेवानें इंद्रास, वसिष्ठानें रामास व श्रीकृष्णानें अर्जुनास गीता सांगितली.)

**तीन फलें योगासनामुळें प्राप्त होणारीं** — १ नाडीशुद्धि, २ शरीरास आरोग्य व ३ अंगात चपलता ( योगसोपान–पूर्व चतुष्टय )

**तीन फलज्योतिषशास्त्राचे आद्यप्रणेते** — १ पराशर, २ जैमिनी व ३ वराहमिहिर.

**तीन बलें** — १ मंत्र ( युक्ति ), २ कोश आणि ३ सैन्य हीं राजसत्तेचीं तीन बलें.

**तीन बंध** — १ मूलबंध, २ उड्डियान बंध आणि ३ जालंधर बंध. हा तीन योगशास्त्रात श्रेष्ठ मानिलीं आहेत. ( गोरक्षपद्धति )

**तीन बंधनें अन्तरिक्षांतील** — १ मेघ, २ विद्युत् आणि ३ गर्जना (ऋग्वेद मंडल १–१६३ )

**तीन बंधनें पृथ्वीवरील** — १ अन्न, २ स्थान आणि ३ बीज. (ऋग्वेद मंडल १–१६३ )

**तीन ब्रीदवाक्यें फ्रेंच राज्यक्रांतीचीं** — १ स्वातंत्र्य, २ समता आणि ३ बंधुभाव.

**तीन भरत** — १ रामसखा भरत, २ दुष्यंतपुत्र भरत आणि ३ जीवन्मुक्त जडभरत. हे तीन प्राचीन काळीं आदर्शभूत होऊन गेले.

**तीन भाग आयुर्वेदाचे** — १ हेतु स्कंध, २ लक्षण स्कंध व ३ औषध स्कंध या तीन भागास आयुर्वेदाची त्रिसूत्री म्हणतात.

**तीन भाग धर्माचे** — १ यज्ञ–उपासना २ अध्ययन–ज्ञानार्जन व ३ दान–परोपकार ( छांदोग्य २–२३–१ )

**तीन मद** — १ धनमद, २ विद्यामद आणि ३ उच्च कुलाचा मद.

विद्यामदो धनमदस्तृतीयोऽभिजनो मदः। ( म. भा. उ. ३४–४४ )

**तीन महत्त्वाचे प्रसंग ( माणसाच्या आयुष्यांत )** — १ जन्म, २ विवाह आणि ३ मृत्यु.

**तीन महा आनंद** — १ स्वतःचा विवाह, २ सत्पुत्रलाभ आणि ३ पुत्राला पुत्रप्राप्ति होणें. हे संसारांतले तीन महा आनंद होत.

जें होतसे अपुलें स्वयंवर। आणिक सत्पुत्र होय संसारीं।
आणिक पुत्रासी पुत्र होय तरी। विशेष चतुर्गुण॥

( काशीखंड ७६–१६० )

**तीन महान् शक्ति जीवन घडविणाऱ्या** — १ आत्मज्ञानशक्ति, २ विज्ञानशक्ति आणि ३ साहित्यशक्ति ( विनोबाजी )

**तीन साधनें भक्तीचीं** — १ श्रवण, २ कीर्तन आणि ३ भजन ( शिव. विश्वेश्वर ३–२२ )

**तीन माता** — १ प्रकृतिमाता, २ विद्यामाता आणि ३ जननीमाता. ( अथर्व–अनु–मराठी )

**तीन मात्रा** — १ ऱ्हस्व २ दीर्घ व ३ प्लुत.

**तीन मानसिक पापें** — १ परधनापहार करण्याचा विचार करणें, २ मनानें दुसऱ्याचें अहित चिंतिणें आणि ३ खोटा दुराग्रह.

परद्रव्येष्वभिध्यानं मनसानिष्टचिंतनम्।
वितथाभिनिवेशश्च मानसं त्रिविधं स्मृतम्॥

( स्कंद–काशी खंड २७–१५४ )

**तीन मार्ग मोक्षप्राप्तीचे** — १ कर्मयोग, २ ज्ञानयोग आणि ३ भक्तियोग.

" मार्गास्त्रयो मे विख्याता मोक्षप्राप्तौ नगाधिप॥ " ( देवी भा. ७–३७–२ )

**तीन मूर्ख** — ( अ ) १ विरक्त पण लोभी, २ योगी पण इंद्रियासक्त आणि ३ व्युत्पन्न पण क्रोधी, ( आ ) १ ज्ञानी पण वैराग्यरहित, २ श्रद्धाहीन भक्त व ३ कुटुंबसंग्रही पण निर्धन.

**तीन युगांतले तीन दाते** — सत्ययुग–बलि, २ त्रेतायुग–श्रीरामचंद्र व ३ द्वापरयुग–कर्ण आणि कलियुग ( ? )

**तीन योग** -- (अ) कर्मयोग, २ भक्तियोग आणि ३ ज्ञानयोग; (आ) १ काल्योग, २ दैवयोग आणि ३ प्रारब्धयोग.

**तीन रथ आकाशगामी** -- १ अश्विनीकुमाराचा रासभ रथ, २ उपेचा वृषभ रथ व ३ सूर्याचा सप्ताश्व रथ. असे प्राचीनांना मानित आहे. (अशोक ते कालिदास)

**तीन रत्नें (इहलोकींचीं)** -- १ अन्न, २ उदक आणि ३ सुभाषित.

पृथिव्या त्रीणि रत्नानि जल्मन्न सुभाषितम्। (वृ. चा. १४-१)

**तीन रूपें (अग्नीचीं)** -- १ आहवनीय-देवाचा, २ गार्हपत्य-मानवाचा व ३ दक्षिणाग्नि-पितराचा.

**तीन रूपें पदार्थांचीं** -- स्थाणुरूप, २ द्रवरूप व ३ वायुरूप अशा तीन रूपात पदार्थ जगात आढळतात.

**तीन रूपें (भगवंताचीं)** --१ प्रकृति, २ पुरुष आणि ३ काल. अशा सृष्ट्युत्पत्तिसमयीं भगवताचीं तीन रूप प्रकट होतात. (कल्याण नारद-विष्णुपुराणांक)

**तीन रूपें (श्रीविष्णूचीं)** -- १ महत्-ब्रह्मांडाला उत्पन्न करणारें, २ ब्रह्मांडात असलेल आणि ३ सर्वभूतस्थ.

तृतीय सर्वभूतस्थ-तानि ज्ञात्वा विमुच्यते (भारतीय दर्शनसंग्रह)

**तीन रूपें (सूर्य देवतेचीं)** -- १ उदयकाला-ब्रह्मरूप, २ माध्यान्ह काला-रुद्ररूप व अस्तमानकालीं-विष्णुरूप "अस्तमाने स्वय विष्णुस्त्रिमूर्तिश्च दिवाकर" (आदित्य हृदय)

**तीन लयी (संगीत शास्त्र)** -- १ द्रुत, २ मध्यम आणि ३ विलंबित.

**तीन लक्षणें (नित्यसंन्याशाचीं)** -- १ इच्छा न धरणें, २ द्वेष न करणे आणि ३ द्वन्द्वभाव धारण न करण (भ गी. ५-३).

**तीन लक्षणें विभूतिमत्त्व ओळखण्याचीं** -- १ ऐश्वर्य, २ शोभा आणि ३ प्रभाव.

**तीन लक्षणदोष (काव्य शास्त्र)** -- १ अव्याप्ति, २ अतिव्याप्ति आणि ३ असंभव (काव्य प्रकाश).

**तीन लक्षणें ( साधूंचीं )** — १ सन्मानाचा हर्ष नाहीं, २ अपमानाचा राग नाहीं व ३ क्रोध आला तरी कठोर वाणी नाहीं. हीं साधूंचीं तीन लक्षणें होत.

*न प्रहृष्यति सन्मानैर्नावमानैः प्रकुप्यति ।*
*न क्रुद्धः परुषं ब्रूयादेतत्साधोस्तु लक्षणम् ॥* ( गरुड ११३ ४० )

**तीन लाभ ( आसनापासून ) व्यवहारदृष्ट्या** — १ नाडींची शुद्धि, २ आरोग्य आणि ३ अगचापल्य.

आसनस्य फलान्यस्ये प्रथमं नाडिशोधनम् ।
द्वितीयं शरीरारोग्यं तृतीयं चागलाघवम् ॥ ( मु. )

**तीन लिंगें ( व्याकरणशास्त्र )** — १ पुल्लिंग, २ स्त्रीलिंग व ३ नपुंसकलिंग.

**तीन लोक अथवा त्रिभुवनें** — ( अ ) १ स्वर्ग, २ मृत्यु व ३ पाताळ, ( आ ) १ भूमि, २ अंतरिक्ष आणि ३ द्यौ, ( इ ) १ मनुष्यलोक, २ पितृलोक व ३ देवलोक ( शतपथ ) "त्रीँल्लोकान्व्याप्य भूतात्मा" ( म. भा. अनु अ १४९ )

**तीन लोक** — १ वाणी–पृथ्वी, २ मन–अंतरिक्ष व ३ प्राण–स्वर्गलोक. 'वागेवायं लोकः मनो अंतरिक्षलोकः प्राणोऽसौ लोकः' ( बृ. १।५।४ )

**तीन वर्ग पदार्थांचे** — १ खनिज, २ उद्भिज्ज व ३ प्राणिज. जगांतील यच्चयावत् पदार्थ या तीन वर्गांपैकीं कोणत्यातरी वर्गांत समाविष्ट असतात.

**तीन वस्तु दातृत्वांत प्रसिद्ध** — १ कामधेनु, २ चिंतामणिरत्न व ३ कल्पवृक्ष.

**तीन वस्तु (दुसऱ्याच्या स्वाधीन करूं नयेत)** — १ ग्रंथ, २ स्त्री व ३ पैसा.

"पुस्तकं वनिता वित्तं परहस्तगतं गतम् ।
यदि चेत्पुनरायाति नष्टं भ्रष्टं च खंडितम् ॥" ( मु. )

**तीन वाद (वेदान्तशास्त्र)** — १ आरंभवाद–जसें मृत्तिकेपासून घटाची उत्पत्ति. हा आरंभवाद–नैयायिकांचा आहे. २ परिणामवाद–दुधापासून दहीं होणें (सांख्य) आणि ३ विवर्तवाद–दोरीवर सर्पाचा आभास होणें (अद्वैत वेदान्त).

**तीन वासना** — १ लोकवासना ( लोकांनीं चांगलें म्हणावें म्हणून ), २ शास्त्रवासना ( शास्त्राध्ययनाची आवड ) आणि ३ देहवासना ( वेशभूषा वगैरेंनीं चांगलें दिसावें म्हणून खटपट ). यांमुळें जीवांना खरें ज्ञान होत नाहीं. यांनाच वासनात्रय म्हणतात.

**तीन वारकरी वैशिष्ट्यें** — १ टाळ, २ माळ आणि ३ पताका. हीं तीन वारकरी सांप्रदायिकांस धारण करावीं लागतात.

**तीन विद्या** — १ प्रकृति विद्या २ आत्मविद्या–आध्यात्मिक ज्ञान आणि ३ ब्रह्मविद्या. यांच्या अध्ययनानें ऐहिक सुख आणि अमृतत्व प्राप्त होतें ( अथर्व–अनु– मराठी )

**तीन विद्याप्राप्तीचीं साधनें** — १ गुरुशुश्रूषा, २ पुष्कळ धन आणि ३ विद्या देऊन विद्या घेणें.

" गुरुशुश्रूषया विद्या पुष्कलेन धनेन वा ।
अथवा विद्यया विद्या चतुर्थं नोपपद्यते ॥ " ( सु. )

**तीन विद्येचे शत्रु** — १ गुरुशुश्रूषेचा अभाव, २ त्वरा आणि ३ आत्मश्लाघा.

" अशुश्रूषा त्वरा श्लाघा विद्यायाः शत्रवस्त्रयः ॥ "
( म. भा. उद्योग ४०–४ )

**तीन विश्रांतिस्थानें सांसारिकांस** — १ पुत्र, २ पत्नी आणि ३ सज्जनसमागम.

संसारतापदग्धानां त्रयो विश्रांतिहेतवः ।
अपत्यं च कलत्रं च संतसंगतिरेव च ॥ ( सु. )

**तीन वेळां विश्वरूपदर्शन** — पहिलें–धृतराष्ट्राच्या राजसभेंत शिष्टाईस गेल्या वेळीं, दुसरें–अर्जुनास गीता उपदेशितांना आणि तिसरें–युधिष्ठिरास राज्याभिषेक झाल्यानंतर द्वारकेस परत जात असतां, उत्तंक नांवाच्या तपोधन ऋषीस त्याचे विनंतीवरून श्रीकृष्णानें विश्वरूपदर्शन दिलें. ( भगवान् श्रीकृष्ण )

**तीन वैभवलक्षणें** — १ दुसऱ्याच्या गोष्टींत ढवळाढवळ न करणें, २ आपल्या कामामध्यें मग्न असणें आणि ३ मिळालेल्या संपत्तीचें रक्षण करणें. हीं तीन वैभव प्राप्त होण्याचीं लक्षणें होत.

अव्यापारः परार्थेषु नित्योद्योगः स्वकर्मसु ।
रक्षणं समुपात्तानामेतद्वैभवलक्षणम् ॥ (म. भा. सभा. ५४–७)

**तीन व्यसनें ( कामापासून उत्पन्न होणारीं )** — १ मिथ्या भाषण, २ परस्त्रीगमन व ३ वैरावांचून मृत्यु करणें. हीं तीन व्यसनें कामापासून उत्पन्न होणारीं. ( वा. रा. अरण्य. ९–३ )

**तीन व्याहृति गायत्रीमंत्राच्या** — १ भूः (पृथ्वी) २ भुवः (अंतरिक्ष) आणि ३ स्वः (स्वर्ग)

**तीन वृत्ति ( शब्दाची अर्थबोधक शक्ति )** — १ अभिधा, २ लक्षणा आणि ३ व्यञ्जना. अर्थ ज्या शक्तीमुळें बोधित होतो ती वृत्ति. काही "तात्पर्य" नामक चौथी वृत्तीहि मानतात.

**तीन शरीरें** — १ स्थूल शरीर ( पंचमहाभूताच्या पंचीकरणानें बनलेलें), २ सूक्ष्म शरीर (मन, बुद्धि, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें व पंचप्राण यांचें) आणि ३ कारणशरीर ( अविद्या ). अशीं तीन शरीरें आत्म्याला असतात.

**तीन शक्ति** — १ ज्ञानशक्ति, २ क्रियाशक्ति आणि ३ अर्थशक्ति. ( देवी. भाग. तृतीयस्कंध ७–२५ )

**तीन शत्रू चंद्राचे** — १ कावळा, २ चोर आणि ३ विरही (चंद्रप्रभा)

**तीन शास्ते — ( ज्यांचे नियमन करणारे )** — १ मनोनिग्रही माणसाचा शास्ता गुरु, २ दुष्टाचा शास्ता राजा ( शासनाधिकारी ) आणि ३ गुप्तपणें पाप करणाराचा प्रत्यक्ष यमच. हे तीन शास्ते होत.

गुरुरात्मवतां शास्ता शास्ता राजा दुरात्मनाम् ।
अथ प्रच्छन्नपापानां शास्ता वैवस्वतो यमः ॥ )
(म. भा. उ. ३५–७१ )

**तीन 'स' कार प्रतिष्ठा वाढविणारे** — १ संपत्ति, २ सन्मान आणि ३ सत्ता.

**तीन सत्ता** — १ पारमार्थिक सत्ता, २ व्यावहारिक सत्ता आणि ३ प्रातिभासिक सत्ता ( वेदान्तशास्त्र )

**तीन सप्तक ( गायनशास्त्र )** — १ मंद्र, २ मध्य आणि ३ तार.

**तीन संग्रहणीय वस्तु** — १ अन्न, २ स्नेही व ३ औषधी. यांचा संग्रह करावा.

**तीन संप्रदाय व त्यांची घोषणावाक्यें ( दत्त उपासकांचे ) —** १ गुरु संप्रदाय-श्रीगुरुदेवदत्त, २ अवधूत संप्रदाय-अवधूत चिंतन श्रीगुरु-देवदत्त. ३ आनंद संप्रदाय-आनंदे दत्तात्रय देवदेव. ( दासोपंताची पासोडी-प्रस्तावना )

**तीन साधनें ( तिघांना आपलेसे करून घेण्याची ) —** १ वृद्ध-इष्ट वस्तूचें दान, २ बालक-प्रेमळ अंतःकरण आणि ३ विद्वान्-मधुरवाणी.

**तीन साधनें ब्रह्मविद्या शिकण्याची —** १ श्रद्धा, २ भक्ति व ३ ध्यान ( कैवल्योपनिषद् १-२ )

**तीन साधनें ज्ञानप्राप्तीची —** १ प्रत्यक्ष, २ अनुमान आणि ३ आगम ( शास्त्र ) ' प्रत्यक्षानुमानागमाभ्याम् ' ( पातंजलयोगशास्त्र )

**तीन सिद्धि —** १ व्यवहार सिद्धि, २ अलौकिक सिद्धि म्हणजे अणिमा लघिमा इ. सिद्धि आणि ३ अत्यंत दुःखनिवृत्ति व परमानंद प्राप्तिरूप सिद्धि. ( हरिपाठ रहस्य )

**तीन सांस्कृतिक गर्जना महाराष्ट्रधर्माच्या —** १ पुंडलिक वरदे हरि विठ्ठल, २ हरहर महादेव आणि ३ जयजय रघुवीर समर्थ. (महाराष्ट्र जीवन)

**तीन स्थानीं गंगा विशेष पुण्यप्रद —** १ तीर्थराज प्रयाग, २ हरि-द्वार व ३ गंगासागर संगम. ( गूढार्थचंद्रिका )

**तीन सौंदर्यें —** १ विचारसौंदर्य, २ गुणसौंदर्य व ३ मनोसौंदर्य.

**तीन स्थानें ध्वनीची —** १ हृदय, २ कंठ व ३ मूर्ध्न या स्थानांतून अनुक्रमें मंद्र, मध्यम व तार हे स्वरालाप उगम पावतात. ( गायनशास्त्र )

(**तीन स्थानें ( पवित्र ) —** १ अवताराची जन्मभूमि, २ संताची मृत्युभूमि आणि ३ वीराची कर्मभूमि. ( विचार पोथी ) )

( **तीन स्थानें भगवान् सूर्यदेवतेची —** १ उदयकाल-पूर्वदेशाच्या पर्वतावर-कोणार्कजवळ, २ मध्यान्ह-कनोजच्या दक्षिणेस कालप्रिय ( काल्पी ) येथें व ३ अस्तमान-मूलस्थान ( मुल्तान ).चंद्रभागा ( चिनाब ) काठीं. अशी तीन स्थानें श्रीकृष्णपुत्र सांबानें स्थापन केलीं. ( वराह पु. अ. १७८ ) )

**तीन स्वर —** १ उदात्त, २ अनुदात्त व ३ स्वरित.

**तीन स्कंध ( विभाग ) ज्योतिषाचे —** १ सिद्धान्त, २ संहिता आणि ३ होरा.

**तीन हट्ट** — १ बालहट्ट, २ स्त्रीहट्ट आणि ३ राजहट्ट.

**तीन हेतु तीर्थप्राशनाचे** — १ देहशुद्धि, २ धर्मसाधन आणि ३ मोक्षप्राप्ति असे तीन हेतु तीर्थ घेण्याचे क्रमानें सांगितले आहेत.

प्रथम कायशुद्धयर्थं द्वितीय धर्मसाधनम् ।
तृतीय मोक्षमाप्नोति एव तीर्थं त्रिधा पिबेत् ॥ ( ऋग्वेदी ब्रह्मकर्म )

**तीन हेतु ( विवाहाचे )** — १ धर्मसाधन, २ प्रजोत्पत्ति व ३ रतिसुख. "धर्मप्रजरत्यर्थो हि विवाहः ।"

**तीन हास्यें** — १ सुस्हास्य, २ स्मितहास्य आणि ३ व्यक्तहास्य. असे हास्याचे तीन प्रकार.

**तिघांना आश्रयाविना शोभा नाहीं** — १ विद्वान, २ स्त्री आणि ३ वेली.

विनाश्रय न शोभन्ते पण्डितावनितालताः । ( सु. )

**तिघेजण जगात निंद्य** — १ लग्न केल्यानंतर पत्नीला टाकणारा पति, २ बापाचे पश्चात् आईचें भरणपोषण न करणारा मुलगा आणि ३ उपवर मुलीचा योग्य वेळीं विवाह न करून देणारा बाप. ( सावित्रीचरित्र )

**तिघांच्या तीन प्रकारें परीक्षा** — १ सोन्याची–अग्नीनें, २ स्त्रियाची –सोन्यानें व ३ पुरुषाची परीक्षा–स्त्रियांनी. ( विनोद महदाख्यायिका )*

**तिघांना तीन प्रकारचें भय असतें** — १ कनिष्ठ वर्गाना वेकारीचे भय, २ मध्यम वर्गीयांना मरणाचें भय आणि ३ उच्च वर्गीयांना अपमानाचे भय.

अवृत्तेर्भयमन्त्यानां मध्यानां मरणाद्भयम् ।
उत्तमानां तु मर्त्यानामपमानात्परं भयम् ( म. भा. उ. ३४–५२ )

**तिघेजण दुर्दैवी** — १ जुगारानें धनप्राप्ति, २ सेवा करून मान आणि ३ भिक्षेनें भोग मिळण्याची इच्छा करणारा. हे तिघे दुर्दैवी होत.

द्यूतेन धनमिच्छन्ति मानमिच्छन्ति सेवया ।
भिक्षया भोगमिच्छन्ति ते दैवेन विडम्बिताः ॥ ( सु. )

**तिघेजण नामधारी होत** — १ नाव विद्याधर पण मूर्ख, २ नाव दिवाकर पण जन्मांध व ३ नाव लक्ष्मीधर पण दरिद्री. कृति व आकृति यांत विसंगति असली म्हणजे हा संकेत उपयोजिला जातो.

विद्याधरो यथा मूर्खो जन्मांधश्च दिवाकर ।
लक्ष्मीधरो दरिद्रश्च-त्रयस्ते नामधारका ॥ ( सु. )

**तिघाचा नाश अटळ** — १ अज्ञ-ज्ञान नसणारा, २ अश्रद्ध-स्वत ला ज्ञान नसून ज्ञानी पुरुषाच्या वचनावर विश्वास न ठेवणारा आणि ३ संशयात्मा —ज्ञानी सांगतात त्याविषयीं सतत संशय घेणारा.

**तिघाना नरक मिळतो** — १ मित्रद्रोही २ कृतघ्न आणि ३ विश्वासघातकी
मित्रद्रोही कृतघ्नश्च योऽहि विश्वासघातक·
ते नरा नरकं यान्ति यावच्चंद्रदिवाकरौ ( विक्रमचरितम् )

**तिघेजण पित्यासमान** — १ जन्मदाता, २ प्राणदाता व ३ अन्नदाता.
शरीरकृत् प्राणदाता यस्य चान्नानि भुंजते ।
क्रमेणैते त्रयोऽप्युक्ता पितरो धर्मशासने ॥ (म. भा. आदि ७२ १५)

**तिघेजण पृथ्वीचा उपभोग घेणारे** — १ शूर, २ विद्यासपन्न आणि ३ सेवा कशी करावी हे जाणणारा. ( म. भा. उद्योग ३५ ७४ )

· **तिघेजण महाभारताचे ( आजच्या ) कर्ते** — १ व्यास-जय, २ वैशपायन-भारत आणि ३ सौती-महाभारत ( म. भा. उपसहार )

(**तिघेजण यज्ञ न करिता स्वर्ग प्राप्त करून घेतात** — १ अन्नदान करणारा, २ पाणपोई घालणारा आणि ३ रोगी बरा करणारा या तिघाना यज्ञ न करता स्वर्ग ( उत्तम गति ) प्राप्त होते.
अन्नदो जलदश्चैव ह्यातुरस्य चिकित्सक ।
त्रयस्ते स्वर्गमायान्ति विना यज्ञेन भारत ॥ ( योगरत्नाकर ) )

**तिघेजण वक्रोक्तिमार्गनिपुण** — १ सुबन्धु, २ बाणभट्ट आणि ३ कविराज-( राघवपाण्डवीय काव्याचा कर्ता ) हे तीन संस्कृत वाङ्मयात वक्रोक्तिमार्गनिपुण असे कवि होऊन गेले.
सुबन्धुर्बाणभट्टश्च कविराज इति त्रय ।
वक्रोक्तिमार्गनिपुणाश्चतुर्थो विद्यते न वा ॥ ( रा. पा. १ ४१ )

**तिघेहि सुखी असावेत** — १ अन्नदाता, २ भोजन करणारा व ३ स्वयपाक करणारा.
" अन्नदाता तथा भोक्ता पाचकस्तु सुखी भवेत् । " ( सु. )

**तिघेजण सृष्टिकर्त्याशीं स्पर्धा करणारे** -- १ ग्रंथकार, २ चित्रकार आणि ३ शिल्पकार. ( प्राचीन हिंदी शिल्पशास्त्रसार )

**तिघेजण स्थानांतरामुळें शोभा पावतात** -- १ सिंह, २ सत्पुरुष व ३ हत्ती. हे तिघे संचारामुळे शोभून दिसतात.

' स्थानभ्रष्टाः सुशोभन्ते सिंहाः सत्पुरुषा गजाः ' ( सु. )

**तीर्थयात्रेचीं तीन प्रयोजनें** -- १ देहदंडन, २ पटिकाराचा त्याग आणि ३ आपपर अभेदत्व. अशीं तीर्थयात्रेचीं तीन प्रयोजनें होत.

यापरी यात्रा तीन्ही । घडल्या असती ज्यालागुनी । तो ज्ञानियाचा मुकुटमणी । मतिईश्वर होईल ॥ ( भक्तिसारामृत ११-१०६ )

**त्रयी** -- तिन्हींचा समुदाय. ( अ ) १ सत्, २ चित्, आणि ३ आनंद; ( आ ) १ ऋक्, २ यजुस् आणि ३ सामन्; ( इ ) १ शासन, २ हवन आणि ३ स्तवन; ( ई ) १ अध्यात्म, २ भक्ति आणि ३ नीति. अशा अनेक त्रयी आहेत. याच्या एकत्रीकरणातच वैदिक धर्माची सिद्धि आहे. ( उ ) १ बाप, २ आजा आणि ३ पणजा; ( ऊ ) १ आई, २ आजी आणि ३ पणजी असे अनुक्रमानें येणारे तीन पूर्वज ( ए ) १ धर्म, २ अर्थ व ३ काम याचा समुच्चय ( ऐ ) १ संहिता, २ ब्राह्मण व ३ आरण्यकें मिळून होणारे ग्रंथ.

**आत्मत्रय** -- १ जीवात्मा, २ अंतरात्मा व ३ परमात्मा.

**आयुर्वेदग्रंथत्रयी** -- १ चरक, २ सुश्रुत आणि ३ वाग्भट.

**दर्शनत्रयी** -- १ सांख्य, २ योग व ३ वेदान्त.

**पुराण प्रस्थानत्रयी** -- १ रामायण, २ महाभारत आणि ३ भागवत.

**प्रमाणत्रयी** -- १ श्रुति, २ युक्ति व ३ अनुभव. ( वेदान्त )

**प्रार्थनात्रयी ( औपनिषदिक )** -- १ असतो मा सद् गमय । २ तमसो मा ज्योतिर् गमय । व ३ मृत्योर् मा अमृतं गमय ।

**रत्नत्रय ( जैन धर्म )** -- १ सम्यग्दर्शन, २ सम्यग्ज्ञान व ३ सम्यक् चारित्र. ( रत्नकरंडक श्रावकाचार )

**रत्नत्रयी** -- ( बुद्ध धर्माची ) १ बुद्ध, २ धर्म आणि ३ संघ.

**वनस्पतित्रयी** -- १ सुंठ, २ मिरी व ३ पिंपळी.

**वारकरी प्रस्थानत्रयी** — (अ) श्रीज्ञानेश्वरी, २ तुकारामाची गाथा आणि ३ एकनाथी भागवत. (आ) १ चांगदेवपासष्टी, २ अमृतानुभव आणि ३ ज्ञानेश्वरी.

**वेदान्तप्रस्थानत्रयी** — १ दशोपनिषदे, २ भगवद्गीता आणि ३ ब्रह्मसूत्र

**त्रिकर्मे** — १ नित्य, २ नैमित्तिक आणि ३ काम्य.

'नित्यं नैमित्तिकं काम्यमिति कर्म त्रिधा मतम्' (व्यास. स्मृति ३–१)

**त्रिकटु** — १ सुंठ, २ मिरे आणि ३ पिंपळी या तीन औषधांचा समुदाय.

**त्रिकूट** — तीन शिखरे असलेला लंब नामांतराने लंकेतील एक पर्वत. (वा. रा. सुंदर सर्ग १ भारत–प्राचीन ऐति. कोश)

**त्रिकूट (पाकशास्त्र)** — १ गोरकूट, २ मेथकूट आणि ३ तिळकूट.

(**त्रिकांडवभ्रु** — पांडवांपैकी भीमाचा शक्तिकेतु हा महापराक्रमी पुत्र. पण भारतीयुद्धात हा कौरवपक्षाला मिळाला होता. याचेजवळ तीन विपारी धूम्रास्त्रे होती म्हणून याला त्रिकांडवभ्रु म्हणत असत (शक्तिकेतु))

**त्रिकांड वेद** — १ कर्मकांड (मंत्रभाग), २ उपासनाकांड (ब्राह्मण भाग) आणि ३ ज्ञानकांड (उपनिषद्भाग). या तीन कांडांनी युक्त असा वेद.

ज्ञान भक्ति कर्मकांडा। वेद त्रिकांड नेमस्ता ॥ (ए. भा. २०–७१)

**त्रिगुण** — १ सत्त्व, २ रज आणि ३ तम हे तीन प्राकृतिक गुण.

ते प्राणियें तव स्वभावें। अनादि मायाप्रभावें।
त्रिगुणाचेचि आघवे। वळिले आहाती ॥ (ज्ञा. १७–५६)

**त्रिगुणांची तीन प्रतीकें** — १ रजोगुण–रावण, २ तमोगुण–कुंभकर्ण आणि ३ सत्त्वगुण–बिभीषण. (विचार पोथी)

**त्रिचक्र** — आश्विनीकुमारांचा रथ (आदर्श हिंदी श. को.)

**त्रिजात** — दालचिनी, २ तमालपत्र आणि ३ वेलदोडे या तीन मसाल्याच्या पदार्थांस (समुच्चयानें).

**त्रितन्त्री** — (अ) तीन तारा असलेली वीणा. (आ) १ आध्यात्मिक, २ आधिभौतिक आणि ३ आधिदैविक.

**त्रिताप** — १ आधि, २ व्याधि आणि ३ उपाधि.

**त्रिदोष** — १ वात, २ पित्त आणि कफ हे तीन मुख्य धातु शरीरात असतात. आयुर्वेदाची मूळ उभारणी शरीरातील या मुख्य तीन पदार्थांवर केलेली आहे. याना उद्देशूनच वातपित्तकफात्मक त्रिदोषपद्धति असें नाव आहे. काहींच्या मतें रक्त हा चवथा पदार्थ किंवा दोष मानून चतुर्दोषात्मक पद्धति असें म्हणतात.

**त्रिदंडी** — १ काया (कर्म), २ वाचा आणि ३ मन, या तिहींवर ज्यानें ताबा मिळविला आहे असा पुरुष.

वाग्दंड. कर्मदण्डश्च मनोदण्डश्च ये त्रयः ।
यस्यैते नियता दण्डाः स त्रिदण्डी महायतिः ॥ (मु.)

**त्रिदंडी संन्यास** — ज्यात १ शिखा, २ यज्ञोपवीत व ३ कच्छ याचा त्याग करावा लागत नाहीं असा सन्यासाचा एक प्रकार. अशास पुन्हा गृहस्थाश्रमात येता येतें, अशी समजूत आहे.

**त्रिधातु** — १ वात, २ पित्त व ३ कफ. (ऋग्वेद १–३४–६) (सायण भाष्य.)

**त्रिनयन** — महादेवाचे तीन नेत्र, १ श्वेत भानु–सोम, २ बृहद्भानु–अग्नि आणि ३ भानु–सूर्य हे महादेवाचे तीन नेत्र होत. (स्तुतिकुसुमाञ्जलि)

**त्रिपथ** — १ कर्म, २ ज्ञान आणि ३ उपासना. या तिन्ही मार्गांस समुच्चयानें म्हणतात

**त्रिपीटक** — १ सूत्र, २ विनय आणि ३ अभिधर्म म्हणजे बुद्धदेवाचे आचार आणि तत्वज्ञान अशी तीन पीटकें म्हणजे संग्रह. याना त्रिपीटक अशी संज्ञा आहे.

**त्रिपदागायत्री** —तीन पदाचा गायत्री छंद. उदा०—

ॐतत्सवितुर्वरेण्यम् । भर्गोदेवस्य धीमहि । धियो यो न. प्रचोदयात् (गा. मंत्र)
" त्रिपदा जपे पवित्रपूर्ण । याल्यागीं वेदाचें निवासस्थान ॥ " (ए. भा. ११–१३८०)

**त्रिपथगा ( भागीरथी )** — ही १ स्वर्ग, २ मृत्यु आणि ३ पाताळ या तिन्ही लोकात वाहणारी. म्हणून त्रिपथगा.

क्षितौ तारयते मर्त्यान् नागास्तारयतेऽप्यध ।
दिवि तारयते देवान् तेन त्रिपथगा स्मृता ॥ (सु.)

**त्रिपुटी** —– एक नसेल तर दुसऱ्या दोहोंची सिद्धि होणार नाहीं. अशा रीतीनें एकमेकाशीं संबद्ध अशा तीन गोष्टींचा समुच्चय, याला त्रिपुटी म्हणतात. अशा त्रिपुटी अनेक आहेत.

उदा० —– परमेश्वर, आत्मा व जगत्, तत्, त्वं, व असि, सत्, चित् व आनंद, ज्ञाता, ज्ञेय व ज्ञान, कर्ता, कारण व क्रिया, प्रकृति, पुरुष व परमपुरुष, दृश्य, द्रष्टा व दर्शन, ब्रह्म, माया व जीव, साध्य, साधक व साधन; पूजा, पूजक व पूज्य, ध्येय, ध्याता व ध्यान, पिता, पुत्र आणि पवित्र आत्मा (ख्रिस्ती धर्म), भोक्ता, भोग्य व भोग, शब्द, अर्थ व प्रत्यय, प्रिय, प्राणेश्वरी व प्रीति, शिष्य, सद्गुरु व साक्षात्कार उपमा, उपमेय व उपमान, व्यष्टि, समष्टि व परमेष्ठी, कर्म, भक्ति व ज्ञान, कर्ता, कर्म व क्रियापद, अकार, उकार व मकार, जागृति, स्वप्न व सुषुप्ति इत्यादि.

**त्रिपुंड्र** — १ अ-कार, २ उ-कार आणि ३ म-कार या भस्माच्या तीन रेषा कपाळावर लावावयाच्या. यास त्रिपुंड्र म्हणतात. (गुरुचरित्र)

**त्रिफळा** — १ हिरडा, २ बेहडा आणि ३ आवळकाठी या तीन औषधांचा समुदाय.

**त्रिभुवन** —– १ स्वर्ग, २ मृत्यु व ३ पाताळ.

**त्रिमधु** —– १ तूप, २ गूळ किंवा साखर आणि ३ मध. हे तीन मधुर पदार्थ मानले आहेत.

'घृत गुड माक्षिक च विज्ञेय मधुरत्रयम्।' (शा नि.)

**त्रिमूर्ति** —– (अ) १ ब्रह्मा (सृजन), २ विष्णु (पालन) आणि ३ शिव (संहार) या तीन देवता, (आ) ब्रह्मा, विष्णु आणि शिव या तिन्ही देवतांच्या अंशापासूनचा दत्तात्रेयावतार.

**त्रिराम** —– १ दाशरथि राम, २ परशुराम आणि ३ बलराम.

**त्रिरूपा लक्ष्मी** —– १ श्रीदेवी, २ भूदेवी व ३ दुर्गा. लक्ष्मीदेवतेचीं हीं सत्त्व, रज व तम या त्रिगुणात्मक प्रकृतीचीं तीन रूपें आहेत.

'लक्ष्मी त्रिरूपा सभूता श्री–भू–दुर्गेति सज्ञिता' (गरुड ब्रह्म. ४–१)

**त्रिलोह** —– १ सोनें, २ रुपें व ३ तांबें.

**त्रिवाचा** — तीन वेळा उच्चारिलेले वचन. ठाम अभिवचन.
ज्ञानेश्वरी आणीन हें प्रमाण । सत्य सत्य त्रिवाचा ॥ (रा. वि. १७–११८)

(**त्रिवारशांति** — १ व्यक्तीमध्ये शांति, २ राष्ट्रांत शांति आणि ३ जगांत शांति. याचा अर्थ सर्वत्र शांति नांदावी असा आहे. म्हणून कोणत्याहि शुभकार्याचे अंतीं 'ॐ शांति शांति. शांति' असा शांतिपाठ तिनदा उच्चारण्याचा परिपाठ आहे.)

(**त्रिशूल** — १ कटिशूल (कामेच्छा), २ पोटशूल व ३ मस्तकशूल.)

**त्रिविध आनंद** — १ काव्यानंद, २ ज्ञानानंद व ३ भक्त्यानंद.

**त्रिविध आदर्श मानवी जीवनाचे** — १ धर्म, २ अर्थ व ३ काम.
"धर्मार्थाविरोधेन काम सेवेत।" (कौटिल्य)

**त्रिविध गंडांतर** — १ नक्षत्र गंडांतर, २ तिथि गंडांतर व ३ लग्न गंडांतर. (म. वा. को).

**त्रिविध केतू अथवा दुश्चिन्हें** — १ दिव्य–उल्कापात इ., २ अंतरिक्ष–धूमकेतू इ व ३ पार्थिव–भूकंप इ. असे तीन प्रकार. असे उत्पात भारतीय युद्धारंभीं झाले होते अशी कथा आहे. (मुक्तेश्वर सभा अ. १२)

**त्रिविध ताप** — १ आधिदैविक (विद्युत्पतन, अतिवृष्टि इ.), २ आध्यात्मिक (ज्वर, शूळ इ.) आणि ३ आधिभौतिक (पाण्यात बुडणें, चौर्य, भय इ.)
देवापासूनि आधिदैविक । मानसताप आध्यात्मिक ।
भूतापासाव तो भौतिक । या नांव देख त्रिविध ताप ॥ (ए. भा. २२–३९९)

**त्रिविध देह** — १ स्थूल देह, २ सूक्ष्म देह आणि ३ कारण देह.

**त्रिदोष (आयुर्वेद)** — १ वात, २ पित्त आणि ३ कफ. हे शरिरांत असणारे तीन दोष चांगल्या स्थितींत असले म्हणजे शरीराचें रक्षण करतात व बिघडले म्हणजे नाश करतात.
'वात पित्त-कफा एते त्रयो दोषा इति स्मृता ।' (भावप्रकाश पूर्वखंड)

**त्रिविध दोष खाद्यपदार्थासंबंधीं** — १ जातिदोष–कांदा, लसूण वगैरे २ निमित्त दोष–हलवायाकडील पदार्थ व ३ आश्रयदोष–चारित्र्यहीन व्यक्तींनीं स्पर्शिलेले (स्वामी विवेकानंदाच्या सहवासात)

**त्रिविध नायिका** — १ मुग्धा, २ मध्या व ३ प्रौढा.

**त्रिविध प्रतिबंध** — १ भूत प्रतिबंध–मनाची अस्थिरता, विषयचिंतन वगैरे, २ वर्तमान प्रतिबंध–कुतर्क दुराग्रह वगैरे आणि ३ भावी प्रतिबंध–निश्चय करण्याची शक्ति बुद्धीत नसणं, मिथ्या ज्ञान इ. (बोधामृत)

**त्रिविध प्रकार औषधाचे** — १ दिव्य–हवा व उष्णता, २ पार्थिव–खनिज, उद्भिज्ज पदार्थ व ३ औदक–प्रवाही किंवा द्रवरूप (ऋ. मंडल १–३४)

**त्रिविध बुद्धि** — १ देहबुद्धि, २ जीवबुद्धि आणि ३ आत्मबुद्धि.

**त्रिविध ब्रह्म** — १ उपभोग घेणारा जीवात्मा २ उपभोग्य हें बाह्य वस्तुविश्व व ३ त्या दोहांना प्रेरणा देणारें चैतन्य ही ब्रह्माची त्रिविधता (धवलगिरी)

**त्रिविध मृदंग** — १ मायूरी, २ अर्धमायूरी आणि ३ कूर्मरता.

**त्रिविध वीरचूडामणी** — १ रणवीर, २ विद्यावीर आणि ३ दान वीर अशा तीन गुणानीं युक्त असा प्राचीन कालीं राजा भोज होऊन गेला. त्याला त्रिविध वीरचूडामणी म्हणत.

**त्रिविध श्रद्धा** — १ सात्त्विक, २ राजस आणि ३ तामस.

'त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा।' (भ. गी. १७–२)

**त्रिवेणी संगम** — १ गंगा, २ यमुना आणि ३ सरस्वती (गुप्त). या तीन नद्यांचा संगम हा प्रयागास आहे त्रिवेणी संगमावरील स्नान फार पुण्यकारक मानलं आहे.

**त्रिविध श्रोता** — १ मुक्त, २ मुमुक्षु आणि ३ विषयी (गूढार्थचिंतामणी कोश)

**त्रिविध सुखें** — १ लौकिक, २ पारलौकिक आणि ३ पारमार्थिक.

**त्रिविध समीर** — १ शीतल, २ मंद व ३ सुगंध.

**त्रिपाद भूमि** — १ त्रिविष्टप, २ भरतखंड आणि ३ पाताळ या तीन देशविभागांना एकत्रानें त्रिपाद भूमि म्हटलं आहे. ही त्रिपाद भूमि वामनानं बळीजवळ मागितली व ती त्यानं दिली अशी पौराणिक कथा आहे

**त्रिसूत्री ( भगवंताच्या अवतारकार्याची )** — १ सज्जनांचें रक्षण, २ दुष्टांचें निर्दालन व ३ धर्माची संस्थापना.

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ( भ. गी. ४ ८ )

**त्रिस्थळी यात्रा** — १ काशी, २ प्रयाग आणि ३ गया. या तीन तीर्थांची यात्रा.

**त्रिस्रोता** — १ स्वर्ग, २ मृत्यु आणि ३ पाताळ. या तिन्ही लोकांत वाहणारी–गंगा. पृथ्वीवरील प्रवाहास भागीरथी, स्वर्गातील प्रवाहास मंदाकिनी व पाताळ लोकांतील प्रवाहास भोगावती अशी संज्ञा आहे.

**त्रैविद्या** — १ ऋग्वेद, २ यजुर्वेद आणि ३.सामवेद या तीन वेदांना मिळून त्रैविद्या अशी संज्ञा आहे.

" त्रयी वै विद्या ऋचो यजूंषि सामानि " ( शतपथ )

## ३॥

**औट** — म्हणजे साडेतीन.

**साडेतीन पीठें** — १ तुळजापूरची भवानी, २ मातापुरची रेणुका, ३ अंबेजोगाईच्या आप्याची योगेश्वरी आणि ½ कोल्हापूरची लक्ष्मी हीं देवींचीं साडेतीन पीठें मानिलीं आहेत.

**साडेतीन मुहूर्त** — १ वर्षप्रतिपदा, २ अक्षय्यतृतीया, ३ विजया-दशमी हे तीन पूर्ण व बलिप्रतिपदा हा अर्धा.

**साडेतीन वाद्यें** — १ वीणा, २ पखवाज, ३ चवरी आणि ½ मंजिरी मिळून साडेतीन वाद्यें.

**साडेतीन शहाणे ( पेशवाईंतील )** — १ सखारामबापू बोकील, २ देवाजीपंत चोरघडे, ३ विठ्ठल सुंदर आणि नाना फडणवीस अर्धा शहाणा. हे साडेतीन शहाणे मराठ्यांच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत.

# ४

**चतुर्थ** -- १ चार वस्तूंच्या समुच्चयापैकी चवथ्या वस्तूला सकेताने म्हणतात. कात, मोक्ष, दड इ.

(अ) १ पान, २ सुपारी, ३ चुना आणि ४ **कात**, (आ) १ धर्म २ अर्थ, ३ काम आणि ४ **मोक्ष**, (इ) १ साम, २ दाम, ३ भेद, आणि ४ **दंड**.

**चतुराक्षरी मंत्र** -- (अ) " राधा कृष्ण " भाविकाचा एक गोड मत्र. (आ) " वासुदेव " (इ) " दत्ता-त्र-य " (श्रीदत्तस्तवपदामृत) (ई) " रामकृष्ण ".

" उघडा मन्त्र जाणा । रामकृष्ण म्हणा " (तुकाराम)

**चतुरात्मा** -- १ मन, २ बुद्धि, ३ अहकार व ४ चित्त या चार अत.करणाच्या वृत्ती होत; म्हणून त्यास चतुरात्मा म्हणतात. (वि. स. नाम)

**चतुरानंद** -- १ आत्मानद, २ ब्रह्मानद, ३ अविद्यानद व ४ विषयानद.

**चतुरायुध** -- १ शख, २ चक्र, ३ गदा आणि ४ पद्म. ही श्रीविष्णूंची चार आयुधे.

**चतुरायुध क्षेत्रें** -- १ शखक्षेत्र-जगन्नाथपुरी, चक्रक्षेत्र-भुवनेश्वर, ३ गदाक्षेत्र - वैतरणी नदी आणि ४ पद्मक्षेत्र-मैत्रावन (कोणार्क) ही सर्व चतुरायुध क्षेत्रे, ओरिसात (उत्कल) आहेत.

**चतुर्विध अन्न** -- १ भक्ष्य-चर्वण करून खाण्याचे पदार्थ-भाकरी, पोळी वगैरे; २ लेह्य-जसे पचामृत, रायते वगैरे ३ चोष्य-चोखण्याचे ऊस इ. आणि ४ पेय-पिण्याचे-दूध, ताक वगैरे. (आ) १ शुष्क, २ पक्व, ३ स्निग्ध आणि ४ विदग्ध. (शिव-ली.)

**चतुर्विध आसव (चित्त-मळ)** -- १ कामासव, २ दृष्टि आसव-मताभिमान, ३ भवासव-पारलौकिकेच्छा व अविद्या-अयथार्थ ज्ञान (बुद्धदर्शन)

**चतुर्विध जीव** — १ देव, २ मनुष्य, ३ तिर्यक् (मनुष्येतर जीव) आणि ४ नरकी (जैनधर्म)

**चतुर्विध कर्तव्यें विद्यार्थ्यांचीं** — १ स्वतंत्र बुद्धि, २ स्वतंत्र राहाणें, ३ सेवापरायणता व ४ सर्वसावधानता (भूदानगंगा भाग ६)

**चतुर्विध दानें** — १ आहारदान, २ ज्ञानदान, ३ औषधीदान आणि ४ अभयदान (जैनधर्म).

**चतुर्विध पुरुषार्थ** — १ धर्म, २ अर्थ, ३ काम व ४ मोक्ष. हे चार पुरुषार्थ होत. ज्ञानी भक्त, भक्ति हा पंचम पुरुषार्थ मानतात. 'भक्ति भाव प्रेमा। साधित पुरुषार्थ। ब्रह्माचा जो अर्थ। निज ठेवा॥' (तुकाराम)

**चतुर्विध प्रलय** — १ नित्य प्रलय, २ प्राकृत प्रलय, ३ नैमित्तिक प्रलय आणि ४ आत्यंतिक प्रलय.

**चतुर्विधभक्त** — १ आर्त–द्रौपदी, २ जिज्ञासु–उद्धव, ३ अर्थार्थी ध्रुव आणि ४ ज्ञानी–शुकदेव.

'आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ।' (भ. गी. ७–१६)

**चतुर्विध भक्ति लोकमातेची (नदीची)** — १ स्नान, २ पान, ३ दान व ४ गान (जीवनलीला).

(**चतुर्भद्र** — (अ) १ धर्म, २ अर्थ, ३ काम व ४ मोक्ष या चार पुरुषार्थांचा समुच्चय. (आ) १ सुंठ, २ अतिविष, ३ मुस्ता गवत व ४ गुळवेल. या चार औषधांचा समूह. (इ) १ गोड शब्दानें दान, २ गर्वरहित ज्ञान, ३ क्षमाशील शौर्य व ४ त्यागयुक्त वित्त. या चार दुर्लभ गोष्टींना चतुर्भद्र म्हणतात. (प्रश्नोत्तर –रत्न–मालिका))

**चतुर्विध मित्र** — १ औरस, २ नात्यागोत्याचे, ३ वंशपरंपरा ऋणानुबंधी आणि ४. आपत्तीत रक्षण करणारे.

> औरसं कृतसंबंधं तथा वंशक्रमागतम्।
> रक्षकं व्यसनेभ्यश्च मित्रं ज्ञेयं चतुर्विधम्॥ (पं. नी. ४–७४)

**चतुर्विध मुक्ति** — १ सलोकता, २ समीपता, ३ सरूपता व ४ सायुज्यता. (दा. बो. ४–१०–२८)

**चतुर्मूर्ती** — १ विराट्, २ सूत्रात्मा, ३ अव्याकृत व ४ तुरीय. या चार ब्रह्माच्याच मूर्ती होत म्हणून त्यास चतुर्मूर्ती म्हणतात. (विष्णु स.–नाम)

**चतुर्विध योग** — १ कर्मयोग, २ भक्तियोग, ३ राजयोग आणि ४ ज्ञानयोग.

**चतुर्व्यूह** — (अ) १ वासुदेव, २ संकर्षण, ३ प्रद्युम्न आणि ४ अनिरुद्ध. पृथ्वीस आधारभूत असे चार व्यूह आहेत; (आ) १ रोग, २ आरोग्य, ३ निदान आणि ४ भैषज्य ( वैद्यशास्त्र ) (इ) १ शरीर पुरुष, २छंदः पुरुष, ३ वेद पुरुष आणि ४ महापुरुष असे परब्रह्माचे चार व्यूह आहेत म्हणून त्यास चतुर्व्यूह म्हणतात. ( विष्णू स. नाम. )

**चतुःश्लोकी भागवत** — श्रीमद्भागवताच्या दुसऱ्या स्कंधातील नवव्या अध्यायातील ३२ ते ३५ हे चार श्लोक. यात ब्रह्मदेवाला भगवताने सांगितलेले गुह्य ज्ञान अथवा सर्व भागवत ग्रंथाचे सार आहे, म्हणून त्यास चतुःश्लोकी भागवत म्हणतात.

तें हे चतुःश्लोकी भागवत ।
सट्यासी सांग भगवत ॥ ( च. भा. ४३० )

**चतुःश्लोकी शाकुंतल** — शाकुंतल नाटकातल्या चवथ्या अंकातील चार श्लोक. या कालिदासाच्या अमर कृतीला ही संज्ञा आहे.

काव्येषु नाटकं रम्यं तत्रापि च शकुंतला ।
तन्मध्ये तु चतुर्थोऽङ्कः तत्र श्लोकचतुष्टयम् ॥ ( सु. )

**चतुर्विध साधनें (दुःखपरिहाराची)** — १ मैत्री, २ करुणा, ३ मुदिता आणि ४ उपेक्षा ( योग० )

**चतुःशास्त्र** — १ न्याय, २ व्याकरण, ३ पूर्वमीमांसा आणि ४ उत्तर मीमांसा हीं चार शास्त्रें व यांत पारंगत तो चतुःशास्त्री.

**चतुःसूत्री ( कर्मयोगाची )** — १ कर्मण्येवाधिकारस्ते, २ मा फलेषु कदाचन, ३ मा कर्मफलहेतुर्भूः, ४ मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि. (भ. गी- २ ४७)

**चतुःसूत्री ( महानुभाव )** — २ अहिंसा, २ निःसंग, ३ निवृत्ति आणि ४ भक्तियोग.

**चतुःसूत्री (चरित्र लेखनाची)** — १ व्यक्तिविकास, २ स्वभावचित्रण, ३ सौंदर्य आणि ४ अचूकता ( म. टाईम्स २९ एप्रिल १९६३ )

**चतुःसूत्री ( लोकमान्यप्रणीत )** — १ स्वदेशी, २ बहिष्कार ३ राष्ट्रीय शिक्षण आणि ४ स्वराज्य.

**चतु सूत्री (व्यावहारिक आचरणाची)** — १ जसेच्या तसे, २ जेव्हाच्या तेव्हा, ३ ज्याचें त्याना व ४ जेथल्या तेथ (आयुर्वेदपत्रिका एप्रिल १९६०)

**चतु सूत्री — (श्रीशिवछत्रपतींच्या अवतारकार्याची)** — १ देव, २ धर्म, ३ गो (गाय) आणि ४ ब्राह्मण याच प्रतिपाल्न

**चतु सूत्री (श्रीशंकराचार्य)** — १ अथातो ब्रह्मजिज्ञासा, २ जन्म द्यास्य यत, ३ शास्त्रयोनित्वात् व ४ तत्तु समन्वयात् (ब्रह्मसूत्र शारीरकभाष्य)

**चतु सूत्री (समर्थांची)** — १ हरिकथानिरूपण–भक्ति, २ राजकारण शक्ति, ३ सर्वविषयीं सावधपणा–युक्ति आणि ४ साक्षेप–मुक्ति (दा बो ११-४)

(आ) १ कर्म, २ उपासना, ३ ज्ञान आणि ४ मोक्ष (दा. बो)

**चतु सूत्री (स्वास्थ्यरक्षणाची)** — १ दिनचर्या २ ऋतुचर्या, ३ वेगोदीरणधारण आणि ४ सदाचार (आयुर्वेद)

**चतु सूत्री (ज्ञानेश्वरीची)** — १ भक्तियुक्त अत करण, २ अध्याम शास्त्र, ३ वाक्चातुर्य आणि ४ सर्वांचे सुख (ज्ञानेश्वरी १८–१७५०)

**चत्वार गुण** — १ तमोगुण, २ रजोगुण, ३ सत्त्वगुण आणि ४ शुद्ध सत्त्वगुण.

ऐसे हे चत्वार गुण । चौदेहाचे ॥ (दा. बो १७ ९ -)

**चत्वार देव** — १ नाना प्रतिमा, २ अवतार महिमा, ३ अतरात्मा व ४ निर्विकारी देव.

ऐसे हे चत्वार देव । सृष्टीमधील स्वमाव ।
या वेगळा अतभाव । काटचि नाहीं (दा बो. ११ २ ३४)

**चत्वार देह आणि त्याचे अभिमानी** — १ स्थूल देह–विश्व, २ सूक्ष्मदेह–तैजस, ३ कारणदेह–प्राज्ञ व ४ महाकारण देह–प्रत्यगात्मा (परमामृत)

**चत्वार भोग** — १ स्थूल भोग, २ प्रविविक्त भोग (उपाधिरहित), ३ आनद भोग व ४ आनदावभास भोग (दा. बो १७–९–३)

**चत्वार मात्रा** — १ अ–कार, २उ–कार, ३ म–कार व ४ अर्धमात्रा.

ऐस्या मात्रा चत्वार । चौदेहाच्या (दा. बो १७–९–४)

चत्वार शक्ति — १ क्रियाशक्ति, २ द्रव्यशक्ति, ३ इच्छाशक्ति आणि ४ दानशक्ति. ( दा. बो. १७–९–६ )

चतुष्पाद — चार पायांचा जनावरें किंवा चार चरणांचीं नक्षत्र.

( चतुष्पाद धर्म — ( अ ) १ तप, २ यश, ३ ज्ञान व ४ वैराग्य; ( आ ) १ अहिंसा, २ सत्य, ३ अस्तेय आणि ४ आनृण्य. हे चार धर्मांचे पाद ( पाय ) होत.

चतुष्पाद संपत्ति व तिच्या सोळा कला — ( आयुर्वेदांतील —

| संपत्ति | कला |
|---|---|
| १ वैद्य | १ दक्ष, २ गुरुपासून वैद्यक शिकलेला, ३ स्वच्छतेची आवड असलेला व ४ अनुभविक. |
| २ औषध | १ अनेक प्रकारें देता येण्यासारखें, २ अनेक विकार बरे करणारें, ३ सपन्न– ताजें व ४ ज्या रोगावर द्यावयाचें त्याच रोगावर योजिलेलें. |
| ३ परिचारक | प्रेमळ, २ स्वच्छतेने राहणारा, ३ रोग्याबद्दल आस्था असलेला व ४ चतुर. |
| ४ रोगी | १ औषधास पैसे खर्च करणारा, २ वैद्यावर विश्वास ठेवणारा, ३ रोगाची खरीं कारणें सांगणारा आणि ४ धैर्यवान. ) |

या प्रकारच्या षोडशकलात्मक चतुष्पाद संपत्तीनें युक्त असा रोगी बरा झाल्यावाचून राहात नाहीं असें वैद्यक शास्त्रांत सांगितलें आहे ( वा. अ. १ )

चातुर्मास्य — १ आषाढ शु. ११ ते कार्तिक शु. ११ पर्यंतचा चार महिन्यांचा काळ.

( चार अक्षरी मंत्र — १ ( अ ) त–ड–जो–ड व्यवहारात हा मंत्र उभयपक्षां सुखावह होतो ( आ ) वि–स–र–लो–ज्याला मन पूर्वक काम करावयाचे नसते त्याला वेळ मारून नेण्याचा सोइस्कर मंत्र म्हणून उच्चारला जातो )

चार अंगें ( आत्मज्ञानाचीं ) — १ इच्छाशक्ति, २ प्रज्ञा, ३ नीतिज्ञान व ४ श्रद्धा. ( कल्याण ईश्वरांक )

**चार अंगें हठयोगाचीं** — १ आसन २ प्राणायाम, ३ मुद्रा व ४ नादानुसंधान ( कबीर दोहावली )

**चार अंगें ( सहिष्णुतेचीं )** — १ द्वंद्वसहिष्णुता, २ वेगसहिष्णुता, ३ परोत्कर्षसहिष्णुता आणि ४ परमतसहिष्णुता

**चार अपाय श्रवणास** — १ लय–निद्रा, २ विक्षेप–वृत्तीचा बहिर्मुखता, ३ कषाय–राग द्वेष इत्यादिकांचे योगानें चित्त स्तब्ध होणें, व ४ रसास्वाद–प्रसंगोपात्त आलेलीं वर्णनें तींच तींच ऐकण्याविषयींची आसक्ति ( ए. भा ११–७०५ )

**चार अवस्था** — ( अ ) १ जागृति ( सृष्टीच्या विविधतेचा अनुभव ), २ स्वप्न, ३ सुषुप्ति ( अद्वैताचा अनुभव ) आणि ४ तुर्या ( शुद्धावस्था ) ( आ ) १ बाल्य, २ पौगंड, ३ तारुण्य आणि ४ वार्धक्य यांना अवस्था चतुष्टय म्हणतात

**चार अवस्थातील चार गोष्टींचा कधींच मेळ बसत नाहीं** — १ बाळपणच्या कल्पना, २ तारुण्यातील मनोराज्यें, ३ प्रौढपणींचे विचार आणि ४ वार्धक्यातील भावना

**चार अवस्था फोटोच्या** — १ प्रकाश दर्शन, २ निक्षेपन, ३ मस्थापन व ४ मुद्रण फोटो घेण्यापासून तो तयार होइपर्यंत या चार अवस्थांतून जावें लागते ( सुलभ फोटोग्राफी )

**चार अवस्था आनंदाच्या** — १ आनंद, २ परमानंद, ३ विरमानंद आणि ४ सहजानंद

**चार अवस्था मोक्षमार्गावरील** — १ बद्ध, २ मुमुक्षु, ३ साधक आणि ४ सिद्ध

**चार अवस्था वासनाच्या** — १ प्रसुप्तवासना, २ तनुवासना ३ विच्छिन्न वासना आणि ४ उदार वासना ( पा योग–साधनपाद )

**चार अवस्था स्त्रियांच्या वयपरत्वें** — १ बाला–बारा वर्षेपर्यंत २ प्रौढा–बारा ते चोवीस वर्षे, ३ मुग्धा–चोवीस ते बत्तीस आणि ४ प्रगल्भा –बत्तीसपासून चाळीस वर्षेपर्यंत ( मूळस्तंभ )

**चार अवस्था साधकाच्या** — बाल, २ उन्मत्त, ३ पिशाचवत् आणि ४ सहजावस्था ( रवींद्रवीणा )

**चार अवतार श्रीदत्ताचे** — १ श्रीदत्त, २ श्रीपाद श्रीवल्लभ, ३ श्रीनृसिंह सरस्वती आणि ४ अक्कलकोटचे स्वामी. ( माऊली विशेषांक )

**चार अरण्यें** — १ दंडकारण्य, २ सैंधवारण्य, ३ नैमिषारण्य आणि ४ धर्मारण्य. हा पूर्वकाळीं भारतवर्षांतर्गत जंबुद्वीपातील चार अरण्यें होतीं. ( मूळस्तंभ )

**चार अश्व ( श्रीकृष्णाच्या रथाचे )** — शैब्य, २ सुग्रीव, ३ मेघपुष्प व ४ बलाहक ( म. भा. उद्योग ८३–१९ )

( **चार आदर्श कामिनींचे** — १ जूनो, २ व्हीनस, ३ मिनर्व्हा आणि ४ डायना असे चार आदर्श ग्रीक रोमन समाजानें कल्पिले आहेत. ( आ ) वैदिकाचें मत—१ मानिनी–सती, २ रूपसम्राज्ञी–रति, ३ शारदा व ४ युद्धप्रिया–दुर्गा हे होत. ( अशोक ते कालिदास ) )

**चार आश्रम** — १ ब्रह्मचर्याश्रम, २ गृहस्थाश्रम, ३ वानप्रस्थाश्रम आणि ४ संन्यासाश्रम. ' एते गृहस्थप्रभवाश्चत्वारः पृथगाश्रमाः। ( मनु ६ ८७)

**चार आर्य सत्यें** — ( **बौद्ध धर्म** ) — १ जग दुःखमय आहे, २ दुःखाचें कारण ( तृष्णा ), ३ कारण नाहींसें झालें तर दुःखाचाहि ( निरोध ) होतो आणि ४ दुःखनिरोध शक्य तर तो प्राप्त करून घेण्याचा मार्ग.

**चार आचार्य ( वैष्णव सांप्रदायाचे )** — १ विष्णुस्वामी, २ निंबार्क, ३ मध्वाचार्य आणि ४ रामानुजाचार्य. हे चारहि वैष्णव सांप्रदायप्रवर्तक दक्षिण भारतात होऊन गेले.

> विष्णुस्वामी प्रथमतो निंबादित्यो द्वितीयकः ।
> मध्वाचार्यस्तृतीयस्तु चतुर्थो रामानुजस्तथा ॥

**चार आचार्यपीठें ( मठ ) ( श्रीशंकराचार्य स्थापित )** — १ पूर्वेस –जगन्नाथ पुरी–गोवर्धन मठ, २ पश्चिमेस–द्वारका–शारदा पीठ, ३ उत्तरेस–बदरीनारायण जवळ–ज्योतिर्मठ व ४ दक्षिणेस–शृंगेरी–म्हैसूरप्रदेश–मुख्य पीठ.

**चार आत्मे** — १ जीवात्मा–शरीरात राहणारा, २ शिवात्मा–जग भरून राहणारा, ३ परमात्मा–दिक्कालातीत आणि ४ निर्मलात्मा ( केवळ शुद्ध चैतन्य स्वरूप ) ( दा. बो १७–४० )

**चार आत्मज्ञानाचीं मुख्य साधनें** — १ विवेक, २ वैराग्य, ३ शमादि षट्क व ४ मुमुक्षता.

**चार आपत्तींचीं द्वारें** — १ अयोग्यकर्माचा आरंभ, २ स्वजनाशीं वैर, ३ बलवतांशीं स्पर्धा आणि ४ दुष्ट स्त्रीचा विश्वास. ( प्रमाणसाहस्री )

**चार आनंद** — ( अ ) १ शब्दानंद, २ कल्पनानंद ३ अनुभवानंद व ४ श्रद्धानंद ( विचारपोथी ).

**चार आरोग्याचे शत्रु** — १ रसनेची विकृत रुचि, २ देहांतील मृत तंतु, ३ अनवश्यक अन्न आणि ४ न पचतां जठरांत साचणारें अन्न.

**चार उपाय** — १ साम, २ दाम, ३ भेद आणि ४ दंड. (या. स्मृति)

**चार उपाय ( ज्ञान प्राप्तीचे )** — १ श्रद्धा, २ तत्परता, ३ इंद्रिय-संयम आणि ४ योगसंसिद्धि ( समत्व बुद्धियोग ) ( भ. गी. ४–३९ )

**चार उपवेद** — १ आयुर्वेद ( ऋग्वेद ) २ धनुर्वेद ( यजुर्वेद, ) ३ गांधर्ववेद ( सामवेद ) आणि ४ स्थापत्यवेद–अर्थशास्त्र ( अथर्ववेद ) ( भ. ब्रा. २–८ )

**चार ऋणें** — १ देवऋण, २ ऋषिऋण, ३ पितृऋण व ४ मनुष्यऋण किंवा समाजऋण या परमात्मऋण ( मानवधर्मसार )

**चार ऋत्विज** — १ अध्वर्यु, २ ब्रह्मा, ३ होता आणि ४ उद्गाता. असे यज्ञांत मुख्य चार ऋत्विज असतात

**चार कर्में ( इस्लाम धर्म )** — १ नमाज, २ रोजा, ३ ज्कात, व ४ हज. ( कल्याण साधनांक )

**चार कर्में ( यतींचीं )** — १ ध्यान, २ अंतर्बाह्य शुचिता, ३ भिक्षा आणि ४ नित्य एकान्तसेवन.

ध्यानं शौचं तथा भिक्षा नित्यमेकान्तशीलता ।
यतेश्चत्वारि कर्माणि पञ्चमं नोपपद्यते ॥ ( स्कंद. काशी. ४१–७० )

**चार कलि ( कल्ह ) वास्तव्य स्थानें** — १ द्यूत, २ मद्यपान, ३ क्रियासनर्थी क्षुद्र व्यवहार व ४ हिंसा. कलीनें आपल्यास राहावयास स्थान नेमून देण्याविषयीं विनंती केल्यावरून राजा परीक्षितानें हीं चार प्रकारचीं टुप्फ्लें जेथ चालतात अशीं चार स्थानें नेमून दिलीं.

अभ्यर्थितस्तदा तस्मै स्थानानि कल्ये ददौ ।
द्यूत पान स्त्रिय. सूना यत्राधर्मश्चतुर्विधः ( भाग. स्कंध १–१७–३८ )

**चार कषाय ( मनोविकार )** — १ क्रोध, २ लोभ, ३ मान, व ४ माया. या चारींपासून कर्मबंध उत्पन्न होतो असें जैन धर्म मानतो. ( रत्नकरंडक श्रावकाचार अ १ )

**चातुर्वर्ण्य** — १ ब्राह्मण, २ क्षत्रिय, ३ वैश्य आणि ४ शूद्र या चार समाजविशेषांना मिळालेलें सामुदायिक नाम.

**चार 'ग' कार** — १ गंगा, २ गीता, ३ गायत्री आणि ४ गोविंद. या चार 'ग' काराचें स्मरण करणाराचा पुनर्जन्मापासून मुक्त होता येतें.

गीता गङ्गा च गायत्री गोविन्दो हृदि संस्थित ।
चतुर्गकारसंयोगात् पुनर्जन्म न विद्यते ॥ ( पा. गी. )

**चार गति** — १ देवगति, २ मनुष्यगति, ३ तिर्यंचगति आणि ४ नरकगति, ( तत्त्वार्थसूत्र )

**चार गुण कोंबड्यापासून घ्यावेत** — १ पहाटे उठणें, २ युद्ध करणें, ३ स्वकष्टार्जित भाग बंधुवर्गास देणें व ४ स्त्रीचें आपत्तीपासून रक्षण करणें.

युद्ध च प्रातरुत्थान भोजन सहबंधुभि ।
स्त्रियमापद्गता रक्षेच्चतु शिक्षेच कुक्कुटात् ( वृ. चा. ६ १८ )

**चार गुण दुर्लभ** — १ दान–संतोषानें, २ ज्ञान–निगर्वी, ३ शौर्याचे अंगीं क्षमा आणि ४ संपत्तींत त्याग

"वित्त त्यागसमेत दुर्लभमेतच्चतुर्भद्रम्" ( बृहत्स्तोत्ररत्नाकर )

**चार गुण शाश्वत स्त्रीत्वाचे** — १ रजोदर्शन, २ गर्भधारण, ३ प्रजोत्पादन व ४ प्रजापोषण. ( नासदीय सूक्त भाष्य–उत्तरार्ध )

**चार गुण वृद्धसन्मानानें प्राप्त होतात** — १ आयुष्य, २ सौंदर्य, ३ सुख आणि ४ बल ( श्री माताजी )

**चार गुण स्वभावसिद्ध असतात** — १ औदार्य, २ मधुर भाषण, ३ धैर्य व ४ युक्तायुक्त विचार.

दातृत्व प्रियवक्तृत्व धीरत्वमुचितज्ञता ।
अभ्यासेन न लभ्यन्ते चत्वार सहजा गुणा ॥ (सु.)

**चार गोष्टींवर व्यक्तीचें महत्त्व** — १ जन्म (कुल), २ रूप, ३ शील आणि ४ संगति. (*गूढार्थचंद्रिका*)

**चार गोष्टी एकदा गेल्या म्हणजे पुन्हा न मिळणाऱ्या** — १ गेलेली अब्रू, २ बोल्लेला शब्द, ३ दवडलेली संधि आणि ४ गेलेलें आयुष्य.

**चार गोष्टी कल्याणकर** — १ वाणीचा संयम, २ अल्पनिद्रा, ३ अल्प आहार आणि ४ एकाग्र चित्तानें परमेश्वर-स्मरण.

**चार गोष्टीपासून ग्रंथ सांभाळावेत** — १ तेल, २ पाणी, ३ असाव्यस्तपणें ठेवणें आणि ४ मूर्खांचे हातीं देणें.

तैलाद्रक्षेद् जलाद्रक्षेत् रक्षेत् शिथिलबंधनात् ।
मूर्खहस्ते न दातव्यमिदं वदति पुस्तकम् ॥ (सु.)

**चार गोष्टी नसतील तेथें वास्तव्य करूं नये** — (अ) १ मान अथवा प्रतिष्ठा, २ प्रीति, ३ गोत्रज व ४ ज्ञानसंपादन, (आ) १ धनिक, २ वैद्य, ३ श्रोत्रिय ब्राह्मण आणि ४ जलपूर्ण नदी.

तत्र मित्र न वस्तव्य यत्र नास्ति चतुष्टयम् ।
ऋणदाता च वैद्यश्च श्रोत्रिय सजला नदी ॥ (सु.)

**चार गोष्टी निरर्थक** — १ घृतरहित भोजन २ नेता नसलेलें राज्य, ३ वक्ता नसलेली सभा व ४ भूगोल न जाणणारा गणितशास्त्रज्ञ (सिद्धांत शिरोमणि)

**चार गोष्टी पडद्याआड ठेवाव्यात** — १ भोजन, २ भजन, ३ संपत्ति आणि ४ स्त्री.

भोजन भजन खजाना और नारी
ये चारों चीजें कर परदेकी आरी

**चार गोष्टी पवित्र** — १ झऱ्याचें पाणी, २ पतिव्रता स्त्री, ३ कल्याण करणारा राजा अथवा थोर पुरुष व ४ संतुष्ट ब्राह्मण.

**चार गोष्टींचा परिणाम इष्टोत्पत्तीस येत नाहीं** — १ अजायुद्ध, २ ऋषिश्राद्ध ( तर्पण ), ३ सकाळचे ढग आणि ४ दांपत्यकलह.

अजायुद्धमृषिश्राद्धं प्रभाते मेघडम्बरम् ।
दंपत्योः कलहश्चैव परिणामे न किंचन ॥ ( सु. )

**चार गोष्टी बुद्धीची वाढ करणाऱ्या** — १ तीर्थावलोकन, २ सर्वत्र परिचय, ३ द्रव्यार्जन आणि ४ नाना प्रकारचें निरीक्षण.

**चार गोष्टी मनुष्यास बिघडविणाऱ्या** — १ यौवन, २ धन, ३ अधिकार आणि ४ अविवेक.

( **चार गोष्टी मनुष्याच्या आयुष्यावर परिणाम करणाऱ्या** — १ स्त्री, २ पैसा, ३ ईश्वर व ४ नाव ( रुझवेल्टची-स्मृतिचित्रें ) )

( **चार गोष्टी मिळतांना सुख व सोडतांना दुःख देणाऱ्या** — १ अधिकार, २ गर्भ, ३ ऋण आणि ४ श्वानमैथुन.

अधिकारं च गर्भं च वित्तं च श्वानमैथुनम् ।
आगमे सुखमाप्नोति निर्गमे प्राणसंकटम् ॥ ( सु. ) )

( **चार गोष्टी मोक्षाचे दारावरील द्वारपाल** — १ शम, २ विचार, ३ संतोष आणि ४ साधुसमागम.

मोक्षद्वारे द्वारपालाश्चत्वारः परिकीर्तिताः ।
शमो विचारः संतोषश्चतुर्थः साधुसंगम ॥ ( यो. वा. २ ११-५८ ) )

**चार गोष्टी योगसिद्धीस सहाय्यक** — १ शास्त्र, २ उत्साह, ३ गुरु आणि ४ काल ( योगसमन्वय ).

**चार गोष्टींची लहान म्हणून उपेक्षा करूं नये** — १ रोग, २ सर्प, ३ अग्नि आणि ४ शत्रु.

**चार गोष्टींत लज्जा अथवा भिडस्तपणा असूं नये** — १ धान्य-संग्रह, २ विद्यासंपादन, ३ भोजन व ४ व्यवहार.

धनधान्यप्रयोगेषु विद्यासंग्रहणेषु च ।
आहारव्यवहारे च त्यक्तलज्जः सुखी भवेत् ॥ ( चाणक्य नीतिसार )

**चार गोष्टी वर्ज्य** — १ आत्मनिंदा, २ आत्मस्तुति, ३ परनिंदा व ४ परस्तुति. या चारहि भल्या मनुष्यास वर्ज्य मानिल्या आहेत. ( म. भा. कर्ण ३६-४५ )

**चार गोष्टींनीं विद्येचा नाश होत असतो** — १ वेदाध्ययन नसणें, २ आचारधर्माचा त्याग, ३ आळस आणि ४ अन्नदोष. ( मनु )

**चार गोष्टी वृथा होत** — १ समुद्रावर पर्जन्य, २ भोजन झाल्यानंतर भोजन, ३ समर्थास दान आणि ४ दिवसा दीप.

वृथा वृष्टि समुद्रेषु वृथा तृप्तस्य भोजनम् ।
वृथा दानं समर्थस्य वृथा दीपो दिवाऽपि च ( सु. )

**चार गोष्टी सद्य फलदायक** — १ देवतांचा संकल्प, २ बुद्धिवानांचा प्रभाव, ३ विद्वानांचा विनय, आणि ४ पापी पुरुषाचा नाश. हे चारी सद्य फलदायी होतात असें बृहस्पतीनें इंद्रास सांगितलें, अशी कथा आहे

देवतानां च सङ्कल्पमनुभावं च धीमताम् ।
विनयं कृतविद्यानां विनाशं पापकर्मणाम् ॥ ( म. भा. उ. ३३-७० )

**चार गोष्टी स्वार्थ-परमार्थ हे दोन्ही साधणाऱ्या** — १ सूर्योदयापूर्वी स्नान, २ गोसेवा, ३ पुष्पोद्यानांत निवास आणि ४ मातापित्यांची सेवा.

प्रातः स्नानं गवां सेवा आरामः पुष्पवाटिका ।
मातापित्रोश्च शुश्रूषा धर्माय च सुखाय च ॥ ( सु )

**चार गोष्टी राष्ट्रोदयास आवश्यक** — १ लोकांत एकी, २ धर्मश्रद्धा, ३ विद्वानांचा मान आणि ४ शक्तिसंपन्नता ( भक्ति सा २८४२ )

**चार गोष्टी वडिलांच्या सेवेनें वृद्धिंगत होणाऱ्या** — १ आयुष्य, २ विद्या, ३ बल व ४ यश

अभिवादनशीलस्य नित्यं वृद्धोपसेविनः ।
चत्वारि तस्य वर्धन्ते आयुर्विद्या यशो बलम् ॥ ( मनु २-१२१ )

**चार गोष्टी हानिकारक** — १ मलिन वस्त्रानें सतेजता कमी होते, २ कुमार्येमुळें घराचा बिघाड, ३ वाईट अन्नानें आन कमी होणें, आणि ४ कुपुत्रामुळें कुलाला कलंक.

कुवस्त्रं हरते तेजः कुमार्या हरते गृहम् ।
कुभोज्यं हरते बीजं कुपुत्रो हरते कुलम् ॥ ( सु )

**चार गृहसौख्यें** — १ स्वतःचें व कुटुंबियांचें आरोग्य, २ सुशील व सुहृद पत्नी, ३ खेळकर व दणकट संतति आणि ४ आवश्यक तितकें धन.

**चार चक्रें** — १ धर्मचक्र, २ कालचक्र, ३ विष्णुचक्र आणि ४ इंद्रचक्र अशीं चार चक्र ( अस्त्र ) श्रीरामास विश्वामित्राकडून प्राप्त झाली होतीं अशी कथा आहे. ( वा. रा. बालकांड )

**चार चरण ( धर्माचे )** — १ आत्मज्ञान, २ अध्यात्मचिंतन, ३ मनोविजय ( मन स्थिरत्व ) आणि ४ इंद्रियनिग्रह.

'चतुष्पादा हि धर्मस्य ज्ञानं ध्यानं शमो दम ॥'

**चार जाती ( पुरुषाच्या )** — १ मृग, २ शश ससा, ३ वृषभ आणि ४ गदम ( अनगरंग-कामशास्त्र )

**चार जाती स्त्रियांच्या** — १ पद्मिनी, २ चित्रिणी, ३ हस्तिनी व ४ शंखिनी.

**चार दानें सर्वश्रेष्ठ** — १ कन्यादान, २ गोदान, ३ भूदान व ४ विद्यादान

दानाना च समस्ताना चत्वार्येतानि भूतले ।
श्रेष्ठानि कन्याभूमिविद्यादानानि सर्वदा ॥ ( सि. शि )

**चार दुर्गुण विनाशाप्रत नेणारे** — १ आळस, २ निद्रा, ३ विसराळूपणा व ४ दिरंगाई. ( कुरल )

( **चार द्वाराचे चार दिक्पाल ( मनुष्यदेहाचे )** — १ पूर्वद्वार–मुख, २ पश्चिमद्वार–गुदा, ३ उत्तर–मस्तकात आणि ४ दक्षिणद्वार–शिश्न. पूर्व आणि पश्चिमद्वाराचा संबंध अन्ननलिकेशीं आणि दक्षिण आणि उत्तर द्वाराचा संबंध मज्जातंतूशीं आहे. ( अथर्व–अनु मराठी भाग २ रा ) )

**चार धनदायाद** — १ धर्म, २ अग्नि, ३ चोर आणि ४ राजा अथवा शासनाधिकारी.

'चत्वारो धनदायादा धर्माग्निनृपतस्करा ॥' ( सु. )

**चार धर्मलक्षणें** — १ वेद, २ स्मृति, ३ सदाचार ( शिष्टाचार ) आणि ४ ( शास्त्रानें विकल्प सांगितला असेल तेथें ) जो पक्ष आपणास प्रिय असेल तो.

वेद स्मृति सदाचार स्वस्य च प्रियमात्मन ।
एतच्चतुर्विधं प्राहु साक्षाद्धर्मस्य लक्षणम् ॥ ( मनु २ १२ )

**चार धर्मांतील चार सर्वश्रेष्ठ देवस्थानें** — १ हिंदु (वैदिक)–काशी–श्रीविश्वेश्वर, २ बौद्ध — बुद्धगया – बोधिवृक्षाचें स्थान, ३ मुसल्मान — मक्का–काबा, ४ खिस्ती — जेरुसलेम–खिस्ताची जन्मभूमि.

**चार धामें** — (अ) १ उत्तरेस–केदारनाथ, २ दक्षिणेस–रामेश्वर (हीं शिवधामें), ३ पूर्वेस–जगन्नाथ व पश्चिमेस द्वारका हीं भारतांतलीं पवित्र देव स्थानें. (आ) १ गंगोत्री, २ जम्नोत्री, ३ बदरी आणि ४ केदार (हिमाल्यांत).

**चार नरकद्वारें** — १ काम, २ लोभ, ३ क्रोध आणि ४ दंभ.

'कामो लोभस्तथा क्रोधो दम्भश्चत्वार इत्यमी ।।' (ग. गी. १० २३)

**चार नैसर्गिक शक्ति (मानवाच्या)** — १ मन, २ प्राण, ३ सकल्पात्मक बुद्धि आणि ४ वाक् (योगशास्त्र).

**चार पण** — १ अज्ञानी बाल्पण, २ धुंद तरुणपण, ३ पराधीन म्हातारपण व ४ बाळंतपण. पहिले तीन पुरुषांना व त्याखेरीज चवथा स्त्रियांना असे चार पण आयुष्यांत जिंकावयाचे असतात. (भा. मर्दनशास्त्र)

**चार पदार्थ स्वतंत्र व अनादि** — १ जीव, २ देवता, ३ प्रपंच व ४ ईश्वर असे महानुभाव संप्रदायांत मानले आहेत. (भा. दर्शनसंग्रह)

**चार परम विख्यात धर्मोपदेशक** — १ श्रीकृष्ण, २ बुद्ध, ३ येशू आणि ४ महंमद. असे चार धर्मांचे उपदेशक आजपर्यंत जगतांत होऊन गेले. (म भा. उपसंहार)

**चार परिमाणें विश्वाचीं (आधुनिक विज्ञान)** — १ लांबी, २ रुंदी, ३ उंची व ४ काल. 'लांबी रुंदी, उंची तीन । काल हें चवथें परिमाण । मानितें नव विज्ञान । विश्व चतु परिमाणात्मक ॥ (विश्वदर्शन–नासदीय नीराजन)

**चार परब्रह्माचीं प्रतीकें** — १ आकाश, २ सागर, ३ सूर्य आणि ४ नगाधिराज हिमालय.

**चार पायऱ्या परमार्थसाधनेच्या** — १ श्रवण, २ मनन, ३ निदिध्यासन व ४ साक्षात्कार.

"द्रष्टव्यः श्रोतव्यः मन्तव्यः निदिध्यासितव्यः" (बृहदारण्यकोपनिषद्)

**चार पार्वतीच्या सख्या** — १ जया, २ विजया, ३ जयंती आणि ४ मंगलारुणा. (स्कंद. चातु. २१–२३)

**चार पुण्यश्लोक** — १ नल, २ युधिष्ठिर, ३ जनक, आणि ४ जनार्दन (परमेश्वर). हे चार पवित्र कीर्तीचे पुरुष म्हणून सांगितले आहेत.

पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिर ॥
पुण्यश्लोको विदेहश्च पुण्यश्लोको जनार्दन ॥ (पद्म सृष्टि)

**चार पैगंबर** — १ दाऊद, २ महम्मद, ३ ईसा व ४ मूसा. असे चार पैगंबर मुसल्मानांत मानिले आहेत (तत्त्व निज विवेक)

**चार प्रकार (अभिनयाचे)** — १ सात्त्विक, २ आंगिक, ३ वाचिक आणि ४ आहार्य (म ना ६–२४)

**चार प्रकार अनध्यायाचे** — १ नित्य अनध्याय, २ नैमित्तिक अनध्याय, ३ तात्कालिक व ४ आकालिक अनध्याय (संस्कृति कोश)

**चार प्रकार आकाशाचे** — १ घटाकाश, २ जलाकाश, ३ मेघाकाश व ४ महाकाश (विचार-सा. रहस्य)

**चार प्रकार अवधूताचे** — १ ब्रह्मावधूत, २ शैवावधूत, ३ वीरावधूत व ४ कुलावधूत (ब्रह्मनिर्वाणतंत्र)

**चार प्रकार अवताराचे** — १ पुरुषावतार, २ गुणावतार, ३ लीलावतार (कल्पावतार) आणि ४ मन्वंतरावतार (कल्याण मासिक).

**चार प्रकार आनंदाचे** — १ शारीरिक, २ मानसिक, ३ बौद्धिक आणि ४ आत्मिक.

**चार प्रकार (कुस्तीचे)** — १ भीमसेनी (शक्तीचे डाव), २ हनुमन्ती (युक्तीचे डाव), ३ जांबुवन्ती (बांधाचे डाव) आणि ४ जरासंधी (नेस्या–हातपाय मोडण्याचे). (व्या को.)

**चार प्रकारचे आचार शाक्तपंथाचे** — १ वामाचार, २ दक्षिणाचार, ३ सिद्धान्ताचार व ४ कौलाचार. (भा. दर्शनसंग्रह)

**चार प्रकार उपासनेचे** — (अ) १ प्रणवोपासना, २ सामोपासना, ३ अक्षिपुरुषोपासना व ४ दहरोपासना (हरिपाठ रहस्य). (आ) १ सम्पत् उपासना, २ आरोप उपासना, ३ अध्यास उपासना व ४ संवर्ग उपासना.

"सम्पदारोपसंवर्गाध्यासा इति मनीषिभि" (शिवगीता १२–१०)

**चार प्रकारचे गण ( समूह ) औषधींचे (रसशास्त्र)** – १ रसौषधि, २ महौषधि, ३ सिद्धौषधि व ४ दिव्यौषधि.

रसौषध्यो महौषध्यः सिद्धौषध्यस्तथापराः ।
दिव्यौषध्य इति प्रोक्ता भैरवेण चतुर्विधाः ॥
( रसेंद्र चूडामणि अ. ६ )

**चार प्रकारचे गुण ( थोर पुरुषांचे )** — १ विभूतिमत्त्व, २ साधुत्व, ३ सिद्धत्व आणि ४ प्रचारकत्व. ( एकनाथ दर्शन भाग १ ला )

**चार प्रकार गृहस्थाचे** — १ वार्ताक–नित्यकर्म तत्पर, २ यायावर–अयाचित्त वृत्ति असलेला, ३ शालीन–षट्कर्मनिरत असून धनसंचय करणारा व ४ घोरसंन्यसिक–उंच्छवृत्तीवर निर्वाह करणारा गृहस्थ ( ब्र. सू. शा. भा. अ. ३ पाद ४ )

**चार प्रकार घोड्यांचे व त्यांचीं गुणदर्शक नांवें** — १ अश्व–वाटेल तेव्हां कामाला तयार, २ तुरंगम–त्वरेनें चालणारा, ३ वाजी–वेगवान् –वेगानें चालतो तो व ४ हय–त्रिकाळ चालणारा ( मु. )

**चार प्रकार जपाचे** — १ रसना जप, २ ओष्ठ जप, ३ श्वास जप, ४ मानसजप ( Pathway to God )

**चार प्रकार चैतन्याचे ( वेदांतशास्त्र )** — १ कूटस्थचैतन्य, २ जीवचैतन्य, ३ ईश्वरचैतन्य आणि ४ ब्रह्मचैतन्य. (विचार सा. रहस्य ).

**चार प्रकार तानांचे ( संगीत शास्त्र )** — १ सरलतान, २ मिश्रतान, ३ अलंकारित तान व ४ कूटतान.

**चार प्रकार दीक्षेचे ( योगशास्त्र )** — १ स्पर्शदीक्षा, २ शब्ददीक्षा, ३ चाक्षुषी दीक्षा व ४ संकल्प दीक्षा अथवा ध्यान दीक्षा ( गुरुदत्तयोग ).

**चार प्रकार दीक्षेचे ( वीरशैव )** — १ देहदीक्षा, २ मंत्रदीक्षा, ३ आज्ञा दीक्षा आणि ४ उपमादीक्षा ( विवेक चिंतामणि )

**चार प्रकार दानाचे** — १ नित्य, २ नैमित्तिक, ३ काम्य व ४ विमल ( निष्काम ).

**चार प्रकारची देहशुद्धि ( वैद्यक )** — १ वमन, २ विरेचन, ३ निरुह आणि ४ नस्य. या चार प्रकारांनीं देहशुद्धि करतां येते.

**चार प्रकार ध्यानाचे** — १ आधिभौतिक ध्यान–शाळिग्राम वगैरेंचे, २ आधिदैविक–सूर्य इ. ३ आध्यात्मिक–चक्रचिंतन करणें व ४ निराकार–नादानुसंधान ( श्रीगुरुदत्तयोग )

**चार प्रकारचे नायक ( नाट्यशास्त्र )** — १ धीरोदात्त, २ धीरोद्धत ३ धीरललित आणि ४ धीरप्रशांत.

**चार प्रकारच्या नायिका** — (अ) १ अनुकूला, २ दक्षिणा, ३ शठा व ४ धृष्टा.

( आ ) १ धीरा, २ ललिता, ३ उदात्ता व ४ निभृता ( अनगरंग ).

**चार प्रकार नांवाचे** — १ नाक्षत्रनाम, २ मासनाम, ३ देवनाम व ४ व्यावहारिकनाम.

**चार प्रकारें पुरुषपरीक्षा** — १ शास्त्राभ्यास, २ स्वभाव, ३ कुल व ४ कर्म.

तथा चतुर्भिः पुरुषः परीक्ष्यते श्रुतेन शीलेन कुलेन कर्मणा ॥ ( सु. )

**चार प्रकारचे पुरुष राष्ट्रोद्धारास आवश्यक** — १ संत व साक्षात्कारी पुरुष, २ शास्त्रज्ञ व तत्त्ववेत्ते, ३ कवि वा ग्रंथकार आणि ४ शूरवीर ( भक्तिसारामृत अ. ४६ )

[*] **चार प्रकारची पुष्टिभक्ति** — पुष्टि म्हणजे ईश्वरी अनुग्रह — १ प्रवाह पुष्टिभक्ति, २ मर्यादा–पुष्टिभक्ति, ३ पुष्टि पुष्टिभक्ति आणि ४ शुद्ध पुष्टिभक्ति. ( वल्लभ संप्रदाय ).

**चार प्रकार (प्राणायामाचे)** — (अ) १ पूरक (श्वास वर ओढून घेणें), २ कुंभक ( श्वास स्थिर करणें ), ३ रेचक ( श्वास हळूहळू खालीं सोडणें ) आणि ४ शून्यक अथवा केवल कुंभक ( आंतून श्वास बाहेर न सोडणें व बाहेरूनहि न घेणें. )

रेचकः पूरकश्चैव कुंभकः शून्यकस्तथा ।
एवं चतुर्विधः प्रोक्तः प्राणायामो मनीषिभिः ॥

( वृ. ना. पूर्व. ३३–१२० )

( आ ) १ बाह्य, २ अभ्यंतर, ३ स्तंभवृत्ति आणि ४ सघनकरण ( केवल कुंभक )–प्राणगतीचा निरोध करणें ( श्रीगुरुदत्तयोग ).

**चार प्रकारचे महापुरुष** ( गीतोक्त ) — १ स्थितप्रज्ञ, २ त्रिगुणातीत, ३ भक्तिमान् आणि ४ निष्काम कर्मयोगी.

**चार प्रकारची पापें** — १ कायिक, २ वाचिक, ३ मानसिक आणि ४ सासर्गिक. ( काशी खंड )

**चार प्रकारचे प्राणी** — १ अण्डज ( पक्षी, मासे वगैरे ), २ जारज ( मनुष्य, पशु वगैरे ), ३ स्वेदज ( उवा, ढेकूण वगैरे ) आणि ४ उद्भिज ( झाडें, वेली वगैरे ). या चार प्रकारच्या जीवकोटि आहेत. याना योनिचतुष्टय म्हणतात.

चार खाणी चारी वाणी । चौऱ्यायशी लक्ष जीवयोनि ॥
निर्माण झाले लोक तिन्ही । पिंड ब्रह्मांड ॥ ( दा. बो. १३-३-१५ )

**चार प्रकारचें प्रेम** — १ अनुयोगी ( व्हानाचें मोठ्यावर ) २ परायोगी ( मोठ्याचें व्हानावर ), ३ समयोगी—समानतेच्या दर्जावरून वाटणारें प्रेम व ४ मिश्रयोगी—प्रकृति आणि पुरुष या नैसर्गिक भेदावर असलेलें. यालाच अनुक्रमें १ भक्ति, २ वात्सल्य, ३ सौहार्द व ४ शृगार. अशा संज्ञा आहेत. ( सह्याद्रि एप्रिल १९५३ )

**चार प्रकार प्रेमाचे** — १ लालन प्रेम, २ वात्सल्य प्रेम, ३ सख्य प्रेम व ४ माधुर्य प्रेम . व्यवहारात तसेच अध्यात्मात असे चार प्रकार मानले आहेत. ( ज्ञानेश्वरी गूढार्थदीपिका खड ३ )

**चार प्रकारचें बल** — १ वीर्यबल, २ प्राणबल, ३ शरीराची वृद्धि आणि ४ पुष्टि. मनुष्याने आपलें शरीर या चतुर्विध बळानीं युक्त केलें पाहिजे. ( अथर्व—अनु—मराठी ).

**चार प्रकार भक्तीचे** — १ गुर्वी, २ अनन्या, ३ अव्यभिचारिणी व ४ परा. " अर्जुना हे गुरुची । भक्ति सांगीतली तुजप्रती । आता ज्ञानयज्ञ यजिती । ते भक्त आइके ॥ ( ज्ञ. ९–२२८ )

**चार प्रकार भक्तांचे** — १ आर्त ध्रुव, २ जिज्ञासु—उद्धव ३ अर्थार्थी—बिभीषण व ४ ज्ञानी-शुकाचार्य ( भ. गी. ७–१६ )

**चार प्रकार मानवी रक्ताचे** — १ अ, २ ब, ३ अब, व ४ ओ असे चार प्रकार मानवी रक्ताचे असतात. ( लॅंडस्टीनर. १९०७ )

**चार प्रकार मित्राचे** — १ औरस पुत्र, २ संबंधी–नातलग वगैरे, ३ पिढिजाद मैत्री असलेला व ४ संकट निवारण करणारा. असे मित्राचे अथवा मित्रत्वाचे चार प्रकार.

"औरस कृतसम्बन्धं तथा वंशक्रमागतम् ।
रक्षितं व्यसनेभ्यश्च मित्रं ज्ञेयं चतुर्विधम्" ( कामंदकीय नीतिसार )

**चार प्रकारचीं माणसें** — १ विशाल हृदय–आपण न खाता दुसऱ्यास देतो तो, २ उदार हृदय–आपण खातो व दुसऱ्यासहि देतो, ३ अनुदार हृदय–आपण खातो पण दुसऱ्यास देत नाहीं तो आणि ४ कृपण हृदय–आपणहि खात नाहीं व दुसऱ्यासहि देत नाहीं असा. ( कल्याण मासिक )

**चार प्रकार मंत्रांचे** — १ सिद्ध, २ साध्य, ३ सुसिद्ध आणि ४ अरि–उच्चाटन ( नाम चिंतामणि ).

**चार प्रकारचे मेघ** – १ आवर्त–विशेषस्थानीं वृष्टि, २ संवर्त–सर्वत्र वृष्टि, ३ पुष्कर–अल्प पर्जन्य व ४ द्रोण–विपुल पर्जन्य. (कृषिपाराशर–२४-२६)

**चार प्रकार योगाचे** — १ मंत्रयोग, २ हठयोग, ३ लययोग आणि ४ राजयोग ( शिवसंहिता ).

**चार प्रकारचे लोक**—( अ ) १ कर्मी, २ भक्त, ३ ज्ञानी व ४ योगी.
'कर्मिणः सन्ति भक्ताश्च ज्ञानिनो योगिनस्तथा ॥' ( रा. गी. ११–३ )

( आ ) १ दुर्जन, २ मतलबी, ३ सज्जन आणि ४ संत.
दुर्जन रत संसारी । मतलबी कामापुरता धरी ।
सज्जन त्याचा विचार करी । संत त्यागी सर्वथा ॥ ( म. सा. १७–६४ )

( इ ) १ **सत्पुरुष**–स्वार्थ सोडून लोकांचें कल्याण करणारे, २ **सामान्य**–स्वार्थ न सोडतां लोकांसाठीं झटणारे, ३ **मानवराक्षस**–स्वार्थासाठीं लोकांचें नुकसान करणारे व ४ **पशुराक्षस**–स्वार्थहि नसता दुसऱ्याची निरर्थक हानि करणारे. असे चार प्रकारचे लोक जगांत असतात.

एते सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थं परित्यज्य ये ।
सामान्यास्तु परार्थमुद्यमभृतः स्वार्थाविरोधेन ये ॥
तेऽमी मानुषराक्षसाः परहितं स्वार्थाय निघ्नन्ति ये ।
ये निघ्नन्ति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे ॥ ( भ. नी ८६ )

**चार प्रकारचें वर्षमान** ( कालगणना ) — १ चान्द्रवर्ष, २ सौरवर्ष, ३ नाक्षत्रवर्ष आणि ४ सायन अथवा सपातवर्ष.

**चार प्रकारचे वाद** — १ आरम्भवाद — हा कणादाचा पक्ष — नैयायिक मीमांसक वगैरे, २ संघातवाद — हा बौद्धांचा पक्ष, ३ परिणाम वाद — सांख्य, पातञ्जल वगैरेंचा पक्ष आणि ४ विवर्तवाद किंवा मायावाद —, अद्वैत वेदान्त्यांचा पक्ष.

**चार प्रकारचीं वाद्यें** — १ तत–तारेचीं वाद्यें, २ वितत–टाळ, चिपळ्या वगैरे, ३ घन–नगारा, डफ वगैरे व ४ सुस्वर–सनई वगैरे.

**चार प्रकार वानप्रस्थाचे** — १ वैखानस, २ औदुंबर, ३ वालखिल्य व ४ फेनप ( ब्र. गू. शां. भाष्य–अ ३ पाद ४ )

**चार प्रकार विदूषकाचे** — १ तापस, २ द्विज, ३ राजजीवि आणि ४ शिष्य ( भ. ना. )

**चार प्रकारचे वैद्य** — १ विषवैद्य, २ शल्यवैद्य, ३ रोगवैद्य आणि ४ कृत्यावैद्य. असे चार प्रकारचे वैद्य राजानें जवळ बाळगावेत

चतुर्विधांश्च वैद्यान्वै संगृह्णीयाद्विशेषत । ( म मा शांति )

**चार प्रकारचें वैराग्य** — ( अ ) १ यतमान वैराग्य, २ व्यतिरेक वैराग्य, ३ एकेन्द्रिय वैराग्य व ४ वशीकार वैराग्य. ( आ ) १ भयजनित वैराग्य, २ विचारजनित वैराग्य, ३ साधनयुक्त वैराग्य आणि ४ ज्ञानजनित वैराग्य.

सविराग पुराणेषु चतुर्धा सम्प्रकीर्तित
यतमानवशीकारस्व्यतिरेकादिभेदत ॥ ( सु. )

**चार प्रकारची वैद्याची वृत्ति असावी** — १ रोग्याविषयीं ममता, २ दया, ३ साध्य रोग दूर करण्याचा उत्साह व ४ रोग असाध्य असेल तर ( अगादरच ) सोडणें, अशी वैद्याची वृत्ति असावी.

मैत्री कारुण्यमार्तेषु शक्ये प्रीतिरुपेक्षणम् ।
प्रकृतिस्थेषु भूतेषु वैद्यवृत्तिश्चतुर्विधा ॥ ( च. सू. ९–२४ )

**चार प्रकार व्यूहाचे** ( सैन्यरचनेचे ) — १ मानुष, २ दैव, ३ गांधर्व व ४ आसुर. असे चार प्रकार भारतकाळीं होते. ( म. भा. भीष्म १९२ )

**चार प्रकार शास्त्र वचनाचे** — १ भयानक, २ रोचक, ३ अनुवाद व ४ यथार्थ (बोधामृत).

**चार प्रकारची स्त्रीपुरुषाची प्रीति** — १ नैसर्गिक-स्वाभाविकपणें, २ विषयजा-पुष्पमाला, मेवामिठाई वगैरेमुळें, ३ समा-ललितकला वगैरे-मुळे जडणारी आणि ४ अभ्यासजा-परस्पराच्या सारख्या सवयीनें व आवडी निवडीमुळे जडणारी (अनगरग).

**चार प्रकारची शुचिता** — १ द्रव्यशौच, २ मन शौच, ३ वाक्शौच आणि ४ कायशौच.

**चार प्रकार शैवाचे** — १ सामान्यशैव, २ मिश्रशैव, ३ शुद्धशैव व ४ वीरशैव. (वीरशैवान्वय चंद्रिका)

**चार प्रकारची सिद्धावस्था** — १ स्वप्नसिद्ध, २ मनसिद्ध, ३ दैवसिद्ध आणि ४ नित्यसिद्ध (श्रीरामकृष्ण वाक्सुधा)

**चार प्रकार सूत्र ग्रंथाचे** — १ श्रौतसूत्र, २ गृह्यसूत्र, ३ धर्मसूत्र व ४ शुल्बसूत्रें यज्ञकर्म.

**चार प्रकार श्रद्धेचे** — १ अध्यात्मश्रद्धा, २ कर्मश्रद्धा, ३ तामसीश्रद्धा व ४ निर्गुणश्रद्धा (ए. भा. अ. २७ ओवी ३५१ ते ३६८)

**चार प्रकारें सुवर्णपरीक्षा** — १ कसोटीवर घासून, २ कापून, तापवून व ४ हातांडीनें ठोकून. अशा चार प्रकारानीं करता येते.

**चार प्रकारचा संन्यास** — १ विद्वत्, २ विविदिषा ३ मर्कट व ४ आतुर (स्वामी-विवेकानंदाच्या सहवासात)

**चार प्रकारची संन्यासदीक्षा** — १ कुटीचक (आश्रमविहित कर्मे करणारा), २ बहूदक (अवश्य कर्मे करून ज्ञानाभ्यास करणारा), ३ हंस (फक्त ज्ञानाभ्यास करणारा) व ४ परमहंस (ब्रह्मज्ञानी झालेला).

'दीक्षा असे ही चतुर्विध' (गुरु—गी १३–२४) (विष्णु४–११)

**चार प्रकारचे संबंध** — १ संयोगसंबंध, २ समवायसंबंध, ३ तादात्म्य-संबंध व ४ भेदाभेद संबंध (वैशेषिक शास्त्र)

**चार प्रकारचे समास** — १ अव्ययीभाव, २ तत्पुरुष, ३ बहुव्रीहि आणि ४ द्वंद्व. ( व्याकरण शास्त्र )

**चार प्रकारचे संवाद ( ज्ञानेश्वरी ग्रंथांतर्गत )** — १ श्रीकृष्णार्जुन-संवाद, २ धृतराष्ट्र-संजय, ३ श्रीज्ञानेश्वर-निवृत्तीनाथ आणि ४ श्रीगुरुखेरीज इतर श्रोते असे चार प्रकारचे संवाद ज्ञानेश्वरींत वर्णिले आहेत.

**चार प्रकारचीं स्त्रियांचीं भूषणें** — १ केशभूषा, २ वेशभूषा, वस्त्रप्रावरण आणि ४ विलेपन ( अंगाला उटी लावणें ).

कचधार्य देहधार्य परिधेयं विलेपनम् ।
चतुर्धा भूषणं प्राहुः स्त्रीणामन्यच्च दैशिकम् ॥ ( रत्नाकर )

**चार प्रकारचें ज्ञान** — १ शब्दज्ञान, २ अपरोक्षज्ञान, ३ सामान्यज्ञान व ४ विशेषज्ञान.

**चार प्रमाणें** — १ स्मृति, २ प्रत्यक्ष, ३ इतिहास व ४ अनुमान.
स्मृतिः प्रत्यक्षमैतिह्यम् । अनुमानश्चतुष्टयम् ॥ ( तै. आ. १-२ )

**चार प्रमुख तत्त्वें ( झरतुष्ट्री धर्माचीं )** — १ अहुरमज्द हा सर्व-श्रेष्ठ देव व सर्वज्ञ, २ आत्मा अमर आहे, ३ विचार, उच्चार आणि आचार यांना आपणच जबाबदार मानणें व ४ असद् विचार, अपशब्द आणि कुकर्में यांचा शपथपूर्वक त्याग. ( गुज्रात )

**चार प्रमुख शिष्य श्री मध्वाचार्यांचे** — १ पद्मनाभतीर्थ, २ नरहरितीर्थ, ३ माधवतीर्थ व ४ अक्षोभ्यतीर्थ.

**चार प्रमुख शिष्य व्यासांचे** — १ वैशंपायन, २ पैल, ३ जैमिनि व ४ सुमन्तु.

'सुमन्तुश्चेति चत्वारो व्यासशिष्या महौजसः' (शिव-कैलास-अ. २३)

**चार प्रमुख प्रकार पर्वतांचे** — १ वलीपर्वत किंवा घडीचे पर्वत, २ गठ पर्वत ३ अवशिष्ट पर्वत व ४ संचय पर्वत ( सुलभ भू-विज्ञान ).

**चार प्रमुख विचार प्रवाह ' भारतीय ' तत्त्व प्रतिपादनाचे** — १ जडाद्वैतपक्ष, २ शून्यवाद, ३ द्वैतवाद व ४ अद्वैतवाद. विविधविचार प्रवाहांची एकूण संख्या सुमारें ३८४ होती असें म्हणतात. त्यांतले हे चार प्रमुख होत. ( ब्रह्मसूत्रभाष्य-प्रस्तावना )

**चार प्रमुख शिष्य श्रीशंकराचार्यांचे** — १ पद्मपादाचार्य, २ चित्सुखाचार्य, ३ आनंदगिरि व ४ सुरेश्वराचार्य.

**चार प्रलय** — १ नित्य, २ नैमित्तिक, ३ प्राकृतिक व ४ आत्यंतिक. (ह. श. को.)

**चार बहुमोल रत्नें** — १ सवत्स कामधेनु, २ सुंदरसा पलंग, ३ रत्नजडित दीप व ४ नागवेलीचीं पानें. हीं चार रत्नें पाताळलोकच्या राजा वासुकीनें भूलोकीच्या राजा उदयनाला आपल्या कन्येच्या विवाहप्रसंगीं हुंडा म्हणून दिलीं अशी कथा आहे. (प्र. कों.)

**चार ब्रह्मवेत्ते** — १ श्रीदत्तात्रेय, २ शुकाचार्य, ३ कपिलमुनि व ४ याज्ञवल्क्य. हे चार महान् ब्रह्मवेत्ते होऊन गेले.

**चार ब्रह्मदेवाचे मानसपुत्र** — १ सनक, २ सनन्दन, ३ सनातन आणि ४ सनत्कुमार हे चार ब्रह्मदेवाचे मानसपुत्र ज्ञानी असून ते नैष्ठिक ब्रह्मचारी होते. (भाग स्कंद ३ अ. १२–४)

**चार बौद्ध क्षेत्रें व त्यांचीं चार प्रतीकें** — १ कपिलवस्तु–जन्मस्थान –छत्रीधारी घोडा. २ बुद्धगया–ज्ञानप्राप्ति–बोधीवृक्ष. ३ सारनाथ–पहिले प्रवचन दिलें–धर्मचक्र. व ४ कुशीनगर–निर्वाणस्थान–स्तूप.

**चार 'म' कार स्वभावसिद्धच असावे लागतात** — १ मन, २ मनगट, ३ मृदु आणि ४ माणुसकी. हे रक्तात म्हणजे स्वभावातच असावे लागतात.

**चार मठ श्रीशंकराचार्यांचे** — १ शृंगेरी मठ (दक्षिणाम्नाय) संप्रदाय–भूरीवार, वेद–कृष्णयजु, तीर्थ–तुंगभद्रा. २ गोवर्धन मठ (जगन्नाथ पुरी पूर्वाम्नाय) भोगवार, ऋग्वेद, महोदधी. ३ बदरीनारायण (उत्तराम्नाय) आनंदवार, अथर्वण, अलकनंदा आणि ४ द्वारकामठ (पश्चिमाम्नाय) कीटवार सामवेद गोमतीतीर्थ. (शंकराचार्यचरित्र अ. ३४)

**चार मतें (गायनाचीं)** — १ शिवमत, २ ब्रह्ममत, ३ पिंगल नागमत व ४ हनुमतमत.

**चार महर्षि शैव शास्त्र सिद्धान्त प्रवचनकार** — १ रुद्र, २ दधीच, ३ अगस्त्य आणि ४ उपमन्यु (शिव. पु. वा. संहिता अ. ३२)

**चार मार्ग आध्यात्मिक उन्नतीचे ( शैवपंथ )** — १ दासमार्ग—पूजा वगैरे बाह्योपचार करणें, २ क्रिया अथवा सत्पुत्रमार्ग—पुत्राप्रमाणें ईश्वर-सेवा करणें, ३ योगमार्ग—मानस पूजा व ध्यानधारणा आणि ४ सन्मार्ग ज्ञान-मार्ग. ( प्रसाद जून १९६३ )

**चार मार्ग ( महम्मदीय )** — १ शरायत — कर्ममार्ग, २ तरीकत्—उपासनामार्ग ३ हकीकत्—योगमार्ग आणि ४ मारफत् ज्ञानमार्ग ( पचग्रथी ).

**चार महावाक्यें ( भक्तिमार्गाचीं )** — १ कृष्णस्तु भगवान् स्वयम्, २ मत्त परतर नान्यत्, ३ ब्रह्मणे प्रतिष्ठाहम् व ४ मामेक शरण व्रज. (भागवत)

**चार महावाक्यें ( वेदान्ताचीं )** — १ प्रज्ञान ब्रह्म ( ऋग्वेद ), २ अहं ब्रह्मास्मि ( यजुर्वेद ), ३ तत्त्वमसि ( सामवेद ) व ४ अयमात्मा ब्रह्म ( अथर्ववेद ).

**चार मानें (परिमाण निश्चिति अथवा वजन लांबी इ याचें माप)** १ डावे—उजवें, २ मागपुढे, ३ वर—खालीं आणि ४ आधी—नतर. (पचांगातील ज्योति शास्त्र. )

**चार मास तीर्थसदृश अभीष्ट फल देणारे** — १ आषाढ, २ कार्तिक, ३ माघ व ४ वैशाख.

> तत्राषाढः कार्तिकश्च माघो वैशाख एव च ।
> तीर्थान्युक्तानि मासा वै चत्वारोऽभीष्टदायका ॥ ( कल्याण—तीर्थांक. )

**चार मित्र** — १ विद्या—प्रवासात, २ पत्नी—घरीं, ३ औषध—व्याधि-ग्रस्तावस्थेंत आणि ४ धर्म—अतसमयी.

> विद्या मित्र प्रवासेषु भार्या मित्र गृहेषु च ।
> व्याधितस्यौषध मित्र धर्मो मित्र मृतस्य च ॥ ( सु. )

**चार मुक्तिस्थानें** — १ ब्रह्मज्ञान, २ गयाश्राद्ध, ३ गाईंच्या गोठ्यात मरण आणि ४ कुरुक्षेत्रनिवास.

> ब्रह्मज्ञान गयाश्राद्ध गोगृहे मरण तथा ।
> वास. पुसा कुरुक्षेत्रे मुक्तिरेषा चतुर्विधा ॥ ( गयामहात्म्य )

**चार मुद्रा** — ( अ ) १ खेचरी, २ भूचरी, ३ चाचरी आणि ४ अगोचरी; ( आ ) १ ध्यान, २ राधायंत्र, ३ षण्मुखी आणि ४ शांभवी.

**चार मूळ गोत्रें** — १ अंगिरस, २ कश्यप, ३ वसिष्ठ व ४ भृगु.

मूलगोत्राणि चत्वारि समुत्पन्नानि भारत ।
अङ्गिराः कश्यपश्चैव वसिष्ठो भृगुरेव च ॥ (म. भा. शांति २९६–१७)

**चार मोक्षद्वाराचे द्वारपाल** — १ शम, २ विवेक, ३ संतोष व ४ साधुसमागम.

'शमो विचारः संतोषश्चतुर्थः साधुसंगमः.' (सु.)

**चार युगें** — १ कृतयुग–आरंभ काल–कार्तिक शु० ९
२ त्रेतायुग– ,, वैशाख शु० ३
३ द्वापरयुग– ,, माघ व० ३०
४ कलीयुग– ,, भाद्रपद व० १२ (शिवनिबंध)

आद्यं कृतयुगं प्रोक्तं ततस्त्रेतायुगं बुधैः ।
तृतीयं द्वापरं पार्थ चतुर्थं कलिरुच्यते ॥ (कूर्म २९–९)

**चार युगें** — (आ) १ सुवर्णयुग, २ रजतयुग, ३ ब्रॉंझयुग आणि ४ लोहयुग (ऑगस्टीन कालगणना).

**चार युगांतील चार अवतार ( महानुभाव )** — १ दत्त (कृत), २ हंस (त्रेता), ३ कृष्ण (द्वापर) आणि ४ प्रल्हाद (कलियुग–व्हावयाचा आहे.)

**चार युगांचे चार स्मृतिकार** — १ कृतयुग–मनु, २ त्रेतायुग–गौतम, ३ द्वापर–शंखलिखित आणि ४ कलियुग–पराशर (प्रा. च. को.)

**चार युगांतील चार प्रकारचा धर्म** — १ कृत–तप प्रधान, २ त्रेत–ज्ञानप्रधान, ३ द्वापर–यज्ञप्रधान आणि ४ कलि–दानप्रधान (म. भा. शांति ३–२३१).

**चार युगांतील प्राणांचीं चार स्थानें** — १ कृत अथवा सत्य युग–अस्थीमध्यें, २ त्रेता–मांसांत, ३ द्वापर–रक्तांत व ४ कलियुग–अन्नांत—(पराशर).

**चार योगभूमिका** — १ वाणीलय, २ मनोलय, ३ बुद्धिलय व ४ अहंकारलय. (विचारचंद्रोदय)

**चार रत्नें** — १ सूर्य–आकाशांत, २ बालक–घरीं, ३ स्त्री–शयनप्रसंगीं व ४ पंडित–सभेमध्यें.

आकाशे रविरत्नानि गृहरत्नानि बालक-।
शयने स्त्रीरत्नानि सभारत्नानि पंडित ॥ (सु.)

**चार श्रेष्ठ दानें** — १ कन्यादान, २ गोदान, ३ भूमिदान आणि ४ विद्यादान.

दानाना च समस्ताना चत्वार्येतानि भूतले ।
श्रेष्ठानि कन्यागोभूमिविद्यादानानि सर्वदा (अ. स.)

**चार लक्षणें (ईशदर्शन झाल्याचीं)** — १ बालवत्, २ पिशाचवत्, ३ जडवत् आणि ४ उन्मत्तवत्. ज्या व्यक्तीला ईशदर्शन झालें ती अशा चार लक्षणांनीं युक्त होऊन जाते. (भागवत)

**चार लक्षणें (खऱ्या ज्ञान्याचीं)** — १ वाणी गोड असून उदार, २ ज्ञान असून गर्व नाहीं, ३ शूर असून अंगीं क्षमा आणि ४ अमूप धन तसेंच अपार औदार्य.

या चौंलक्षणीं मंडित । तोचि ज्ञानि तोचि पंडित ॥ (वदान्तसूर्य)

**चार लक्षणें (शिष्टाचाराचीं)** — १ गुरुशुश्रूषा, २ सत्य, ३ अक्रोध आणि ४ दान हीं चार शिष्टाचाराचीं नियत लक्षणें होत

गुरुशुश्रूषण सत्यमक्रोधो दानमेव च ।
एतच्चतुष्टय ब्रह्मन् शिष्टाचारेषु नित्यदा ॥ (म. भा. वन. २०७-६९)

**चार ललितकला** — १ नृत्य, २ नाट्य, ३ गायन व ४ वादन.

**चार लोक** — १ स्वर्ग, २ मृत्यु, ३ पाताळ आणि ४ कैलास.

**चार वर्ण** — १ ब्राह्मण, २ क्षत्रिय, ३ वैश्य व ४ शूद्र. मूळ एका वर्णाचेच हे चार वर्ण म्हणजे चातुर्वर्ण्य महाभारतकाळीं करण्यात आले.

"चत्वारो वै वर्णा ब्राह्मणो राजन्यो वैश्य शूद्र· ।" (शतपथ)

हे चार वर्ण म्हणजे चार प्रकारच्या शक्ती होत. १ शिक्षकशक्ति-ब्राह्मण, २ रक्षकशक्ति-क्षत्रिय, ३ पोषकशक्ति-वैश्य व ४ सेवकशक्ति-शूद्र. राष्ट्राच्या सोयीसाठीं या चार प्रकारच्या शक्तींची आवश्यकता असते. (वा. रामायणाचें निरीक्षण-प. सातवळेकर)

**चार वर्ण (मुसलमानांत)** — १ सय्यद, २ शेख, ३ मोगल व ४ पठाण. असे चार वर्ण मुसल्मानांत मानतात.

**चार वाचिक पापें** — १ कठोर भाषण, २ खोटं बोलणें, ३ चहाडी आणि ४ असंबद्ध बोलणं हीं वाणाचीं चार पापें होत (स्कंद–काशी २७–१५३)

**चार विद्या** — १ तर्कशास्त्र, २ वेदविद्या, ३ कृषिकर्मादि अर्थशास्त्र आणि ४ सामदामदंडादि राजनीति (कौ १–२)

**चार वेद** — १ ऋग्वेद, २ यजुर्वेद, ३ सामवेद, आणि ४ अथर्ववेद. आणि नाट्य हा पांचवा वेदच असे भरत नाट्य शास्त्रात म्हटले आहे

सर्वशास्त्रसंपन्नं सर्व शिल्पप्रवर्तकम् ।
नाट्याख्यं पंचमं वेदं सेतिहासं करोम्यहम् ॥ (भ. ना. अ १)

**चार विकथा** — १ भक्तकथा, २ स्त्रीकथा, ३ राज्यकथा व ४ देशकथा (रत्नकरंड श्रावकाचार अ ३)

**चार वेद (महाराष्ट्राचे)** — १ श्रीज्ञानेश्वरी, २ एकनाथी भागवत, ३ दासबोध व ४ तुकारामगाथा

**चार वेदांचीं उपांगें** —१ पुराणें, २ न्याय, ३ मीमांसा व ४ धर्मशास्त्र.

**चार वेदांचे चार द्रष्टे** — १ ऋग्वेद–अग्निऋषि, २ यजुर्वेद–वायुऋषि, ३ सामवेद–आदित्यऋषि व ४ अथर्ववेद–अंगिरसऋषि (The wisdom of India)

**चार वैष्णव संप्रदाय** — १ ब्रह्मसंप्रदाय (श्रीज्ञानेश्वर), २ आनंद संप्रदाय (एकनाथ), ३ स्वरूपसंप्रदाय (रामदास) व ४ चैतन्यसंप्रदाय (तुकाराम) असे परमार्थमार्गांत चार प्रकारचे वैष्णव संप्रदाय मानले आहेत त्यास वारकरीचतुष्टय म्हणतात (अमृता–अमृतवाहिनी टीका)

**चार वंश** — १ सोमवंश–यादव, २ सूर्यवंश–श्रीरामचंद्राचा, ३ ब्रह्मवंश व ४ शेषवंश. असे चार वंश पुराणांत वर्णिले आहेत. (वंशमाहात्म्य)

**चार व्यसनें सत्ताधाऱ्यांना असणारीं** — १ मृगया, २ मद्यपान, ३ द्यूत व ४ अतिरिक्त कामासक्ति (म भा सभा ६८–२०)

**चार व्यास** — १ वृद्धव्यास,–याचे चार ब्राह्मण सोळा अध्याय, २ बृहद्व्यास–याचीं चार आरण्यकें वीस अध्याय, ३ वेदव्यास–याच्या चार संहिता चोवीस अध्याय आणि ४ मानव्यास–याचीं महाभारत अठरा पुराणें व इतिहास (दर्शनप्रकाश)

**चार व्यूह ( रचना ) वर्णाश्रमात्मक** — १ शिक्षाव्यूह, २ रक्षाव्यूह, ३ वार्ताव्यूह आणि ४ सेवाव्यूह. ( मानवधर्मसार )

**चार वृत्ति अंतःकरणाच्या** — १ मन–कल्पनांना आत घेते, २ चित्त –त्यांची निवड करते, ३ अहंकार–कल्पनेचा पक्ष घेतो आणि ४ बुद्धि– निश्चय करते. या चार वृत्ति वेदांतात मानिल्या आहेत. ( मानवधर्मसार )

**चार शक्ति** — १ क्रियाशक्ति, २ द्रव्यशक्ति, ३ इच्छाशक्ति व ४ ज्ञानशक्ति. ( दा. बो. १७–९–६ )

**चार शक्ति अथवा विश्व देवता** — १ महेश्वरी, २ महाकाली, ३ महालक्ष्मी व ४ महासरस्वती. ( अरविंद ये पत्र )

**चार शिष्य येशुख्रिस्ताचे** — १ मॅथ्यू, २ मार्क, ३ ल्यूक व ४ जॉन. या चौघांनी ' गॉस्पेल ' नावाचे ग्रंथ लिहिले आहेत.

**चार शक्ति राष्ट्र जिवंत राहण्यास आवश्यक** — १ शिक्षक शक्ति–ब्राह्मण, २ रक्षकशक्ति–क्षत्रिय, ३ पोषकशक्ति–वैश्य, आणि ४ सेवक- शक्ति–शूद्र. ( वा. रा. समालोचना )

**चार शिष्यप्रकार बुद्धाचे** — १ माध्यमिक, २ योगाचार, ३ सौत्रा- तिक व ४ वैभाषिक. ( भारतीयदर्शन संग्रह )

**चार शैली ( रचनाप्रकार ) निबंधवाङ्मयाच्या** — १ कैशिकी, २ भारती, ३ सात्वती आणि ४ आरभटी. ( साहित्य ) ( आपटेकोश )

**चार शून्यें** — १ ऊर्ध्वशून्य, २ अधःशून्य, ३ मध्यशून्य व ४ ब्रह्म.

ऊर्ध्वशून्य मनोभूत अधःशून्य तु मारुत. ।
मध्यशून्य जीवभूत चतुर्थ ब्रह्म उत्तमम् ॥ ( सु. )

प्रपंचाचा रोविला वेळू । चहू शून्यांचा मांडिला खेळू ॥ ( सकलमतगाथा )

**चार स्त्रिया परमसिद्धीला प्राप्त झाल्या** — १ मैत्रेयी, २ सुल्भा, ३ शार्ङ्गा व ४ शांडिली. या चौघी पूर्वजन्मातील पुण्याईनें परमसिद्धीला प्राप्त झाल्या.

मैत्रेयी सुल्भा शार्ङ्गी शांडिली च तपस्विनी ।
स्त्रीवे प्राप्ता. परां सिद्धिमन्यजन्मसमाधिनः ॥ ( योगचिंतामणि )

**चार संस्कार** — १ सयम, २ सेवा, ३ साधना आणि ४ सज्जन- समागम.

संयम सेवा साधना सत्पुरुषोंका संग ।
ये चारो करते तुरन्त मोहनिशाको भंग ॥ ( कल्याण मासिक )

**चार संगीत मतें** — १ नारदमत संगीत, २ भरतमत-संगीत, ३ हनुमन्तमत-संगीत व ४ श्रीकृष्णमत-संगीत असे चार प्रकार आहेत.

**चार साधनें अंतर्मल विनाशाचीं** — १ श्रीहरिस्मरण, २ हरीतकी भक्षण ( हिरडा ), ३ गायत्री जप व ४ गंगाजल-पान. या चार गोष्टी उक्त मानिल्या आहेत.

हरिं हरीतकीं चैव गायत्रीं जाह्नवीजलम् ।
अन्तर्मलविनाशाय स्मरेत् भक्षेत् जपेत् पिबेत् ॥ ( जीवनविकास )

**चार साधनें जनतासंपर्काची** — १ संचार, २ संपर्क, ३ संवाद व ४ संघटना. ( इंद्रायणी दि. अंक १९६२ )

**चार साधनें मोक्षाचा अधिकारी होण्याचीं** — १ नित्यानित्यवस्तु-विवेक, २ इहामुत्रफलभोगविराग-संसारिकसुखविषयीं वैराग्य, ३ शमादिषट्-संपत्ति व ४ मुमुक्षुत्व ( वेदान्तशास्त्र ब्रह्मसूत्र अ १ )

**चार संस्था संस्कार करणाऱ्या** — १ घर, २ शिक्षणसंस्था, ३ सामाजिक अथवा बाह्य वातावरण आणि ४ परिस्थिति. ( माहेर मासिक )

**चार संप्रदाय वैष्णवांचे** — १ ब्रह्म, २ सनक, ३ श्री व ४ रुद्र. ( पद्मपुराण )

**चार संप्रदाय शैवांचे** — १ शैव, २ पाशुपत, ३ कारुणिक सिद्धान्ती व ४ कापालिक.

**चार संप्रदाय सुफी पंथाचे** — १ चिस्ती, २ नक्शबंदी, ३ सुहरावर्दी व ४ कादरी ( सुफी संप्रदाय )

**चार स्वर ( गायनांत )** — १ वादी-राजा, २ संवादी-प्रधान, ३ अनुवादी-सरदार व ४ व्यावादी-शत्रु. ( ह्र. श. को. )

**चार स्वातंत्र्यें** — १ व्यक्तिस्वातंत्र्य, २ धर्मस्वातंत्र्य, ३ भाषण-स्वातंत्र्य व ४ मुद्रणस्वातंत्र्य. हीं आधुनिक काळचीं चार स्वातंत्र्यें लोक-शाहीचीं मूलभूत तत्त्वें म्हणून मानिलीं आहेत.

**चार श्रेष्ठ आसनें** — १ सिद्धासन, २ पद्मासन, ३ सिंहासन व ४ भद्रासन ( गोरक्षासन ). योगशास्त्रांतील चौऱ्यायशीं आसनांत हीं चार आसनें श्रेष्ठ होत.

**चार श्रेष्ठ शक्ति ( लोकशाहींतील )** — १ राष्ट्रपति, २ राज्यसभा, ३ संसद् ( लोकसभा ) व ४ वृत्तपत्र.

**चार सिद्ध आदेश** — १ पुराणें, २ मानवधर्म, ३ सांगवेद आणि ४ वैद्यक. या चार गोष्टी सिद्ध म्हणजे अबाधित आज्ञा होत. त्या टाळून चालावयाचें नाहीं.

पुराणं मानवो धर्मः साङ्गो वेदश्चिकित्सितम् ।
आज्ञासिद्धानि चत्वारि न हन्तव्यानि हेतुभिः ॥ ( वि. स्मृ. )

**चार स्थानें मुक्तिप्रद** — १ गयाश्राद्ध, २ ब्रह्मज्ञान, ३ गाईच्या गोठ्यांत मरण व ४ कुरुक्षेत्री निवास. ( करवीरमाहात्म्य अ८ )

**चार स्थानीं कृष्णास्नान दुर्लभ** — १ शूर्पालय, २ मल्लसभा व कृष्णासंगम, ३ छाया ( भगवती ) या नांवाचें एक तीर्थ ( छाया भगवती-कृष्णा संगम विजापूर पासून १० मैलांवर तगडगी जवळ. ) आणि ४ श्रीशैल.

शूर्पाले संगमे चैव छायायां श्रीगुरौ तथा ।
सर्वत्र सुलभा कृष्णा चतुःस्थानेषु दुर्लभा ॥ ( कृ. मा. ५४-८ )

**चार स्थानीं कुंभमेळा**— १ हरद्वार, २ प्रयाग, ३ उज्जयिनी व ४ नाशिक. समुद्रमंथनांतून निघालेला अमृतकुंभ या चार ठिकाणीं १ चंद्र, २ बृहस्पति, ३ शनि व ४ सूर्य या चौघांच्या संरक्षणाखालीं बारा दिवसपर्यंत दडवून ठेवला होता. तन्निमित्त पुराणकालापासून भारतांत प्रचलित असलेली मोठी यात्रा. ( केसरी जानेवारी १९५६ )

**चौघेजण कोणत्याहि कार्याच्या चांगल्यावाईटाचे समभागी होत** — १ प्रत्यक्ष करणारा, २ तें करविणारा, ३ जवळ असून पाहणारा आणि ४ अनुमोदन देणारा

कर्ता कारयिता चैव प्रेरको ह्यनुमोदकः ।
सुकृतं दुष्कृतं चैव चत्वारः समभागिनः ॥ ( सु. )

**चार स्थानीं मुंडण व उपोषण वर्ज**— १ विरजक्षेत्र, २ कुरुक्षेत्र, ३ विशालतीर्थ व ४ गया क्षेत्र. ( करवीर महात्म्य अ ८ )

**चौघांची खरी ओळख चार अवस्थेत होते**—१ विपत्काळात मित्राची, २ दारिद्र्यसमयीं स्त्रीची, ३ युद्धात वीराची आणि ४ अपकीर्तीत बांधवाची.

**चौघेजणच चक्रव्यूहाचा भेद जाणणारे** — १ श्रीकृष्ण, २ अर्जुन, ३ प्रद्युम्न व ४ अभिमन्यु. हे चार जणच चक्रव्यूहाचा भेद जाणणारे महाभारतकालीं होते.

**चौघेजण षट्टेपासून मुक्त** — १ शुक, २ भीष्म, ३ हनुमान् आणि ४ कार्तिकस्वामी.

> षट्टेपासून सुटले चौघेजण । शुक भीष्म आणि हनुमान ।
> चौथा कार्तिकस्वामी जाण ॥
> त्याला नाहीं बट्टा । अशी ही षट्टा ।
> भल्याभल्यासी लाविला बट्टा ॥ (एकनाथ)

**चौघेजण ब्रह्महत्येच्या पापाचे वाटेकरी**—१ भूमि, २ उदक, ३ वृक्ष आणि ४ स्त्रिया. इंद्रानें ब्रह्महत्येचा लोकापवाद दूर करण्याकरिता ती ब्रह्महत्या चार भाग करून या चौघांना वांटून दिली व ती त्यांना काही अटींवर ग्रहण केली अशी कथा आहे. (भाग–स्कंध ६ अ ९ ७)

**चौघांशीं मसलत करूं नये** — १ मंदमति, २ चेंगट, ३ हयानें हुरळून जाणारा आणि ४ स्तुतिपाठक. (म. भा. उद्योग ३३–६९)

**चौघेजण आश्रयास पात्र** — १ वृद्ध नातेवाईक, २ खालावलेला कुलीन मनुष्य, ३ दरिद्री मित्र आणि ४ निपुत्रिक भगिनी. (म. भा. उद्योग ३३–७०)

**चौघे शत्रुवत् होत** — १ भार्या रूपवती, २ निरक्षर पुत्र, ३ ऋणकर्ता बाप आणि ४ अकुलीन माता.

> भार्या रूपवती शत्रु पुत्र शत्रुरपण्डित ।
> ऋणकर्ता पिता शत्रुर्माता च व्यभिचारिणी ॥ (सु.)

**चौघेजण शूलवत् दुःखदायक** — १ मूर्ख सेवक, २ कंजूष राजा–शासनाधिकारी, ३ कुल्टा स्त्री व ४ कपटी मित्र.

> सेवक शठ नृप कृपन, कुनारी ।
> कपटी मित्र सूलसम चारी ॥ (राम–मानस किष्किंधाकांड)

**चौघाचे स्मरणानें कलिनाश होतो** — १ कर्कोटक नाग, २ दमयंती, ३ नळ आणि ४ राजा ऋतुपर्ण.

कर्कोटकस्य नागस्य दमयन्त्या नलस्य च ।
ऋतुपर्णस्य राजर्षे कीर्तनं कलिनाशनम् ॥ (सु.)

**चौघाकडील अन्न त्याज्य** — १ राजा, अथवा शासनाधिकारी, २ वेश्या, ३ वैद्य व ४ दुष्कर्माचरणी.

राजान गणिकान्न च भिषगन्न तथैव च ।
दुष्कर्मणा च सर्वेषामन्न त्याज्य प्रयत्नत ॥ (कल्याण मासिक)

**अनुबंध चतुष्टय** — १ प्रयोजन, २ विषय, ३ अधिकारी आणि ४ संबंध या गोष्टी ग्रंथात असाव्या लागतात.

**अनंत चतुष्टय** — १ अनंतज्ञान, २ अनंतदर्शन, ३ अनंतवीर्य व ४ अनंतसुख.

**उपसर्ग चतुष्टय** — १ आधि, २ व्याधि, ३ उपाधि व ४ समाधि,

**घात चतुष्टय** — १ घातचंद्र, २ घाततिथि, ३ घातनक्षत्र व ४ घातवार.

**चित्त चतुष्टय** — १ मन, २ बुद्धि, ३ चित्त आणि ४ अहंकार.

**तनु चतुष्टय** — १ स्थूल, २ सूक्ष्म, ३ कारण आणि ४ महाकारण. (दा. बो ४-१-२८)

**पुरुषार्थ चतुष्टय** — १ धर्म, २ अर्थ, ३ काम आणि ४ मोक्ष.

**प्रस्थान चतुष्टय** — १ दशोपनिषदें, २ ब्रह्मसूत्रें, ३ भगवद्गीता आणि ४ श्रीमद्भागवत या चार ग्रंथाना मिळून प्रस्थान चतुष्टय म्हणतात वेदांचे विभाग व ब्रह्मसूत्रांची रचना करूनहि व्यासांना शांति मिळाली नाहीं. ती त्यांना श्रीमद्भागवताची रचना केल्यानंतर लाभली अशी कथा आहे

**भक्त चतुष्टय** — १ नारद, २ ध्रुव, ३ प्रल्हाद व ४ विदुर. हे चार आदर्श भक्त होत.

**विद्या चतुष्टय** — १ आन्वीक्षकी, २ त्रयी, ३ वार्ता व ४ दण्डनीति. (मानवधर्मसार)

**वीर चतुष्टय (पुराणकालीन)** — १ भरत, २ अभिमन्यु, ३ ककुत्स्थ आणि ४ भीष्म.

**पंच अंगें ( कालाचीं )** — १ तिथि, २ वार, ३ नक्षत्र, ४ योग आणि ५ करण हीं पांच अंग ज्यांत मुख्यत्वें सांगितलेलीं असतात त्यास पंचांग म्हणतात.

' तिथिर्वारश्च नक्षत्र योगः करणमेव च ।
तत्पञ्चाङ्गमिति प्रोक्तम् ॥ ' ( सु. )

**पंच अंगें ( पुरश्चरणाचीं )** — १ जप, २ होम, ३ तर्पण, ४ मार्जन, आणि ब्राह्मणभोजन.

पंचांगोऽयं महायाग: पुरश्चरणसंज्ञकः ( विष्वक्सेन मन्त्रशास्त्र )

**पंच अंगें ( मीमांसा पद्धतीचीं )** — १ विषय, २ संशय, ३ पूर्वपक्ष, ४ उत्तरपक्ष आणि ५ सिद्धान्त.

**पंच अंगें ( यज्ञाचीं )** — ( अ ) १ देवता, २ हविर्द्रव्य, ३ मंत्र, ४ ऋत्विज व ५ दक्षिणा; ( आ ) १ शास्त्रोक्त विधि, २ अन्नसंतर्पण, ३ वेदमंत्र, ४ दक्षिणा व ५ श्रद्धा हीं पांच अंग मानतात.

देवाना द्रव्यहविषामृक्सामयजुषां तथा ।
ऋत्विजां दक्षिणानां च संयोगो यज्ञ उच्यते ॥ ( वा. पु. )

**पंच अग्नि ( तेज तत्त्व )** — १ जठराग्नि, २ कामाग्नि, ३ मंदाग्नि, ४ प्रकाशाग्नि, ( वडवाग्नि ) आणि ५ ब्रह्माग्नि ( तत्त्व निज विवेक )

**पंच अवस्था** — १ जागृति, २ स्वप्न, ३ सुषुप्ति, ४ तुर्या आणि ५ उन्मनी. ( क. गी. २–७ )

**पंच अवस्था उन्नतीच्या (साक्षात्कार मार्गातल्या)** — १ अज्ञानावस्था, २ भोगावस्था, ३ त्यागावस्था ४ भक्तावस्था व ५ स्वरूपावस्था ( अथर्व अनु भाग १ ला )

**पंच अवस्था (प्राणिमात्रांच्या)** १ जन्म, २ बालपण, ३ तारुण्य, ४ वार्धक्य व ५ मृत्यु.

**पंच अणुव्रतें ( जैनांचीं )** — १ अहिंसा अणुव्रत, २ सत्य, ३ अचौर्य, ४ स्वस्त्रीसंतोष व ५ परिग्रह प्रमाण अणुव्रत. ( जैनधर्म तत्त्वार्थ सूत्र )

**पंच अहंकार** — १ देहाहंकार, २ प्रज्ञाहंकार, ३ जीवाहंकार, ४ आत्माहंकार आणि ५ शिवाहंकार ( साधन–संहिता )

**पंचांगुलें** — १ अंगुष्ठ, २ तर्जनी, ३ मध्यमा, ४ अनामिका आणि ५ कनिष्ठिका.

**पंच आनंद** — १ विषयानंद, २ योगानंद, ३ अद्वैतानंद, ४ विदेहानंद आणि ५ ब्रह्मानंद.

विषययोगानंदौ द्वावद्वैतानंद एव च ।
विदेहानन्दो विख्यातो ब्रह्मानन्दश्च पञ्चमः ॥ (क. गी. २–३४)

**पंच आशास्थानें ( मानवाचीं )** — १ जीवित, २ कांता, ३ अपत्य, ४ मान आणि ५ धन. हीं पांच आशास्थानें होत.

**पंचाचार्य ( वीरशैव संप्रदाय )** — १ रेवणाराध्य–रंभापुरी–बाळे–हळ्ळी, २ मरुळाराध्य–उज्जयिनी, ३ एकोरामाराध्य–हिमवत्केदार, ४ पंडिताराध्य–श्रीशैल आणि ५ विश्वाराध्य–कोन्शिवाकी–काशी ( वी. प्र. )

(पंच 'उ' कार — १ उद्योग, २ उत्साह, ३ उत्तेजन, ४ उपकारबुद्धि आणि ५ उदारत्व. हे पंच 'उ' कार उच्च प्रतीचे सद्गुण होत.)

**पंच उपप्राण** — १ नाग–ढेकर येणारा, २ कूर्म–निमिषोन्मेष करणारा, ३ कृकल–शिंक येणारा, ४ देवदत्त–जांभई येणारा व ५ धनंजय–मरणानंतर किंचित्काल ब्रह्मरंध्रांत राहणारा. असे पंच वायु. (रा. गी. ४–३७)

**पंच उपविषें** — (अ) १ रुईचा चीक, २ निवडुंगाचा चीक, ३ कळलावी, ४ धोत्रा आणि ५ कण्हेर. (आ) १ शेर, २ रुई, ३ कण्हेर, ४ लागली (नारळ) व ५ विषमुष्टिका (काजरा) (म. वा. को.)

अर्कक्षीरं स्नुहीक्षीरं तथैव कलिहारिका ।
धत्तूरः करवीरश्च पंच चोपविषाः स्मृताः ॥ (सु.)

**पंच उपविघ्नें योगाभ्यासाच्या आड येणारीं** — १ दुःख, २ दौर्मनस्य (मन क्षुब्ध होणें), ३ अंगमेजयत्व (अंग थरणें), ४ श्वास आणि ५ *प्रश्वास* (शरीरांतील वायु बाहेर सोडणें) (यो. सू १-३१).

**पंच 'क' कार ( लक्षणात्मक )** — १ कच्छ (आखूड विजार)–नियमदर्शक, २ कडें–सद्धर्माची आठवण, ३ कृपाण–शक्ति व स्वाभिमान, ४ कंगा–स्वच्छता व ५ केश–परमेश्वराप्रति समर्पण. (ईश्वरानें ज्या स्थितींत निर्माण केलें तींत समाधान मानावयाचें) (शिखांचा इतिहास) हे पंच

'क' कार गुरु गोविंदसिंगाने सुरू केले व ते प्रत्येकाजवळ असले पाहिजेत असा शीखपंथाचा निर्बंध आहे

**पंचक ( प्रातःस्मरणीय )** — (अ) १ अहल्या, २ द्रौपदी, ३ सीता, ४ तारा आणि ५ मंदोदरी

( अहल्या द्रौपदी सीता तारा मंदोदरी तथा ।
पञ्चकं ना स्मरेन्नित्यं महापातकनाशनम् ॥

(आ) १ सावित्री, (आधुनिक) २ भगिनी निवेदिता, ३ मीरा, (राजस्थान), ४ राणा लक्ष्मी झाशी व ५ अहिल्याबाई होळकर

यमनेत्रीच सावित्री भगिनी च निवेदिता ।
मीरा लक्ष्मीरहल्या च पञ्चैता पुण्यजीवना ॥ ( भगिनी निवेदिता चरित्र )

**पंच कर्म शरीरशुद्ध्यर्थ** — १ वमन, २ विरेचन, ३ बस्ति, ४ तैल-बस्ति व ५ नस्य या पाच उपचारपद्धति आयुर्वेदात सांगितल्या आहेत (आयुर्वेद)

**पंचकर्म ( संध्यासमयी वर्ज्य )** — १ आहार ( भोजन ), २ मैथुन, ३ झोप, ४ अध्ययन व ५ मार्गक्रमण ( भा प्र पूर्वखंड )

**पंचकर्मेंद्रियें** — १ हात, २ पाय, ३ वाणी, ४ शिश्न व ५ गुद

**पंच कर्मेंद्रियें व त्यांच्या अधिष्ठात्री देवता** — १ वाचा–अग्नि, २ हात–इंद्र, ३ पाय–विष्णु, ४ गुद–मृत्यु (मित्र) व ५ शिश्न प्रजापति, पंचकर्मेंद्रियें व पंच ज्ञानेंद्रियें यांखेरीज मन हें अकरावें इंद्रिय असून त्याची अधिष्ठात्री देवता इंद्र आहे ( सिद्धान्तशिरोमणि )

**पंचकर्म चिकित्सा** — १ वमन, २ विरेचन, ३ अनुवासन ( स्नेह-बस्ति ) ४ निरूह (बस्ति क्वाथ) व ५ नस्य अशा पाच प्रकारच्या चिकित्सेला म्हणतात ( आयुर्वेद )

**पंचकल्याणी ( घोडा )** —गुडघ्यापर्यंत चारी पाय पांढरे व तोंडावर पांढरा पट्टा असतो असा घोडा हा शुभलक्षणी मानतात ( अश्वपरीक्षा )

**पंचकल्याणिक ( जैनधर्म )** — १ गर्भकल्याणिक, २ जन्मकल्याणिक, ३ तपकल्याणिक, ४ केवलकल्याणिक आणि ५ मोक्षकल्याणिक. असे तीर्थंकर भगवानांच्या १ गर्भ, २ जन्म, ३ तप, ४ केवल आणि ५ मोक्ष अशा पाच प्रसंगांच्या उत्सवप्रकारास पंच महाकल्याणिक म्हणतात

**पंचकलि** ( कलह वास्तव्यस्थानें ) — १ मिथ्या भाषण, २ उन्माद, ३ काम, ४ हिंसादि दोष व ५ वैर. परीक्षितानें कलीला प्रथम चार स्थानें नेमून दिलीं ( चारचे अंकात पाहा ). त्यानंतर कलीनें पुन प्रार्थना केल्या वरून परीक्षितानें आणखी पाच स्थानें कलीला दिलीं. ( भा. ग १.१७.३९ )

**पंचकषाय** — ( अ ) १ हिरडा, २ आमलक, ३ मंजिष्ट, ४ लोध्र व ५ टेंभुरणी, ( आ ) शमी, २ उंबर, ३ अश्वत्थ, ४ वट आणि ५ पळस.

शम्युदुम्बरमश्वत्थं न्यग्रोधं च पलाशकम् ।

यत्र यत्ने विमन्त्रेण दद्यात्पञ्चकषायिकम् । ( भ. पु. १३५–३० )

( इ ) १ जांभूळ, २ सावरी, ३ चिकणा, ४ बकुल आणि ५ बोर. हे पचकषाय देवीला प्रिय आहेत.

जम्बूशाल्मलिवाट्याल बकुल बदर तथा ।

*कषाया पञ्च विज्ञेया देव्या. प्रातिकरा शुभा ॥* ( दुर्गोत्सवपद्धति )

**पंच काशी** — १ वाराणशी, २ गुप्तकाशी, ३ उत्तरकाशी, ४ दक्षिण काशी ( तेन्काशी ) व ५ शिवकाशी.

**पंचकुळी** — १ मोसले, २ गुजर, ३ शिर्के, ४ मोहिते व ५ महाडीक. हीं महाराष्ट्रातील पाच प्रसिद्ध क्षत्रिय कुलें.

**पंचकेणें** — १ मिरीं, २ मोहरी, ३ जिरें, ४ हिंग आणि ५ धाडफूल. या मसाल्याच्या पाच जिनसांना म्हणतात.

**पंच केदार** — १ बदरीकेदार, २ मध्यमहेश्वर, ३ तुंगनाथ, ४ रुद्रनाथ व ५ गोपेश्वर.

**पंच क्लेश** — १ अविद्या, २ अस्मिता ( आहपणा, मीपणाची गाठ ), ३ राग, ४ द्वेष आणि ५ अभिमान. या पाचांपासून उद्भवणाऱ्या स्थूल वृत्ति, यास क्लेशादिपंचक म्हणतात. ( पातञ्जलयोग साधनपाद ३ )

**पंच कोश** ( आत्म्याचे ) — १ जड्शरीर, २ चैतन्य, ३ मन बुद्धि, ४ अतिमानस ( सुप्रमन ) आणि ५ आनंद. ( विज्ञानघन आणि आनंदघन ) ( महायोगी अरविंद )

**पंच कोश** ( योगशास्त्र ) १ अन्नमय. २ प्राणमय, ३ मनोमय, ४ विज्ञानमय आणि ५ आनंदमय असे पंचकोश म्हणजे जीवात्म्याची पाच आवरणें.

**पंचकृष्ण** ( महानुभाव संप्रदाय ) — १ श्रीकृष्ण, २ दत्तात्रय, ३ चांगदेव राऊळ, ४ गुंडम राऊळ आणि ५ श्रीचक्रधर. ( आ ) १ हंस, २ दत्त, ३ कृष्ण, ४ प्रज्ञात व ५ चक्रधर. ( म. ज्ञा. को )

**पंचाकाश** — ( अ ) १ आकाश, २ महाकाश, ३ पराकाश, ४ तत्त्वाकाश आणि ५ सूर्याकाश ( कल्याण योगांक ६२ ); ( आ ) १ घटाकाश, २ मठाकाश, ३ महदाकाश, ४ चिदाकाश आणि ५ निराकाश. (क.गी.२-२४)

**पंचीकरण** — १ पृथ्वी, २ आप, ३ तेज, ४ वायु आणि ५ आकाश. या पंचमहाभूतांपैकी प्रत्येकाचा कमी जास्त भाग घेऊन त्या सर्वांच्या मिश्रणाने तयार होणारा पदार्थ. याला पंचीकरण अथवा पांच तत्त्वांचें विवरण म्हणतात. ( गी. र. १८१ )

**पंचखंड** — १ आशिया, २ युरोप, ३ अमेरिका, ४ आफ्रिका आणि ५ आस्ट्रेलेशिया असे या पृथ्वीचे पांच मोठे भूभाग.

**पंचखाद्य अथवा पंचमेवा** — ( अ ) १ खारीक, २ खोबरें, ३ खसखस, ४ वेदाणा व ५ खडीसाखर; ( आ ) १ खारीक, २ खोबरें, ३ डाळें, ४ लाह्या व ५ पोहे.

**पंचख्याति** — १ असत् ख्याति – शून्यवाद, २ आत्मख्याति – क्षणिक विज्ञानवाद, ३ अन्यथाख्याति – नैयायिक, ४ अख्याति – सांख्य व प्रभाकरमत, आणि ५ अनिर्वचनीय ख्याति – अद्वैत वेदान्त. या पांच ख्याति म्हणजे पदार्थांची प्रतीति.

अनिर्वचनीय जे ख्याति । तो वादू निश्चिती मी उद्धवा ॥

( ए. भा. १६–२०६ ).

**पंच 'ग' कार ( गवयाचे )** — ( अ ) १ गत, २ गर्व, ३ गाजा, ४ गप्पा आणि ५ गणिका; ( आ ) १ गायत्री, २ गोविंद, ३ गाय, ४ गीता आणि ५ गंगास्नान. हे पंच 'ग' कार वैदिक धर्माचे पंचप्राण होत.

गायत्री गोविन्द गौ गीता गङ्गास्नान ।
इन पाँचोंकी कृपासे शीघ्र मिले भगवान ॥ ( तत्त्वचि. भाग २ )

**पंच 'ग' कार दुर्लभ** — १ गोमती नदी, २ गोमयस्नान, ३ गोदान, ४ गोपीचंदन आणि ५ गोपीनाथदर्शन.

(**पंच गोदानें** — १ पापधनु, २ उत्क्रांतिधेनु, ३ वैतरणीधेनु, ४ ऋण धेनु आणि ५ कामधेनु ( म. वा. कोश ))

**पंचगंगा** — ( अ ) १ नन्दिनी, २ नलिनी, ३ सीता, ४ मालती आणि ५ विष्णुपदा ( ज्वालामुखी पर्वतात ). ( गदाधर भाष्य ). ( आ ) १ किरणा, २ धूतपापा, ३ सरस्वती, ४ गंगा व ५ यमुना. ( इ ) १ शिवा, २ भद्रा, ३ भोगावती, ४ कुमी आणि ५ सरस्वती ( करवीर महात्म्य )

गोमती गोमयस्नान गोदान गोपिचन्दनम् ।

दर्शन गोपिनाथस्य द्वारा पंच दुर्लभा ॥ ( स्कं. नागरखंड. )

**पंच गंध** — ( अ ) १ कस्तुरी, २ चंदन, ३ कापूर, ४ अगरु आणि ५ मल्यागरुचंदन हीं पाच प्रसिद्ध सुगंधी द्रव्य हीं सर्व पोर्यांत सुखदायक होत.

कस्तुरीचंदनं चंद्रमगरु द्वितीय तथा ।

पंचगंधसमाख्यात सर्वकार्येषु शोभनम् ॥ ( पद्म पाताळखंड ). ( आ ) १ कापूर, २ कंकोळ, ३ लवंग, ४ जायफळ आणि ५ सुपारी ( दु श को. )

**पंचगव्य** — १ गोमूत्र, २ गोमय, ३ दूध, ४ दही व ५ तूप. हे पाचहि गाईपासून मिळणारे पदार्थ, सर्व पवित्र धार्मिक कार्यांत शुद्धिक्रियाकडे यांचा उपयोग करतात.

गोमूत्र गोमय क्षीर दधिसर्पिस्तथैव च ।

गवा पञ्च पावनानि पुनन्ति सकल जगत् ॥ ( स्कं. रेवाखंड )

**पंचगीता** — १ भगवद्गीता, २ गणेशगीता, ३ भगवतीगीता, ४ सूर्यगीता आणि ५ शिवगीता

**पंचगौड** — १ सारस्वत, २ कान्यकुब्ज, ३ गौड, ४ उत्कल आणि ५ मैथिल या पाच उत्तर भारतातील ब्राह्मणांस पंचगौड म्हणतात

'गौडा पञ्चेति विख्याता विंध्यस्योत्तरवासिनः ।' ( वाराह पुराण )

**पंचग्रंथ** — १ संहिता, २ ब्राह्मण, ३ आरण्यक, ४ पद आणि ५ क्रम.

**पंच ग्रंथी** — १ पंचकोश, २ समाधियोग, ३ मानुष विचार, ४ गुरुबोध आणि ५ सत्यशब्द टकसार या पाच कबीरपंथी ग्रंथास पंचग्रंथी म्हणतात

(**पंच "च" कार** — १ चहा, २ चिवडा, ३ चिरूट, ४ चर्चा आणि ५ चलच्चित्रपट या पंच 'च' कारांना समाजपुरुषाला ग्रासले आहे.)

(**पंच 'ज' कार (दुर्लभ)** —१ जननी, २ जन्मभूमि, ३ जाह्नवी, ४ जनार्दन आणि ५ जनक.

जननी जन्मभूमिश्च जाह्नवी च जनार्दन ।
जनक पञ्चमश्चैव जकारा पञ्च दुर्लभा ॥ (सु.))

**पंच 'ज' कार तृप्ति न पावणारे** — १ जावई, २ जठर, ३ जाया, ४ जातवेद आणि ५ जलाशय

जामाता जठर जाया जातवेदा जलाशय ।
पूरिता नैव पूर्यन्ते जकारा पञ्च दुर्भरा ॥ (सु.) )

**पंचजन (वेदकालीन)** — (अ) १ पुरु, २ अनु, ३ द्रह्यु, ४ यदु व ५ तुवश. या पाच जमातींना ऋग्वेदकाल पंचजन म्हणत (आ) १ ब्राह्मण, २ क्षत्रिय, ३ वैश्य, ४ शूद्र व ५ निषाद (इ) १ गंधर्व, २ पितर, ३ देव, ४ असुर आणि ५ राक्षस.

**पंचजळ (आपतत्त्व)** — १ कामजल, २ चचळजल, ३ आवरणजल, ४ ज्ञानीवजल आणि ५ विज्ञानजल (तत्त्व-निज-बोध)

**पंचाम्ल** — (अ) १ अम्लवेतस, २ आमसोल, ३ महाळुंग, ४ डाळिंब व ५ इडलिंबु. (आ) १ आमसोल, २ डाळिंब, ३ बोर, ४ वेतस आणि ५ चिंच (इ) १ बोर, २ डाळिंब, ३ अमसोल किंवा चिंच, ४ चुका व ५ चणकाम्ल-हरभऱ्याची आंब

कोल-दाडिम वृक्षाम्ल चुक्रका चुक्रिकारसम् ।
पंचाम्लक समुद्दिष्टं तच्चोक्त चाम्लपंचकम् ॥ (रसरत्नसमुच्चय १०-८४)

**पंचौदन अज (जीवात्मा)** — १ शब्द, २ स्पर्श, ३ रूप, ४ रस आणि ५ गंध हे पाच विषय याची पाच भोजने म्हणजे उपभोगाचे विषय होत. विषयरूप पाच प्रकारचे अन्न खातो म्हणून त्यास पंचौदन अज अथवा पंचमाजनी असे म्हटले आहे (अथर्व-अनु-मराठी भाग ३ रा)

**पंचोपचार (पूजेचे)** —१ ध्यान, २ आवाहन, ३ भक्त्यायुक्त निवेदन, ४ नीराजन व ५ प्रणाम (आ) १ गंध २ पुष्प ३ धूप, ४ दीप आणि ५ नैवेद्य. (आन्हिक सूत्रावलि)

**पंचमी तिथी** — वैदिक धर्मात पंचमी तिथीस विशेष महत्त्व आहे. अनेक सण व पर्वे या तिथीस आढळतात. आषाढ शु. ५ स वीज पंचमी म्हणतात. निदान वीज जरी चमकली तर पावसाळा चांगला जाईल, अशी समजूत आहे. श्रावण शु. ५—नागपंचमी; भाद्रपद शु. ५—ऋषिपंचमी, आश्विन शु. ५-ललितापंचमी; कार्तिक शु. ५—लाभपंचमी, माघ शु. ५ —वसंत पंचमी; फाल्गुन व. ५ रंगपंचमी इ.

**पंचाग्नि** — (अ) १ वडवाग्नि, २ मदाग्नि, ३ ज्वराग्नि, ४ शोकाग्नि आणि ५ कामाग्नि. (क. गी. २-३३), (आ) १ दक्षिणाग्नि, २ गार्हपत्य, ३ आहवनीय, ४ सभ्य व ५ आवसथ्य. हे पाच श्रौताग्नि होत, (इ) १ स्वर्ग, २ मेघ, ३ पृथ्वी, ४ पुरुष आणि ५ स्त्री. या पाच अग्निद्वारा मानवाचा पुनर्जन्म होतो. (छा अ. ५)

**पंचाग्नि विद्या** — १ द्युलोक, २ पर्जन्य, ३ पृथिवी, ४ पुरुष व ५ स्त्री. यांचे ठिकाणी अग्नीची दृष्टि ठेवून उपासना-चिंतन करणे ही पंचाग्नि विद्या होय. (ब्रह्मसूत्र शा. भा. अ ३)

**पंचाग्निसाधन** — चारी दिशांना चार अग्निकुंडे प्रज्वलित करून ठेवावयाची व सूर्याकडे टक लावून तपश्चर्या करावयाची. याला पंचाग्निसाधन म्हणतात. हा विधि ग्रीष्मऋतूत मरउन्हात करावयाचा असतो. अशा प्रकारची तपस्या प्राचीन काळी करीत असत.

**पंचनद** — १ वितस्ता, २ इरावती (असिक्री), ३ चंद्रभागा (परुष्णी), ४ शतद्रु (सतलज) व ५ विपाशा. हीं वेदकालीन नावें. या पाच नद्या असलेला (पंजाब) प्रदेश,

विवस्तैरावती चंद्रभागा मध्ये सरिद्वरा ।
शतद्रुश्च विपाशा च तेन पंचनदः स्मृत. ॥ (वि. पु. तळटीप)

आधुनिक नावें — १ झेलम, २ चिनाब, ३ रावी, ४ सतलज व ५ बियास.

**पंच नमस्कार** — १ अर्हतांना नमस्कार, २ सिद्धांना नमस्कार, ३ आचार्यांना नमस्कार, ४ उपाध्यायांना नमस्कार आणि ५ सर्व सतांना नमस्कार. हे पंच नमस्कार, सर्व पापांचा नाश करणारे व मंगलामध्ये मंगल असे जैन धर्मात मानले आहेत.

**पंचपदी** — देवापुढे नित्य पांच अभंग व पाच पदे म्हणण्याची जी प्रथा तीस पचपदी म्हणतात.

**पंच पर्वत** — १ वैदार, २ वराह, ३ वृषभ, ४ ऋषिगिरि व ५ चैत्यक. मगधात जरासधाचे राजधानी गिरिव्रजचे परिसरात असलेल्या पर्वतास म्हणतात. (मुक्तेश्वर सभा. ६–८८)

(**पंचोन्मत्त** — १ बलोन्मत्त, २ मदोन्मत्त, ३ राजोन्मत्त, ४ विजयोन्मत्त आणि ५ महामत्त. असा रावणाचा भाऊ कुंभकर्ण पचोन्मत्त होता.

मदोन्मत्त बलोन्मत्त। राज्योन्मत्त गर्वोन्मत्त।
विजयोन्मत्त महामत्त। पचोन्मत्त कुंभकर्ण ॥ (भा. रा. यु. २७–५५)

**पंच पतिव्रता** — १ सती, २ पार्वती, ३ अरुंधती, ४ अनसूया आणि ५ शांडिली.

**पंचपक्वान्नें** — १ लाडू, २ पुरणपोळी, ३ साखरभात, ४ बासुदी व ५ श्रीखंडपुरी. हीं पाच उंची पक्वान्न. हीं सर्व भोजनाच्या वेळीं एकत्र वाढणें. हीं ऐश्वर्याची परमावधि समजली गेली आहे. (आ) १ घीवर, २ लाडू, ३ खाजी, ४ जिलेबी आणि ५ गुळोरी. (क. क.)

**पंच पुरुषार्थ** — १ धर्म, २ अर्थ, ३ काम, ४ मोक्ष व ५ परामर्क्ति.

जैसा ज्यासी भावार्थ। तैसा पुरवी मनोरथ।
पढिये पंच पुरुषार्थ। तो हरि नादत वैकुंठी ॥ (ए. भा. २४-२७०)

**पंच पंच उषःकाल** — सूर्योदयापूर्वी पाच घटिकाचा काळ. पाच घटिका मिळून दोन तास होतात. हा समय नित्य उठून कार्यप्रवृत्त होण्याला फार प्रशस्त व शुभ मानला आहे.

**पंच पल्लव** — (अ) १ वड, २ पिंपळ, ३ पायरी, ४ जांभूळ व ५ आंबा (ब्रह्माड पुराण); (आ) १ आंबा, २ उंबर, ३ जांभूळ, ४ वड व ५ पिंपळ; (इ) १ आंबा, २ जांभूळ, ३ कवठ, ४ महाळुंग आणि ५ वेल. (शब्दरत्न प्रकाश)

**पंच पर्वकाळ** — (अ) १ व्यतिपात, २ वैधृति, ३ संक्रांत, ४ पौर्णिमा व ५ अमावास्या. (आ) १ चतुर्दशी, २ अष्टमी, ३ अमावास्या, ४ पौर्णिमा व ५ रविसंक्रांति. हे पर्वकाल होत.

**पंचतरणी ( पंच तरंगिणी )**— १ विमल, २ कमल, ३ चकलुना ( चाक्ष नदी ), ४ वितस्ता व ५ वैतरणी या पांच नद्यांचे प्रवाह एकत्र येतात असें ठिकाण अमरनाथचे वाटेवर आहे. या पांच धारा म्हणजेच सिंधूचा उगम म्हणतात.

**पंच तन्मात्रा** — १ शब्द, २ स्पर्श, ३ रस, ४ रूप आणि ५ गंध. या पंचतन्मात्रा–पंचमहाभूतांची मूलतत्वें.

प्रकृति पुरुष महत्तत्व । पंच तन्मात्रा सूक्ष्मत्वभाव ॥ (ए. भा. ११-१६८)

**पंच ताल** — १ डोली ताल, २ सतरुद्रताल, ३ वासुकीताल, ४ लोकपालताल व ५ सतोपंथ ताल. हीं हिमालयांतील तीर्थें होत.

**पंच तिक्त** — १ निम्ब, २ गुळवेल, ३ अडुळसा, ४ परवर ( कडु पटवळ ) व ५ मरकट्या ( रिंगणा ). या पांच कडू वनस्पतींस म्हणतात.

**पंचतीर्थें** — १ गंगाद्वार, २ कुशावर्त, ३ बिल्वक, ४ नीलपर्वत आणि ५ कनखल. हीं पांच तीर्थें हरिद्वार येथें व त्र्यंबकेश्वरास गोदावरीचे परिसरांत आहेत; ( आ ) १ वह्नितीर्थ, २ प्रल्हादकुंड, ३ नारदकुंड, ४ कूर्मधारा व ५ लक्ष्मीधारा. बदरीनाथ येथें.

**पंचत्वचा** — १ वड, २ पिंपळ, ३ पिंपरी, ४ जांभूळ आणि ५ आंबा. यांच्या साली. ( धर्मशास्त्र )

**पंचतंत्र** — विष्णुशर्मा नामक ब्राह्मणानें रचिलेला प्राचीन संस्कृत ग्रंथ. यांत पांच कथानकें आहेत. या ग्रंथाचे द्वारें पं. विष्णुशर्म्यानें मूर्ख राजपुत्रांस चतुर केलें.

**पंच देवपादप** — पादप म्हणजे झाड. झाडें पायांनीं ( मुळांनीं ) पाणी शोषितात म्हणून पादप. १ मंदार, २ पारिजातक, ३ संतान, ४ हरिचंदन व ५ कल्पवृक्ष, हे पांच स्वर्गलोकींचे मुख्य वृक्ष. ( अमर )

**पंच देवता ( नित्य उपासनेच्या )** — १ सूर्य, २ देवी, ३ विष्णु, ४ गणेश आणि ५ शिव.

आदित्यं अंबिकां विष्णुं गणनाथं महेश्वरम्
गृहस्थः पूजयेत्पंच भुक्तिमुक्त्यर्थसिद्धये ॥ ( सु. )

**पंचदीर्घ** — १ बाहु, २ नाक, ३ डोळे, ४ छाती आणि ५ पोट. हे पांची अवयव लांब असलेल्यास म्हणतात. सामुद्रिकांत शुभलक्षण मानतात. (म. वा. को.)

**पंच देवी** — १ दुर्गा, २ पार्वती, ३ सावित्री, ४ सरस्वती व ५ राधिका.

**पंच देह** — १ स्थूलदेह, २ सूक्ष्मदेह, ३ कारणदेह, ४ महाकारणदेह आणि ५ कैवल्य-ज्ञानदेह. (क. गी. २-८)

**पंच दुःखें** — १ गर्भदुःख, २ जन्मदुःख, ३ जरादुःख, ४ व्याधिदुःख ५ मृत्युदुःख. (श्वेता-१-५)

**पंच द्राविड** — १ तेलग, २ द्राविड, ३ महाराष्ट्रीय, ४ कर्नाटकी व ५ गुर्जर. या पाच दक्षिण भारतांतील ब्राह्मणास पंचद्राविड म्हणतात.

द्राविडाः पचविख्याता विन्ध्यदक्षिणवासिन. ॥ (वाराह पुराण)

**पंच द्राविड भाषा** — १ तामिळ, २ तेलगु, ३ मल्याळम्, ४ कन्नड आणि ५ तुळु.

**पंच दुर्ग** — १ जलदुर्ग, २ पर्वतदुर्ग, ३ वृक्षदुर्ग, ४ ईरिणदुर्ग, (जेथें कोणत्याहि प्रकारची शेती होत नाहीं असा प्रदेश) व ५ धन्वदुर्ग (वाळवंटमय प्रदेश), अशीं पाच सरक्षण-साधनें प्राचीन काळीं होतीं.

**पंच दोष** — १ काम, २ क्रोध, ३ भय, ४ निद्रा आणि ५ श्वास. हे पाच दोष जेवढे म्हणून देहधारी प्राणी आहेत त्याच्या ठिकाणीं असतात. (म. भा. शांति)

**पंच धातु** — १ सोनें, २ रुपें, ३ लोखंड, ४ तांबे आणि ५ जस्त. या पचधातु. पंचधातूच्या मिश्रणानें तयार होणारी वस्तु टिकाऊ असते.

**पंच धान्यें** — १ गहू, २ जव, ३ तांदूळ, ४ तीळ व ५ मुग. हवन करण्यास उक्त अशीं पाच धान्यें.

**पंच धारा (जलप्रपात)** — १ कूर्मधारा, २ प्रल्हाद धारा, ३ इंद्र धारा, ४ वसुधारा आणि ५ भृगुधारा. यातच कोणीकोणी उर्वशी (उर्वशीचे जन्मस्थान) धारेचा समावेश करतात. उंच उंच पर्वतावरून पडणारे हे पाच जलप्रपात बद्रीनाथाचे परिसरात आहेत.

**पंचनाथ** — १ उत्तर-श्रीबद्रीनाथ, २ दक्षिण-श्रीरंगनाथ (श्रीरंगम्), ३ पूर्व-जगन्नाथ, ४ पश्चिम-श्रीद्वारकानाथ व ५ मध्य-श्रीगोवर्धननाथ (नाथद्वारा राजस्थान).

**पंचपर्वा विद्या** — १ वैराग्य, २ विचार, ३ योग, ४ तप व ५ ईश भक्ति. अशा पाच पर्वांनी युक्त अशी विद्या आहे. ही साध्य झाली म्हणजे जीव मुक्तावस्थेस जातो असे वल्लभ संप्रदायात मानले आहे.

**पंच परमेष्ठी ( जैनधर्म )** — १ अर्हंतपरमेष्ठी, २ सिद्धपरमेष्ठी, ३ आचार्य, ४ उपाध्याय आणि ५ साधुपरमेष्ठी. ( रत्नकरंडक श्रावकाचार )

**पंच परिवर्तने ( जैनधर्म )** — १ द्रव्यपरिवर्तन, २ क्षेत्रपरिवर्तन, ३ कालपरिवर्तन, ४ भावपरिवर्तन आणि ५ भवपरिवर्तन.

**पंच पुष्प** — १ चंपक, २ आम्र, ३ शमी, ४ कमल आणि ५ कण्हेर. ही देवतांना प्रिय आहेत

**पंच प्रमाणे** — १ शब्दप्रमाण, २ अर्थापत्ति प्रमाण, ३ अनुमान प्रमाण, ४ उपमान प्रमाण आणि ५ प्रत्यक्ष प्रमाण.

**पंच प्रलय** — १ नित्यप्रलय, २ मरणप्रलय, ३ दैनंदिनप्रलय, ४ ब्रह्म प्रलय व ५ आत्यंतिक प्रलय. ( भा. रा. किष्किंधा १२ २४ )

( आ ) निद्रा-प्रलय, २ प्राण-प्रलय, ३ भूत-प्रलय, ४ ब्रह्म-प्रलय व ५ विवेक-प्रलय ( हृत्पद्म. )

**पंच प्रयाग** — ( अ ) १ विष्णुप्रयाग — लेटी व अलकनंदा संगम, २ कर्णप्रयाग — पिंडार व अलकनंदा, ३ रुद्रप्रयाग — मंदाकिनी व अलकनंदा, ४ देवप्रयाग — भागीरथी व अलकनंदा व ५ भूतप्रयाग — यमुना व गंगासंगम. अलाहाबादेस जो त्रिवेणी संगम आहे हा भूतप्रयाग व बाकीचे चार हिमालयात बदरीनारायणाचे वाटेवर आहेत.

दूरमार्गं पंचप्रयाग । वेदप्रयाग । शिवप्रयाग ।
कर्णप्रयाग ब्रह्मप्रयाग । अतिगुप्तप्रयाग पाचवा ( भा.रा.बाल. ७ २३ )

**पंच प्रवृत्ति जीवनाला आधारभूत** — १ जिजीविषा — जगण्याची इच्छा, २ विजिगिषा — जिंकत राहाण्याची ३ रिरंसा — सुखाचा शोध घेण्याचा, ४ जिज्ञासा — जाणण्याची व ५ मुमुक्षा — मुक्त होण्याची इच्छा. ( भाऊजी जानेवारी १९६३ )

**पंच पांडव** — १ धर्म, २ भीम, ३ अर्जुन, ४ नकुल, आणि ५ सहदेव.

  

**पंच प्राण** — १ प्राण — अन्नप्राशन, २ अपान — गुदस्थानीं मलमूत्र धारण करणारा, ३ व्यान — पाचन, ४ उदान — ऊर्ध्वगमन करणारा व ५ समान–डोळे मिटणें व उघडणें. हे पंचप्राण शरिरातील पाच प्राणवायु होत. त्यांची स्थानें अनुक्रमे १ नाक, २ गुद, ३ सर्व शरीर, ४ कंठस्थान व ५ नाभिस्थान हीं होत.

**पंचप्राण ( नाट्याचे )** — १ संघर्ष, २ संवाद, ३ प्रसंग, ४ समस्या आणि ५ स्वभाव रेखन ( केसरी ) ८-१०-१९५४.

**पंच प्राण ( लौकिकांत )** — १ बायको, २ तिची बहीण, ३ सासू, ४ सासरा व ५ मेहुणा. हे कलिनिर्मित पंचप्राण होत.

गृहिणी भगिनी तस्याः श्वशुरौ श्याल इत्यपि ।
प्राणिनां कलिना सृष्टाः पंचप्राणा इमे परे ॥ ( रामदास मासिक आषाढ १८७४ )

**पंचप्राण ( भारतीय संस्कृतीचे )** १ वेद, २ उपनिषदें, ३ श्रीमद्भगवद्गीता, ४ रामायण व ५ महाभारत ( पुरुषार्थ )

**पंच प्राण वाङ्मयाचे** — १ प्रयत्न, २ प्रचीति, ३ प्रक्षोभ, ४ प्रसाद व ५ प्रतिमा ( महाराष्ट्र. ध. प्रणेते )

**पंचप्राण संस्कृतीचे** — १ विचार ( तर्क ), २ भावना आणि कल्पना, ३ कला, ४ नीति आणि ५ धर्म ( साहित्याचा संसार )

**पंच प्रेषित** — १ झरतुष्ट्र, २ महावीर, ३ बुद्ध, ४ ख्रीस्त व ५ महंमद.

'पंचेते प्रेषिताः तेषां चिन्तनं हितकारकम्' ( श्रीयुत जून १९६३ )

**पंच प्रासाद** — मध्यभागीं गर्भागारावर एक मुख्य कळस व चार बाजूस चार लहान कळस अशा प्रकारच्या शिखररचनेस पंच प्रासाद म्हणतात.

**पंच बला** — १ बला, २ नागबला, ३ महाबला, ४ अतिबला व ५ राजबला. बला म्हणजे आकस्मिक संकट, अथवा पीडा. ( बृ. श. को. )

**पंच बलें** — ( अ ) १ बाहुबल, २ अमात्यबल ( सल्लागार-सामान्य लोकांचे बाबतींत ), ३ धनबल, ४ कुलबल व ५ बुद्धिबल. हीं पाच प्रकारचीं बलें होत, ( आ ) १ इंद्रियबल, २ मनोबल, ३ बुद्धिबल, ४ नैतिक बल

आणि ५ शरीरबल. ( इ ) १ श्रद्धा, २ उत्साह, ३ समाधि, ४ स्मृति व ५ प्रज्ञा ( अभिधम्म )

**पंच बदरी** — १ विशाल बदरी ( बदरीनाथ ), २ योगबदरी ( पंडुकेसर ), ३ भविष्यबदरी ( तपोवन–जोशी मठापासून ८ मैल ), ४ वृद्धबदरी ( अनिमठ ) व ५ ध्यानबदरी ( सीलाग ). ही पांची स्थानें बदरीनाथाचे परिसरात आहेत.

**पंच बाजारपेठा भक्तीच्या ( महाराष्ट्र )** — १ श्रीक्षेत्र पढरी, २ आळंदी, ३ देहू, ४ सज्जनगड आणि ५ पैठण. ( माऊली मासिक )

**पंचबाण–पंचशर** — १ अरविंद ( लालकमल ), २ अशोक, ३ आम्रमंजिरी, ४ जाईचें फूल किंवा मोगरा व ५ नीलकमल. हे पंचबाण म्हणजे मदनाचीं आयुधें होत. मदनाला पंचबाण अथवा पंचशर म्हणतात. याच्या धनुष्याचे बाण म्हणजे पाच फुलें असें मानलें आहे. ( आ ) ( गुण-वाचक ) १ उन्माद आणणारा, २ तापन–तप्त करणारा, ३ शोषण–कृश करणारा, ३ स्तम्भन–क्रियाहीन व ५ समोहन–मोह पाडणारा.

अरविंदमशोकं च चूतं च नवमल्लिका ।
नीलोत्पलं च पञ्चैते पचबाणस्य सायकाः ॥ ( सु. )
" समोहनं च कामस्य पंचबाणाः प्रकीर्तिताः ॥ ( सु. )

**पंच बिल्व** — १ तुलसी, २ बिल्व, ३ निर्गुडी, ४ लिंबू व ५ आवळी.
तुलसी बिल्व निर्गुडी जंबीरामलकं तथा ।
पंचबिल्वसमाख्यातं एकबिल्वं शिवार्पणम् ॥ ( चंद्रिकोपाल्नि दीपिका )

**पंचब्रह्म सनातन** — १ तारक, २ दडक, ३ कुंडल, ४ अर्धचद्रक आणि ५ बिंदुसकाद्य असें सनातन पच ब्रह्म आहे. ( क. गी. २ १ )

**पंचात्मक ब्रह्म** — १ ॐ, २ गणपती, ३ मन, ४ परब्रह्म व ५ आत्मा. ॐ हाच पंचविध किंवा यासच पचात्मक ब्रह्म म्हणतात. ( ध्यान योग रहस्य )

**पंच प्रवाह भारतीय संस्कृतीचे** — १ यज्ञ, २ योग, ३ ज्ञान, ४ भक्ति आणि ५ कर्म. ( ज्ञानेश्वरी प्रबोधिका प्रस्तावना )

[**पंचभयें** — १ ईश्वरभय, २ धर्मभय, ३ समाजभय, ४ शासनभय व ५ शरारभय. हीं पाच भयें मानवाला दुराचरणापासून परावृत्त करणारीं. (तुलसीदल)]

**पंच भक्तिमती** — १ अनसूया, २ शबरा, ३ गोपीजन, ४ विदुर पत्नी व ५ राणी मीरा. या पाच प्रसिद्ध भक्तिमती होत.

**पंचभद्र** — १ गुळवेल, २ पित्तपापडा, ३ वाळा, ४ काडे चिराईत व ५ मुस्त. या पाच वनस्पतींस आयुर्वेदांत पचभद्र म्हणतात. (आ) १ सव शरार पिवळे असून पाय आणि ताड मात्र श्वेतवर्ण असणारा घोडा. किंवा १ कंठ, २ पाठ, ३ मुख, ४ कटि व ५ पार्श्वभाग या पाच ठिकाणीं भोवरे असलेल्या घोड्यास म्हणतात. हा शुभ लक्षणी मानतात. (म. वा. को.)

**पचभ्रम** — १ भेदभ्रम, २ कर्तृत्वभ्रम, ३ सगभ्रम, ४ विकारभ्रम आणि ५ सन्यासाभास. (मो. प्र.)

**पचभाव** — (अ) १ शात, २ दास्य, ३ सख्य, ४ वात्सल्य आणि ५ मधुर. या पचभावास आध्यात्मिक जगतांत पचभाव म्हणतात (आ) १ सृष्टि, २ स्थिति, ३ प्रलय, ४ तिरोभाव व ५ अनुग्रह (सस्कृतीचीं प्रतीक.)

**पंच भावना** — (अ) १ आदर, २ प्रीति, ३ आश्रय, ४ आनद व ५ प्रेम (आ) १ भय, २ विरोध, ३ आप्तपणा, ४ स्नेह व ५ भक्ति या पाच उत्कट भावनापैकीं परमेश्वरासबधान राजा वेनाचा एकहि भावना नव्हती, अशी भागवतात कथा आहे (भाग ७ १ ३७)

**पचभिक्षु** — १ कौंडिण्य, २ वप्र, ३ भद्रायु, ४ महानाम व ५ अश्वजित्. हे गौतमबुद्धानें प्रथम उपदेशिलेले पाच भिक्षु होत

**पच भिक्षुव्रतें** — १ चोरी न करणें, २ ब्रह्मचर्य, ३ त्याग, ४ लोभाचा अभाव व ५ अहिंसा

अस्तेय ब्रह्मचर्य च त्यागो लोभस्तथैव च।
व्रतानि पञ्च भिक्षूणामहिंसा परमाणि वै ॥ (मार्कण्डेय पु)

**पचभू-संस्कार** — १ परिसमूहन-पाणी शिंपडणे, २ उपलेपन-गोमयानें सारवणे, ३ उल्लेखन-देवता नामाचा रेघांनी उल्लेख करणें, ४ मृद्‌उद्धरण-माती उकरून काढणे आणि ५ अभ्युक्षण-प्रोक्षण करणें हीमहवन प्रसगीं

अग्नि प्रतिष्ठापना करण्यापूर्वी अशा पाच प्रकारांनी भू–शुद्धि करावयाची असते. ( गृह्यसूत्रे )

**पंच भेद ( संन्यास दीक्षेचे )** — १ आश्रम, २ तीर्थ, ३ सरस्वती, ४ भारती व ५ परमहंस. असे पाच प्रकार.

**पंचभृंग** — १ देवदाली ( देवडंगरी ), २ शमी, ३ भृंग ( भांग ), ४ निर्गुडी आणि ५ तामलक. ( म. वा. को. )

**पंच 'म' कार** — १ मद्य, २ मांस, ३ मत्स्य, ४ मुद्रा आणि ५ मैथुन. या पाच वस्तूंचे सेवन हा शाक्तपंथातील वाममार्गीयांत आचारधर्म समजला जातो.

मकारपञ्चकं देवि । देवानामपि दुर्लभम् ॥ ( गुप्तसाधनतंत्र )

**पंच महाकाव्यें ( संस्कृत )** — १ रघुवंश, २ कुमारसंभव, ३ किरातार्जुनीय, ४ शिशुपालवध व ५ नैषधचरित.

**पंच महाग्रह** — १ मंगळ, २ बुध, ३ गुरु, ४ शुक्र आणि ५ शनि.

**पंच मानव ( पाच प्रकारचे लोक )** — १ विद्वान्, २ शूरवीर, ३ व्यापारी, ४ कारागीर व ५ वन्यजन. ( अथर्व–अनु–मराठी )

**पंच महाभूतांचीं देवस्थानें** — १ पृथ्वी–कांचीवरम्, २ आप–जंबुकेश्वरम्, ३ तेज–अरुणाचलम्, ४ वायु–काळहस्ति व ५ आकाश–चिदंबरम्. हीं पांचीं देवस्थानें दक्षिण भारतांत मद्रास राज्यांत आहेत.

**पंच महातत्त्वाचे पांच विषय** — १ पृथ्वी–गंध, २ आप–रस, ३ तेज–रूप, ४ वायु–स्पर्श आणि ५ आकाश–शब्द. (तत्त्व निजबोध विवेक)

**पंच महातत्त्वांचीं दहा इंद्रियें** — १ पृथ्वी–नाक व गुद, २ जल–जीभ व लिंग, ३ तेज–नेत्र व पाय, ४ वायु–त्वचा व हात आणि ५ आकाश–कान व मुख ( तत्त्व–निजबोध–विवेक )

**पंच महादीक्षा** — १ स्पर्श–दीक्षा, २ दृष्टि–दीक्षा, ३ ध्यान–दीक्षा, ४ शब्द ( मंत्र )–दीक्षा आणि ५ संकल्प–दीक्षा. ( माउली विशेषांक )

**पंच महापातकें** — ( अ ) १ ब्रह्महत्या, २ भ्रूणहत्या, ३ बालहत्या, ४ गोहत्या आणि ५ स्त्रीहत्या; ( आ ) १ ब्रह्महत्या, २ सुरापान, ३ चोरी, ४ गुरुदारागमन आणि ५ अशांच्या संसर्गांत राहणें. हीं पंचमहापातकें व हीं त्यांच्यामुळें घडल्यास ते पंचमहापातकी होत. ( मनुस्मृ. ३६–२ )

**पंच महाभूतें** — १ पृथ्वी, २ आप, ३ तेज, ४ वायु आणि ५ आकाश. हीं पंच महाभूतें परमात्म्यानें विश्वोत्पत्तीकरितां निर्माण केली. ( कृ. गी. २-१३ ) यांना भूतपंचक म्हणतात.

**पंचमहाभूतांचे स्वभाव, धर्म, गुण, आकार आणि रंग** —

१ पृथ्वी–कठोरता–गंध–भ्रमन–स्थूल–पीत.

२ आप–शीतलत्व–रस–अधोगमन क्रिया–स्थूल–श्वेत.

३ तेज–उष्ण अथवा प्रकाश–रूप–ऊर्ध्वगमन क्रिया–स्थूल–लाल-सूक्ष्माकार.

४ वायु–कोमलत्व–स्पर्श अथवा शब्द–तिर्यग्गमन क्रिया-सूक्ष्माकार–हिरवा.

५ आकाश–शून्यधर्म–निर्गुण–अक्रिय–गोलाकार–रंगरहित. ( पंचग्रंथी )

**पंच महाभूतांचीं पांच प्रतीकें** — १ पृथ्वी–आयत, २ आप–वर्तुळ, ३ तेज–त्रिकोन, ४ वायु–चंद्रकोर व ५ आकाश–ज्योत. ( केसरी २१ ऑगस्ट १९६० )

**पंच मात्रा** — १ अकार, २ उकार, ३ मकार, ४ इकार आणि ५ बिंदु, या पंच मात्रा होत.

**पंच महायज्ञ** — १ ब्रह्मयज्ञ-अध्यापन, २ पितृयज्ञ–तर्पण, ३ देवयज्ञ-वैश्वदेव होम, ४ भूतयज्ञ–बलिहरण व ५ मनुष्ययज्ञ–अतिथि-सत्कार.

> अध्यापनं ब्रह्मयज्ञः पितृयज्ञश्च तर्पणम् ।
> होमो दैवो बलिर्भौतो नृयज्ञोऽतिथिपूजनम् ॥ ( मनु. )

( आ ) १ मातृपितृभक्ति, २ पातिव्रत्य, ३ समता, ४ मित्रांचा द्वेष न करणें व ५ विष्णुभक्ति.

> पित्रोरर्चाऽथ पत्युश्च साम्यं सर्वजनेषु च ।
> मित्राद्रोहो विष्णुभक्तिरेते पञ्चमहामखाः ॥ ( पद्म. सृष्टि. ७–१३ )

**पंच महाविषें** — १ सोमल, २ हरताळ, ३ मनशीळ, ४ वत्सनाभ आणि ५ सर्प विष. ( शा. नि. )

**पंच महाव्रतें ( जैनधर्म )** — १ अहिंसा, २ असत्य त्याग, ३ अस्तेय ४ ब्रह्मचर्य व ५ अपरिग्रह. अशीं पांच व्रतें पाळण्याची भिक्षु-भिक्षुणींस शपथ घ्यावी लागते; ( आ ) १ सत्य, २ अस्तेय, ३ अहिंसा, ४ ब्रह्मचर्य व ५ शास्त्र आज्ञापालन. हीं सर्वसामान्य पंचमहाव्रतें.

**पंच महाव्याधि** — १ मूळव्याध, २ यक्ष्मा ( क्षय ), ३ कोड, ४ प्रमेह आणि ५ उन्माद.

**पंच महाभूतांचीं पंचवीस तत्त्वें** — ( १ ) पृथ्वी-१ अस्थि, २ मांस, ३ नाडी, ४ त्वचा व ५ रोम, ( २ ) आप-१ शुक्र ( वीर्य ), २ शोणित ( रक्त ), ३ लाळ, ४ मूत्र व ५ स्वेद, ( ३ ) तेज-१ क्षुधा, २ तृषा, ३ आलस्य, ४ निद्रा व ५ कांति, ( ४ ) वायु-१ चलन, २ वलन, ३ पलायन, ४ प्रसरण व ५ आकुंचन, ( ५ ) आकाश-१ काम, २ क्रोध, ३ शोक, ४ मोह व ५ भय. ( विचारचंद्रोदय दर्शन )

**पंच महाशब्द** — ( अ ) १ झांज, २ नगारा, ३ कर्णा, ४ चौघडा व ५ शिंगाडी, ( आ ) १ शिंग, २ ताशा, ३ नगारा, ४ शंख व ५ जय घंटा ही पांच मोठ्या आवाजाचीं वाद्यें होत व तीं प्राचीन काळीं राजाची स्वारी निघाली असतां वाजवीत असत तो एक प्रकारचा मान ( बिरुद ) समजला जात असे.

**पंच महासरोवरें** — १ बिंदु सरोवर-सिद्धपूर-मातृगया, २ नारायण सरोवर कच्छप्रांत, ३ मानस सरोवर-हिमालयांत, ४ पुष्कर-अजमीरजवळ व ५ पंपा सरोवर-होसपेठजवळ

**पंच महासागर** — १ उत्तर महासागर, २ दक्षिण महासागर, ३ हिंदी महासागर, ४ पॅसिफिक ( प्रशांत ) महासागर आणि ५ अॅटलांटिक महासागर हे पृथ्वीवरील पंच महासागर होत यांत प्रशांत महासागर अधिक खोल व मोठा आहे.

**पंच माता** — १ राजपत्नी, २ गुरुपत्नी, ३ मित्रपत्नी अथवा भ्रातृपत्नी, ४ पत्नीमाता ( सासू ) आणि ५ आपली माता या पांच माता-मातेसमान होत. ( ब्र चा ४-२० )

**पंच प्यारे** — शिखांचे दहावे गुरु, गुरु गोविंदसिंग यांनी खालसा पंथ स्थापन केला. त्यांनीं ज्या पहिल्या पांच जणांना पंथाची दीक्षा दिली त्यास पंचप्यारे म्हणतात ते —१ दयाराम, २ धरमचंद, ३ मुगमचंद, ४ साहेब चंद व ५ हिंमतराय ( शिखांचा इतिहास )

**पंचमुखें ( शिवदैवतेचीं )** — १ सद्योजात, २ वामदेव, ३ अघोर, ४ तत्पुरुष आणि ५ ईशान. अशीं शिवाचीं पांच मुखें व स्वरूपें होत.

(पाशुपततंत्र) यानाच पंचब्रह्म असेहि म्हणतात व त्यापासून अनुक्रमे १ रेणुकाचार्य, २ दारुक (मरुल), ३ घण्टाकर्ण (एकोराम), ४ धेनुकर्ण (पंडिताराध्य) व ५ विश्वकर्ण (विश्वाराध्य) असे पंचाचार्य अवतरले. (सुप्रभेदागम)

**पंच मुद्रा** — (अ) (जप विधि) १ कमल, २ कलश, ३ धेनु, ४ ज्ञान आणि ५ अंजलि. अशा पाच प्रकारच्या मुद्रा करून जप करावा असे सांगितले आहे.

> कमलं कलशं धेनु ज्ञानमञ्जलिमेव च ।
> पञ्चमुद्रा प्रदर्शाथ श्रीसूक्तं च जपेद्बुधः ॥ (श्रीसूक्त फलश्रुति)

(आ) (मुद्रा धारण) १ चक्र, २ शंख, ३ गदा, ४ पद्म आणि ५ नारायण. अशा पांच मुद्रा मध्वसंप्रदायी शरीरावर धारण करतात.

(इ) (दीक्षाविधि) १ भिक्षापात्र, २ दण्डकाष्ठ, ३ भगवी कथा, ४ कमंडलु व ५ विभूति. या पांच वस्तु वीरशैव संप्रदायात दीक्षाविधीस लागतात त्यांसहि पंचमुद्रा म्हणतात.

(ई) (योगशास्त्र) १ चाचरि, २ भूचरा, ३ अगाचरा, ४ खेचरि आणि ५ अलक्ष्य. (क. क. स्तबक ८)

**पंच मूल** — (अ) १ शालपर्णी, २ पृश्निपर्णी, ३ रिंगणी, ४ डोरली व ५ गोखरू (लघुपंचमूल), (आ) १ बेल, २ एरण, ३ टेटू, ४ पाडळ व ५ शिवन. (बृहत्पंचमूल), (इ) १ शतावरी, २ विदारिकंद, ३ जीवंती, ४ पाषाणी व ५ जीवक. (ई) १गधाणागवत, २ हला, ३ अश्वदंष्ट्रा, ४ शिरीष व ५ कासमिदा (तृणपंचमूल) (उ) १ शर, २ इक्षु, ३ दर्भ, ४ कसई व ५ साळी भात (तृणपंचमूल). (ऊ) १ जीवक, २ ऋषभक, ३ मेद, ४ महामेद व ५ जीवन्ती. (ए) १ पुनर्नवा, २ बला, ३ एरंड, ४ रान उडीद व ५ रानमूग. (ऐ) १ गोखरू, २ लहान गोरा, ३ इंद्रवारुणी, ४ कासविंदा व ५ शिरस (ओ) १ गुळवेल, २ मेढशिंगी, ३ उपळसरी, ४ बिदारिका व ५ निशा (वल्लीपंचमूल) (म. वा. को.)

**पंच मुळें** — १ डाय (दाय), २ डोला, ३ रिंगणी, ४ रानवांगीं आणि ५ गोखुर. यास आर्यवैद्यकांत पंचमुळें म्हणतात.

**पंच मूर्खलक्षणें** — १ गर्विष्ठ, २ दुरुत्तरें करणें, ३ हट्टी, ४ अप्रिय भाषण करणें व ५ दुसऱ्याचें भलेंबुरें न जाणणें.

मूर्खस्य पंचचिह्नानि गर्वी दुर्वचनी तथा ।
हठी चाप्रियवादी च परोक्तं नैव मन्यते ॥ (सु.)

**पंचमूत्रें** — १ गाय, २ शेळी, ३ म्हैस, ४ मेंढी व ५ गाढव या पांच प्राण्यांचीं मूत्रें चेतनावर्धक औषधी आहेत.

गोजाविका महिषीणां मूत्रं गर्दभकस्य च ।
पंचमूत्रं कटूष्णस्य शोधनं वृष्यमीरितम् (शा. नि.)

**पंच मोक्षासनें** — १ पर्यंक, २ अर्धपर्यंक, ३ वज्र, ४ वीर आणि ५ सुखासन—पद्मासन पूर्वक-कायोत्सर्ग. (संस्कृतिकोश)

**पंचमृत्तिका** — १ विटकर, २ गेरू, ३ क्षार मृत्तिका, ४ भस्म आणि ५ वारुळाची माती. या पांचांना पंच मृत्तिका म्हणतात. व त्या पवित्र मानतात.

इष्टिका गैरुका लोणं भस्मवल्मीकमृत्तिका ।
रसप्रयोगकुशलैः कीर्तिताः पंचमृत्तिकाः ॥ (र. र. समुच्चय १०. ८३)

**पंच मोक्षसाधनें** — १ मुद्राधारण, २ त्रिपुंड्र, ३ विष्णुनाम ठेवणें, ४ विष्णुप्रिय माला धारण करणें व ५ 'ॐनमो नारायणाय' हा मंत्रोपदेश. हीं पांच मोक्षसाधनें रामानुज संप्रदायांत मानलीं आहेत.

**पंच यज्ञ** — १ स्नान, २ दान, ३ तप, ४ होम व ५ पितृयज्ञ (तर्पण) हे पांच यज्ञ नित्याचे होत

**पंच योग** — (अ) १ क्रियायोग, २ मंत्रयोग, ३ हठयोग, ४ नादयोग, आणि ५ राज्योग; (आ) १ मंत्रयोग; २ स्पर्शयोग, ३ भावयोग, ४ अभावयोग आणि ५ महायोग, (लिंग. अ. ८५)

**पंच रत्न** — १ रामरक्षा महत्त्व, २ पार्वती मंगल, ३ जानकी मंगल ४ वैराग्य संदीपनी आणि ५ बरवैरामायण. या श्री मत तुलसीदासाच्या प्रयास म्हणतात.

**पंच रत्नें** — (अ) १ माणिक, २ नील, ३ पाच, ४ पुष्कराज व ५ हिरा; (आ) १ सोनें, २ रुपें, ३ मोतीं, ४ माणिक आणि ५ पोवळें. हीं सर्व देवाना प्रिय अशीं पांच रत्नें (विष्णुधर्मोत्तर); (इ) १ इंद्रनीलमणी, २ हिरा, ३ माणिक, ४ मोतीं व ५ प्रवाळ.

नीलक वज्रक चेति पद्मरागश्च मौक्तिकम् ।
प्रवाल चेति विज्ञेय पचरत्न मनीषिभि. ॥ ( सु. )

**पंच रत्नें ( सौराष्ट्राचीं )** — १ नदी, २ नारी, ३ घोडे, ४ श्री. सोमनाथ आणि ५ द्वारका. ( हरिदर्शन ).

सौराष्ट्रे पचरत्नानि नदीनारीतुरगमा ।
चतुर्थ सोमनाथ च पञ्चम हरिदर्शनम् ॥ ( केसरी ११ ६ १९५१ )

**पंचरत्न गीता** — १ श्रीमगवद्गीता, २ विष्णुसहस्रनाम, ३ भीष्म स्तवराज, ४ अनुस्मृति व ५ गजेंद्रमोक्ष या पाच अध्यात्म ग्रथाचे समुच्चयाने.

**पंचरसा** — आवळ्याला संस्कृतमध्ये पचरस हे नाव आहे. हे अत्यत आरोग्यदायक असून यात पचरसाचें मिश्रण असते. यापासूनच आयुर्वेदातील दीर्घायुष्यदायक च्यवनप्राश हें औषध तयार करतात.

**पंचरसी** — १ सुवर्ण, २ रुप, ३ लोह, ४ तांबें व ५ जस्त. या पाच धातूंच्या मिश्रणान बनविलेली वस्तु

**पच राजचिह्नें** — १ छत्र, २ चामर, ३ सिंहासन, ४ मुकुट आणि ५ राजदंड.

**पच लवणें** — १ सामुद्र, २ सैंधव, ३ सचळ, ४ बिडलोण आणि ५ बागडखार.

**पंच लक्षणें ( अनन्य भजनाचीं )** — १ निरपेक्षता, २ ईशचिंतन, ३ शांति, ४ समदर्शन व ५ निर्वैर. ( ए. भा १४–१६२ ते १८५ )

**पंच लक्षणें (धश्चोटाचीं)** — १ सामान्य मनुष्याच्या दुपटीनें आहार, २ वेळा अवेळा झोपणे ३ अति विषयलंपट, ४ मान आणि ५ अपमान. या दोहाबद्दल सारखाच बेफिकीर.

आहार द्विगुण प्रोक्त शय्या च कुचमर्दनम् ।
नास्ति मानापमान च धश्चोट पचलक्षणम् ॥ ( सु )

**पच लक्षणें ( पुराणाचीं )** — १ सर्ग उत्पत्ति, २ प्रतिसर्ग संहार, ३ पुनरुत्पत्ति, ४ मन्वन्तर ( वेगवेगळ्या मनूच्या कालातील कथा ) आणि ५ वशानुचरित. ( सूर्यचंद्रवशीय राजाच्या कथा )

सर्गश्च प्रतिसर्गश्च वशो मन्वन्तराणि च ।
वशानुचरित चैव पुराण पचलक्षणम् ॥ ( सु. )

**पंच लक्षणें ( पुरुषाचीं )** — १ सत्पात्रीं त्याग, २ गुणाचा प्रेमी, ३ बंधुवर्गास समान भाग देणारा, ४ शास्त्र जाणणारा आणि ५ पराक्रमी

पात्रे त्यागी गुणे रागी संविभागी च बन्धुषु ।
शास्त्रे बोद्धा रणे योद्धा पुरुषः पंचलक्षणः ॥ ( सु. )

**पंच लक्षणें व्याख्यानाचीं** — १ पदाचा च्छेद करणें, २ अर्थ सांगणें, ३ समासाचा विग्रह करणें, ४ वाक्याची अन्वयद्वारा योजना करणें आणि ४ आक्षेपाचें समाधान.

" आक्षेपस्य समाधानं व्याख्यानं पंचलक्षणम् । " ( पंचदशी )

**पंच लक्षणें ( श्रेष्ठत्वाचीं )** — १ पैसा, २ कुल, ३ वय, ४ कर्तृत्व व ५ विद्या.

**पंच लक्षणें संतांचीं** — १ निष्काम, २ मननशील, ३ शमदमसंपन्न, ४ अद्वेष्टा व ५ समदृष्टि.

निरपेक्षं मुनिं शान्तं निर्वैरं समदर्शिनम् । ( भाग. ११ १४ १६ )

**पंच लहरी** — १ गंगालहरी, २ पीयूषलहरी, ३ सुधालहरी, ४ अमृतलहरी व ५ करुणालहरी. या जगन्नाथपंडितकृत पंचकाव्यांना म्हणतात. ( आपटे कोश )

(**पंच 'ल' कार संपन्न स्त्री भाग्यानेंच मिळते** — १ अनुकूल, २ निर्मल, ३ कुलीन, ४ कुशल आणि ५ सुशील.

अनुकूला विमलांगी कुलजा कुशला सुशीलसंपन्ना ।
पंच 'ल' कारा भार्या पुरुष पुण्यादयाल्लभते ॥ ( सु. ))

(**पंच लावण्यें स्त्रीजीवनांतील** — १ निद्रासौंदर्य, २ स्नानसौंदर्य, ३ मानसौंदर्य, ४ रागसौंदर्य आणि ५ अनुरागसौंदर्य हीं स्त्रीजीवनांतील पांच प्रकारचीं लावण्यें होत. )

**पंच वह्नि** — १ प्रल्यानल, २ विद्युदानल, ३ वडवानल, ४ शिवनेत्रानल व ५ द्वादशादित्यरूपानल असे पाच अग्नि. ( हस कोश )

**पंच वक्त्र-वदन** — शिवाचीं पाच मुखें १ सद्योजात २ तत्पुरुष, ३ अघोर, ४ वामदेव व ५ ईशान.

**पंच वल्कलें** — ( अ ) १ अश्वत्थ, २ अजीर ( न्यग्रोध ), ३ उंबर, ४ पिंपरी आणि ५ वेतस याच्या साली. याना पच वल्कलें म्हणतात, ( आ ) १ वड, २ उंबर, ३ पिंपळ, ४ पासेरस आणि ५ नादुरकी किंवा वेतस.

**पंच वर्ज्य नामें** — १ आत्मनाम, २ गुरुनाम, ३ कृपणनाम, ४ ज्येष्ठापत्यनाम व ५ पत्नीनाम. ज्याला पुष्कळ जगण्याची इच्छा असेल त्यानें या पाचास नावानें सबोधू नये. सौभाग्यवतीने पतीचें नाव घेऊ नये हें अनुमेय समजावें.

**पंच वज्रनिवारक** — १ सुमन्तु, २ वैशपायन, ३ पुलस्त्य, ४ पुलह आणि ५ जमिनी. ( प्रा. च. को )

**पंचवर्ण** — १ ताम्रडा वर्ण–रेडइंडियन्स, २ पादरा–युरोपियन, ३ काळा–शिद्दी, ४ पिवळा–चिनी-जपानी व ५ सावळा–भारतीय अशी पाच वर्णाची प्रजा जगात आहे. ( महाराष्ट्रात विनोबा. भाग २ रा )

**पच वाचा** — १ वैखरी, २ मध्यमा, ३ पश्यन्ती, ४ परा आणि ५ अनिर्वाच्या. ( सि जो. ३४ ३७ )

**पंच वार्तिक** — महानुभवावी व्याकरण ग्रथ. यात–१ सूत्रलक्षण, २ सूत्रप्रकृतिलक्षण, ३ सूत्रकारकलक्षण, ४ सूत्रव्याख्यानलक्षण व ५ सूत्रस्वरूप लक्षण. अशी पाच प्रकरणें असल्यामुळे म्हणतात. ( म शब्दकोश )

**पंच वाद्यें** — १ ततिवीणा, २ वितत, ३ मृदग, ४ घनकास्य व ५ अनाहत वेणुनाद. अशीं पाच वाद्यें आणि त्याचे नाद आहेत.

**पंच वानरशार्दूल** — १ ऋषभ, २ शरभ, ३ नीळ, ४ गवाक्ष व ५ गवय. हे पाच रामरावणयुद्धातील प्रमुख वानरवीर.

पांचही वीर सग्रामशीळ । ऋषभ शरभ आणि नीळ ।
गवाक्ष गवय अतिप्रबळ । वीरशार्दूल सग्रामीं ॥ (भा. रा. युद्ध २६ ३१)

**पचवायु** — १ श्वासवायु, २ गुरुत्ववायु, ३ स्थिरवायु, ४ चिन्मयवायु व ५ निवांतवायु. ( तत्त्व–निज–विवेक )

**पंचविनायक** — १ माद, २ प्रमोद, ३ दुर्मुख, ४ सुमुख आणि ५ गणनायक.

पूजा करा भावेंसी । मोदादि पचविनायका ॥ ( गुरु. च. ४१–१८४ )

**पचविषय** — १ रूप, २ रस, ३ गध, ४ स्पर्श आणि ५ शब्द. हे पच ज्ञानेंद्रियानें जाणले जाणारे पाच विषय होत.

**पंच विषय गीताशास्त्राचे** — ( अ ) १ ज्ञान, २ कर्म, ३ भक्ति, ४ योग आणि ५ सन्यास. ( आ ) १ ईश्वर, २ जीव, ३ जगत्, ४ धर्म आणि ५ तत्त्व.

" ईशो जीवो जगत् धर्मस्तत्त्वमिति पचविषया यत्र निर्णायते तच्छास्त्रम् "

**पंचविनय** — १ दर्शनविनय, २ ज्ञानविनय, ३ चारित्रविनय, ४ तपोविनय व ५ उपचारविनय ( रत्नकरंडक श्रावकाचार )

**पंचवीर** — १ त्यागवीर, २ दयावीर, ३ विद्यावीर, ४ पराक्रमवीर व ५ धर्मवीर अशी पाचहि प्रकारची वीरलासपन्न, वेदमर्यादापालन सरक्षण करणारे म्हणून मर्यादा पुरुषोत्तम श्रीरामचद्र होते. सत तुळसीदासानी " रामचरित मानसात " आणखी एक सहावा प्रकार ' ऋतुवीर ' म्हणून वर्णिला आहे.

पञ्चवीरा समाख्याता राम एव तु पञ्चधा ।
रघुवीर इति ख्यात सर्ववीरोपलक्षण ॥ ( सु )

**पच वीरागना** — १ कैकेयी, २ सयोगिता, ३ दुर्गावती, ४ कर्मदेवी आणि ५ झाशीची राणी लक्ष्मीबाई. ( कल्याण नारी अक )

**पचवृत्ति ( भूमिका )** — १ क्षिप्त, २ मूढ, ३ विक्षिप्त, ४ एकाग्र आणि ५ निरुद्ध ( मानसशास्त्र )

**पंच वृष्णीवीर** — १ श्रीकृष्ण, २ सकर्षण, ३ प्रद्युम्न, ४ अनिरुद्ध आणि ५ साब ( अशोक ते कालिदास )

**पंचव्रीहि** — १ तीळ, २ उडीद, ३ मूग, ४ सावे व ५ साळी. ही पांच व्रीहि ( धान्यें ) होत. हा सव अरिष्टाचा नाश करणारा धान्यगण म्हणून सांगितला आहे.

तिलाश्च माषामुद्गाश्च श्यामक शाल्य स्मृता ।
पञ्च धान्यगण प्रोक्त सर्वारिष्टनिषूदन ॥ ( म. म. ६–२८ )

**पंच व्यास** — १ वृहद्व्यास, २ देवव्यास, ३ मानवव्यास ४ द्वैपायनव्यास आणि ५ वेदव्यास.

**पंचविध चित्तवृत्ति** — १ प्रमाण, २ विकल्प, ३ विपर्यय, ४ निद्रा व ५ स्मृति ( योगशास्त्र )

**पंचविध दानें** — १ धर्ममूलक–निर्मत्सर बुद्धीनें देणें, २ अर्थमूलक–याचकाच्या तोंडून धन्योद्गार, ३ भयमूलक–पीडा देईल म्हणून, ४ काममूलक–परस्पर प्रेम जाणून, ५ करुणामूलक–दया म्हणून.

**पंचविध दृष्टान्त** — १ शुक्तिरजत न्याय–शिंपीच्या ठिकाणीं रुप्याचा आभास, २ रज्जुसर्प न्याय–रज्जूवर सर्पाचा आभास, ३ स्थाणुचोर न्याय–स्थाणु ( खोड ) त्याचे ठिकाणीं चोराचा भास, ४ खपुष्प न्याय–आकाशामध्यें पुष्पाचा किंवा नीलतेचा भास आणि ५ मृगजल न्याय–मध्याह्न समयीं मरुभूमीवर प्रतिबिंबित होणारा पाण्याचा आभास. असे जगन्मिथ्यात्वाविषयीं पंचविध दृष्टान्त आहेत.

**पंचविध प्रकार पारमार्थिक अनुभूतींचे** — १ श्रवण, २ स्पर्श, ३ दर्शन, ४ आस्वाद आणि ५ गंध ( रानडे चरित्र व तत्त्वज्ञान )

**पंचविध पांडित्य** — १ वक्तृत्व, २ कवित्व, ३ वादित्व, ४ आगमिकत्व व ५ सारस्वतप्रमाण ( वस्तुरत्नकोश )

**पंचविध ( प्रभुत्व )** — १ कुलप्रभुत्व, २ ज्ञानप्रभुत्व, ३ दानप्रभुत्व, ४ स्थानप्रभुत्व आणि ५ अभयप्रभुत्व असे मोठेपणाचे पांच प्रकार. ( वस्तुरत्नकोश )

**पंचविध लक्षणें ( समर्थ संप्रदायाचीं )** — १ शुद्ध उपासना, २ निर्मलज्ञान, ३ वीतराग, ४ ब्राह्मण्यरक्षण व ५ गुरुपरंपरा ( समर्थवाङ्मय )

**पंचविधलक्षणें साक्षात्कारी पुरुषाचीं** — १ मौन, २ नम्रता, ३ समता, ४ प्रपत्ति ( पूर्ण शरणागति ) व ५ परोपकार ( हिंदी संत परमार्थमार्ग )

**पंचविध सृष्टिविकास** — १ जडजीवन, २ वनस्पतिजीवन ३ प्राणिजीवन ४ मानवजीवन आणि ५ परमात्मजीवन ( अरविंददोहन भाग २ रा )

**पंचशिला** — १ नारद शिला, २ नृसिंह शिला, ३ वराह शिला, ४ गरुड शिला आणि ५ मार्कंडेय शिला. हीं पांच तीर्थे. त्या त्या तीर्थांच्या

ठिकाणीं अति अजस्र शिला बद्रीनाथास अलकनंदेच्या प्रवाहात आहेत. त्या ठिकाणीं ज्यांनी तपश्चर्या केली त्यांची नांवें दिली आहेत.

**पंच शिल्पकार** — १ सुतार, २ कोष्टी, ३ न्हावी, ४ धोबी व ५ चांभार.

> तक्षश्च तन्तुवायश्च नापितो रजकस्तथा ।
> पंचमश्चर्मकारश्च कारवः शिल्पिनो मताः ॥ ( सु )

**पंचशील ( भगवान् बुद्धाचे )** — १ स्वतः हिंसा करूं नये व दुसऱ्याला अनुमति देऊं नये, २ स्वतः चोरी करूं नये व दुसऱ्याकडून चोरी घडूं देऊं नये, ३ स्वतः व्यभिचार करूं नये व दुसऱ्याकडून तो घडूं देऊं नये, ४ खोटें कधी बोलूं नये व खोट्याला संमति देऊं नये व ५ स्वतः मद्यपान करूं नये व दुसऱ्याकडून घडूं देऊं नये.

**पंचशील ( आंतरधार्मिक )** — १ सर्व धर्मांसंबंधीं समान आदर, २ ज्ञानानें धर्मपरिवर्तन मान्य, पण छलबलानें निषिद्ध, ३ पूजास्थानांविषयीं समान आदर, ४ गतकालीन समाजानें केलेल्या पूजास्थानांच्या विध्वंसना संबंधीं आजच्या समाजाला उत्तरदायी धरूं नये. तसेंच त्या विध्वंसनाचें समर्थनहि करूं नये आणि ५ धार्मिक संघर्षप्रसंगीं परस्पर सहिष्णुतेच्या तत्त्वावर एकत्र विचारानें मार्ग काढणें ( केसरी १२।१०।१९५४ )

**पंचशील ( आंतरराष्ट्रीय )** — १ परस्परांच्या प्रादेशिक अभंगत्वा-बद्दल व सार्वभौमत्वाबद्दल आदर, २ अनाक्रमण, ३ एकमेकांच्या अंतर्गत कारभारांत हस्तक्षेप न करणें, ४ परस्पर समानता व ५ शांततापूर्ण सहजीवन. हें आंतरराष्ट्रीय पंचशील होय ( केसरी जून १९५५ )

**पंच शून्यें ( शून्य प्रकार )** — अधःशून्य–अकार, २ मध्यशून्य–उकार, ३ ऊर्ध्वशून्य–मकार, ४ चतुर्थशून्य–ॐ व ५ शुद्धचैतन्य–निःशून्य. "शुद्ध तें पांचवें शून्य । तें निःशून्य नांव" ( दासप्रबोध )

**पंचशौच** — १ मनःशौच, २ कर्मशौच, ३ कुलशौच, ४ शरीर शौच आणि ५ वाक्शौच. ( वृद्ध गौतमस्मृति )

**पंच 'स'कार** — ( अ ) १ सहिष्णुता, २ सेवा, ३ सन्मानदान, ४ स्वार्थत्याग व ५ समता, ( आ ) १ सत्संग, २ सदाचार, ३ संतोष, ४ सरलता व ५ सत्य.

**पंच सरस्वती** — सरस्वती नदी पाच ठिकाणीं असून प्रवाह गुप्त आहे असें म्हणतात — १रुद्रावर्त-हिमालयात, २ कुरुक्षेत्र, ३ श्रीस्थल-सिद्धपूर, ४ पुष्कर व ५ प्रयाग.

रुद्रावर्ते कुरुक्षेत्रे श्रीस्थले पुष्करेऽपि वा ।
प्रभासे पचमे तीर्थे पच प्राची सरस्वती ॥

प्रभासाजवळ प्राचीन सरस्वती आहे. (ऐति. गोष्टी भाग ३ रा.)

**पंच सरोवरें (पवित्र तीर्थें)** — १ नारायण सरोवर-कच्छ प्रांती, २ पुष्कर-अजमीर जवळ, ३ बिंदु सरोवर-सिद्धपूर, ४ पपा सरोवर-किष्किंधे जवळ आणि ५ मानस सरोवर-हिमालयात. (ऐति. गोष्टी भाग ३ रा)

**पंचसार** — १ तूप, २ मध, ३ तापविलेले दूध, ४ पिंपळी व ५ सर्डीसाखर. हे पाच पदार्थ एकत्र घुसळून तयार केलेले सार. हें हृद्रोग, श्वास व कास याचा नाश करित.

**पंचसम्राट्** — १ यौवनाश्व (माधाता) अजिंक्य-लोकाना जिंकल्यामुळें, २ भगीरथ-प्रजापालनामुळें, ३ कार्तवीर्य-तप प्रभावानें, ४ भरत-सामर्थ्यसपन्नतेमुळें आणि ५ मरुत्-प्रजेची भरभराट करून. या पाचानी सम्राट् ही पदवी मिळविली. (म. भा. सभा. १५-१६)

**पंच सिद्धौषधी** — १ बचनाग, २ पाढरा भुइकोहळा, ३ गोड कन्द, ४ रुद्रवती (रानहरभरे) आणि ५ सर्पाक्षी (थोर मुगुसवेल).

तैलकन्द सुधाकन्द क्रोडकन्दारुदतिका ।
सर्पनेत्रयुता पञ्च सिद्धौषधिकसंज्ञका. ॥ (रा. नि.)

**पंचसिद्धि** — १ जन्मसिद्धि, २ औषधिसिद्धि, ३ मंत्रसिद्धि, ४ तप सिद्धि आणि ५ समाधिसिद्धि. (पातञ्जल योगसूत्र)

**पंचसिद्धान्तिका** — वराहमिहिरकृत एक ज्योतिषग्रंथ. यात १ रोमक सिद्धान्त, २ पैतामह, ३ वासिष्ठ, ४ पौलिश आणि ५ सौर सिद्धान्त. अशा ज्योतिषातील पाच पुरातन ज्योतिष सिद्धान्ताच विवरण असल्यामुळें त्यास पचसिद्धान्तिका म्हणतात.

**पच सुगंध** — १ कापूर, २ कंकोळ, ३ लवग, ४ सुपारी व ५ जायफळ. हे पाच पदार्थ समभाग विड्यात घातले असता उत्तम सुगध तयार होतो. त्यास पच सुगध म्हणतात.

**पंच सूक्तें** — १ पुरुषसूक्त, २ देवीसूक्त, ३ सूर्यसूक्त, ४ पर्जन्यसूक्त व ५ श्रीसूक्त.

**पंचसूत्री (संसारोपयोगी)** — १ विचार करून बाजारासाठीं बाहेर पडा, २ भेटीस गेल्यावेळीं दोन शब्द कमी बोला, ३ सौंदर्य मावळत जातें पण गुणविकास होतो, ४ डोळे उघडे ठेवा, कानाचा नीट उपयोग करा, जीभ जपून वापरा व ५ आधीं गरजा व मग सोई आणि नतर चैनी. (कण आणि क्षण)

**पंचसूत्री (स्वास्थ्यसंरक्षणाची)** — १ आहार, व्यायाम व मैथुन नियमित, २ निर्व्यसनता, ३ नित्य सुखानें ७ ८ तास झोंप, ४ मच्छरदाणी वापरणें व ५ सुशील सुग्रण व हसतमुख पत्नी असणें. (ज. नानासाहेब शिंदे)

**पंच सूत्रें (ग्रंथालय शास्त्र)** — १ ग्रंथ अध्ययनाकरिता आहेत, २ ते सर्वांकरिता आहेत, ३ प्रत्येक ग्रंथाला वाचक असतोच, ४ अभ्यासकाचा वेळ वाचवा आणि ५ ग्रंथालय सारख वाढतें असावें.

(ग्रंथालय शास्त्राची पंचसूत्र)

**पंच सूत्रें (वेदविहित) शाश्वत सुख प्राप्त करून देणारीं** — १ यज्ञ, २ दान, ३ तप, ४ धर्म आणि ५ स्वाध्याय.

(In Search of Happiness)

**पंच सूत्रें व त्यांचे कर्ते** — १ ब्रह्मसूत्र वेदव्यास, २ कर्मसूत्रें-जैमिनि, ३ भक्तिसूत्र नारद, ४ योगसूत्रें पतंजलि व ५ तंत्रसूत्रें परशुराम. (नाम चिंतामणि)

**पंचसूना दोष** — १ झाडसारवण, २ कांडणें, ३ चूल पेटविणे, ४ दळणें, वाटणें व ५ पाणी भरणें. एतन्मूलक हत्या-सूक्ष्म जीवांची हिंसा मनुष्याच्या हातून नकळत नित्य घडत असते. (मनु ३ ६८)

**पंच संस्कार (मुस्लिमांचे)** — १ जातकर्म, २ सुंता, ३ बिस्मिल्ला (श्रीगणेशा), ४ विवाह आणि ५ अंत्यसंस्कार (मु. सण आणि संस्कार)

**पंच संस्कार (वैष्णवांचे)** — १ तप्तमुद्रा, २ ऊर्ध्वपुंड्र, ३ नाम, ४ मंत्र व ५ याग.

ताप पुण्ड्रं तथा नाम मन्त्रो यागश्च पञ्चमः ।
अमी पञ्च च संस्काराः पारमैकान्त्यहेतवः ॥ (भारद्वाज संहिता)

(**पंच स्नान** — १ पाण्यात दोन बोटें भिजवून मस्तकावर शिपडणें, २ ३ दोही डोळ्याना स्पर्श, ४ ५ त्याच बेबाचा दोन्ही कर्णमूळाना स्पर्श. हें पचस्नान. ( हिमप्रदेशातील एकस्नान प्रकार–जीवनलीला ) )

**पंच स्नानें** — १ आग्नेय, २ वारुण, ३ ब्राह्म, ४ वायव्य आणि ५ दिव्य–( पराशर स्मृति १२ ९ )

**पंच स्कंध ( भाग ) मनुष्य शरीराचे** — १ जडत्व, २ सज्ञा, ३ वेदना, ४ सस्कार व ५ विज्ञान.

मनुष्य प्राण्याचें ठायीं । पच स्कद असती पाही ।
ज्यावाचून अस्तित्व नाही । मनुष्य देहाकारणें ॥ शकराचार्य चरितामृत २–१२६

**पंच हत्या** — १ भ्रूणहत्त्या, २ वीरहत्त्या, ३ स्त्रीहत्या, ४ बाल्हत्त्या व ५ आत्महत्त्या या पाचहि हत्त्या म्हणजे महान् पापें होत.

**पंच क्षार** — १ टाकणखार, २ सज्जीखार, ३ जवखार, ४ बागडखार आणि ५ सोराखार ( चि. प्र. )

**पंच क्षीरवट** — १ वड (न्यग्रोध), २ औदुंबर, ३ अश्वत्थ, ४ पारसपिंपळ व ५ पिंपरी ( प्लक्ष ). हे पाच चीक असलेले वृक्ष होत. ( नूतनामृत सागर )

**पंच क्षुद्रसिद्धि** — १ त्रिकाळ ज्ञान, २ शीतोष्णादि द्वद्वावर सत्ता, ३ दुसऱ्याचें मन जाणणे, ४ अग्नि—सूर्य–उष्ण–जल–विष इत्यादींचें स्तमन ( परिणाम थाबविणे ) आणि ५ अजिंक्यता. ( भाग. स्कध ११ अ १५ )

**पचज्ञानी** — १ श्रीकृष्ण, २ शुकाचार्य, ३ जनक, ४ श्रीरामचद्र आणि ५ वसिष्ठ.

कृष्णो योगी शुकस्त्यागी राजानौ जनकराघवौ ।
वसिष्ठ कर्मकर्ता च पञ्चैते ज्ञानिन स्मृता ॥ ( जीवन्मुक्तिविवेक )

**पंच ज्ञानें ( जैनधर्म )** — १ मतिज्ञान, २ श्रुतिज्ञान, ३ अवधिज्ञान, ४ मन पर्यय ज्ञान, व ५ केवलज्ञान.

**पंचज्ञानेंद्रियें व त्याच्या अधिष्ठात्री देवता** — १ श्रोत्र ( कान )–दिशा, २ त्वचा ( कातडी )–वायु, ३ डोळे–सूर्य, ४ जिव्हा–वरुण आणि ५ नासिक ( नाक )—अश्विनीदेव ( भास्कराचार्य )

" श्रोत्र चक्षु स्पर्शन च रसन घ्राणमेवच " ( भ. गी. १५–९ )

**पंचम स्वर** — १ नाभि, २ छाती, ३ हृदय, ४ कंठ व ५ मूर्धा. या शरिराच्या पाच स्थानांच्या वायूपासून निघालेला स्वर

**पंचामरा** — १ दूर्वा, २ भांग, ३ वेल, ४ निगुडी व ५ तुळस. ह्या पाच पवित्र वनस्पति. ( वज्रकोश )

**पंचामृत** — ( अ ) १ गाईचें दूध, २ दही, ३ तूप, ४ मध व ५ साखर. *या पाच अमृततुल्य पदार्थांना पंचामृत म्हणतात. यानें देवमूर्तीला अभिषेक करतात.* ( आ ) १ गुळ, २ मुसळी, ३ गुळवेल, ४ शतावरी आणि ५ गोखरू. हें औषधी पंचामृत अथवा वनस्पति पंचामृत ( शा. नि ), ( इ ) १ चिंच, २ गूळ, ३ सुंठ, ४ मिरची व ५ तीळ. *या पांच पदार्थांच्या मिश्रणानें* केलेला पदार्थ ( भोजनांतील ), ( ई ) १ नारळ, २ आंबा, ३ फणस व ४ केळीं या चारापैकीं कोणतीहि तीन व ४ साखर व ५ मध या पांचांचें एक पंचामृत प्राचीनकालीं करीत असत.

नालिकेराम्रपनसकदलीनां फलत्रयम् ।
शर्करा मधुसंयुक्तं पञ्चामृतमितीरितम् ॥ ( गौ. गृह्यसूत्र )

**पंचामृतयूष** — १ कुळीथ, २ मूग, ३ तूर, ४ उडीद आणि ५ राजशिवी या पांच धान्यांचें कढण.

**पंचायतीचे पाच गुण** — पांच सदस्य असलेल्या समितीस पंचायत म्हणतात. या सदस्यांचे अंगी १ प्रेम, २ निर्भयता, ३ ज्ञान, ४ उद्योग व ५ स्वच्छता हे पांचगुण अभिप्रेत आहेत किंवा असावेत असें मानलें आहे. ( आ. मंदिर ऑगस्ट १९६२ )

**पंचायतन** — १ शिव, २ विष्णु, ३ सूर्य, ४ गणपति व ५ देवी. या पांच देवतांचा समुदाय. या पांचांपैकी प्रत्येक देवतेस प्राधान्य देऊन शिव, विष्णु इ. चीं पांच पंचायतनें मानण्याची प्रथा आहे.

आदित्यं गगनाथं च देवीं रुद्रं च केशवम् ।
पञ्चदैवतमित्युक्तं सर्वकार्येषु पूजयेत् ॥ ( स्मृ. )

या पंचायतनकल्पनेचा उगम श्रीशंकराचार्यांच्या कालापासून झाला व ती त्यांस पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या सृष्टींतल्या पंचतत्वांवरून सुचली म्हणतात.

**पंचारति** — १ दीप, २ कमल, ३ वस्त्र, ४ आम्रफल व ५ सुपारी. हीं एकत्रपणें ओवाळणें.

**पंचावयव** — १ प्रतिज्ञा-या पर्वतावर अग्नि आहे, २ हेतु-कारण तेथें धूर आहे, ३ उदाहरण धूर असतो तेथें अग्नि असतो. जसें स्वयपाक घर, ४ उपनय या पर्वतावर अग्नीस कधींहि सोडून न राहणारा धूर आहे आणि ५ निगमन-म्हणून या पर्वतावर अग्नि आहे. हे वाक्याचे पांच अवयव अथवा सिद्धान्ताचे भाग न्यायशास्त्रात सांगितले आहेत.

**पंचाक्षरी मंत्र** — (अ) 'नमः शिवाय'. १ नकार-पृथ्वीतत्त्व, २ मकार-उदकतत्त्व, ३ शिकार-अग्नितत्त्व, ४ वकार-वायुतत्त्व आणि ५ यकार-आकाशतत्त्व. हीं पाच बीजाक्षरें पाच तत्त्वें आहेत. (बी. प्र. अ. ८); (आ) 'ॐ नमः सिद्धं' हा वाक्प्रचार जैन मताचा आहे. याचा अर्थ सिद्धांस नमस्कार. याचेंच मराठी अपभ्रष्ट रूप म्हणजे ओ-ना-मा-सी-ध असें आहे.

**पंचाक्षरी यमक** — आर्येच्या प्रत्येक चरणात पाच अक्षरांचें यमक (समान अक्षरांची पुनरावृत्ति) साधलें आहे असें. उदा०—

> गाधारि म्हणे तज्जय का ? त्या आहेत काय चा ? सिंग ?
> कीर्तिवर म्हणुनि विधिनें बाधियलीं त्यासि काय बासिंग ? ॥
>
> (मो. आ. उद्योग ५-५०)

**पंचोपचार** — (अ) १ गंध, २ पुष्प, ३ धूप, ४ दीप, ५ नैवेद्य हे पंचोपचार होत. या पंचोपचारांनीं केलेल्या देवपूजेस पंचोपचार पूजा म्हणतात; (आ) १ ध्यान, २ आवाहन, ४ नैवेद्य, ४ नीरांजन व ५ नमस्कार. (बागालि)

**पांच अंगें (आन्तरपूजनाचीं)** — १ जप, २ होम, ३ तर्पण, ४ मार्जन आणि ६ अन्नमतर्पण.

**पांच अंगें (बाह्य पूजनाचीं)** — १ पटल, २ पद्धति, ३ वर्म, ४ स्तोत्र आणि ५ नमस्कार. (कल्याण शक्ति अंक)

**पांच अंगें (राजनीतीचीं)** — १ कार्यारंभ, २ माणसें आणि द्रव्य यांचा पुरवठा, ३ देशकालाची अनुकूलता, ४ संकटाचा प्रतिकार व ५ कार्य-सिद्धि. (स. को.)

**पाच अगें ( विवाहाचीं )** — १ वाग्दान, २ प्रदान-वधूला वस्त्रालंकार देणे, ३ वरण-लग्नास सर्वांनीं संमति देणें, ४ पाणिपीडन-वरानें वधूचा पाणि ग्रहण करणें आणि ५ सप्तपदी ( जैनधर्म )

**पाच अगें ( वेदाचीं )** — १ विधि, २ अर्थवाद, ३ मंत्र, ४ स्मृति व ५ नामधेय अशीं पाच अगें

**पाच अवयव ( शास्त्राचे )** — १ विषय, २ सदेह, ३ सगति, ४ पूर्व पक्ष आणि ५ सिद्धांत.

**पाच अवस्था ( चित्ताच्या )** — १ क्षिप्त, २ मूढ, ३ विक्षिप्त, ४ एकाग्र व ५ निरुद्ध ( योगशास्त्र )

**पाच अवस्था ( जीवाच्या )** — १ जाग्रत्, २ स्वप्न, ३ सुषुप्ति ४ मूर्च्छा व ५ मरण ( भारतीय दर्शन सग्रह )

**पाच अवस्था परमात्म्याचा साक्षात्कार होण्याच्या** — १ अज्ञानावस्था, २ भोगावस्था, ३ त्यागावस्था, ४ मुक्तावस्था व ५ स्वरूपा वस्था ( अथर्व-अनु. मराठी )

**पाच अवस्था ( मनुष्यजीवनाच्या )** — ( अ ) १ कौमार, २ पौगंड, ३ कैशोर, ४ यौवन आणि ५ वार्धक्य ( आ ) १ पुत्र, २ बधु, ३ पति, ४ पिता आणि ५ पितामह

**पाच अवस्था ( स्त्रीजीवनाच्या )** — १ कन्या, २ भगिनी, ३ पत्नी, ४ माता आणि ५ पितामही

**पाच आचार्य ( वैदिक धर्माचे )** — १ श्रीशंकराचार्य, २ श्रीरामा नुजाचार्य, ३ श्रीनिंबार्क, ४ श्रीमध्वाचार्य व ५ श्रीवल्लभाचार्य

जगद्गुरुनीं अध्यात्म कथिलें । यानी उपासनेला जीवविलें ।
एवच पाचानींही केलें । वैदिक धर्माचें सरक्षण ॥

( शंकराचार्य च ३७ २०० )

**पाच आशास्थानें मानवाचीं** — १ जीवित, २ कांता, ३ अपत्य, ४ मानसन्मान आणि ५ संपत्ति

**पाच आध्यात्मिक भावना** — १ आश्चर्य २ आनंद, ३ आनंद, ४ प्रीति आणि ५ आदर. ( म. गी सा दर्शन )

**पांच आयुष्यवर्धनास उपाय** — १ भूमीवर शय्या, २ दोन वेळा जेवण, ३ सहा वेळा लघुशंका, ४ तीन वेळा शौचास जाणे आणि ५ स्त्रीसंग अल्प प्रमाणात.

**पांच आज्ञा ( श्रीकृष्णाच्या )** —

१. उद्धरेदात्मनात्मानम्-आपण होऊन आपला उद्धार करावा.
२. आत्मैव ह्यात्मनो बंधुः आपणच आपला बंधु किंवा आपणच आपला शत्रु;
३. कर्मण्येवाधिकारस्ते-कर्म करण्यापुरताच तुझा अधिकार आहे;
४. स्वधर्मे निधनं श्रेयः-स्वधर्माप्रमाणें मरण आले तरी त्यात कल्याण आहे;
५. श्रद्धामयोऽयं पुरुषः-मनुष्य हा श्रद्धामय आहे. ( भ. गी. )

**पांच आज्ञा ( बुद्धाच्या )** — १ अहिंसा, २ सत्य, ३ अस्तेय, ४ अव्यभिचार आणि ५ अपेयपान न करणें.

**पाच आज्ञा ( वैदिक धर्माच्या )** — १ यज्ञ, २ दान, ३ तप, ४ कर्म आणि ५ स्वाध्याय.

**पाच आज्ञा ( महंमदाच्या )** — १ शुचित्व, २ निराहार, ३ दान, ४ उपासना व ५ तीर्थयात्रा.

**पांच कन्नड महाकवि** — १ पंपा, २ रन्न, ३ पोन्न, ४ नागवर्म आणि ५ चामुंडराय.

**पांच कन्नड महाकाव्यें** — १ पंपभारत, २ आदि पुराण, ३ शांति पुराण, ४ गदायुद्ध आणि ५ कर्नाटक कादंबरी.

**पाच कर्तव्यें राजाचीं ( राजशास्त्रांची )** — १ दुष्टांना दंड, २ सज्जनाचा परामर्श, ३ न्यायानें कोश समृद्धि, ४ धनिकाविषयीं निःपक्षपात आणि ५ राष्ट्राचें संरक्षण.

दुष्टस्य दंडः सुजनस्य पूजा । न्यायेन कोशस्य च संप्रवृद्धिः ।
अपक्षपातोऽर्थिषु राष्ट्ररक्षा । पञ्चैव यज्ञाः कथिता नृपाणाम् ॥ ( अत्रिसंहिता )

**पाच कल्प ( भाग ) अथर्ववेदाचे** — १ नक्षत्र कल्प, २ वेदकल्प, ३ संहिता कल्प, ४ आंगिरस कल्प व ५ शांति कल्प. ( विष्णु अ० ३ १४ )

**पांच कार्यें ईशसत्तेचीं (जगत्संबंधीं)** — १ सृष्टि पृथ्वीतत्त्व, २ स्थिति अथवा पालन-जलतत्त्व, ३ संहार-अग्नितत्त्व, ४ तिरोभाव वायुतत्त्व आणि ५ अनुग्रह आकाशतत्त्व. (शिव. पु. विश्वेश्वर सं. अ. १०)

**पांच कार्यक्षेत्रें (जीवात्म्याचीं)** — १ कर्मेंद्रियें, २ ज्ञानेंद्रियें, ३ मन, ४ चित्त आणि ५ बुद्धि (अथर्व-अनु मराठी)

**पांच कारणें (स्वकर्माच्या सिद्धीस आवश्यक)** — १ अधिष्ठान (क्षेत्र), २ कर्ता, ३ साधन, ४ प्रयत्न आणि ५ दैव. (भ. गी. १८. १४)

**पांच कायिक दोष** — १ एखाद्याला पीडा–मारपीट करणें, २ व्यभिचार, ३ एखाद्याची वस्तु चोरुन घेणें, ४ उगीच ताठ्यानें चालणें आणि अपवित्र राहणें, व ५ व्यर्थ कुचेष्टा करणें.

**पांच कृत्यें परमेश्वरी सत्तेचीं** — १ सृष्टि, २ स्थिति, ३ संहार, ४ अनुग्रह आणि ५ निलय. (श्रीशैवागम आणि ज्ञानेश्वर)

**पांच गीतेचे प्रधान भाष्यकार** — १ श्रीशंकराचार्य, २ श्रीरामानुजाचार्य, ३ श्रीमध्वाचार्य, ४ श्रीवल्लभाचार्य आणि ५ श्रीज्ञानेश्वरमहाराज. सहावे लो. टिळक होत.

**पाच गुजराती संत कवि** — १ नरसीमेहता, २ मीराबाई, ३ प्रेमानंद, ४ अखोभगत व ५ दयाराम. (गुजरात) (आ) १ मीराबाई, २ नरसी मेहता, ३ मालन, ४ भीम व ५ पद्मनाभ. (म. ज्ञा. को. वि.१२)

**पांच गुण कवीच्या अंगीं असावेत** — १ ज्ञानदशा, २ मनीषी-मन आधीन असलेला, ३ परिभूः सर्वांना व्यापून असणारा, ४ स्वयम्भूः-स्वतन्त्रवृत्ति व ५. शाश्वतकाल पुरेल इतकी सामग्री यथायोग्यपणे मिळविलेला असा.

> कविर्मनीषी परिभूः स्वयम्भूर्याथातथ्यतः ।
> अर्थान् व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ॥ (ईशावास्योपनिषद्)

**पांच गुण चित्राचे** — १ रेखामाधुर्य, २ प्रमाण, ३ सादृश्य, ४ पार्श्वभूमीची सजावट व ५ सजीवपणा. (कला–कलातत्र आल्हाद.)

**पांच गुण दानासंबंधीं** — १ सहानुभूति उत्पन्न होणें, २ सद्गदित होणें ३ आदर, ४ प्रिय भाषण व ५. दिल्यानंतर समाधान वाटणें.

> आनंदाश्रूणि रोमाणि बहुमानं प्रियं वचः ।
> किञ्चानुमोदनं दानं दानभूषणपंचकम् ॥ (दानशासनम्)

**पाच गुण नाटकाचे** — १ कथानक–देशकालानुरूप, २ मविधानक–मनहार, ३ पात्रानुरूप भाषा, ४ अतिदीर्घ वा अतिर्हस्व असू नये आणि ५ नानारसात्मक असून बोधप्रद (रंगभूमि)

**पाच गुण परमार्थाला आवश्यक** — १ क्षमा, २ दया, ३ शांति, ४ तितिक्षा आणि ५ उपरति

**पाच गुण बुद्धीचे** — १ निद्राजय, २ सुनिश्चितता, ३ चित्तनिरोधाचे सामर्थ्य, ४ संशय आणि ५ निश्चित स्वरूपाचे ज्ञान (म भा शांति अ २५७)

**पाच गुण कावळ्यापासून शिकावेत** — १ गुप्त रीतीनें संभोग, २ धैर्य ३ समयाच्या ठायीं संग्रह करणें, ४ सावधानपणा व ५ कोणाचाहि विश्वास न धरणें (वृ चा ६ १०)

**पाच गुण (ब्राह्मण्याचे)** — १ सत्य, २ दया, ३ इंद्रियदमन, ४ परोपकार व ५ तपाचरण

**पाच गुण लिपीस आवश्यक** — १ निश्चितता (उच्चारासंबंधी), २ उपयोगिता, ३ सरलता, ४ सौंदर्य व ५ लेखनसुलभता

**पाच गुरु (अभ्युदयेच्छू पुरुषाचे)** — १ पिता २ माता, ३ अग्नि ४ आत्मा आणि ५ गुरु (म भा वन २१४ २८)

**पाच गुरु (स्त्रियांचे)** — १ माता २ पिता, ३ सासू, ४ सासरा व ५ पति

**पाच गोष्टी अकीर्तिकर** — १ परान्न २ दुसऱ्याचे वस्त्र, ३ परशय्या, ४ परस्त्री आणि ५ परगृहवास

परान्नं परवस्त्रं च परशय्या परास्त्रियः ।
परवेश्मनि वासश्च शक्रस्यापि श्रियं हरेत् ॥ (सु.)

**पाच गोष्टी अग्निविना जाळणाऱ्या** — १ भार्या वियोग २ स्वजनापवाद ३ ऋणशेष, ४ कृपणाची सेवा व ५ दारिद्र्य आल्यावेळीं स्वजनांचें दर्शन

**पाच गोष्टी अक्षय्यनिधीच होत** — १ शील, २ शौर्य, ३ आळसराहित्य, ४ विद्वत्ता व ५ मित्रसंग्रह यांना चोरीचे भय नाहीं

शील शौर्यमनालस्य पांडित्यं मित्रसंग्रहम् ।
अचोरहरणीयानि पञ्चैतान्यक्षया निधि ॥ ( सु. )

**पाच गोष्टी आयुष्यनाशक** — १ सायंकाळचें उन्ह, २ प्रेताचा धूर, ३ वृद्ध स्त्रीसंग, ४ साचलेलें पाणी व ५ नित्य रात्रीं दहीं खाणें.

वृद्धार्कः प्रेतधूमश्च वृद्धा स्त्री पिल्लरोदकम् ।
आयुष्यनाशकं नित्यं रात्रौ दध्यन्नभोजनम् ॥ ( सु. )

**पाच गोष्टी आयुष्यवर्धक** — १ प्रातःकाळचें उन्ह, २ यज्ञधूम, ३ तरुण स्त्री, ४ झऱ्याचें पाणी व ५ रात्रीं दूध पिणें

बालार्को यज्ञधूमश्च बाला स्त्री निर्झरोदकम् ।
आयुष्यवर्धकं नित्यं रात्रौ क्षीरान्नभोजनम् ॥ ( सु. )

**पाच गोष्टी आदर्श समाजास आवश्यक** — १ स्वच्छता, २ टापटीप, ३ व्यवस्था, ४ दक्षता आणि ५ सौंदर्यदृष्टि

**पाच गोष्टी कर्मानें घडतात** — १ उत्पत्ति, २ नाश, ३ प्राप्ति, ४ विकार आणि ५ संस्कार.

**पाच गोष्टी ग्रंथनिर्मितीस आवश्यक** — १ अवलोकन, २ मनन, ३ अभ्यास, ४ ऊर्मि, आणि ५ अलिप्तता ( संयम )

**पाच गोष्टी चतुरस्त्रतेस आवश्यक** — १ देशाटन, २ गुणीविद्वत्समागम, ३ वारांगना-कलावंताचा सहवास, ४ सभेत मान मिळवणें व तो टिकविणें आणि ५ शास्त्ररहस्य जाणणें

" अनेकशास्त्रार्थविलोकनं च चातुर्यमूलानि पंच " ( सु )

**पाच गोष्टी जाणल्याविना मंत्राची सफलता नाहीं** — १ ब्राह्मण, २ विनियोग, ३ छंद, ४ ऋषि व ५ देवता

ब्राह्मणं विनियोगं च छंद आर्षं च दैवतम् ।
अज्ञात्वा पंच या मन्त्रे न स तत्फलमश्नुते ॥ ( व्यास )

**पाच जीवनमूल्यें** — १ शुचि, २ बुद्धि, ३ भावना, ४ शांति व ५ आत्मसुख व्यक्तीच्या वा समाजाच्या जीवनांतील पांच सर्वोत्तम मूल्य ( गीताइ चिंतनिका )

**पाच गोष्टी नसतील तेथें वसति करूं नये** — (अ) उपजीविकेचें साधन २ अभय, ३ लज्जा, ४ दाक्षिण्य आणि ५ दानशीलता.

लोकयात्रा भय लज्जा दाक्षिण्य दानशीलता ।
पञ्च यत्र न विद्यन्ते न तत्र दिवस वसेत् ॥ (गरुड ११० २७)

(आ) १ धनिक, २ श्रोत्रिय ब्राह्मण, ३ शासनाधिकारी, ४ नदी व ५ वैद्य.

धनिक श्रोत्रियो राजा नदी वैद्यस्तु पचम ।
पच यत्र न विद्यन्ते न तत्र दिवस वसेत् ॥ (नृ. चा)

**पांच गोष्टि न्यायाधीशास आवश्यक** — १ प्रामाणिकपणा २ उद्यम प्रियता, ३ धैर्य, ४ सभ्यता व ५ कायद्याचे ज्ञान (न्यायाधीशाचे अतरग)

**पाच गोष्टी भाषणात समाविष्ट असाव्यात** — १ सौक्ष्म्य–अनेकार्थ संभव, २ साख्य–गुणदोषपरिगणन, ३ क्रम–अनुक्रम, ४ निर्णय–सिद्धाताचा –पुनरुच्चार व ५ प्रयोजन. (म. भा. शाति अ ३२०)

**पाच गोष्टी शोभून दिसतात** — १ अशक्ताची क्रीडा, २ प्रियेचा रुसवा, ३ समर्थाची क्षमा, ४ जाणत्याचें बोलणें व ५ अजाणत्याचें मौन. (सार्थ गाथासप्तशती)

**पाच गोष्टी श्रवणास आवश्यक** — १ आस्था, २ शरीरस्वास्थ्य, ३ प्रज्ञा, ४ गुरूपदिष्ट प्रकाश व ५ अतर्निष्ठ धारणा (हरिवरदा १–७४.)

(**पाच गोष्टी परमेश्वरी सत्तेच्या** — १ (कियामत दिन) शेवटच्या न्यायाचा दिवस, २ परमेश्वरच पाऊस पाडतो, ३ गर्भाशयात काय असतें हें परमेश्वरालाच माहीत असतें, ४ उद्याची प्राप्ति किती हें परमेश्वरालाच माहीत असतें आणि ५ कोणाचा अत कोठें होणार ह त्यालाच माहीत असतें. (कुराण २१ ३२))

**पाच गोष्टी पूर्वपुण्याईनें प्राप्त होणाऱ्या** — १ यश, २ पुण्य, ३ कलत्र, ४ पुत्र आणि ५ धन.

**पाच गोष्टी प्रकट करूं नयेत** — १ संपत्तिनाश, २ मनस्ताप, ३ गृहछिद्रें, ४ स्वतःची फसगत आणि ५ अपमान. या पाच गोष्टींची वाच्यता करू नये.

अर्थनाशं मनस्तापं गृहे दुश्चरितानि च ।
वञ्चनं चापमानं च मतिमान् न प्रकाशयेत् ॥ (कौटिल्य)

**पांच गोष्टी प्राणी गर्भात असतानाच ठरलेल्या असतात** — १ आयुष्य, २ कर्म, ३ धन, ४ विद्या आणि ५ मरण. (वृ. चा. १३-४)

**पाच गोष्टीमुळे राष्ट्राची अभिवृद्धि होते** — १ न्यायालय, २ मखाम, ३ धर्मसंरक्षण, ४ योग्य वेळीं योग्य विचार करणे आणि ५ सुखी जीवन.

रक्षाविस्रण युद्ध तथा धर्मानुशासनम् ।
मन्त्रचिन्ता सुखं काले पंचभिर्वर्धते मही ॥ (म. भा. शांति ९३-२६)

**पांच गोष्टी विद्याप्राप्तीस बाधक** — १ अभिमान, २ क्रोध, ३ प्रमाद, ४ रोग आणि ५ आळस (उत्तराध्ययन सूत्र अ. ११)

**पांच गोष्टी संध्याकाळीं निषिद्ध** — १ भोजन, २ मैथुन, ३ निद्रा, ४ *वेदपठण आणि ५ मार्गक्रमण (प्रवास)*.

एतानि पञ्च कर्माणि सन्ध्यायां वर्जयेद्बुधः ।
आहारं मैथुनं निद्रां सपाठं गतिमध्वनि ॥ (नि. र.)

**पांच गोष्टी सार्वजनिक उपयोगाच्या** — १ विहीर, २ तळें, ३ सरोवर, ४ देवालय आणि ५ झाड.

वापीकूपतडागानां देवालयकुजन्मनाम् ।
उत्सर्गात्परतः स्वाम्य मपि कर्तुं न शक्यते ॥ (पञ्चतन्त्र)

**पांच गोष्टी हळूहळू कराव्या** — १ *विद्या*, २ *द्रव्यप्राप्ति*, ३ *गिर्यारोहण*, ४ *विषयसेवन आणि* ५ *धर्म*.

शनैर्विद्या शनैरर्थाः शनैः पर्वतमारुहेत् ।
शनैः कामं च धर्मं च पञ्चैतानि शनैः शनैः ॥ (ग. पु. १०९ ४६)

**पांच घटक (राष्ट्राचे)** — १ देश, २ वेष, ३ धर्म, ४ संस्कृति आणि ५ भाषा.

**पाच तत्त्वें आयुर्वेद चिकित्सेचीं** — १ गुण, २ रस, ३ वीर्य, ४ *विपाक व ५ प्रभाव. ही औषधामधली पाच तत्त्वें आयुर्वेद मानतो.*

**पाच तत्त्वें (औषधींच्या परीक्षेचीं)** — १ गुण, २ रस, ३ वीर्य, ४ विपाक व ५ प्रभाव.

**पाच तत्त्वज्ञानें ( भारतकालीन )** — १ सांख्य, २ योग, ३ पाशुपत, ४ वेदान्त आणि ५ पांचरात्र हीं भिन्नभिन्न पाच तत्त्वज्ञानें भारतकाली प्रचलित होतीं ( म भा शांति, अ ३८९ )

**पाच तामिळ महाकाव्यें** — १ जीवन चिंतामणि ( तिरुतक्कदवर ), २ सिलप्पदिकारम्, ३ मणिमखले, ४ वल्याणद आणि ५ कुल्कसी

**पाँच तामिळ लघुकाव्यें** — १ यशोधरकाव्य, २ चूडामणि, ३ उदयनकथै, ४ नागकुमारकाव्य आणि ५ नीलकेशी

**पाच देवतरु ( वृक्ष )** — १ मंदार, २ पारिजातक, ३ संतान, ४ कल्पवृक्ष आणि ५ हरिचंदन

पंचैते देवतरवो मंदारः पारिजातकः ।

संतानः कल्पवृक्षश्च पुंसि वा हरिचंदनम् ॥ ( अमर )

**पाच देवलोकींच्या गायी** — १ नंदा, २ भद्रा, ३ सुरभि, ४ सुशीला आणि ५ सुमना

नंदा भद्रा च सुरभिस्सुशीला सुमनस्तथा ।

पञ्चगावो विभोर्जाता सद्योजातादि वक्त्रतः ॥ ( सि शि )

**पाच दोष चित्राचे** — १ बोजडरेषा, २ प्रमाणभंग, ३ अयोग्य वर्णसंस्कार, ४ भावनाशून्यत्व व ५ अवयवांचे चुकीचें आरेखन (कला-कलातत्र आस्वाद )

**पाच दांभिक लक्षणें** — १ लंगोटी घालणें, २ भस्मलेपन, ३ दर्भासन, ४ रुद्राक्षमाला धारण करणें आणि ५ मौन हीं बाह्य चिन्हें ( त्याप्रमाणें आचरण नसेल तर ) म्हणजे दांभिक लक्षणें होत

**पाच देहांतर्गत दोष** — १ काम, २ क्रोध, ३ भय, ४ निद्रा आणि ५ श्वास हे पाच दोष शरीरांत स्वभावसिद्ध असतात

कामक्रोधौ भयं निद्रा पञ्चमः श्वास उच्यते ।

एते दोषाः शरीरेषु दृश्यन्ते सर्वदेहिनाम् ॥ (म भा शांति २९० ५४)

**पाच देव प्राणिमात्राला आरोग्य देणारे** — १ पर्जन्य, २ ( प्राण ) वायु, ३ जलदेव-वरुण, ४ चंद्र व ५ सूर्य ( अथर्ववेद )

**पाच दैवी प्रकोप** — १ आग लागणे, २ अतिवृष्टि, ३ रोगराई, ४ दुष्काळ व ५ पक्ष्यांचा उपद्रव

**पाच दोष घरा (निवासस्थान) बाबत वर्ज्य** — १ पदाघात-एका रस्त्यांत चालणाऱ्या माणसाचा आवाज दुसऱ्या रस्त्यांत ऐकू येणे, २ पराघात-आपल्या घराच्या चाहूडन दुसऱ्याचा मार्ग ३ पथाघात-घरातून दुसऱ्याचा वापर असणे, ४ जलदोष-आसपास पाणी साचून होणारा त्रास. आणि ५ वृक्षदोष-जवळच्या झाडांवरून कृमी कीटकांचा वगैरे त्रास असे पाच दोष टाळावेत.

पदाघात पराघात पथाघातस्तथैव च ।
जलदोषो वृक्षदोषो गृहदोषाः प्रकीर्तिताः ॥ (युक्तिकल्पतरु)

**पाच दोष दानासंबंधी** — १ अनादर, २ विलंब, ३ तोंड फुगवणे, ४ अप्रिय भाषण व ५ दिल्यानंतर पश्चात्ताप होणे

अनादरो विलंबश्च वैमुख्यं चाप्रियं वच ।
पश्चाद् भवति संतापो दानदूषणपंचकम् ॥ (दानशासनम्)

**पाच द्रविड देशीय पवित्र नद्या** — १ ताम्रपर्णी, २ कृतमाला, ३ पयस्विनी, ४ कावेरी व ५ प्रतीची

ताम्रपर्णी नदी यत्र कृतमाला पयस्विनी ।
कावेरी च महापुण्या प्रतीची च महानदी ॥ (भाग स्कंद ११)

**पाच नरकाची द्वारे** — १ जीवहिंसा, २ सुरापान, ३ अगम्यागमन, ४ चोरी व ५ विश्वासघात

जीवहिंसा सुरापानमगम्यागमनं तथा ।
चौर्यं विश्वासघातं च पञ्चैतानि मुनीश्वराः ॥ (लक्ष्मीपूजनमंत्र)

**पाच नावे (श्रीगीतेची)** — १ श्रीमद्भगवद्गीता, २ उपनिषद्, ३ ब्रह्मविद्या, ४ योगशास्त्र आणि ५ श्रीकृष्णार्जुनसंवाद

**पाच नियम (आत्मसंयमनासाठी करावयाची कृत्ये** — १ शौच, २ संतोष, ३ तप, ४ स्वाध्याय आणि ५ ईश्वरप्रणिधान (योगसूत्र २ ३२)

**पाच नियम (भिक्षूंचे)** — १ अक्रोध, २ गुरुशुश्रूषा, ३ शौच, ४ मिताहार आणि ५ नित्यस्वाध्याय

अक्रोधो गुरुशुश्रूषा शौचमाहारलाघवम् ।
नित्यस्वाध्याय इत्येते नियमा पञ्च कीर्तिता ॥ (सु)

**पाच परमेश्वरी कृत्यें** — १ सृष्टि, २ पालन, ३ संहार, ४ अनुग्रह आणि ५ निग्रह.

**पाच पवित्र नद्या** — १ किरणा, २ धूतपापा, ३ सरस्वती, ४ गंगा व ५ यमुना

किरणा धूतपापा च पुण्यतोया सरस्वती ।
गंगा च यमुना चैव पञ्च नद्य प्रकीर्तिता ॥
(बृहन्नारदीय उत्तर खंड ५१.१५)

**पाच पवित्र पर्वत जैन धर्मीयांचे** — १ शत्रुंजय, (सिद्धाचल), २ अर्बुदाचल (आबु), ३ गिरनार, ४ कैलास व ५ सम्मतशिखर (पारसनाथ)

**पाच परिघ रावणाच्या होमस्थानाभोंवतीचे** — १ आनंदाचा, २ महामोहाचा, ३ संकल्पाचा, ४ वादळी धान्याचा आणि ५ क्षुधेचा असे पाच परिघ रक्षणासाठीं होते अशी कथा आहे सर्वांबाहेर राक्षसांचा (परिघ) चरा होता. (एकनाथ वाङ्मय आणि कार्य)

**पाच पंचकें ज्योतिषांत** — १ राजपंचक, २ अग्निपंचक, ३ रोगपंचक, ४ चोरपंचक आणि ५ मृत्युपंचक

**पाच पुराणकालीन मणि** — १ कौस्तुभ मणि, २ स्यमंतक मणि, ३ चिंतामणि मणि, ४ चूडा मणि (वा रा सुंग ६-२३) आणि ५ संजीवक मणि (म भा आश्वमेधिक अ ८०) सेरीज अभीवत नामक मणि असल्याचा उल्लेख अथर्ववेदांत आहे (अथर्व—अनु—मराठी भाग २ रा)

**पाच पुराण प्रसिद्ध स्वयंवरें** — १ सावित्री, २ दमयन्ती, ३ रुक्मिणि, ४ सीता व ५ द्रौपदी पैकीं नावच्या दोन "स्वयंवरें" नगन समाहृय होत औपचारिकपणे स्वयंवर म्हटलें गेलें आहे. कारण या विवाहाचें बाबतींत त्या त्या कन्यांच्या वडिलांना पण लावले होते स्वतः मुलींना नव्हे.
(वा. रा निरीक्षण)

**पांच पुरुषार्थ** — १ धर्म, २ अर्थ, ३ काम, ४ मोक्ष आणि ५ भक्ति. पाच पुरुषार्थात भक्ति हा पांचवा श्रेष्ठ.

" चहू पुरुषार्थांशिरीं भक्ति ॥ " ( ज्ञा. १८.८६७ )

**पांच पंचायतनें** — १ विष्णुपचायतन, २ शिवपचायतन, ३ सूर्यपंचायतन, ४ देवीपचायतन आणि ५ गणेशपचायतन. ज्या देवतेची उपासना करावयाची ती मध्यभागीं स्थापून इतर चार देवता चार बाजूस स्थापावयाच्या. ( धर्मसिंधु )

**पांच प्रकारचे अग्नि** — १ मदाग्नि, २ तीक्ष्णाग्नि, ३ विषमाग्नि, ४ समाग्नि व ५ भस्माग्नि. ( वैद्यक )

**पाच प्रकारचे आनंद** — १ आत्मानद, २ ब्रह्मानद, ३ सुरतानद, ४ विद्यानद आणि ५ शौचानद.

**पांच प्रकारच्या अभिज्ञा** — १ निरिंद्रिय श्रवण, २ अलौकिक प्रत्यक्ष, ३ पूर्वजन्माचे ज्ञान, ४ दुसऱ्याच्या चित्ताचे ज्ञान आणि ५ जादूविद्येसारखे प्रयोग करण्याची शक्ति. अशा पाच प्रकारच्या अभिज्ञा बौद्धांनीं मानिल्या आहेत. ( गुरुदत्त योग )

**पांच प्रकारचें कर्म** — १ कायिक, २ वाचिक, ३ मानसिक, ४ कृत व ५ अकृत. ( वेदात विचार दर्शन )

**पाच प्रकार (अनुभवांचे)** — १ पाहणें, २ वास घेणें, ३ रस चाखणें, ४ स्पर्शणें व ५ ऐकणें. ( अनुभवामृत साररहस्य )

**पाच प्रकारचीं कर्में** — १ नित्य, २ नैमित्तिक, ३ काम्य, ४ प्रायश्चित्त व ५ निषिद्ध. ( विचारचंद्रोदय दर्शन )

**पांच प्रकार कल्पाचे ( शास्त्रांचे )** — १ नक्षत्रकल्प, २ वितानकल्प, ३ संहिताकल्प, ४ आङ्गिरसकल्प व ५ शांतिकल्प.

नक्षत्रकल्पो वैतानस्तृतीयो संहिताविधि: ।
चतुर्थोऽङ्गिरस: कल्प: शान्तिकल्पश्च पञ्चम: ॥

History of Dharmashastra VOL V Part. II

**पाच प्रकार गद्य काव्याचे** — १ आख्यायिका, २ कथा, ३ खण्डकथा, ४ परिकथा व ५ कथानिका. ( अग्निपुराण )

**पाच प्रकारचे गुप्तहेर** — १ कापटिक कपटी शिष्य अथवा विद्यार्थी, २ उदास्थित भ्रष्ट संन्यासी, ३ गृहपतिक कपटक शेतकरी, ४ वैदेहिक व्यापारात दिवाळे निघालेला आणि ५ तापस–व्यवसाय करू इच्छिणारा जटाधारी (कौटिल्य १ ११)

**पाच प्रकार हेरांचे** — १ स्थानिक, २ अंतर्गत, ३ परिवर्तित, ४ शासनाश्रम व ५ उत्तरित या पाचाही प्रकारच्या हेरांचा राष्ट्रचालकांस उपयोग असतो (युद्धकला)

**पाच प्रकारें द्रव्याचा विनियोग करावा** — १ धर्म, २ यश, ३ अर्थ, ४ काम आणि ५ स्वजन या पाच गोष्टींप्रीत्यर्थ द्रव्याचा विनियोग करणाऱ्या पुरुषास इहपर आनंद मिळतो (भागवत ८ १९ ३७)

**पाच प्रकार धनुर्वेदाचे** — १ वसिष्ठ धनुर्वेद, २ भरद्वाज धनुर्वेद, ३ विश्वामित्र धनुर्वेद ४ उशनस धनुर्वेद आणि ५ जमदग्नि धनुर्वेद

**पाच धार्मिक कृत्यें इस्लामचीं** — १ कल्मा 'ला इलाह मनाचे' पठण, २ नमाज दिवसातून पाच वेळा प्रार्थना, ३ रोजा-रमजान महिन्यात सूर्यास्तानंतर एकदा भोजन करणें (या महिन्यात कुराण पृथ्वीवर अवतीर्ण झालें) ४ जकात-व्यापक उत्पन्नाचा चाळीसावा हिस्सा दानधर्मात व्यय आणि ५ हज अर्थात् मक्केची यात्रा (संस्कृतिकोश)

**पाच धर्माधिकारी मुसलमान समाजाचे व त्यांचीं कार्यें** — १ काझी विवाह नोंदणी वगैरे, २ मुल्ला मर्शादींची व्यवस्था और्ध्वदेहिक वगैरे, ३ मौल्वी कायदा जाणणारा व उपदेशक, ४ खतीब शुक्रवारीं व ईद दिवशी मशिदीत उपासना करणारा व ५ मुजावर-कनिष्ठ दर्जाचा अधिकारी मशिदीची व्यवस्था वगैरे (म ज्ञा को वि १८)

**पाच प्रकारचे पेशीजाल** (Tissues)— १ उपलेपक, २ मज्जा, ३ स्नायु, ४ संयोगी व ५ अस्थि अशा पाच प्रकारच्या पेशीजालांनी मानवशरीर बनलेलें असतें (शारीरिक शिक्षण)

**पाच प्रकार परमात्मशक्तीचे** — १ चित्, २ आनंद, ३ इच्छा, ४ ज्ञान आणि ५ क्रिया (शैवागम)

**पाच प्रकार पूजेचे** — १ अभिगमन ( सफाई निर्माल्यविसर्जन वगैरे ) २ उपादान ( पूजासामग्री-संग्रह ), ३ याग ( इष्ट देवतेचे ध्यान ), ४ स्वाध्याय आणि ५ प्रत्यक्ष पूजा. ( कल्याण साधनांक )

**पाच प्रकारचें भस्म** — १ विभूति, २ भसित, ३ भस्म, ४ क्षार व ५ रक्षा.

**पाच प्रकार भाजीपाल्याचे** — १ पालेभाजी-चुका, चाकवत इ., २ फळभाजी भेंडी, गवार इ., ३ मूळभाजी मुळा, गाजर इ., ४ खोड भाज्या वगैरे, सुरण इ. आणि ५ फूल भाजी केळफूल, फार्नी हदगा इत्यादि.

**पाच प्रकार मनाचे** — १ नास्तिक, २ रागी पापी, ३ अचेत पोटभरू, ४ उलटें मन व्याजावर निर्वाह करणाराचें आणि ५ शुद्ध मन-साधुसंताचें.

**पाच प्रकारचीं माणसं** — १ दगड-बेदर्दी, २ झाड-कुटुंबप्रिय, ३ पशु जातिप्रिय, ४ मनुष्य देशप्रिय, व ५ संत विश्वकल्याण. अशीं पाच प्रकारचीं माणसें जगात असतात. ( गुरुदेव मासिक )

**पाच प्रकारचीं मात्रा वृत्तें** — १ आया, २ गीति, ३ उपगीति, ४ उद्गीती आणि ५ आर्यागीती. ( छंद शास्त्र )

**पाच प्रकार मंत्राचे** — १ त्वरित फलदायी, २ बीजमंत्र, ३ गुरुपादिष्ट मंत्र ४ सिद्धमंत्र व ५ आसुरमंत्र ( जारण मंत्र ). ( याज्ञवल्क्य-मासिक )

**पाच प्रकारचे यज्ञ** — ( अ ) १ द्रव्ययज्ञ, २ तपोयज्ञ, ३ योगयज्ञ, ४ वाग्यज्ञ आणि ५ ज्ञानयज्ञ. ( भ गी. ४ २८ ), ( आ ) १ अग्निहोत्र, २ दर्शपूर्णमास, ३ चातुर्मास्य, ४ पशुयाग, व ५ सोमयाग

**पाच प्रकारचीं युद्धें** — १ तंत्रयुद्ध, २ दंडयुद्ध, ३ पाषाणयुद्ध, ४ बाहुयुद्ध आणि ५ क्षेपण युद्ध ( फेकून मारण्याचें ) ( वसिष्ठ धनुर्वेद )

**पाच प्रकारचे योग** — ( अ ) १ मंत्रयोग, २ स्पर्शयोग, ३ भावयोग, ४ अभावयोग व ५ महायोग. ( लिंग ग्र ५५ ), ( आ ) १ क्रियायोग, २ भक्तियोग, ३ हठयोग, ४ ज्ञानयोग व ५ राजयोग

**पाच प्रकारचें रासनृत्य** — १ महारास, २ वसंतरास, ३ कुंजरास ४ उत्कलरास व ५ राखालरास.

**पाच प्रकारानीं रोगनिदान होतें** — १ निदान, २ पूर्वरूप, ३ रूप, ४ उपशय आणि ५ संप्राप्ति ( माधवनिदान १४ )

**पाच प्रकार ( ललित लेखनाचे )** — १ कादंब, २ नाट्य, ३ कादंबरी ४ लघुकथा व ५ लघुनिबंध. ( साहित्याचा संसार )

**पाच प्रकार लोकगीताचे** — १ ओव्या, २ गवळण, ३ मारुल, ४ लळित व ५ गाथळ. ( महाराष्ट्रराज्य परिचय )

**पाच प्रकारचे वर्ष** — १ चांद्र, २ सौर, ३ सायन, ४ नाक्षत्र व ५ बार्हस्पत्य. असे पांच प्रकारचे वर्ष कालमाधवेन मानले आहे. ( धर्मसिंधु )

**पाच प्रकार वेदाचे** — १ विधि, २ मंत्र, ३ नामधेय, ४ निषेध आणि ५ अर्थवाद. ( म. शा. का. नि ५ )

**पाच प्रकार वेश्येचे** — १ गणिका गुणलुब्ध पण एकनिष्ठ, २ कचनी-धन घेऊन देह अर्पण करणारा, ३ रामजेणी ईश्वरभक्ती. तिची धर्मप्रवृत्ति पाहून विषयीजन तिला फसवतात, ४ वेश्या केवळ विषयाधीन व ५ कुल्टा अत्यंत अधम. ( चंद्रकांत भाग २ रा )

**पाच प्रकारचे वैर** — १ सापत्नभाव, २ घर वगैरेच्या याग, ३ स्त्री याग, ४ शिवीगाळ व ५ अपराध केल्याने. असे पाच प्रकारचे वैर उत्पन्न होत. तें इष्ट मार्गाने शमवावें.

सापत्न्य वास्तुज स्त्रीज वाग्जातमपराधजम् ।
वैर पञ्चविध प्राक्त साधनै प्रशम नयेत् ॥ ( अग्नि. २४०.१९ )

**पाच प्रकारचे वैराग्य** — १ त्राधवैराग्य, २ स्मशानवैराग्य, ३ प्रसूति वैराग्य, ४ मैथुनवैराग्य आणि ५ शुद्धवैराग्य ( सि. नो ४० )

**पाच प्रकारचे वैद्य अपूज्य** — १ नित्य वस्त्र अंगावर घेणारा, २ कठोर, ३ स्तब्ध असणारा, ४ गावकामगार आणि ५ रोग्याकडे आपण होऊनच आलेला असा पाच वैद्याकडून ते धन्वंतरीसारखे असले तरी औषध घेऊ नये.

कुचैल कर्कश स्तब्धो ग्रामणी स्वयमागत ।
पञ्च वैद्या न पूज्यन्ते धन्वतरिसमा अपि ( रा. नि. )

**पाच प्रकारच्या वृत्ति** — १ यथार्थज्ञान, २ विपरीतज्ञान, ३ शब्द-भ्रम, ४ निद्रा व ५ स्मृति—आठवण.

" प्रमाण विपर्यय विकल्प-निद्रा-स्मृतय " ( पा. यो. १ ६ )

**पाच प्रकार शास्त्रीय ग्रंथाचे** — ( संस्कृत वाङ्मय ) १ सूत्र २ वृत्त, ३ भाष्य, ४ वार्तिक व ५ टीका. ( व्याकरण महाभाष्य प्रस्तावना गद्य. )

**पाच प्रकारची शुद्धि** — १ सत्य, २ मन शौच, ३ इंद्रियनिग्रह, ४ सर्वभूतदया आणि ५ पाण्याने शुद्धि.

सत्यशौच मनःशौच शौचमिंद्रियनिग्रह ।
सर्वभूते दयाशौच जलशौच च पचमम् ॥ ( ग पु. )

**पाच प्रकार शैव-धर्माचे** — १ तप, २ कर्म, ३ जप, ४ ध्यान व ५ ज्ञान ( शिव पु वा. संहिता अ ७ )

**पाच प्रकारच्या सख्या** — १ सखी, २ नित्यसखा, ३ प्राणसखी, ४ प्रियसखी आणि ५ परमेष्ठ सखी. ( कल्याण नारा अंक )

**पाच प्रकारचे साक्षीदार** — १ लेख, २ प्रत्यक्ष पाहिलेले आठवणाने सांगणारा, ३ सहज्गत्या येऊन सांगणारा, ४ गुप्तपणे सांगणारा व ५ उत्तर जानूचा पण अनुकूल सांगणारा.

लिखित स्मारितश्चैव यदृच्छाभिज्ञ एव च ।
गूढश्चोत्तरसाक्षी च साक्षी पचविध स्मृत ॥ ( ना स्मृ )

**पाच प्रकारचे सगुण ध्यान** — १ श्रीविष्णुध्यान, २ अग्निध्यान, ३ सूर्यध्यान, ४ ब्रह्मध्यान व ५ पुरुषध्यान ( श्रीगुरुदत्तयोग )

**पाच प्रकार संताचे** — १ भोगी, २ योगी, ३ रागी, ४ त्यागी, व ५ त्यागी ( परमार्थपर व्याख्यान )

**पाच प्रकारची सृष्टि** — १ खनिजसृष्टि, २ वनस्पतिसृष्टि, ३ प्राणिसृष्टि, ४ मनुष्यसृष्टि व ५ देवसृष्टि अशी क्रमाने सृष्टीची उत्पत्ति झाली.

**पाच प्रकारच्या सिद्धि** — १ जन्म, २ औषधी, ३ मंत्र, ४ तप व ५ समाधि. ( पा योग. )

**पाच प्रकार स्वप्नाचे** — १ यथातथ्य, २ प्रतान ( विस्तार ), ३ चिंतास्वप्न, ४ विपरीत व ५ अव्यक्त ( स्वप्नाची अनुक स्मृति )

**पाच प्रमुख गाथा झरतुष्ट्र धर्माच्या** — १ अहुनवद, २ उश्तवद, ३ स्पेनतोमद, ४ वोहूक्षत्र व ५ वहिश्तोइश्त ( झेंदावस्ता )

**पाच प्रमुख प्रकार प्राणायामाचे** — १ सूर्यभेदन, २ उज्जायी, ३ सीत्कारी, ४ शीतली व ५ भस्त्रिका ( योगशास्त्र )

**पाच प्रकारचें बल** — १ आत्मबल, २ तपोबल, ३ बाहुबल, ४ धनबल व ५ ईश्वरबल.

**पाच प्रमुख शिष्य व्यासाचे** — १ सुमतु, २ वैशंपायन, ३ जैमिनि, ४ पैल व ५ शुकाचार्य (पुत्र व शिष्य). या पाच जणांना व्यासानीं वेदविद्या पढविली. (म. भा. शांति. अ. ३२०)

**पाच प्रकार सत्तेचे** — १ धर्मसत्ता, २ जातिसत्ता, ३ राजसत्ता, ४ अर्थसत्ता आणि ५ लोकसत्ता. (भारतीय लोकसत्ता)

**पाच प्रकार संन्यासदीक्षेचे** — १ आश्रम, २ तीर्थ, ३ सरस्वती, ४ भारती व ५ परमहंस (दृष्टप्रज्ञा)

**पाच प्रकार साक्षात्कारी पुरुषाचे** — १ रूपदर्शा, २ तेजोदर्शा, ३ वर्णदर्शा, ४ नादश्रवा व ५ अमृतास्वादी. (संत स्वरूप साक्षात्कार मार्ग)

**पाच प्रभास क्षेत्रें** — १ आद्यप्रभास, २ वृद्धप्रभास, ३ जलप्रभास, ४ कृतस्मरप्रभास व ५ महाप्रभास. अशीं पाच प्रभासक्षेत्रें प्रभास रहात आहेत (नीयुत–दिवाळी अंक)

**पाच प्रकारचें ज्ञान** — १ मतिज्ञान, २ श्रुतज्ञान, ३ अवधिज्ञान, ४ मन:पर्याय व ५ केवलज्ञान (तत्त्वार्थ सूत्र अ १)

**पाच प्रमुख आसनें (योगाचीं)** — १ पद्मासन, २ स्वस्तिकासन, ३ भद्रासन, ४ वज्रासन आणि ५ वीरासन. योगशास्त्रातील चौऱ्यायशी आसनांतील ही पाच आसनें मुख्य आहेत. (कल्याण योगांक)

**पाच प्रमुख तत्त्वें (बौद्ध धर्माचीं)** — १ प्रज्ञा, २ शील, ३ दया, ४ करुणा आणि ५ मैत्री.

**पाच प्रमुख तत्त्वें (समर्थसंप्रदायाचीं)** — १ शुद्ध उपासना, २ निरूपणज्ञान, ३ वीतराग (वैराग्य), ४ ब्राह्मण्यरक्षण आणि ५ शुद्ध कर्माचरण.

**पाच प्रसंगीं खोटें बोलणें पाप नाहीं** — १ थट्टेंत, २ पत्नीजवळ, ३ विवाहकालीं, ४ प्राणसंकटाचे वेळीं आणि ५ सर्वस्व लुबाडलें जात असताना. (वसिष्ठस्मृति अ. १६) (म. भा. आदि ८२ १६)

**पाच प्रपंचातील प्रमुख सुखें** — १ निरोगी काया, २ द्रव्याची अनुकूलता, ३ पतिव्रता व मधुरभाषिणी स्त्री, ४ आज्ञांकित पुत्र व ५ धन देणारी विद्या.

**पाच प्रतीकें (भारतीय संस्कृतीचीं)** — १ दीप ज्ञानाचें प्रतीक, २ कमळ-जन्मस्थान नव्हे पण कर्तृत्वाचें प्रतीक, ३ वटवृक्ष-औदार्याचें प्रतीक, ४ स्वस्तिक-कल्याण व ५ ॐ ध्वनीचें उगमस्थान. हीं भारतीय संस्कृतीचीं पाच मुख्य प्रतीकें होत.

**पाच फारशी महाकवि** — १ खुस्रो, २ फैजी, ३ उर्फी, ३ जहूरा व ५ नजीरी. (मणिकांचन)

**पाच बुद्धिजीवी वर्ग समाजोपयोगी** — १ सैनिक, २ धर्मगुरु, ३ वैद्य अथवा डाक्टर, ४ विधिज्ञ आणि ५ व्यापारी (Unto this Last)

**पाच भक्तिमार्गांतले कांटे** — १ जाति, २ विद्या, ३ महत्त्व, ४ रूप व ५ यौवन.

> जातिर्विद्या महत्त्वं च रूपं यौवनमेव च ।
> यत्नेन परिहर्तव्या पचैते भक्तिकण्टकाः ॥ (सु)

**पाच भक्तांचीं लक्षणें** — १ निरपेक्षता, २ मनन, ३ शांति, ४ समता व ५ निर्वैरता

> निरपेक्षता आणि माझें मनन । शांति आणि समदर्शन ॥
> पांचवें तें निर्वैर जाण । पांच लक्षणें हे मुख्यत्वें ॥ (ए.भा.अ. १४)

**पाच भाग (वेदाचे)** — १ मंत्रसंहिता, २ ब्राह्मण, ३ आरण्यक, ४ सूत्र व ५ अनुक्रमणि या पांच भागांना मिळून श्रुति अशी संज्ञा आहे. (कल्याण—बालकांक)

**पाच मराठेशाहींतील प्रसिद्ध शाहीर** — १ परशराम, २ होनाजी बाळा, ३ अनंत फंदी, ४ रामजोशी व ५ प्रभाकर.

**पाच मराठी संतकवि व त्यांचे प्रासादिक ग्रंथ** — १ श्रीज्ञानेश्वर—ज्ञानेश्वरी २ नामदेव—अभंग गाथा, ३ एकनाथ—एकनाथी भागवत. ४ तुकाराम—अभंग गाथा, आणि ५ रामदास—दासबोध

**पाच मराठी संत कवयित्री** — १ महदंबा किंवा महदाईसा, २ मुक्ताबाई, ३ जनाबाई, ४ बहिणाबाई, आणि ५ वेणाबाई.

**पांच महान् तत्त्वें ( इस्लाम धर्माचीं )** — १ कल्मा ( धर्मश्रद्धा ), २ नमाज ( प्रार्थना ), ३ उपवास, ४ दानधर्म व ५ मक्केची यात्रा. ( इस्लाम आणि संस्कृति )

**पांच मान प्राप्त होण्याचीं कारणें** — १ धन, २ बंधुवर्ग, ३ वय, ४ कर्म आणि ५ विद्या. ( मनु २–१३६ )

**पांच मानव जातीचे शत्रु** — १ दारिद्र्य, २ अस्वच्छता, ३ रोगराई, ४ अज्ञान आणि ५ आळस.

**पांच मानसिक तपें** — १ मनाची प्रसन्नता, २ सौम्यता, ३ ईश्वराचें ध्यान, ४ मनोनिग्रह व ५ अन्तःकरणाची शुद्धि.

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ ( कल्याण नारी अंक )

**पांच मानसिक दोष** — १ विषाद मानणें, २ निर्दय विचार करणें, ३ व्यर्थ चिंता करणें, ४ मन स्वाधीन न ठेवतां भटकूं देणें, व ५ अपवित्र विचार बाळगणें. ( कल्याण साधनांक )

**पांच मार्गांनीं सिद्धी प्रकट होतात** — १ विशिष्ट जन्म, २ दिव्य औषधी, ३ मित्र देवताचे मन्त्र, ४ तपःसामर्थ्य व ५ समाधि ( पा. योग ३–१ )

**पांच मूर्खलक्षणें** — १ रस्त्यानें खात जाणें. २ हसत हसत बोलणें, ३ गेल्या गोष्टीचा शोक करणें, ४ आत्मप्रशंसा करणें व ५ दोघे बोलत असतील तेथें जाणें.

**पांच यम ( संयमन करावयाच्या गोष्टी )** — १ अहिंसा, २ सत्य, ३ अस्तेय, ४ ब्रह्मचर्य आणि ५ अपरिग्रह ( यो. सू. २–३० )

हे पांच यम सार्वभौम महाव्रत म्हणजे सर्वांना व्यापून असणारे आचरणांत आणण्याचे नियम होत.

**पांच यज्ञ ( राजकर्तव्यें ) शासनाचीं** — १ सज्जनाचा परामर्ष, २ दुर्जनांना शासन, ३ न्याय्य मार्गानें कोशसंवर्धन, ४ प्रजारक्षण व ५ निःपक्षपाती न्यायदान.

**पांच योगदोष** — १ काम, २ क्रोध, ३ लोभ, ४ भय आणि ५ स्वप्न ( म. भा. शांति ३–२४० )

**पाच रत्ने ( महाभारतान्तर्गत )** — १ भगवद्गीता, २ विष्णुसहस्र नाम, ३ भीष्मस्तवराज, ४ अनुस्मृति आणि ५ गजेंद्रमोक्ष.

गीतासहस्रनामैव स्तवराजो ह्यनुस्मृति. ।
गजेन्द्रमोक्षणं चैव पचरत्नानि भारते ॥ ( सु. )

**पाच लक्षणे सद्गुरूची** — १ श्रोत्रिय ( शास्त्रज्ञ ), २ ब्रह्मनिष्ठ ( अनुभवी ), ३ शिष्यप्रबोधिनी ( समर्थ ), ४ कृपालुत्व आणि ५ पूर्ण शांति ( पु. दा )

**पाच लेखन गुण** — १ अर्थानुक्रम, २ वाक्यसगति, ३ परिपूर्णता, ४ माधुर्य आणि ५ गौरव आणि नि सदेहपणा ( कौ. अधि २ अ. १ )

**पाच लेखन दोष** — १ कमहीनपणा, २ विरोध, ३ पुनरुक्ति, ४ चुकीचा शब्दप्रयोग आणि ५ अक्षराचा घोटाळा ( कौ. अ. २ अ. ३१ )

**पाच लोक आणि त्यांच्या दिशा** — ( अ ) सत्यलोक, २ वैकुंठलोक, ३ कैलास, ४ आश्रय आणि ५ निराश्रय ( क. गी. २. २६ ) ( आ ) १ इंद्रलोक-पूर्वस, २ यमलोक-दक्षिणेस, ३ वरुणलोक-पश्चिमेस, ४ धनदलोक ( कुबेर )-उत्तरेस आणि ५ ब्रह्मलोक-ऊर्ध्व दिशा ( म भा. सभापर्व )

**पाच वस्तु अति पवित्र होत** — १ उच्छिष्ट-वासराचे उष्टे दूध, २ शिवनिर्माल्य-शंकराच्या मस्तकापासून निघालेली गगा, ३ वमन-मधमाश्या पासून उत्पन्न झालेले मध, ४ शवकर्पट-प्रेतचीवर म्हणजे किडे नष्ट होऊन उत्पन्न झालेले रेशीम व ५ काकविष्ठेपासून झालेला पिंपळ.

उच्छिष्टं शिवनिर्माल्यं वमनं शवकर्पटं ।
काकविष्ठासमुत्पन्ना पञ्चैतेऽतिपवित्रका ॥ ( सु. )

**पाच वस्तु निद्रासमयी जवळ असाव्या** — १ पादत्राण, २ काठी, ३ पाण्याचे तांब्याचे भांडे, ४ दिवा व ५ आगपेटी

**पाच वस्तु स्वर्गात देखील दुर्मिळ** — १ विद्या, २ उंच उंच घरे, ३ केशर, ४ बर्फमय पाणी, व ५ द्राक्ष. पण या पाचहि वस्तु भूनंदनवन-काश्मीरमध्ये विपुल प्रमाणात

विद्या वेश्मानि तुङ्गानि कुङ्कुमं सहिमं पयः ।
द्राक्षेति यत्र सामान्यमस्ति त्रिदिवदुर्लभम् ॥ ( राजतरंगिणी )

**पाच वनस्पति पापमोचक** — (अ) १ सोमवल्ली, २ शमी, ३ आपटा, ४ तुळस ( पांढरी व काळी ) आणि ५ तीळ. ( आ ) १ तुळस, २ शमी, ३ आपटा, ४ गोरोचन व ५ तीळ. ( निर्णय शिरोमणि )

**पाचावर शस्त्रप्रहार करूं नये** — १ स्त्री, २ गाय, ३ ब्राह्मण, ४ ज्याचें अन्न खावें तो व ५ ज्याला आपण आश्रय दिला आहे तो. ( म. भा. सभा. ४१-४३ )

**पाच वाणीचीं तपें** -- १ उद्वेग न करणारें, २ प्रिय, ३ हितकर, ४ यथार्थ भाषण आणि ५ स्वाध्याय.

**पाच वाचिक दोष** -- १ असत्य भाषण, २ निंदा करणे, ३ मर्मी लागेल असे बोलणें, ४ आत्मश्लाघा व ५ परदोषकथन.

**पाच विद्यासंपादनाचे मार्ग** -- १ आस्था, २ जिज्ञासा, ३ शिस्त, ४ एकाग्रता आणि ५ तज्ज्ञसहवास.

**पाच वैदिक संप्रदायाचे प्रमुख आचार्य** -- १ श्रीशंकराचार्य, २ श्रीरामानुजाचार्य, ३ श्रीवल्लभाचार्य, ४ श्रीनिंबार्काचार्य व ५ श्रीमध्वाचार्य. वैदिक धर्माला आलेलें मालिन्य नाहीसें करून धर्माची घडी नीट बसवून देणारे हे प्रमुख पाच आचार्य होत.

**पाच वैश्याचे स्वाभाविक गुणधर्म** -- १ श्रद्धा २ दान, ३ विचाराप्रमाणे आचार, ४ वेदब्राह्मणांची सेवा आणि ५ धनसंग्रहाविषयीं असमाधान. ( भा. स्कंध ११.१७.१८ )

**पाच शक्ति (शिवाच्या)** -- १ चिच्छक्ति, २ आनंदशक्ति,, ३ इच्छाशक्ति, ४ ज्ञानशक्ति, व ५ क्रियाशक्ति. या पाच मुख्य शक्ति शैव मतांत मानल्या आहेत

**पाच शब्द औदार्यसूचक** - १ वेदघोष, २ धनुष्याचा टणत्कार ( शत्रूचा संहार ), ३ द्या, ४ प्या व ५ उपभोग घ्या असे पाच औदार्यसूचक शब्द कधी नाहीसे झाले नाहीत. अशा प्रकारचें राजा दिलीपाचें राज्य होतें अशी कथा आहे

> पंचशब्दा न जीर्यन्ते खट्वांगस्य निवेशने ।
> स्वाध्यायघोषो ज्याघोषो पिबताश्नीत खादत ॥ ( सु )

**पाच शारीरिक तपें** — १ देव, गुरुजन आदि यांची पुजाच पूजन, २ पवित्रता, ३ सरलता, ४ ब्रह्मचर्य आणि ५ अहिंसा

**पाच श्रेष्ठत्वदर्शक नारायणनामें** — १ अग्निनारायण, २ वदा नारायण, ३ व्यासनारायण, ४ आपानारायण व ५ सूक्ष्मनारायण. (ज्ञान. गाथा भाग ३ रा.)

**पाच साधनें आत्मज्ञानाचीं** — १ सद्गुरुप्राप्ति, २ सत्संग, ३ श्रवण, ४ मनन आणि ५ निदिध्यास (दा ग्रा)

**पाच साधनें सिद्धीचीं** — १ जन्म, २ औषध, ३ मंत्र, ४ तप व ५ समाधि (योगशास्त्र)

**पाच सिद्धांत विरोधाभासात्मक व त्यांचा समन्वय (गीतोक्त)** — १ ईश्वर सगुण कीं निर्गुण—तो गुणातीत, २ तो कर्ता कीं प्रेरक—तो मूळप्रेरक, ३ ईश्वर अंतर्यामी कीं सर्वातीत—दोन्हीही, ४ जगत् सत्य का असत्य—ते क्षणभंगुर आणि ५ विदेहमुक्ति कीं क्रममुक्ति—जीवन्मुक्ति (म. गी साक्षात्कारदर्शन)

**पाच श्रेष्ठ वेदान्ती** — १ याज्ञवल्क्य, २ आरुणि, ३ शांडिल्य, ४ दध्यच आणि ५ सनत्कुमार

**पाच सन्मान स्थानें** — १ धन, २ बंधु, ३ अवस्था, ४ कर्म व ५ विद्वत्ता यांत उत्तरोत्तर प्रशस्त (कल्याण मासिक)

**पाच स्कंध (भाग) ज्योतिषाचे** — १ सिद्धांत, २ होरा, ३ संहिता, ४ स्वर व ५ सामुद्रिक. (तत्त्व निज विवेक)

**पाच हिंदी संत कवि** — १ कबीर, २ जायसी, ३ सूरदास, ४ तुलसीदास व ५ मीराबाई

**पाच हेतु ज्योतिर्गणिताचा विचार करतांना जाणावेत** — १ चक्षु, २ शास्त्र, ३ जल, ४ लेख्य व ५ प्रत्यक्ष गणित.

चक्षु शास्त्रं, जलं लेख्यं गणितं बुद्धसत्तमा ।
पञ्चैते हेतवो ज्ञेया ज्योतिर्गणितचिन्तने ॥ (वायु पु)

**पाच हेतु (विवाहाचे)** — १ संयम, २ कुलरक्षण, ३ सुप्रजोत्पादन, ४ प्रेम आणि एक्य व ५ भगवद्भाव.

**पांच क्षुद्र सिद्धि** — १ त्रिकालज्ञान, २ अद्वंद्वता-शीत, उष्ण, सुख-दुःख या द्वंद्वाच्या आधीन न होणें, ३ परचित्त ज्ञान, ४ भूत प्रतिकार ( अग्नि, वायु, विष वगैरेंची बाधा न होणें ) आणि ५ अपराजय.

**पांच जण आनुवंशिक वीर होत** — १ बलराम, २ श्रीकृष्ण, ३ प्रद्युम्न, ४ सांब व ५ अनिरुद्ध.

> संकर्षणो वासुदेवः प्रद्युम्नः सांब एव च ।
> अनिरुद्धश्च पञ्चैते वंशवीराः प्रकीर्तिताः ॥ ( वायु. पु. )

( **पांचजणांना कन्या देऊं नये** — १ मूढ, २ विरक्त, ३ स्वतःला फार मोठे समजणारा, ४ रोगी आणि ५ उद्धट.

> मूढाय च विरक्ताय आत्मसंभाविताय च ।
> आतुराय प्रमत्ताय कन्यादान न कारयेत ॥ ( स्कं. माहेश्वर खंड ) )

**पांचजण अवश्यमेव पोष्य** — १ अतिथि, २ बाळ, ३ पत्नी, ४ जननी आणि ५ जनक.

> अतिथिर्बालकः पत्नी जननी जनकस्तथा ।
> पञ्चैते गृहिणः पोष्या इतरे च स्वशक्तितः ॥ ( सु. )

**पाचजण यथाशक्ति पोष्य** — १ मोठीं मुलें, २ बाप, ३ नातू, ४ भाऊ आणि ५ भाचा.

> बालः पिता च दौहित्रो भ्राता च भगिनीसुत ।
> एतेऽधनस्य पालनीया प्रयत्नेन स्वशक्तित ॥ ( सु. )

**पाचजण कर्मचांडाल होत** — १ नास्तिक, २ पिशुन, ३ कृतघ्न, ४ दीर्घद्वेषी आणि ५ अधर्मजन्य संतति.

> नास्तिक पिशुनश्चैव कृतघ्नो दीर्घदोषक ।
> चत्वार कर्मचांडाला जन्मतश्चापि पञ्चम ॥ ( व. स्मृति )

**पाचजण कार्य उरकलें म्हणजे तृणवत् होतात** — १ उपाध्याय, २ वैद्य, ३ ऋतुकालीन स्त्री, ४ सुईण आणि ५ दूती. हे पाचजण तें ते कार्य उरकलें म्हणजे तृणवत् होतात.

**पाचजण गुरुसमान** — १ पिता, २ माता, ३ अग्नि, ४ आत्मा आणि ५ आचार्य. ( म. भा. वन. १२-२१४ )

**पांचजणांना तीर्थाचें फल मिळत नाहीं** — १ श्रद्धाहीन, २ स्वभावच पापमय आहे असा पापात्मा, ३ नास्तिक, ४ संदेहशील व ५ हेतुवादी.

अश्रद्दधानः पापात्मा नास्तिकोऽच्छिन्नसंशयः ।
हेतुनिष्ठश्च पञ्चैते न तीर्थफलभागिनः ॥ ( कृष्णा म. अ. २९ )

**पांचजण दुसऱ्यावर जगतात** — १ वैद्य-रोग्यावर, २ दुकानदार-गिऱ्हाईकावर, ३ शहाणा अजागळावर, ४ चोर गाफिलावर आणि ५ भिक्षु गृहस्थावर. ( पंचतंत्र )

**पांचजणांना निद्रा येत नाहीं** — १ बलवानानें दात धरलेला, २ दुबळा आणि साधनहीन, ३ सर्वस्व गमावून बसलेला, ४ विषयलंपट व ५ चोर. ( म. भा. उद्योग३३-१३ )

**पांचजण नित्य स्मरणीय** — १ जननी, २ जनक, ३ विद्यादाता, ४ राष्ट्र आणि ५ धर्माचा उपदेशक.

जननी जन्मदाता च सुविद्या प्रददाति यः ।
राष्ट्रं धर्मोपदेष्टा च पञ्चक सततं स्मरेत् ॥ ( सु. )

**पाचजण पंक्तिपावन होत** — १ विकलांग नसलेला, २ विनयी ३ योगी, ४ सकलशास्त्रज्ञ व ५ फिरता साधु.

षडङ्गी विनयी योगी सर्वतन्त्रस्तथैव च ।
यायावरश्च पञ्चैते विज्ञेयाः पंक्तिपावना ॥ ( वायु. पु. )

**पाचजण पचनशक्ति श्रेष्ठ असलेले** — १ अगस्ति, २ कुंभकर्ण, ३ शनि, ४ वनवानल आणि ५ वृकोदर.

अगस्ति कुंभकर्णं च शनि च वडवानलम् ।
आहारपरिपाकार्थं स्मरामि च वृकोदरम् ॥ ( यो. र. भाग १ )

**पाचजण पित्यासमान** — १ जन्मदाता, २ उपनयनकर्ता, ३ विद्या देणारा, ४ अन्नदाता आणि ५ भयत्राता.

जनिता चोपनीता च यस्तु विद्यां प्रयच्छति ।
अन्नदाता भयत्राता पञ्चैते पितरः स्मृता ॥ ( वृ. चा ४.९ )

**पाच जणांना विद्या प्राप्त होत नाहीं** — १ रागीट, २ दुराग्रही, ३ आळशी, ४ रोगी आणि ५ चचल चित्त असलेला.

पञ्च विप्रा न गृह्णन्ति चडालास्था च ये नरा ।
अलसश्च सरोगश्च येषा च विस्मृत मन ॥ ( नारदीय पूर्वखंड )

**पाचजणावर विश्वास नये** — १ जामात, २ कृष्णसर्प, ३ अग्नि, ४ दुर्जन व ५ भाचा.

जामातो कृष्णसर्पश्च पावको दुर्जनस्तथा ।
विश्वासो नैव कर्तव्य पञ्चमो भगिनीसुत ॥ ( सु. )

**पाचजण विद्वान् असले तरी अपूज्य** — १ चंचल, २ कठोर, ३ दुराग्रही, ४ निंद्य वस्त्र धारण करणारा आणि ५ आगंतुक.

अधीर कर्कश स्तब्ध कुचल स्वयमागत ।
पच विप्रा न पूज्यन्ते बृहस्पतिसमा अपि ॥ ( गरुड. आचारकांड )

**पाचजण व्याधींचा परिहार करणारे** — १ धन्वतरी, २ वृकोदास, ३ काशीराज ४ नकुल आणि ५ सहदेव, हे पांच व्याधींचा परिहार करणारे म्हणून सांगितले आहेत. ( नेपाळी पचांग )

**पाचजण संगतीला वर्ज्य** — १ गर्विष्ठ, २ मूर्ख, ३ रागीट, ४ अविचारी आणि ५ धर्माला सोडून वागणारा.

**पाच संस्कृत महाकवि** — ( अ ) १ कालिदास, २ भवभूति, ३ भारवि, ४ माघ व ५ हर्ष, ( आ ) १ कालिदास, २ भवभूति, ३ दंडी, ४ बाण आणि ५ सुबंधु

**पाचजण सुखानें निद्रा करणारे** — १ अगस्ति-अन्न भागलें पचल्यामुळे, २ माधव पुण्याचरणामुळे, ३ मुचकुंद फार मेहनत झाल्यामुळे, ४ कपिल ध्यानधारणेमुळें आणि ५ आस्तिक दुष्टावरसुद्धा उपकार करणारा. निद्रासमयी या पाचांचें स्मरण केल्यानें सुखानें निद्रा येते.

अगस्तिर्माधवश्चैव मुचकुंदो महामुनि ।
कपिलो मुनिरास्तिक पञ्चैते सुखशायिन ॥ ( गोभिल )

**पाचजणांच्या स्मरणानें घोर संकटाचा नाश होतो** — १ हर, २ हरि, ३ हरिश्चंद्र, ४ हनुमान् आणि ५ हलायुध. ( माध्य. आ. सूत्रावलि )

**पाचजण जिवंत असून मृतवत् होत** — १ दरिद्री, २ नित्यरोगी ३ मूर्ख, ४ सदा प्रवास करणारा, ५ आजन्म नोकरीवर निर्वाह करणारा.

जीवन्तोऽपि मृताः पञ्च श्रूयन्ते किल भारते ।
दरिद्रो व्याधितो मूर्खः प्रवासी नित्यसेवकः ॥ ( पचतत्र )

**पाच जणाच्या स्मरणानें दृष्टिदोष होत नाहीं** — १ शर्याति, २ शर्यातिकन्या-सुकन्या, ३ च्यवनमहर्षि, ४ सोम व ५ अश्विनीकुमार.

शर्याति च सुकन्या च च्यवन सोममश्विनौ ।
भोजनान्ते स्मरेन्नित्य तस्य चक्षुर्न हीयते ॥ ( सु. )

**पांचाच्या स्मरणानें वेदपठणास प्रवृत्त व्हावें** — १ गणेश, २ सरस्वती, ३ रवि, ४ शुक्र आणि ५ बृहस्पति.

गणनाथसरस्वतीरविशुक्रबृहस्पतीन् ।
पंचतानि स्मरेन्नित्य वेदवाणीप्रवृत्तये ॥ ( प्रात स्मरण )

**पांच जणांच्या स्मरणानें विषबाधा होत नाहीं** — १ कपिला, २ कालिया, ३ अनत, ४ वासुकि व ५ तक्षक ( माध्य. आ. सूत्रावलि )

**पाचजणांच्या प्रात स्मरणानें सौभाग्यवर्धन होतें** — १ उमा, २ उषा, ३ जानकी, ४ रमा आणि ५ गगा ( माध्य. आ. सूत्रावलि )

**पांचजणाना नांवानें संबोधूं नये** — १ आत्मनाम, २ गुरु, ३ अति कृपण मनुष्य, ४ ज्येष्ठपुत्र व ५ पत्नी. कल्याणेच्छु पुरुषानें या पाचाना नावानें संबोधू नये.

आत्मनाम गुरोर्नाम नामातिकृपणस्य च ।
श्रेय कामो न गृह्णीयात् ज्येष्ठापत्यकलत्रयो ॥ ( सु. )

**पाचजणांची पाच प्रकारची आसक्ति** — १ हरिण-शब्द-ध्वनिलुब्ध झाल्यामुळें, २ हत्ती-स्पर्श-हत्तिणीवर आसक्त झाल्यामुळें, ३ पतग-रूप-दिव्यावर मोहित झाल्यानें, ४ भ्रमर-रस-मधुररसावर आसक्त झाल्यामुळें आणि ५ मत्स्य-गध-आमिषाला भुलून जाळ्यात अडकल्यामुळें. असे हे पाच विषयाच्या आसक्तीनें नष्ट होतात.

"कुरग-मातग-पतग-भृग-मीना हता पचभिरेव पच ( गरुड. ६ ३५)

**पाच जणाकडून प्रजेला भय असतें** — १ अधिकारी वर्ग, २ चोर, ३ शत्रु, ४ शासनाचे सबधी लोक व ५ लोभी शासन मडळ "प्रजानां पञ्चधा भयम्" ( नीतिसार )

**अंतःकरणपंचक** — १ अंतःकरण, २ मन, ३ बुद्धि, ४ चित्त, व ५ अहंकार. (दा. बो. १७८)

**गाथापंचक** — १ श्रीज्ञानदेव गाथा, २ श्रीनामदेव गाथा, ३ श्रीएकनाथ गाथा, ४ श्रीतुकाराम गाथा व ५ श्रीसंत गाथा.

**गीतपंचक** — १ वेणूगीत, २ गोपीगीत, ३ युगलगीत, ४ भ्रमरगीत व व ५ महिषीगीत. या भागवतांतील भक्तिरसानें भरलेल्या पाच गीतांस गीतपंचक अशी संज्ञा आहे.

**दुष्टपंचक** — १ वाणी दुष्ट असणे, २ क्रिया क्रूर असणे, ३ स्वाभाविक दुष्टता, ४ संसर्गदुष्टता आणि ५ शिल्पिपाकें यांना दुष्टपंचक म्हणतात. हीं वर्ज्य करावींत.

भावदुष्टं क्रियादुष्टं जातिदुष्टमिति त्रिधा ।
संसर्गं कालदुष्टं च वर्जयेत् दुष्टपंचकम् ॥ (द्वैतसिद्धान्तकेसरी)

**देवतापंचक** — १ अग्नि, २ वायु, ३ सूर्य, ४ चंद्र व ५ नक्षत्रें. (तैत्तिरीय उपनिषद्)

**नारीपंचक** — १ गायत्री, २ मूर्ति, ३ श्री, ४ धी आणि ५ जयन्ती. राष्ट्राराष्ट्रांतील युद्धामुळें स्त्रीपुरुषांना अपत्याचा कंटाळा आल्यामुळें प्रजा क्षयास्थान नाहींशी होत चालली. अखेर पाच स्त्रिया राहिल्या त्या. (आपटेकृत अजरामर)

**निदानपंचक** — १ निदान, २ पूर्वरूप, ३ रूप, ४ उपशय आणि ५ संप्राप्ति. या पांच प्रकारांनी रोगाचें ज्ञान होतें. (सार्थ माधवनिदान)

**पुरुषपंचक** — १ गौतम, २ कौशिक, ३ अगस्ति, ४ धाता आणि ५ शुक्र. राष्ट्राराष्ट्रांतील युद्धामुळें स्त्रीपुरुषांना अपत्याचा कंटाळा आला. अखेर पाच पुरुष राहिले ते. (आपटेकृत अजरामर)

**पुष्पपंचक** — १ चाफा, २ आंबा, ३ शमी, ४ कमळ व ५ कण्हेर.
'चम्पकाम्रशमी पद्म करवीर च पञ्चकम् ।' (भविष्य मध्यम पर्व)

**प्राणपंचक** — १ प्राण, २ अपान, ३ व्यान, ४ उदान व ५ समान.

**मघापंचक** — १ मघा, २ पूर्वा, ३ उत्तरा, ४ हस्त व ५ चित्रा.

**मलपंचक** — १ मिथ्याज्ञान, २ अधर्म, ३ आसक्ति, ४ हेतु आणि ५ च्युति. हे पाच अंतःकरणाचे मळ होत. (नकुलीश पाशुपतदर्शन)

**मृगपंचक** — १ मृग, २ आर्द्रा, ३ पुनर्वसु, ४ पुष्य व ५ आश्लेषा.

**विषयपंचक** — १ शब्द, २ स्पर्श, ३ रूप, ४ रस आणि ५ गंध.

**प्रवाळपंचामृत** — १ प्रवाळ, २ मोती, ३ शंख, ४ कवडी व ५ मोत्याचा शिंपला. या पाचांना मिळून प्रवाळपंचामृत असे म्हणतात.

**हरिपाठपंचक** — १ श्रीज्ञानेश्वर, २ एकनाथ, ३ नामदेव, ४ तुकाराम व ५ निवृत्तिनाथ. या पाच संतांच्या " हरिपाठ " ग्रंथास म्हणतात

**भागवत धर्माची पंचाध्यायी** — एकादश स्कंधाच्या पहिल्या पाच अध्यायांना म्हणतात. यांत नारदाने वसुदेव-देवकीस सर्व भागवत धर्मरहस्य सांगितले आहे ( भागवत ११–१ ते ५ )

तो मार्ग दाखवावया पुरा, हाकारी स्त्री शूद्रा पंचाध्यायी ॥ (ए. भा. अ. २)

**रासपंचाध्यायी** — श्रीमत् भागवत दशमस्कंध अध्याय २९ ते ३३. या पाच अध्यायांत भागवतांतील सर्व भक्तिसर्वस्व व काव्यकौशल्य भरलेले आहे. यास रासपंचाध्यायी असे म्हणतात.

**एकनाथपंचायतन** — १ एकाजनार्दन, २ रामाजनार्दन, ३ जनीजनार्दन ४ विठारेणुकानंदन आणि ५ दासोपंत.

**कृष्णपंचायतन** — १ बलराम, २ गरुड, ३ श्रीकृष्ण, ४ अर्जुन आणि ५ उद्धव

**गणेशपंचायतन** — १ विष्णु, २ शिव, ३ गणेश, ४ सूर्य आणि ५ देवी.

" मध्ये गणपतिर्विष्णुशिवसूर्यांबिका इशानादिक्रमेण. " (धर्मसिंधु)

**देवतापंचायतन** — १ सूर्य ( उग्र प्रकाश ), २ चंद्र ( सौम्य प्रकाश ), ३ वायु ( गति ), ४ अग्नि ( ताप ) आणि ५ आप ( शांति ). (अथर्ववेद)

**दत्तपंचायतन** — १ सूर्य, २ अनसूया, ३ दत्त, ४ अग्नि व ५ गणपति. अशा पूजा प्रकार इंदापुरास ( जि. पुणे ) आहे ( स्वराज्य साप्ताहिक )

**देवीपंचायतन** — १ विष्णु, २ शिव, ३ देवी, ४ गणेश आणि ५ सूर्य

**बद्रीशपंचायतन** — १ गणेश, २ कुबेर, ३ बद्रीनाथ, ४ लक्ष्मी व ५ नरनारायण.

**रामपंचायतन** — ( अ ) १ श्रीराम ( जानकीसह ), २ लक्ष्मण, ३ भरत, ४ शत्रुघ्न व ५ मारुती हे पाच मिळून रामपंचायतन होते.

**वारकरीपंचायतन** — १ नामदेव, २ ज्ञानदेव, ३ तुकाराम, ४ एकनाथ व ५ निळोबा.

**विष्णुपंचायतन** — १ शिव, २ गणेश, ३ विष्णु, ४ सूर्य व ५ देवी.

**शिवपंचायतन** — १ विष्णु, २ सूर्य, ३ शिव, ४ गणेश व ५ देवी.

**समर्थपंचायतन** — १ श्रीसमर्थ, २ जयरामस्वामी वडगावकर, ३ रंगनाथस्वामी निगडीकर, ४ केशवस्वामी भागानगरकर आणि ५ आनंदमूर्ति ब्रह्मनाळकर.

**सूर्यपंचायतन** — १ शिव, २ गणेश, ३ सूर्य, ४ विष्णु व ५ देवी.

**श्रीज्ञानेश्वरपंचायतन** — १ निवृत्ति. २ ज्ञानदेव, ३ सोपान, ४ मुक्ताबाई आणि ५ चांगदेव तथा चांगावटेश्वर.

**श्रीशिवपंचस्थली (शिवाजीमहाराजांची)** — १ जन्मभूमि–शिवनेरी, २ कार्यारंभ–तोरणा, ३ बलिदान–घोडखिंड, ४ प्राणार्पण–सिंहगड आणि ५ समाधि–रायगड.

**श्रीसमर्थपंचस्थली** — १ जन्मभूमि जांब, २ तपोभूमि-टाकळी, ३ कार्यभूमि कृष्णातीर, ४ इष्ट देवता स्थापना स्थळ-चाफळ आणि ५ समाधि –सज्जनगड.

**श्रीकृष्णचरित्रांतील लीलायुगुलपंचक** —( १ दोन पिता वसुदेव नंद, २ दोन माता देवकी, यशोदा, ३ दोन भगिनी सुभद्रा, द्रौपदी, ४ दोन गुरु श्रीदुर्वास, सांदीपनि आणि ५ दोन शिष्य अर्जुन, उद्धव, याखेरीज श्रीकृष्णांनी निर्माण केलेले ग्रंथहि दोनच आहेत. गीता आणि भागवत. )

# ६

**षट्कर्मे ( उपजीविकेची )** — १ असि, २ मसि, ३ कृषि, ४ वाणिज्य ५ शिल्प आणि ६ पशुपालन. ( जैनधर्मादर्श )

**षट्कर्मे ( गृहिणीचीं )** — १ देवपूजन, २ अतिथिपूजन ( आल्या-गेल्याचा समाचार ), ३ तुलसीपूजन, ४ गोग्रास देणें, ५ अर्घ्यदान देणें, आणि ६ दीपदान.

देव-अतिथि-तुलसी पूजा गौआसे हितग्रासप्रधान ।
अर्घ्यदान और दीपदान ये गृहिणीके षट्कर्म प्रधान ॥

**षट्कर्मे ( नित्याचीं )** — १ स्नान, २ सध्योपासना, तथा जप, ३ दान, ४ देवपूजा, ५ अतिथिसत्कार आणि ६ वैश्वदेव.

सध्यास्नान जपो होम देवताना च पूजनम् ।
आतिथ्य वैश्वदेव च षट्कर्माणि दिनेदिने ॥ ( प. स्मृति १ ३९ )

**षट्कर्मे ( ब्राह्मणाचीं )** — १ अध्ययन, २ अध्यापन, ३ यजन, ४ याजन, ५ दान आणि ६ परिग्रह. ( मनु. १० ७५ )

**षट्कर्मे ( मंत्रतंत्र विद्येंतील )** — १ जारण, २ मारण, ३ उच्चाटन, ४ मोहन, ५ स्तमन, व ६ विध्वसन

**षट्कर्मे ( वैश्याचीं )** — १ पशूचें रक्षण, २ दान, ३ यज्ञ, ४ अध्ययन, ५ व्यापार आणि ६ व्याजबट्टा व शेती. ( मनु. १ ९० )

**षट्कर्मे ( जैनधर्म )** — १ देवपूजा, २ गुरुउपासना, ३ स्वाध्याय, ४ सयम, ५ तप आणि ६ दान.

**षट्कर्मे ( सन्यास मार्गाचीं )** — १ भिक्षाटन, २ जप, ३ शौच, ४ स्नान, ५ ध्यान आणि ६ देवताचन

**षट्कर्मे ( हठयोग )** — १ धौति, २ बस्ति, ३ नेति, ४ नौलि, ५ कपालभाति आणि ६ त्राटक. ( ह. प्र. )

**षट्कोष** — १ त्वचा, २ रुधिर, ३ मांस, ४ मज्जा, ५ अस्थि आणि ६ मेद

**षट्चक्र ( शरीरांतील ) व त्यांचीं स्थानें** — ( अ )

१ मूलाधार चक्र अथवा पृथ्वीचक्र—गुदद्वार व वृषण याच्या मध्यावर.
२ स्वाधिष्ठानचक्र अथवा आपचक्र—जननेंद्रियाच्यावर व नाभीच्या खालीं.
३ मणिपूरचक्र अथवा अग्निचक्र—नाभिस्थान
४ अनाहतचक्र अथवा वायुचक्र—हृदयस्थान

५ विशुद्धिचक्र अथवा आकाशचक्र—कंठस्थान.

६ आज्ञाचक्र अथवा मनश्चक्र—भ्रूमध्यावर.

मानवदेहास आधारभूत अशीं हीं चक्रें सुषुम्नानामक नाडीवर असतात. ( शिवसंहिता ) या चक्रांना कमळें असेंहि म्हणतात.

सेरीज अथवा वेदांत आणखी दोन—७ ललनाचक्र—जिव्हेच्या मुळाशीं. ८ सहस्रारचक्र—मस्तकांत, अशीं आठ असल्याचें वर्णन आहे. ( अथर्व अनु-मराठी )

( आ ) १ त्रिकुट, २ श्रीहाट, ३ गोल्हाट, ४ औटपीठ, ५ भ्रमरगुंफा व ६ ब्रह्मरंध्र ( ज्ञानेश्वराचे अभंग )

**षट्प्रश्न** — १ धर्म, २ अर्थ, ३ काम, ४ मोक्ष, ५ व्यवहार व ६ तत्त्वज्ञान. हीं सहा जाणणारा.

**षट्शक्ति** — १ पराशक्ति, २ ज्ञानशक्ति, ३ इच्छाशक्ति, ४ क्रियाशक्ति, ५ कुंडलिनीशक्ति आणि ६ मातृकाशक्ति. या सहा शक्ति मानव शरिरांत आहेत ( कल्याण शक्ति अंक )

**षट्शास्त्रें** — १ धर्मशास्त्र, २ सांख्यशास्त्र, ३ वेदान्तशास्त्र, ४ न्याय शास्त्र, ५ कामशास्त्र, आणि ६ योगशास्त्र ( दर्शनप्रकाश ), १ कापालिक, २ लोकायतिक, ३ दिगंबर, ४ शून्यवादी, ५ निरीश्वरवादी आणि ६ चार्वाक. ( वाचस्पतिमिश्र )

**षट्संपत्ति** — १ शम–मनोनिग्रह, २ दम–इंद्रियनिग्रह, ३ तितिक्षा–शीतोष्णादिक द्वंद्व सहन करणें, ४ उपरति–स्वधर्मानुष्ठान, ५ श्रद्धा आणि ६ समाधान. या अध्यात्मविषयांतील संपत्ति होत (कल्याण योगांक). या सहा साधनांस शमादिषट्क म्हणतात.

**षट्स्थल** — १ भक्त, २ महेश, ३ प्रसादि, ४ प्राणलिंगी, ५ शरण व ६ ऐक्य. सहा षट्स्थल म्हणजे मोक्षाच्या सहा पायऱ्या ( वीरशैव ग्रं. )

**षडूर्मि** — १ शोक, २ मोह, ३ जरा, ४ मृत्यु, ५ क्षुधा व ६ पिपासा. या सहा ऊर्मि म्हणजे संसाररूपी समुद्राच्या लहरा होत

**षडूषण** — १ पिंपळी, २ पिंपळमूळ, ३ चवक, ४ चित्रक, ५ सुंठ व ६ मिरीं. ( नूतनामृतसागर )

**षड्ऋतु** — १ वसंत–चैत्र, वैशाख; २ ग्रीष्म–ज्येष्ठ, आषाढ; ३ वर्षा–श्रावण, भाद्रपद; ४ शरद्–आश्विन, कार्तिक; ५ हेमंत–मार्गशीर्ष, पौष व ६ शिशिर–माघ, फाल्गुन.

"षड्वा ऋतवः संवत्सरस्य।" (शतपथ)

**षड्गया** — १ गया–गयाक्षेत्र, २ गय–देशवाचक अथवा गय नांवाचा राजा होऊन गेला–ज्यानें शंभर अश्वमेध केले, ३ गयादित्य, ४ गायत्री, ५ गदाधर व ६ गयेंतील गयासुर–याचा देह ब्रह्माने यज्ञाकरितां मागितला व तो त्याने लोकोपकारार्थ दिला म्हणून. अशीं सहा गया स्थानें मुक्तिदायक होत.

गया गयो गयादित्यो गायत्री च गदाधरः।
गयागयासुरश्चैव षड्गया मुक्तिदायकाः॥ (वायु.उत्तरार्ध ५०–७३)

**षडंगें (कला साधनेचीं)** — नैपुण्य, २ योग्यता, ३ लोकसंग्रह, ४ लोकमन, ५ काळ आणि ६ उपासना (माकडी निरोपाक)

**षडंगें (दानाचीं)** — १ दाता, २ प्रतिग्रहीता (घेणारा), ३ पवित्रता, ४ वस्तु, ५ देश (स्थान) आणि ६ काल.

दाता प्रतिग्रहीता च शुद्धिर्देयं च धर्मयुक्।
देशकालौ च दानानामङ्गान्येतानि षड् विदुः॥ (स्कंदमाहेश्वर २ ५०)

**षडंगें (योगाचीं)** — १ आसन, २ प्राणायाम, ३ प्रत्याहार, ४ धारणा, ५ ध्यान व ६ समाधि.

आसनं प्राणसंरोधः प्रत्याहारश्च धारणा।
ध्यानं समाधिरेतानि योगाङ्गानि भवन्ति षट्॥ (स्कंद काशी ४१–५९)

**षडंगें (वेदाचीं)** — १ शिक्षा–उच्चार शास्त्र (वेदाचे घ्राणेंद्रिय), २ कल्प सूत्र–यज्ञशास्त्र (वेदाचे हात), ३ व्याकरण–शब्दशास्त्र (वेदाचें मुख) ४ निरुक्त–कोश (वेदाचे कान), ५ छंद–वृत्त, (वेदाचे चरण) आणि ६ ज्योतिष, (वेदाचे नेत्र). (तत्त्व निज-बोध)

शिक्षा कल्पो व्याकरणं निरुक्तं छंदसामिति।
ज्योतिषं नयनं चैव षडङ्गो वेद उच्यते॥ (सु)

**षडंगें (सैन्याचीं)** — १ रथ, २ हत्ती, ३ घोडे, ४ पायदळ ५ गाडे आणि ६ उंट. अशीं महाभारत काळीं, सेनेचीं सहा अंग होतीं.

**षड्गुण** — ( अ ) १ ऐश्वर्य, २ धर्म, ३ यश, ४ श्री, ५ ज्ञान व ६ वैराग्य. हे सहा ईश्वरी गुण मानले आहेत.

ऐश्वर्यस्य समग्रस्य वीर्यस्य यशसः श्रियः ।
ज्ञानवैराग्ययोश्चैव षण्णां भग इतीरणा ॥ ( बृहन्नारदीय पूर्वखंड )

( आ ) १ कर्तृत्व, २ नियंतृत्व, ३ भोक्तृत्व, ४ विभुत्व, ५ साक्षित्व आणि ६ सर्वेश्वत्व ( ब्रह्मकाश ), ( इ ) १ सर्वज्ञता, २ तृप्ति, ३ अनादिज्ञान, ४ स्वातंत्र्य, ५ शक्तिप्रभाशन आणि ६ अनंतशक्तित्व. असे सहा गुण श्रीकृष्णाचे ठिकाणी होते. ( हरिवंश-विष्णुपर्व अ. ६५ )

**षड्गुण गायनातील** — १ सुस्वर, २ सुरस, ३ सुराग, ४ मधुराक्षर, ५ सालंकार आणि ६ प्रमाण.

सुस्वरं सुरसं चैव सुरागं मधुराक्षरम् ।
सालंकारं सप्रमाणं षड्विधं गीतलक्षणम् ॥ ( रागविलास )

**षड्गुण ( राजनीतिशास्त्र )** — १ संधि-प्रसंगी एकमेकास मदत करणें, २ विग्रह-युद्ध, ३ यान-शत्रूवर चाल करून जाणें, ४ आसन-शत्रूची उपेक्षा करणें, ५ द्वैधीभाव-केव्हा संधि केव्हां विग्रह करणें ( दुटप्पी धोरण ) आणि ६ संश्रय-दुसऱ्याचा आश्रय घेणें-बलिष्ठ सत्तेशीं स्पर्धा न करणें. ( मनु ७-१६० )

**षड्दर्शनें** — ( अ ) १ न्याय, २ वैशेषिक, ३ वेदान्त, ४ बौद्धमत, ५ सांख्य आणि ६ पूर्वमीमांसा.

'बौद्धमतसंकेतु वार्तिकांचा' ( ज्ञानेश्वरी १-१२ )

(आ) १ सौर, २ शाक्त, ३ गाणपत्य, ४ शैव, ५ वैष्णव ६ स्कांद.

**षड्दर्शनें व षड्दर्शनप्रणेते** — १ सांख्य-कपिलमुनि, २ योग-पतंजलि, ३ न्याय-गौतम, ४ वैशेषिक-कणाद, ५ पूर्वमीमांसा-जैमिनि आणि ६ वेदान्त-बादरायण ( व्यास )

सांख्यस्य कर्ता कपिलो न्यायसूत्रस्य गोतम ।
पतंजलिस्तु योगस्य कर्ता योगीश्वरो महान् ॥
वैशेषिकस्य काणादो मीमांसायाश्च जैमिनिः ।
वेदान्तशास्त्रस्य कर्ता व्यासो नारायणः स्वयम् ॥ ( सु. )

**षड्दोष** — १ झोप, २ तन्द्रा, ३ भीति, ४ क्रोध, ५ आळस व ६ चेंगटपणा.

षड्दोषाः पुरुषेणेव हातव्या भूतिमिच्छता । (हितो.)

**षड्द्रव्ये (जैनधर्म)** — १ जीवद्रव्य, २ पुद्गलद्रव्य, ३ धर्मद्रव्य, ४ अधर्मद्रव्य, ५ कालद्रव्य आणि ६ आकाशद्रव्य.

**षडाधिप** — १ राजा, २ मंत्री, ३ सस्यधान्येश, ४ मेघेश, ५ रसेश व ६ पश्चाद्धान्येश. (पंचांग)

**षडक्षरी मंत्र** — (अ) ॐ नमः शिवाय.

"सर्वमंत्राधिकश्चाय आकाराद्य षडक्षर" (शिवपुराण)

(आ) ॐ विष्णवे नमः. (इ) राम-कृष्ण हरि हा मंत्र भगवद्भक्त तुकाराम यास त्याचे गुरूकडून स्वप्नात मिळाला त्या दिवशी माघ शु. १० गुरुवार होता.

(ई) "ॐ माणपद्मे हूँ" हा मंत्र बौद्धाचा

**षडभिषक् संहिता** — १ अग्निवेश, २ भेड, ३ जातुकर्ण, ४ पराशर, ५ हारीत व ६ क्षारपाणि या अत्रिपुत्र पुनर्वसू पढविलेल्या सहा शिष्यांनी लिहिलेल्या आयुर्वेदावरील ग्रंथास म्हणतात (विज्ञान उदय आणि विकास)

**षड्भुज गणेश देवतेची सहा आयुधे व विषय** — १ परशु-तर्क (न्याय), २ अंकुश-नीतिभेद (वैशेषिक), ३ मोदक-वेदान्त (उत्तर-मीमांसा) ४ भग्नदंत-मीढमत (पूर्वमीमांसा), ५ कमल-सत्कारवाद (सांख्य), आणि ६ अभय-धमप्रतिष्ठा (योग) ज्ञानेश्वरी अ. १ ला विवरण.

**षण्मुखीमुद्रा** — २ दोन कानांची दोन भोकें, २ डोळे व २ नाक पुड्या. हा सहा हाताच्या बोटांना दाबून करावयाचा एकमुद्रा.

**षण्मुद्रा** — १ भूचरा, २ चाचरी, ३ अगोचरा, ४ खेचरा, ५ उन्मनी व ६ अलक्ष्य. (ह. प्र)

**षड्योग कपिलाषष्ठी** — १ भाद्रपद मास, २ कृष्णपक्ष, ३ मंगळवार, ४ षष्ठी, ५ रोहिणी नक्षत्र व ६ व्यतिपात. असे सहा योग एकत्र आल्यास त्यास कपिलाषष्ठी म्हणतात हा योग प्राय साठ वर्षांनीं येतो. (धर्मसिंधु)

**षड्रस** — १ गोड, २ आंबट, ३ तिखट, ४ कडू, ५ खारट, आणि ६ तुरट.

“ षड्रस जीवन चालवी । षड्रिपु माया प्रसवी ”

मधुराम्लकटुतिक्तखारकषाया षड्रसा ।। (च. स.)

**षड्रिपु** — १ काम, २ क्रोध, ३ मोह, ४ लोभ, ५ मद आणि ६ मत्सर. हे मनुष्याच्या मनाचे शत्रु समजले गेलेले सहा विकार.

**षड्राग (गायनशास्त्रातील)** — १ श्री, २ वसंत, ३ भैरव, ४ पंचम, ५ मेघ किंवा मेघमल्हार व ६ बृहन्नाट किंवा नट्नारायण. हे सहा पुरुष राग होत.

श्रीरागोऽथ वसंतश्च भैरव पंचमस्तथा ।

मेघरागो बृहन्नाटो षडेते पुरुषा स्मृता ।। (संगीतरत्नाकर)

**षडंगोदक** — १ नागरमोथा, २ पित्तपापडा, ३ वाळा, ४ काळा वाळा, ५ रक्तचंदन आणि ६ सुंठ. या सहा जिनसा घालून उकळलेले ऊन पाणी.

**षडंगन्यास** — १ हाताची बोटे, २ तळहाताच्या मागचा भाग, ३ हृदय, ४ मस्तक, ५ शिखा आणि ६ नेत्र. गायत्री मंत्रात शरीरशुद्धीसाठी या सहा अवयवांस स्पर्श करावयाचा असतो.

**षडंगभक्ति** — १ समरस भक्ति, १ आनंद भक्ति, ३ अनुभव भक्ति, ४ अवधान भक्ति, ५ निष्ठा भक्ति आणि ६ सद्भाव भक्ति. असे सहा भक्तीचे प्रकार वारकरी संप्रदायात मानले आहेत.

**षड् लवण** — १ मीठ, २ सैंधव, ३ सचळ, ४ बीडलोण, ५ रोमक आणि ६ पासुन. (निघंटु)

**षड्विकार** — (अ) १ अस्ति गर्भात संभवणे, २ जायते-जन्मास येणे, ३ वर्धते-वाढणे, ४ विपरिणमते तारुण्यात येणे, ५ अपक्षीयते वृद्धत्व येणे आणि ६ विनश्यति मरण. हे सहा विकार देहाला असतात (आ) १ जन्म, २ वृद्धि, ३ परिणाम म्हणजे बदल, ४ क्षय, ५ रोग व ६ मृत्यु. (विवेकचूडामणि)

**षड्विधि (गणितशास्त्र)** — १ बेरीज, २ वजाबाकी, ३ गुणाकार, ४ भागाकार, ५ वर्गमूळ आणि ६ घनमूळ. अशा गणिताच्या सहा प्रक्रिया अथवा प्रकार आहेत.

**षड्विध अधिकारी** — १ मनु, २ मनुपुत्र, ३ देव, ४ ऋषि, ५ इंद्र व ६ परमेश्वरी अवतार. प्रत्येक मन्वतरात या सहा प्रकारच्या अधिकाऱ्यांची योजना लोकस्थिति चांगली राखण्यासाठी आहे अशी कल्पना आहे. ( भाग–स्कंध ८ )

**षड्विध अन्न** — १ भक्ष्य–चर्वण करून खाण्याचे भाकरी, पोळी वगैरे, २ भोज्य भात वगैरे, ३ पेय प्यावयाचे, ४ लेह्य चाटून खाण्याचे पंचामृत वगैरे, ५ चोष्य चोखून खाण्याचे व ६ पिच्छिल–चटण्या-कोशिंबिरी.

भक्ष्य भोज्य च पेय च लेह्य चोष्य च पिच्छिलम् ।
इति भेदा षडन्नस्य मधुराद्याश्च षड्रसा. ॥ ( सु )

**षड्विध भक्ति** — १ श्रद्धा भक्ति, २ नैष्ठिक भक्ति, ३ अवधान भक्ति, ४ अनुभवभक्ति, ५ आनंद भक्ति आणि ६ समरस भक्ति. असे भक्तीचे सहा प्रकार वीरशैव संप्रदायात मानले आहेत. ( विवेक चिंतामणि )

**षड्विधभाव** — १ दास्यरति, २ सख्यरति, ३ वात्सल्यरति, ४ शान्त रति, ५ कान्तरति आणि ६ अद्भुतरति. असे भक्तिरसाला पोषक सहा भाव अथवा रस मानले आहेत.

**षड्विधसाधनें आदर्श गृहस्थ धर्माचीं** — १ धन, २ कीर्ति, ३ न्याय्यवर्तन, ४ राष्ट्रसेवा, ५ विचार व ६ विमर्शित्व ( विवेक ) ( चिन्मयजगत् मासिक )

**षट्सूत्रें** — १ जैमिनीय सूत्र, २ आश्वलायन सूत्र, ३ आपस्तंब सूत्र, ४ बौधायन सूत्र, ५ कात्यायन सूत्र आणि ६ वैशेषिक सूत्र. हीं सहा गृह्य सूत्र होत.

**सहा अंगें चित्रकलेचीं** — १ रूपभेद, २ प्रमाण, ३ भाव, ४ लावण्ययोजना, ५ सादृश्य व ६ वर्णिकाभंग–विषयानुकूल रंगाचा यथोचित प्रयोग.

रूपभेदो प्रमाणानि लावण्य भावयोजनम् ।
सादृश्य वर्णिकाभङ्गमिति चित्रषडङ्गकम् ॥ ( वा कामसूत्रे–यशोधरा टीका )

**सहा अंगें नाटकाचीं** — १ कथानक, २ स्वभाव, ३ भाषाशैली, ४ विचार, ५ देखावे–सजावट व ६ संगीत हीं होत. ( ॲरिस्टॉटल )

**सहा अंगें योगाचीं**— १ प्रत्याहार, २ ध्यान, ३ प्राणायाम, ४ धारणा ५ तर्क आणि ६ समाधि.

"तर्कश्चैव समाधिश्च षडंऽगो योग उच्यते" (अमृतनादोपनिषद्)

**सहा अणुव्रतें** — १ हिंसा, २ लबाडी, ३ चोरी, ४ मैथुन, ५ परिग्रह व ६ रात्रीं भोजन न करणें. हीं सहा अणुव्रत जैनधर्मांत मानलीं आहेत. (रत्न-श्रावकाचार अ. ३)

**सहा अतिरथी भारतीय युद्धांतले** — १ अर्जुन, २ अभिमन्यु, ३ द्रोण, ४ अश्वत्थामा, ५ भूरिश्रवा व ६ भीष्म.

अह भूरिश्रवाश्चैव षडेतेऽतिरथाः स्मृताः (भारतसावित्री)

**सहा अवस्था (वस्तुमात्रांच्या)** — १ उत्पत्ति, २ अस्तित्व, ३ वृद्धि, ४ बदल-परिणत होणें, ५ क्षय-क्षीण होणें आणि ६ नाश पावणें. या सहा अवस्था प्रत्येक वस्तुमात्राला आहेत.

"क्षयश्च षष्ठमी भावा. विकाराः कालनिर्मिताः (शिवभारत. अ. ८)

**सहा अवस्था (स्थूल शरीराचे काल)** — १ शिशु एक वर्ष, २ कौमार दोन ते पांच वर्षें, ३ पौगंड सहा ते दहा वर्षें, ४ किशोर अकरा ते पधरा, ५ यौवन-सोळा ते चाळीस वर्षेंपर्यंतचा काल व ६ जरा चाळीस वर्षांनंतरचा काल. (मो. प्र.)

**सहा अधिष्ठानें (दानाचीं)** — १ धर्म, २ अर्थ, ३ काम, ४ व्रीडा (लज्जा), ५ हर्ष व ६ भय. हीं दानाचीं सहा अधिष्ठानें होत.

**सहा अनर्थ सदैव टाळावेत** — १ अतिनिद्रा, २ आळस, ३ भय, ४ क्रोध, ५ मृदुता आणि ६ चेंगटपणा.

'निद्रालस्य भय क्रोधो मार्दवं दीर्घसूत्रता ॥' (म. भा. सभा. ५ १२८)

**सहा आस्तिक दर्शनें** — १ सांख्य, २ पातंजल, ३ पूर्वमीमांसा, ४ उत्तरमीमांसा, ५ न्याय व ६ वैशेषिक. हीं सहा आस्तिक दर्शनें होत

**सहा उपाय (पैसा मिळविण्याचे)** — १ भीक मागणें, २ सरकारी चाकरी, ३ कला (हुन्नर), ४ शेती, ५ सावकारी आणि ६ व्यापार-उदीम करणें. (पंचतंत्र)

**सहा उपदर्शनें** — १ योगाभ्यास, २ सन्यास, ३ जैन, ४ बौद्ध, ५ प्राभाकर आणि ६ चार्वाक. (म. वा. को.)

**सहा कर्तव्यें ( संन्यासाश्रमास विहित )** — १ भिक्षेवर निर्वाह, २ जप, ३ ध्यान, ४ स्नान, ५ शौच आणि ६ देवतापूजन ( *यतिधर्मसंग्रह* )

**सहा उपरत्नें** — १ वैक्रांत, २ सूर्यकांत, ३ चंद्रकांत, ४ राजावर्त, ५ लाल आणि ६ पेरोज.

(सहा कर्ण — १ भातृयांत-महारथी कर्ण, २ कौरवांत-विकर्ण, ३ क्षेत्रांत-गोकर्ण, ४ राक्षसांत-कुंभकर्ण, ५ घोड्यांत-श्यामकर्ण, आणि ६ देहांत-अंतःकरण. हे सहा कर्ण म्हणून वाङ्मयांत प्रसिद्ध आहेत.)

**सहा कलिकौतुकें** — १ संत-दुःखी, २ असंतांचा उदोउदो, ३ मुलें अल्पायुषी, ४ मातापितरें दीर्घायु, ५ परक्यांशीं मैत्री आणि ६ स्वकीयांशीं वैर. हीं सहा *कलिकौतुकें मध्ययुगांत अनुभवास येतात.*

सीदन्ति सन्तो विलसन्त्यसन्तः पुत्रा म्रियन्ते जनकश्चिरायुः ।
*परेषु मैत्री स्वजनेषु वैरं पश्यन्तु लोकाः कलिकौतुकानि ॥* ( *सु.* )

**सहा कालविभाग** — १ वर्ष, २ अयन, ३ ऋतु, ४ मास, ५ पक्ष आणि ६ दिवस. असे सहा कालविभाग मानले आहेत. ( धर्मसिंधु )

**सहा कारणांनीं रोगोत्पत्ति होते** — १ अति पाणी पिणें, २ अति कठीण पदार्थ खाणें, ३ धातुक्षय, ४ मलमूत्रावरोध, ५ दिवसा झोप आणि ६ रात्रीं जागरण.

*अत्यम्बुपान कठिनाशनश्च धातुक्षयो वेगविधारण च ।*
*दिवाशयो जागरणं च रात्रौ षड्भिर्नराणां प्रभवन्ति रोगाः ॥* ( *सु.* )

**सहा कारणें प्रायः परमार्थप्रवृत्तीचीं** — १ वंचना, २ अज्ञानाची निद्रा, ३ अविवेकाचें आधळेपण, ४ जगातील अन्याय, ५ पापाची जाणीव व ६ जरामृत्यूचें दुःख. ( *परमार्थपर व्याख्यानें* )

**सहा कारणें सृष्ट्युत्पत्तीसंबंधीं ( आयुर्वेदमतें )** — १ स्वभाववाद, २ ईश्वरवाद, ३ कालवाद, ४ यदृच्छावाद, ५ परिणामवाद आणि ६ नियतिवाद. ( *सुश्रुत-शारीर १-११* )

**सहा कुलपरीक्षेचीं लक्षणें** — १ सामानसुमान, २ जन्मभूमि, ३ घर, ४ आचार, ५ अन्न आणि ६ आच्छादन. या सहा गोष्टींवरून कुलाची परीक्षा केली जाते.

**सहा गायनमहर्षि** — १ अग्नि, २ ब्रह्मा, ३ रुद्र, ४ विष्णु, ५ नारद आणि ६ तुंबर.

वह्निर्वेधाः शशावश्च लक्ष्मीनायस्तथैव च ।
नारदस्तुंबरुश्चैव षड्जादीना ऋषीश्वराः ॥ ( गायनाचार्यमाला )

**सहा गुण ( आत्म्याचे )** — १ सर्वज्ञत्व, २ नित्यत्व, ३ नियन्तृत्व, ४ बोधरूपत्व, ५ स्वतंत्रत्व आणि ६ नित्यस्फूर्ति. ( अ. रा. उत्तर सर्ग. ५ )

**सहा गुण ऐश्वर्यप्रत नेणारे** — १ उद्योग, २ साहस, ३ धैर्य, ४ बल, ५ बुद्धि आणि ६ पराक्रम.

उद्यमः साहस धैर्य बल बुद्धिः पराक्रमः ।
षडिमे यत्र तिष्ठन्ति स सर्व प्राप्नुयात् पुमान् ॥ ( सु. )

**सहा गुण कुत्र्यापासून घ्यावेत** — १ पुष्कळ खाणे, २ अल्पसंतुष्टता, ३ झोप सावध, ४ एकदम तुटून पडणें, ५ इमानी आणि ६ शूर. ( च. चा. ६–२० )

**सहा गुण नाट्य कर्त्यास आवश्यक** — १ बहुश्रुतता, २ प्रतिभा, ३ भाषाप्रभुत्व ४ शब्दलालित्य, ५ प्रसाद आणि ६ स्वतः नट ( रंगभूमि )

**सहा गुण ( पाठकाचे )** — १ गोडी, २ स्पष्टोच्चार, ३ पदे पाडून म्हणणें, ४ गोड आवाज, ५ धीटपणा आणि ६ तन्मयता.

माधुर्यमक्षरव्यक्तिः पदच्छेदस्तु सुस्वरः
धैर्य लयसमर्थ च षडेते पाठका गुणाः ॥ ( पाणिनिशिक्षा )

**सहा गुण मनुष्यानें टाकूं नयेत** — १ सत्य, २ परोपकार, ३ अनालस्य, ४ अनसूया, ५ क्षमा आणि ६ धैर्य. ( प्रमाणसाहस्त्री )

**सहा गुण ( मित्रत्वाचे )** — १ कायम टिकणारा, २ अनुकूल, ३ सहज किंवा अल्प प्रयासानें सज्ज होणारा, ४ वाडवडिलापासून चालत आलेला, ५ वैभवशाली आणि ६ प्रतारणा न करणारा. असे मित्राचे सहा गुण म्हणून सांगितले आहेत.

नित्य वश्य लघूत्थान पितृपैतामह महत् ।
अद्वैध्य चेति सम्पन्न मित्र षड्गुणमुच्यते ॥ ( कौटिल्य अ. १०७ )

**सहा गुण पद्यरचनेस आवश्यक** — १ मृदु, ललित, आणि सोपी शब्दरचना, २ व्याकरण शुद्धता, ३ सुसंगतता, ४ चेचक शब्दाचा उपयोग, ५ प्रसंगानुसार भाषा व चाल व ६ रचनेत सहजता (नाट्य-शास्त्र आणि तर).

**सहा गोष्टी प्रारब्धाधीन** — १ हानि, २ लाभ, ३ जनन, ४ मरण, ५ यश व ६ अपयश या सहा गोष्टी प्रारब्धवशात् ज्या समयीं ज्या स्थानीं घडावयाच्या त्या ठिकाणीं तेव्हांच त्या घडतात (तुलसीरामायण-टीप)

**सहा गोष्टी बल वाढविणाऱ्या** — १ ताजें मांस, २ ताजें अन्न, ३ तरुण स्त्री, ४ दुधाचे पदार्थ, ५ तूप आणि ६ ऊन पाणी.

सद्योमांसं नवान्नं च बाला स्त्री क्षीरभोजनम् ।
घृतमुष्णोदकं चैव सद्य प्राणकराणि षट् ॥ (शा. नि.)

**सहा गोष्टी ब्रह्मचर्यास वर्ज्य** — १ सुखशय्या, २ वेषभूषा, ३ तांबूल, ४ अभ्यंगस्नान, ५ दन्तकाष्ठ वापरणें आणि ६ सुगंधी पदार्थ सेवन.

सुखशय्यासनं वस्त्रं तांबूलं स्नानमज्जनम् ।
दन्तकाष्ठं सुगंधं च ब्रह्मचर्यस्य दूषणम् ॥ (शिवपुराण)

**सहा गोष्टींत मौन आवश्यक** — १ शौच, २ विषयसेवन, ३ लघवी, ४ दांत घासणें, ५ श्राद्धकाल व ६ भोजन.

उच्चारे मैथुने चैव प्रस्रावे दन्तधावने ।
श्राद्धे च भोजने चैव षट्सु मौनं समाचरेत् ॥ (हारीत)

**सहा गोष्टी योगाला साधक** — १ उत्साह, २ साहस, ३ धैर्य, ४ भावना, ५ अभ्यास चालू ठेवण्याचा निश्चय व ६ विषयीजनसंग त्याग.

**सहा गोष्टी योगाभ्यासाला बाधक** — १ अति आहार, २ अधिक श्रम, ३ फार बोलणें, ४ उपोषण (एकादशी वगैरे आवश्यक उपोषणाखेरीज), ५ योगाभ्यासीं नव्हेत अशाची संगति व ६ जिह्वालौल्य.

अत्याहारः प्रयासश्च प्रजल्पो नियमग्रहः ।
जनसंगश्च लौल्यं च षड्भिर्योगो विनश्यति ॥ (ह. प्र.).

**सहा गोष्टी लघुता म्हणजे कमीपणा आणणाऱ्या** — १ लहान मुलांबरोबर सख्यत्व, २ अकारण हास्य, ३ स्त्रियांशीं वाद, ४ असज्जनाची सेवा, ५ गर्दभ-वाहनाचा योग आणि ६ ग्राम्यभाषा. (सु.)

**सहा गोष्टी विडंबन करणाऱ्या** — १ ब्राह्मण–पण मूर्ख, २ स्थविर (वृद्ध)–पण कामी, ३ कामी–पण दरिद्री, ४ धनवान्–पण तपस्वी, ५ वेश्या –पण कुरूप आणि ६ थोर–पण कृपण.

**सहा गोष्टी क्षणिक असतात** — १ ढगाची छाया, २ दुर्जनाची प्रीति, ३ शिजलेले अन्न, ४ स्त्री, ५ तारुण्य आणि ६ धन.

अभ्रच्छाया खलप्रीतिः सिद्धमन्नं च योषितः ।
किंचित्कालोपभोग्यानि यौवनानि धनानि च ॥ (पंचतंत्र)

**सहा गोष्टी क्षणभंगुर होत** — १ यौवन, २ जीवित, ३ मन, ४ शरीराची सावली, ५ लक्ष्मी आणि ६ स्वामित्व (नीतिशास्त्र).

**सहा गोष्टी संसारांत सुखप्रद** — (अ) १ धनलाभ, २ निरोगी प्रकृति, ३ प्रियमित्र, ४ मधुरभाषिणी स्त्री व ५ आज्ञाधारक पुत्र आणि ६ द्रव्य मिळवून देणारी विद्या; (आ) १ आरोग्य, २ ऋण नसणें, ३ सारखा प्रवास नसणें, ४ सज्जनसमागम, ५ अनुकूल उपजीविका आणि ६ भयरहित वसतिस्थान. ही सहा जीवलोकांची सुखें होत. (म. भा. उद्योग ३३–८९)

**सहा गव्य पदार्थांच्या उपयोगानें दुःस्वप्नांचें निवारण होतें** — १ गोमूत्र, २ गोमय, ३ दूध ४ दही, ५ तूप व ६ गोरोचन.

गोमूत्रं गोमयं क्षीरं दधि सर्पिश्च रोचना ।
षडङ्गं परमं पाने दुःस्वप्नादि निवारणम् ॥ (सु.)

**सहा जाती पुरुषांच्या** — १ शश, २ मृग, ३ अश्व, ४ गर्दभ, ५ वृषभ व ६ महिष (टोणगा). (तत्व निजबोध विवेक)

**सहा जाती (बाभळींच्या)** — १ काटे बाभूळ, २ निकाटे बाभूळ, ३ देवबाभूळ, ४ रानबाभूळ, ५ सतबाभूळ, व ६ गुआबाभूळ. (बाभळींचा उपयोग)

**सहा जाती स्त्रियांच्या** — (अ) १ पद्मिनी, २ हरिणी ३ हस्तिनी, ४ चित्रिणी, ५ वडवा आणि ६ शंखिनी. पैकीं सहावी शंखिनी वर्ज्य करून चारांच्या पाच शुभ होत.

'शंखिनी प्रहरुनि अन्य सुंदरी । येरें पंच त्या शुद्धा ॥"

(काशीखंड ४१-६९)

**सहा गुण मिताहारी पुरुषाचा आश्रय करतात** —— १ आरोग्य, २ आयुष्य, ३ बल, ४ सुख, ५ शुद्ध संतति आणि ६ अधाशी म्हणून निंदला न जाणे या सहा गोष्टी मिताहारी पुरुषाला लाभतात (भा उद्योग ३७ ३४)

**सहा गुण राज्यशासकास आवश्यक** —— १ वक्तृत्व, २ शत्रूंचे दमन करण्याची सिद्धता, ३ तर्ककुशलता, ४ स्मरणशक्ति, ५ नीतिशास्त्रज्ञता आणि ६ विद्वत्ता (म भा सभा ५ २२)

**सहा गुण लेखकाचे अंगी असावेत** —— १ बुद्धिमान्, २ समयसूचक, ३ बोलणारा, ३ धीर-गंभीर, ४ जल्द लिहिणारा, ५ संयमी आणि ६ दुसऱ्याचे इंगित संपूर्णपणे जाणणारा

मेधावी वाक्पटुर्धीरो लघुहस्तो जितेंद्रिय ।
परशास्त्रपरिज्ञाता एप लेखक उच्यते ॥ (शु.)

**सहा गुण वधूपरीक्षेकामी उपयुक्त** —— १ कन्या कमनीया-सुडौल म्हणजे पाहताच आकर्षण उत्पन्न करणारा, २ पतिगृह हेंच स्वत चें खरें घर समजून, ३ उभय कुलाचें यश वाढवणारी, ४ पतीचे माम्य वाढविणारी, ५ सासर सोडून इतरत्र कोठेंहि राहू न इच्छिणारी व ६ वृक्षावरील पुष्पाप्रमाणे पितृकुलाला सुगंधित करणारी (अथर्व अनु मराठी भाग ३ रा)

**सहा गुण वरपरीक्षेकामी उपयुक्त** —— १ यम-नियम पालन करणारा, २ धर्मपत्नीचा संतोष वाढविणारा, ३ स्वातंत्र्यप्रिय, ४ परिस्थिति आणि कर्तव्याची जाणीव असलेला, ५ बलवान आणि ६ ज्ञानी (अथर्व अनु-मराठी)

**सहा गुण विद्यापरंपरा चिरकाल टिकण्यास आवश्यक** —— १ स्वाभाविक बुद्धि, २ सतत वाचन ३ दीर्घकाल चिंतन, ४ चर्चा ५ अध्यापन आणि ६ वेदलेखन (स्वराज्य ३ ८ १९६३)

**सहा गुण सत्पुरुषाचे (स्वाभाविक)** —— १ विपत्तीत धैर्य, २ भाग्यकाली सहिष्णुता, ३ सभेत पांडित्य, ४ रणांत शौर्य, ५ यशाविषयी आवड आणि ६ ज्ञानसंपादन करण्याचें व्यसन (भर्तृ नीति)

**सहा सद्गुण सुवैद्यास आवश्यक** —— १ विद्या, २ विचार, ३ अन्यशास्त्राचें ज्ञान, ४ स्मरण, ५ तल्लीनता आणि ६ दीर्घ अनुभव
"यस्यैते षड्गुणास्तस्य न साध्यमतिवर्तते" (चरक सूत्रस्थान ९ २१)

**सहा गुरु** — १ मातापिता, २ मुंडण, (कान फुंकून हातपाय थोपटते) ३ शिक्षक, ४ कर्ममार्गी, ५ नामकरण करणारा व ६ बीजमंत्र देणारा. (सिद्धांत बोध. अ. ५०)

**सहा गोष्टी अग्निविना शरीर जाळणाऱ्या** — १ कुग्रामात वसति, २ दुर्जनाची सेवा, ३ जेवण चांगले नसणे, ४ क्रोधमुखी भार्या, ५ मूर्ख मुलगा आणि ६ विधवा कन्या.

कुग्रामवासः कुलहीनसेवा कुभोजन क्रोधमुखी च भार्या ।
पुत्रश्च मूर्खो विधवा च कन्या विनाग्निना षट् प्रदहन्ति कायम् (सु.)

**सहा गोष्टी अशाश्वत होत** — १ तारुण्य, २ रूप, ३ जीवित, ४ धनसंचय, ५ आरोग्य आणि ६ प्रियजनाचा सहवास. या सहा गोष्टींची शहाण्याने आसक्ति ठेवू नये.

अनित्यं यौवनं रूपं जीवितं द्रव्यसंचयः ।
आरोग्यं प्रियसंवासो मुह्येत् तत्र न पण्डितः ॥ (सु.)

**सहा गोष्टी अभ्युदयाच्या आड येणाऱ्या** — १ आळस, २ स्त्रीमोह, ३ व्याधि, ४ जन्मभूमिवात्सल्य, ५ अल्पसंतुष्टता आणि ६ भीरुता.

आलस्यं स्त्रीसेवा सरोगता जन्मभूमिवात्सल्यम् ।
संतोषो भीरुत्वं षड्व्याघाता महत्त्वस्य ॥ (हितो.)

**सहा गोष्टीमुळें आयुष्याची हानि होते** — १ अमर्याद अभिमान, २ अमर्याद भाषण ३ अमर्याद पाप, ४ क्रोध, ५ आप्पलपोटेपणा व ६ मित्रद्रोह. (म. भा. उद्योग. ३७ १०)

**सहा गोष्टी तत्काळ क्षीण करणाऱ्या** — १ शिळें मांस, २ वृद्ध स्त्री, ३ सकाळचें उन्ह, ४ पूर्ण न विरजलेलें दही, ५ सकाळचें मैथुन आणि ६ निद्रा.

शुष्कमांसं स्त्रियो वृद्धा बालार्कस्तरुणं दधि ।
प्रभाते मैथुनं निद्रा सद्यः प्राणहराणि षट् ॥ (शा. नि.)

**सहा गोष्टी पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें होत** — १ आभाळाची सावली, २ गवतापासून उत्पन्न झालेला अग्नि, ३ दुष्ट पुरुषाच्या ठिकाणची प्रीति, ४ उंबरठ्यावरील पाणी, ५ वेश्येचें प्रेम आणि ६ कुमित्र.

( आ ) १ पद्मिनी २ चित्रिणी, ३ हस्तिनी, ४ शंखिनी, ५ नागिणी व ६ डाकिणी. ( तत्त्व निजबोधविवेक )

**सहा ज्योति ( अवकाशांतला पदार्थ )** — १ सूर्य, २ चंद्र, ३ ग्रह, ४ उल्का, ५ धूमकेतु आणि ६ तारे असे सहा ज्योति अनंत आकाशात आहेत. ( राहु केतु आणि ग्रहणे )

**सहा ठिकाणे आश्रयास पात्र** — १ इष्ट प्रातीनिधी निधिनि, २ आनंदाचा त्याग, रक्षण होईल असा विश्वास, ४ रक्षणाविषयींची मान्यता, ५ ठेवींची सुरक्षितता व ६ मनाचा मोठेपणा. अशा प्रकारची असलेली सहा ठिकाणे आश्रयास पात्र होत.

> आनुकूल्यस्य संकल्पः प्रातिकूल्यस्य वर्जनम् ।
> रक्षिष्यतीति विश्वासः गोप्तृत्वे वरणं तथा ।
> निक्षेपण अकार्पण्य षड्विधा शरणागति. ॥ ( वायुपुराण )

**सहा तीर्थे** — १ भक्तितीर्थ, २ गुरुतीर्थ, ३ मातृतीर्थ, ४ पितृतीर्थ, ५ पतितीर्थ आणि ६ पत्नीतीर्थ. ही सहा तीर्थे मानवाला पावन करणारी. ( पद्म भूमिखंड )

**सहा दाते ( पुराणप्रसिद्ध भारतीय )** — १ बलि-सत्ययुग, २ भार्गवराम व ३ श्रीरामचंद्र त्रेतायुग, ४ धर्मराज, व ५ कर्ण द्वापरयुग आणि ६ व्यापारी–कलियुग.)

**सहा दु.खी** — १ मत्सरी, २ दयाळू, ३ असंतुष्ट, ४ रागीट, ५ सदा शंकेखोर आणि ६ दुसऱ्याच्या भाग्यावर उपजीविका करणारा. हे सहा नित्याचे दु.खी असतात. ( म. भा. उद्योग ३३ ९० )

**सहा दु.खे जीवितातील** — १ गर्भदु.ख, २ जन्मदु.ख, ३ व्याधिदु.ख, ४ दारिद्र्य दु.ख, ५ जरादु.ख व ६ मृत्युदु.ख.

**सहा दोष ( आसुरी संपत्तीचे )** — १ दंभ, २ दर्प, ३ अभिमान, ४ क्रोध, ५ पारुष्य ( कठोरपणा ) आणि ६ अज्ञान. ( भ. गी. १६ ४ )

**सहा दोष ( अभ्युदयाच्या आड येणारे )** — १ निद्रा, २ सुस्ती, ३ भय, ४ क्रोध, ५ आळस आणि ६ दीर्घसूत्रीपणा. ( म. भा. उद्योग. ३३-७८ )

**सहा दोष पद्य रचनेसंबंधीं** — १ कर्णकठोर, अपरिचित किंवा क्लिष्ट शब्दयोजना, २ शब्दांची ओढाताण, ३ भिन्न भाषांतील शब्दांचे समास, ४ त्याच त्या शब्दांची पुनरावृत्ति, ५ रसाला प्रतिकूल चाल व ६ यतिभंग.
(नाटक–शास्त्र व तंत्र)

**सहा दोष (पाठकाचे-पठण करणाराचे)** — १ गात म्हणणारा, २ जलद जलद म्हणणारा, ३ वाचताना किंवा म्हणताना डोकें हलविणारा, ४ लिहिलेले वाचणारा, ५ अर्थ न जाणणारा व ६ बारीक आवाजाचा.

गीती शीघ्री शिरःकम्पी तथा लिखितपाठकः।
अनर्थज्ञोऽल्पकण्ठश्च षडेते पाठकाधमाः॥ (पा. शिक्षा ३२)

**सहा दोष (स्त्रियांचे वावर्तीत)** — (अ) १ मद्यपान, २ दुर्जन संगति, ३ पतीपासून दूर राहणे, ४ इकडे तिकडे भटकणे, ५ परगृहीं निद्रा, आणि ६ परगृहवास (मनु. ९ १३); (आ) १ अनृत, २ साहस, ४ माया, ५ जाणीव कमी, ५ अतिलोभ आणि ६ अशुचित्व.

अनृत साहस माया मूर्खत्वमतिलोभता।
अशौचत्वं निर्दयत्वं स्त्रीणां दोषाः स्वभावजाः॥ (वृ. चा.)

**सहा द्वारें मसलत फुटण्याची (राजनीतिशास्त्र)** — १ मद, २ निद्रा, ३ अज्ञान (शत्रुकडील गुप्त हेर वगैरेंबद्दल), ४ चेहऱ्यावरील विकार, ५ दुष्ट मन्त्र्यावर विश्वास आणि ६ अकुशल दूत. (म. भा. उद्योग. ३९-३९)

**सहा 'न' कार** — १ मौन, २ विलंब, ३ भिवया चढविणें, ४ अधोवदन, ५ निघून जाणें आणि ६ विषयांतर.

मौनं कालविलम्बश्च प्रयाणं भूमिदर्शनम्।
भृकुट्यन्यमुखी वार्ता नकारः षड्विधः स्मृतः॥ (सु.)

**सहा नराधम** — १ कोणतेंहि काम न करिता ज्यात त्यात घोटाळा करणारा, २ कामाकडे अति दुर्लक्ष करणारा, ३ नेहमीं खोटें बोलणारा, ४ दृढ प्रेम न करणारा, ५ स्नेहभावाचा त्याग केलेला आणि ६ स्वतःला शहाणा समजणारा. (म. भा. उद्योग ३७ ३७)

**सहा नास्तिक दर्शनें** — १ चार्वाक, २ सौत्रांतिक, ३ वैभाषिक, ४ योगाचार, ५ माध्यमिक आणि ६ अर्हत्. (वृ. प्र.)

**सहा निसर्गदत्त वैद्य** — १ सूर्यप्रकाश, २ अन्न, ३ हवा, ४ पाणी, ५ व्यायाम आणि ६ विश्रांति. हे सहा निसर्गदत्त वैद्य परमेश्वराने मनुष्याच्या सनिध ठेविले आहेत. त्याची आठवण ठेवावी. ( प्रात स्मरण )

**सहा पद्धती सुगंधी पदार्थ तयार करण्याच्या** — १ भावन, २ पाचन, ३ बोधन ४ वेधन ५ धूपन व ६ वासन. ( गंधसार )

**सहा पारतंत्र्ये** — १ स्वभाव-पारतन्त्र्य, २ ईश्वर पारतन्त्र्य, ३ प्रकृति पारतन्त्र्य, ४ गुण पारतन्त्र्य ५ कर्म पारतन्त्र्य आणि ६ काल-पारतन्त्र्य.

**सहा पुराणप्रसिद्ध सभा** — १ इंद्रसभा, २ वरुणसभा, ३ कुबेर सभा, ४ यमसभा, ५ ब्रह्मसभा आणि ६ धर्म ( मय ) सभा. ( पाण्ड्व १ प्र. १६-४ )

**सहा प्रकारची अभिज्ञा ( दिव्यज्ञान )** — १ दिव्यदृष्टि, २ दिव्यश्रुति, ३ कामरूप, ४ पूर्वजन्मस्मृति, ५ दिव्यज्ञान आणि ६ निमुक्तिज्ञान (बुद्धदर्शन)

**सहा प्रकार (ऋषींचे)** — १ छंदऋषी-वसिष्ठ कण्व २ इ. ब्रह्मऋषी-अत्रि वगैरे, ३ महर्षि-भृगु वगैरे, ४ राजर्षि-विश्वामित्र, जनक, ऋतुपर्ण इ. ५ गोत्र ऋषी-शाण्डिल्य-कौंडिण्य वगैरे आणि ६ देवऋषी-नारद.

( एति. गोष्टी भाग, ३ रा )

**सहा प्रकार उन्मादाचे** — १ वातोन्माद, २ पित्तोन्माद, ३ कफोन्माद, ४ सान्निपातिक उन्माद, ५ मानसिक उन्माद व ६ विषजन्य उन्माद.

( आयुर्वेद )

**सहा प्रकारचे ऐतिहासिक विपर्यास ( दोष )** — १ स्थलविपर्यास, २ कालविपर्यास, ३ घटनाविपर्यास, ४ कार्य-कारण विपर्यास, ५ स्वभाव विपर्यास आणि ६ परिस्थितिविपर्यास. असे सहा प्रकारचे दोष इतिहासशास्त्रात मानले आहेत. ( साहित्याचा ससार )

**सहा प्रकारचे गुरू** — १ प्रेरक, २ सूचक, ३ वाचक, ४ दर्शक, ५ बोधक आणि ६ शिक्षक. ( मनशास्त्र )

**सहा प्रकारचे गंध** — १ लवंग, वल्दोडे वगैरेंचा खमंग वास, २ फुले, अत्तर वगैरेंचा वास, ३ पक्व फळाचा स्वादिष्ट वास, ४ टर्पेन्टाईन वगैरेंचा दर्प, ५ कुजक्या पदार्थाचा दुर्गंध आणि ६ डांबर वगैरेंचा जळका वास

**सहा प्रकारांनीं अंतरंग जाणतां येतें** — १ चर्या ( चाल रीत ), २ इंगित ( खाणाखुणा ), ३ चेष्टा ( हालचाल, ) ४ भाषण, ५ दृष्टि आणि ६ मुखचर्या. ( मनु. ८.२६ )

**सहा प्रकारांनीं तीळ पापाचा नाश करणारे आहेत** —१ तिलमिश्रित पाण्यानें स्नान, २ तीळ वाटून अंगास लावणें, ३ तिळांनीं हवन करणें, ४ तिलोदकानें तर्पण, ५ तीळ भक्षण आणि ६ तिलदान.

तिलस्नायी तिलोद्वर्ती तिलहोमी तिलोदकी ।
तिलभुक् तिलदाता च षट्तिलाः पापनाशकाः ॥ ( सु. )

**सहा प्रकारचीं दर्शनें ( मतें )** — १ शैव दर्शन, २ शाक्त दर्शन, ३ वैष्णव दर्शन, ४ गाणपत्य दर्शन, ५ सौर दर्शन आणि ६ कापालिक दर्शन.

दर्शनं षड्विधं प्रोक्तं शैवशाक्तेयवैष्णवम् ।
गाणपत्यं च सौरं च कापालिकमिति स्मृतम् ॥ ( सु. )

**सहा प्रकार दक्षिणेचे** — १ धेनु, २ भूमि, ३ सुवर्ण, ४ रौप्य, ५ वस्त्र व ६ अश्व. ( म. भा. आरण्यक पर्व )

**सहा प्रकारचा देह** — १ स्थूलदेह, २ वासनादेह, ३ मनोदेह, ४ कारणदेह, ६ बुद्धिदेह आणि ६ निर्वाणदेह. असे सहा प्रकारचे देह असतात असे थिऑसफीनें ( ब्रह्मविद्या ) मानलें आहे.

**सहा प्रकारचे दुर्ग** — १ निर्जन प्रदेश दुर्ग, २ भूदुर्ग ( भुईकोट किल्ला ), ३ डोंगरी किल्ला, ४ नरदुर्ग नगराभोवती पहारा वा अनन्यनिष्ठ सेवक असणें, ५ मृद्दुर्ग-मातीचा तट आणि ६ नगराभोवती दुर्गम अरण्य असणें. असे सहा प्रकार दुर्गांचे ( किल्ल्यांचे ) प्राचीन काळीं असत.

**सहा प्रकार दूषित अन्नाचे** — २ आश्रयदुष्ट, २ कालदुष्ट, ३ भावदुष्ट, ४ स्वभावदुष्ट, ५ वाग्दुष्ट आणि ६ संसर्गदुष्ट. ( भविष्य. पु. )

**सहा प्रकार प्रकृतीचे** — १ स्वभाव, २ ईश्वर, ३ काल, ४ यदृच्छा, ५ नियति आणि ६ परिणाम. ( सुश्रुत. शा. अ. १ )

**सहा प्रकारचे पशुमानव** — १ वेदपशु, २ शास्त्रपशु, ३ पुराणपशु, ४ देवपशु, ५ नरपशु व ६ स्त्रीपशु. असे सहा प्रकारचे पक्षपाती अविचारी मानव जगांत असतात. ( निर्पक्ष सत्यदर्शन )

**सहा प्रकार भक्तीचे** (जैनधर्म) — १ नामभक्ति, २ स्थापना भक्ति, ३ द्रव्यभक्ति, ४ भावभक्ति, ५ क्षेत्रभक्ति आणि ६ कालभक्ति (कल्याण भक्ति अंक)

**सहा प्रकार भाज्यांचे** — १ पानें मेथी, चुका, चाकवत इ., २ फुलें केळी दगडा इ., ३ फळें भोपळा, कारली इ., ४ कंद सुरण, रताळी इ., ५ देठ अळू गिरस इ. व ६ भूइफोड भूछत्रे, गोमय, लाकूड इत्यादिकांत पावसाळ्यात उत्पन्न होणारी छत्रीसारखी दिसणारी वनस्पती (बृहद्योग तरंगिणी)

**सहा प्रमुख प्रकार** (भाताचे) — १ वांगीभात, २ दाल्यभात, ३ तांदुळीभात, ४ वाळकीभात, ५ कळीभात व ६ नारळभात (स्वयंपाक शास्त्र)

**सहा प्रकार रतिक्रियेचे** — १ उत्तान रत, २ तिर्यग् रत, ३ उपविष्ट रत, ४ स्थित रत, ५ आनत रत व ६ विपरीत रत (रतिशास्त्र)

**सहा प्रकार राजनीतीचे** — १ संधि प्रसंगी परस्पर सख्य, २ विग्रह युद्ध, ३ यान आक्रमण, ४ आसन शत्रूची उपेक्षा करणे, ५ द्वैधीभाव म्हणजे संधि म्हणजे विग्रह व ६ द्वैध दुसऱ्याचा आश्रय धारण

तथा चान्वीक्षिकीं विद्या राजनीतिं च षड्विधाम् ॥ (भाग १० ४५ ३४)

**सहा प्रकार लघुकथांचे** — १ स्वभावप्रधान, २ कथानकप्रधान, ३ तत्त्वप्रधान, ४ लघुतम कथा ५ रूपक कथा व ६ स्वैर कथा असे हे सहा प्रकार प्रचारात आहेत (ल. क. कशी लिहावी ?)

**सहा प्रकारची वनस्पति सृष्टि** — १ वनस्पति पुष्पावाचून फळ येणारे वड, पिंपळ इ., २ औषधी एक वार फुलें फळें येऊन नाश पावणारे केळी, धान्यें इ., ३ लता वृक्षाचा आधार लागतो त्या, ४ त्वक्सार वेचा कठीण असे वेळू वगैरे ५ विरुध-आधाराशिवाय वाढतात अशा आणि ६ द्रुम फुलें फळें येणारे आंबा इत्यादि वृक्ष

**सहा प्रकारचे विरह** — १ प्रारंभ विरह लग्नच न झाल्यामुळे नायका नाहीं म्हणून, २ क्षणिक विरह नजरेआड झाल्यामुळे, ३ वाङ्मयविरह तंग वकेवा होऊन अबोला झाल्यामुळें, ४ परोक्ष विरह-माहेरी गेल्यामुळें ५ प्रत्यक्ष विरह नायको आजारी झाल्यामुळें आणि ६ चिरविरह पत्नी मृत झाल्यामुळे होणारा विरह (भावबंधन अंक १)

**सहा प्रकारचीं विषें** — १ निकोटीन, २ मुर्चिकॲसिड, ३ पाइरीडीन, ४ कन्नीडीन, ५ अमानिया आणि ६ कार्बन मानो ऑक्साइड. अशीं सहा प्रकारचीं विषे तमाखूत असतात. असे चालू युगाचे वैज्ञानिक सांगतात. (कल्याण जून १९६१)

**सहा प्रकार व्याख्यानात आवश्यक** — १ संधी सोडून पदें सांगणें, २ पदाचा अर्थ, ३ समास सोडणें, ४ वाक्य योजना, ५ आक्षेपाचा अनुवाद करणें व ६ त्या आक्षेपाचें निरसन करणें. (वैदिकधर्म व भारतीय राजनीति)

**सहा प्रकार शृंगार चेष्टाचे** — १ विलास, २ विब्बोक, ३ विभ्रम, ४ ललित, ५ हेला व ६ लीला. (अमर)

**सहा प्रकारचे वैष्णव** — १ भक्त, २ भागवत, ३ वैष्णव, ४ पांच रात्रागमाप्रमाणे चालणारे, ५ वैखानसशाखी व ६ कर्म न करणारे

भक्ता भागवताश्चैव वैष्णवा पांचरात्रिण ।

वैखानसा कर्महीना षड्विधा वैष्णवा मता ॥

**सहा प्रकार सैन्याचे** — १ पिढीजाद सैन्य, २ पगारी, ३ पथक सैन्य, ४ मित्राचें, ५ शत्रुराजाचें आणि ६ रानटी लोकांचें सैन्य असे सहा प्रकार महाभारतकाळीं असत (कौ. अर्थ अधि ९)

**सहा प्रकार (स्नानाचे)** — १ नित्य, २ नैमित्तिक, ३ काम्य, ४ क्रियास्नान, ५ मलापकर्षण आणि ६ कर्मांग

नित्य नैमित्तिकं काम्यं क्रियाख्यं मलकर्षणम् ।

कर्मांगाश्चेति विज्ञेया षट्प्रकारा समासत ॥ (म. ब्राह्म.)

**सहा प्रकारचें स्त्रीधन** — १ विवाहसमयी अग्नीसमोर दिलेलें २ सासरीं जातांना मिळालेलें, ३ प्रेमानें दिलेलें, भावाकडून मिळालेलें, ५ मातेकडून मिळालेलें व ६ पित्याकडून मिळालेलें (मनु ९ १९४)

**सहा प्रकारची समाधि** — १ दृश्यानुविद्ध २ शब्दानुविद्ध, ३ निर्विकल्प, ४ निर्विकल्प, ५ निवृत्तिक आणि ६ निर्वासन (सरस्वती रहस्योपनिषद्)

**सहा प्रकारची सिद्धि** — १ प्रतिभा (त्रिकालज्ञान), २ श्रवणा, ३ वार्ता, ४ दर्शना, ५ आस्वादा आणि ६ वेदना (सर्वज्ञान) (विभू अ ४)

**सहा प्रकार सिद्धाचे** — १ नियसिद्ध, २ अचानकसिद्ध, ३ स्वप्न सिद्ध, ४ देवसिद्ध, ५ कृपासिद्ध व ६ हठात्सिद्ध. असे सहा मुख्य प्रकार. ( जीवनविकास. ऑक्टोबर १९६२ )

**सहा प्रकार सूत्राचे** — १ महासूत्रें, २ परिभाषासूत्र, ३ विधिसूत्र, ४ नियमसूत्र, ५ अतिदेशसूत्र व ६ अधिकारसूत्र. (व्याकरण म भा प्रस्तावना)

**सहा प्रकारचें सैन्यबल** — १ शारीरिक बल कणखरपणा, २ शूर असणें, ३ सैन्यबल भरपूर संख्या असणे, ४ आस्त्रिक बल-तीक्ष्ण हत्यारें, ५ बुद्धिबल आणि ६ आयुर्बल सैन्याचा सतत पुरवठा होत असणे. ( शुक्र नीति अ. ४ )

**सहा प्रकार हास्याचे** — १ स्मित गालातल्या गालात हसणें, २ दात काढून हसणें, ३ विहसित-बोलत बोलत हसणे, ४ उपहसित नाक फुगवून हसणे, ५ अपहसित डोळ्याला आसवें आणून हसणें आणि ६ अतिहसित मोठमोठ्यानें टाळी वाजवून हसणें. ( तत्व निज विवेक भ. ना. ६ ६० )

सहा प्रकारचे होम — १ राष्ट्रभृत होम, २ जया होम, ३ अभ्यातन होम, ४ अरिष्टनाशक, ५ लाजा होम व ६ पापमोचन. असे सहा प्रकारचे होम विवाहसंस्कारसमया करावे लागतात ( रामतीर्थ दिवाळी अंक )

**सहा प्रकार संभोगासनाचे** — १ उत्तान आसन, २ तिर्यक् आसन, ३ उपविष्ट आसन, ४ उत्थित आसन, ५ व्यानत आसन व ६ पुरुषायित आसन ( कामशास्त्र )

**सहा प्रकार ( संन्यासाचे )** — १ कुटीचक, २ बहूदक ३ हंस, ४ परमहंस, ५ तुरीयातीत व ६ अवधूत ( नारद परिव्राजकोपनिषद् )

**सहा प्रयोजनें ( काव्याचीं )** — १ कीर्ति, २ धनप्राप्ति, ३ व्यवहार ज्ञान, ४ अशुभपरिहार, ५ परमानंद व ६ कान्तेप्रमाणें होतो तसा माधुर्यानें तत्त्वबोध ( काव्यप्रकाश )

**सहा प्राचीन तेलगु कवि आणि त्यांचीं काव्यें** — १ नन्नयभट्ट-तेलगू महाभारत, २ तिक्कन सोमयाजी-निर्वचनोत्तर रामायण महाभारत, ३ एराप्रगड -हरिवंश, ४ नाचनसोम-उत्तर हरिवंश, ५ श्रीनाथ-आंध्रनैषध ६ व बम्मन पोतराम-श्रीमद्भागवत संस्कृत भागवत पुराण शैलीत तसा आंध्रभागवत प्रबंध शैलींत प्रसिद्ध आहे. ( म ज्ञा को. वि. १५ )

**सहा स्थानें भुक्ति आणि मुक्ति ह्या दोन्ही प्राप्त करून देणारीं** — १ करवीर, २ विरूपाक्ष, ३ श्रीशैल, ४ पद्मराक्षस, ५ श्रीरंगम् व ६ सेतुनाथ रामेश्वर.

करवीर विरूपाक्ष श्रीशैल पाण्डुरंगम् ।
श्रारंग्या सेतुनाथ च भुक्तिमुक्तिप्रदानि षट् ॥ ( करवीरमहात्म्य )

**सहा प्रमाणें** — १ प्रत्यक्ष, २ अनुमान, ३ शब्द, ४ उपमान, ५ अर्थापत्ति व ६ अनुपलब्धि.

**सहा प्रमुख अंगें संध्येचीं** — १ आसन, २ आचमन, ३ प्राणायाम, ४ मार्जन, ५ अर्घ्यप्रदान व ६ जप व उपस्थान. ( आर्यांची दिनचर्या )

**सहा प्रमुख नीतिशास्त्रकार** — १ मनु, २ बृहस्पति, ३ शुक्र, ४ पराशर, ५ व्यास व ६ कौटिल्य.

**सहा पशुधर्म** — १ आच्छादन २ भोजन ३ मैथुन ४ भय ५ निद्रा व ६ मोह.

छादन भोजन मैथुन । भय निद्रा मोह पशुधर्म ॥ ( पंचप्रथा )

**सहा पंथ गाणपत्य संप्रदायाचे** — १ महागणपति पंथ, २ हरिद्रा गणपति, ३ उच्छिष्ट गणपति, ४ नवनीत गणपति, ५ स्वर्ण गणपति व ६ संतान गणपति पंथ. ( पुरुषार्थ गणेशांक शर, १९०८ )

**सहा प्रसंगीं लाज अथवा भीड धरू नये** — १ स्त्रीसंग, २ गायन, ३ विकणें, ४ व्याख्यान, ५ धान्य व द्रव्य याचा व्यवहार आणि ६ आयव्यय ( अ रा सग, ७-७ )

**सहा प्राचीन पुराणवेत्ते** — १ त्रय्यारुणी, २ कश्यप, ३ सावर्णि, ४ अकृतव्रण, ५ वैशंपायन व ६ हारीत ( ना स्कंध १२-७-५ )

**सहा प्रीतिलक्षणें** — १ जो देतो, २ तसच घेतो, ३ आपलें गुह्य सांगतो, ४ तसच ऐकून घेतो, ५ पक्तीला नवतो, आणि ६ जेवूंहि घालतो हीं सहा प्रीतिलक्षणें होत

ददाति प्रतिगृह्णाति गुह्यमाख्याति पृच्छति ।
भुक्ते भोजयते चैव षड्विधं प्रीतिलक्षणम् ॥ ( हिता. २-११ )

**सहा प्रेरणा ग्रंथलेखनाच्या** — १ द्रव्य, २ कीर्ति, ३ अमगल स्थितीतून मुक्त होण्यासाठी, ४ सरकार दरबारची लोकाना माहिती पुरविण्यासाठी, ५ तात्कालिक आनद व ६ उपदेश करण्यासाठी. अशा सहा प्रेरणा अथवा प्रयोजनें आहेत.

**सहा ब्रह्मवादी** — १ काश्यप, २ वत्सार, ३ विभ्रम, ४ रैभ्य, ५ असित आणि ६ देवल.

काश्यपश्चैव वत्सारो विभ्रमो रैभ्य एव च ।
असितो देवलश्चैव षडेते ब्रह्मवादिन ॥ ( वायुपु. ५९ १०३ )

**सहा भाग पृथ्वीचे** — १ द्यु २ पृथिवी, ३ अहन्, ४ रात्रि, ५ उदक व ६ ओषधी ( ऋग्वेद मडल ८-४७ )

**सहा भाव–जीवगर्भोत्पत्तीला कारणीभूत** — १ मातेचा भाव, २ पित्याचा भाव, ३ आत्म्याचा भाव, ४ सयोगाचा भाव, ५ रसाचा भाव, व ६ सत्त्वाचा भाव ( ईशावास्योपनिषद–आर्य भैषज्य शास्त्र )

**सहा महारथी ( कौरवपक्षीय )** — १ कर्ण, २ भूरिश्रवा, ३ अश्वत्थामा, ४ वृषसेन, ५ कृपाचार्य व ६ शल्य ( म. भा. द्रोण. अ. ७५ )

**सहा महान् दोष ( आसुरी वृत्तीच्या मानवाचे )** — १ दभ, २ दर्प, ३ अभिमान, ४ क्रोध, ५ दुष्पणा आणि ६ अज्ञान. हे सहा महान् दोष सख्येनें कमी असले तरी त्याचा प्रभाव विघारी असतो. ( म. गी. १६-४ )

**सहा मनोव्यापार कार्यान्वित होणारे विज्ञानाचे रचनेस आवश्यक** —१ निरीक्षण, २ विकलन ( पृथक्करण ), ३ सकलन, ४ अमूर्तीकरण, ५ सामान्यीकरण व ६ समन्वय. ( तर्कशास्त्र आणि वैज्ञानिक विवेचन पद्धति )

**सहा मुख्य परिमेयें** — १ लाबी, २ क्षेत्रफळ ( पृष्ठफळ ) ३ अवकाश फळ अगर घनफळ ( गर्भफळ ), ४ वजन, ५ मूल्य व ६ काल. खेरीज घनता व शक्ति अशीं अनेक परिमेयें गणिताच्या उपयोगातून दृष्टीस पडतात. ( म. ज्ञा. या. वि ९ )

***सहा राष्ट्रीय दुर्घटना*** — १ अतिवृष्टि, २ अनावृष्टि, ३ टोळधाड ४ उदीर फार होणें, ५ पोपट वगैरे प्राण्याचा उपद्रव व ६ परकीय सत्तेचे आक्रमण.

अनिवृष्टिः शलभा मूषकाः शुकाः ।
प्रत्यासन्नाश्च राजानः षडेता ईतयः स्मृताः ॥ ( सु. )

**सहा लाभ** (प्रवासापासूनच मिळणारे) — १ तीर्थावलोकन, २ सज्जन परिचय, ३ वित्तार्जन, ४ नानाश्चर्यनिरीक्षण, ५ चतुरता आणि ६ समाप्रगल्भता. ( सु. )

**सहा विघ्नें विद्येला येणारीं** — ( अ ) १ द्यूत, २ पुस्तकशुश्रूषा, ३ नाट्याची आसक्ति, ४ स्त्रीचा ध्यास, ५ सुस्ती आणि ६ झोपाळूपणा.

द्यूतं पुस्तकशुश्रूषा नाटकासक्तिरेव च ।
स्त्रियस्तन्द्री च निद्रा च विद्याविघ्नकराणि षट् ॥ ( सु. )

( आ ) १ स्वच्छंदीपणा, २ द्रव्य, मिळविण्याचा मोह, ३ प्रेमसंधान पडणें, ४ चैन, ५ उद्धटपणा आणि ६ आळस.

स्वच्छन्दत्वं धनार्थित्वं प्रेमभावोऽथ भोगिता ।
अविनीतत्वमालस्यं विद्याविघ्नकराणि षट् ॥ ( सु. )

**सहा विघ्नें योगाभ्यासाच्या आड येणारीं** — १ अति आहार, २ निर्भेळश्रम, ३ फार बोलणें, ४ उपोषण ( आवश्यक उपोषणाव्यतिरिक्त ), ५ योगाभ्यासी नव्हेत अशाची संगत व ६ मनाची अस्थिरता

अत्याहारः प्रयासश्च प्रजल्पो नियमग्रहः ।
जनसंगश्च लौल्यं च षड्भिर्योगो विनश्यति ॥ ( ह. प्र. )

**सहा विकार देहाचे** — १ शोक, २ मोह, ३ क्षुधा, ४ तृष्णा, ५ जरा व ६ मरण.

**सहा विषय** (शिक्षेचे—उच्चार शास्त्र) — १ वर्ण, २ स्वर, ३ मात्रा, ४ बल, ५ साम व ६ संतान ( संहिता ) ( ऋग्वेददर्शन )

**सहा वीरांचे सहा सर्वप्रसिद्ध शंख** — १ श्रीकृष्ण-पांचजन्य, २ अर्जुन-देवदत्त, ३ भीमसेन पौंड्र, ४ युधिष्ठिर अनंतविजय, ५ नकुल सुघोष व ६ सहदेव मणिपुष्पक महाभारतकाळी अनेक प्रसिद्ध वीरांचे निरनिराळे शंख असत आणि सैन्याचे उत्साहवर्धनार्थ ते प्रसुरले जात. ( भ. गी. १-१५ ) या व्यतिरिक्त परशुरामाचा "अमितजित्" नामक शंख होता असें वर्णन आढळतें. ( प्रा. च. को. )

**सहा वैकुंठ लोक** — १ नित्यवैकुंठ, २ पादविभूतिवैकुंठ, ३ नित्यक्लिन वैकुंठ, ४ ब्रह्मविद्यावैकुंठ, ५ तुलसीवैकुंठ व ६ गोपालवैकुंठ. (ईशादि विंशोत्तरशतोपनिषद )

**सहा वैष्णव ( प्रातःस्मरणीय )** — १ नृसिं २ बिभीषण, ३ भीष्म, ४ प्रल्हाद, ५ नारद आणि ६ ध्रुव.

नृसिंहविभीषणो भीष्म प्रल्हादो नारदो ध्रुव ।
षडेते वैष्णवा ज्ञेया स्मरणं पापनाशनम् ॥ ( वा. रा. युद्धकांड )

**सहा वाईट गोष्टी** — १ चांगले काम न करणारा शहाणा मनुष्य, २ धर्म नसलेला म्हातारा, ३ आज्ञाधारक नसलेला-तरुण, ४ दातृत्वहीन श्रीमंत, ५ विनय नसलेली-स्त्री आणि ६ कोणताहि गुण नसलेला-धर्म.

**सहा शककर्ते** — १ युधिष्ठिर, २ विक्रम, ३ शालिवाहन, ४ विजया भिनन्दन ( वतरणी सिंधुसंगमी ), ५ नागार्जुन व ६ कल्की ( करवार ). हे सहा शककर्ते म्हणून पुराणात वर्णिले आहेत. पाच यापूर्वी होऊन गेले व सहावा होणार आहे.

युधिष्ठिरो विक्रमशालिवाहनौ । ततो नृपः स्याद्विजयाभिनन्दनः ॥
ततस्तु नागार्जुनभूपतिः । कल्की षडेते शककारका नृपा ॥ ( दानप्रकाश )

आधुनिक कालात छत्रपति शिवाजीमहाराज हे एक शककर्ते होत.

**सहा शत्रुरूपी रोग वृद्धापकालाची वाट पाहणारे ( मनुष्य तीस वर्षांच्या आयुष्यात )** — १ सभागाचे रोग, २ चाळपुळी ( कॅन्सर ), ३ रक्ताशयाचे रोग, ( उन्ह्या नाड्या ) – ४ पोटपणाचे रोग, ५ नाड्यांचा रक्तभिसरणा होऊन शोष व वरड होणें व ६ मूत्रपिंडाचे रोग

**सहा शास्त्रें जगताचा चरितार्थ चालविणारीं** — १ शिल्पशास्त्र, २ वैद्यशास्त्र, ३ सिद्धान्त ( गणित ) शास्त्र, ४ ज्योतिःशास्त्र, ५ कामशास्त्र आणि ६ गानशास्त्र. या सहा शास्त्रांच्या आधाराने लोक आपला निर्वाह करून घेतात.

**सहा षाड्गुण्यसंपन्न सत्पुरुष** — १ वसिष्ठ, २ वामदेव, ३ नारद, ४ व्यास, ५ वाल्मीकि आणि ६ प्रल्हाद. हे सहा षाड्गुण्यसंपन्न पुरुष म्हणून पुराणांत प्रसिद्ध आहेत.

**सहा सन्यासधर्माला दूषणें** — १ पलग, २ शुभ्रवस्त्र, ३ स्त्रीकथा, ४ जिह्वालौल्य, ५ दिवसा निद्रा आणि ६ वाहनात बसण. या सहा गोष्टी यतिधर्माला बाधक आहेत. ( भ. स्मृ )

**सहा साधनानीं कर्माला धर्मत्व प्राप्त होतें** — १ सद्गुरूपदेश, २ ईश्वरार्पित कर्म, ३ शुद्ध काल, ४ पवित्र स्थळ, ५ मगलद्रव्य आणि ६ वेदोक्त कर्म

**सहा सद्भ्रम** — १ कुल, २ गोत्र, ३ जाति, ४ वर्ण ५ आश्रम आणि ६ नाम हे सहा सद्भ्रम होत ( मो प्र )

**सहा स्वभावधर्म ( देहाचे )** — १ आच्छादन, २ भोजन, ३ मैथुन, ४ भय, ५ निद्रा आणि ६ मोह हे सहा देहाचे स्वभावधर्म मानले आहेत ( तत्त्व–निजबोधन–विवेक )

[ **सहा सर्व प्रसिद्ध अशा सार्थप्रतिज्ञा** — १ भीष्मप्रतिज्ञा, २ भीम प्रतिज्ञा, ३ राणाप्रतापप्रतिज्ञा, ४ शिवरायप्रतिज्ञा, ५ लोकमान्य 'स्वराज्य प्रतिज्ञा, आणि ६ महात्मा गांधी–' चलेजाव ' प्रतिज्ञा ]

**सहा सूत्र ग्रंथ व त्यांचे कर्ते** — १ जैमिनीयसूत्र—जैमिनि, २ आश्वलायन सूत्र–अश्वलायन, ३ आपस्तम्ब सूत्र–आपस्तम्ब, ४ बौधायनसूत्र–बोधायन ५ कात्यायनसूत्र कात्यायन आणि ६ वैशेषिकसूत्र–कणाद ( तत्त्व–निज–विवेक )

**सहा सत्संस्कार गुण** — १ वैराग्य, २ ज्ञान, ३ ब्रह्मचर्य, ४ तप, ५ करुणा व ६ सदाचार ( सुगमागम )

**सहा सूत्र लक्षणें** — १ अल्पाक्षरत्व २ असंदिग्धता, ३ सारग्रहण, ४ विश्वतोमुखम् म्हणजे सामान्य सिद्धान्त सांगणे, ५ अस्तोभम् म्हणजे निरर्थक शब्दाचा अभाव आणि ६ दोषराहित्य ही सहा म्हणजे त्या त्या शास्त्राच्या आचार्यांना लिहिलेले मूलग्रंथ–लक्षणें होत

अल्पाक्षरमसंदिग्धं सारवद्विश्वतोमुखम् ।
अस्तोभमनवद्यं च सूत्रं सूत्रविदो विदुः ॥ ( वेदान्त )

**सहा स्त्रीचे आदर्शगुण** — १ कार्यप्रसंगीं मंत्री अथवा सल्लागार, २ गृहकृत्यात दासी, ३ भोजनसमयीं माता, ४ रतिप्रसंगी रंभा, ५ धर्माला अनुकूल आणि ६ धरित्रीप्रमाणें क्षमायुक्त हे सहा स्त्रीचे आदर्श गुण होत

**सहाजण श्राद्धास वर्ज्य** — (अ) १ फल्यातपा, २ वैद्य, ३ पुराणिक, ४ कृपावल, ५ गायक आणि ६ राजसेवक

ज्योतिगण्य तथा वैद्य पुराण कृपकारिका ।
गायका राज्यसवाश्च षडते श्राद्धघातका ॥ (मु)

(आ) १ मेहुणा, २ गोत्तन, ३ आतवद्ध, ४ व्यभिचारा व व्यभिचारी स्त्रीचा पति, ५ नानहीन आणि ६ मूख

शाल्कश्च स्वगानश्च नातवृद्धश्च वृषलीपत ।
नानहीनश्च मूनश्च पन्त श्राद्धघातका ॥ (मु.)

**सहाजण सर्वत्र (सगतीला) वर्ज्य** — १ निंदक, २ लबाड, ३ धूर्त, ४ दुष्ट, ५ दुष्कर्मे करणारा व ६ तामसी

निंदका वचका धूर्त खलो दुष्कृतितामसौ ।
एते नागरन प्रोक्ता सर्वत परिवर्जयेत् ॥ (मु)

**सहाजणाच्या सहा सर्वप्रसिद्ध वीणा** — १ श्रीशिव-नालवी, २ सरस्वती-कच्छपी, ३ नारद-महती, ४ गणपति-प्रभावता (गणाना तु प्रभावना) ५ विश्वावसु-बृहती आणि तुम्बर-कलावती (अभिधान चिंतामणि)

**सहाजणाच्या स्मरणाने प्रवास सुखकर होतो** — १ वैन्य २ पृथु ३ हैहय, ४ अर्जुन, ५ भरत आणि ६ नल

एतान् नृपान् य पठत प्रयाण ।
तस्यार्थसिद्ध पुनरागमश्च (म.)

**सहाजणी मातेसमान** — १ राजपत्नी २ गुरुपत्नी, ३ मित्रपत्नी, ४ सती स्त्री, ५ सासू आणि ६ स्वमाता

राजपत्नी गुरा पत्नी मित्रपत्नी सती तथा ।
पत्नीमाता स्वमाता च सताप्ता मातर स्मृता (मु.)

(आ) प्राचीन ऋर्षीपैकीं जे महर्षि विशेष प्रसिद्धीस आले त्यांचीं नावें चिरस्मरणीय व्हावीत म्हणून उत्तरेकडील ध्रुवनक्षत्रामोवतीं प्रदक्षिणा घालणाऱ्या तारकासमूहातील सात तेजस्वी ताऱ्यास दिलीं तीं अशीं— १ मरीचि, २ अत्रि, ३ अंगिरस, ४ पुलस्त्य, ५ पुल्ह, ६ क्रतु व ७ वसिष्ठ. यात वसिष्ठाजवळच्या ल्हान ताऱ्यास अरुधती असें नाव दिलें आहे. हे चित्रशिखंडी नावाचे *सप्तर्षि होत. यांनी आपल्या सातमुखांनी लोकधर्म सांगितला (म. भा. शांति* अ. ३३५). या तारका समूहासच बृहद्दक्ष किंवा खाटले वाजलें म्हणतात. यातच वसिष्ठाच्या ताऱ्याजवळ एक ल्हान तेजस्वी दिसतो, तारा दिसतो, त्यास अरुधती म्हणतात. वैदिक विवाहपद्धतींत अरुधतीदर्शन म्हणून सप्तपदीनंतरचा एकविधि. यावेळीं वधूला अरुधती नक्षत्र दाखवून तू अरुधतीसारखी पतिनिष्ठ हो असें सांगावयाचें असतें.

> कश्यपोऽत्रिर्भरद्वाजो विश्वामित्रोऽथ गौतमः ।
> जमदग्निर्वसिष्ठश्च सप्तैते ऋषयः स्मृता ॥ (भाग–१३–८–५)

(इ) दोन डोळे, दोन कान, दोन नासिका–छिद्रें व एक मुख–वाणीचें इंद्रिय. हे मस्तकावर असलेले सात ऋषि होत. ज्ञान घेणें व ज्ञान देणें हें कार्य अखंड चालू असतें (वैदिक तत्त्वज्ञान)

(ई) (शरीरातील) १ नाक, २ जिव्हा, ३ डोळे, ४ त्वचा, ५ कान ६ वाणी आणि ७ मन.

(उ) १ आत्मा, २ बुद्धि, ३ अहंकार, ४ मन, ५ प्राण, ६ ज्ञानेंद्रियें व ७ कर्मेंद्रिय. प्रत्येक शरीरात हे सप्तऋषि आहेत आणि ते शरीररूपी घराचें रक्षण करितात.

> "सप्तऋषय प्रतिहिता शरीरे" (वा. यजु ३४–५५)

**सप्त अवस्था** — १ अज्ञान, २ आवरण, ३ विक्षेप, ४ परोक्षज्ञान, ५ अपरोक्षज्ञान, ६ शोकभंग आणि ७ निरंकुश तृप्ति (म. वा. को.)

**सप्त अधिकारी (पंचांगात)** — १ राजा, २ मंत्री, ३ न्यायाधिपति, ४ मेघेश, ५ रसाधिपति, ६ अग्रधान्येश आणि ७ पश्चाद्धान्येश.

**सप्त अप्सरा** — १ रंभा, २ घृताची, ३ मेनका, ४ तिलोत्तमा, ५ मंजुघोषा, ६ उर्वशी आणि ७ सुकेशी.

कार्येषु मन्त्री करणेषु दासी भोज्येषु माता शयनेषु रंभा ।

धर्मानुकूला क्षमया धरित्री, भार्या च षाड्गुण्यवतीह दुर्लभा ॥ ( सु. )

**सहा स्थानीं क्षौर विहित आहे** — १ गंगच्या काठीं, २ भास्कर क्षेत्रात, ३ माता निधनप्रसंगा, ४ पिता निधनप्रसंगा, ५ यज्ञ आणि ६ सोम पान. या सहा स्थानीं व काळीं क्षौर विहित मानलें आहे.

गंगायां भास्करे क्षेत्रे मातृपित्रमृतेऽहनि ।

आधाने सोमपाने च षट्सु क्षौरं विधीयते ॥ ( सु. )

**सहाजण आततायी** — १ घर जाळण्यास आलेला, २ विष घालणारा, ३ शस्त्र घेऊन वध करावयास आलेला, ४ धन लुटून नेणारा, ५ स्त्री अपहर्ता ६ शेत हरण करणारा.

अग्निदो गरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः ।

क्षेत्रदारापहर्ता च षडेते ह्याततायिनः ॥ ( व. स्मृ. ३-१६ )

**सहाजण आत्मघातकी** — १ आळशी, २ गर्विष्ठ, ३ झोपाळू, ४ दुसऱ्याकडून लिहून घेणारा, ५ अल्पविद्या असलेला आणि ६ वितंडवादी.

आलस्यो गर्वितो निद्रः परहस्तेन लेखकः ।

अल्पविद्या विवादा च षडेते चात्मघातकाः ॥ (भा. रा. युद्धकांड ५८ ५)

**सहाजणांना कन्या देणें अनुचित** -- १ निकट असलेला, २ अति दूर असलेला, ३ अत्यंत धनवान्, ४ अति दरिद्री, ५ उपजीविकेचें साधन नसलेला असा आणि ६ मूर्ख.

प्रेरक सूचकश्चैव वाचको दर्शकस्तथा ।
शिक्षको बोधकश्चैव षडेते गुरव स्मता ॥ (कुलागम)

**सहाजण त्याज्य होत** — (अ) १ मूढ अंतःकरणाचा शासनाधिकारी, २ खादाड ब्राह्मण, ३ दुष्ट मनाचा सावती, ४ आज्ञा मोडणारा नोकर, ५ कामात गाफिल राहणारा अधिकारी व ६ केलेले न स्मरणारा (पचतत्र), (आ) १ विवरण न करणारा आचार्य, २ अध्ययनहीन ऋत्विज ३ रक्षण न करणारा राजा अथवा शासनाधिकारी, ४ अप्रिय भाषणी भार्या, ५ गावात राहू इच्छिणारा गोपाळ (गुराखी) व ६ वनातच राहू इच्छिणारा नापित हे सहा त्याज्य होत (म भा. उद्योग ३३–८०)

**सहाजण दुसऱ्यावर उपजीविका करणारे** — १ चोर–बसावध मनुष्यावर, २ चिकित्सक–व्याधिग्रस्तावर, ३ कुमार्गी स्त्रिया–विषयलपटावर, ४ याज्ञिक–यज्ञ अथवा हव्यकव्य करणारावर, ५ शासनसंस्था–परस्पर कलह करणारावर आणि ६ पडित (विद्वान्)–मूर्खावर. (म भा उद्योग ३३ ८५)

**सहाजण धर्मभिक्षुक होत** — १ पांथस्थ (प्रवासी), २ उपजीविकेचे साधन नष्ट झालेला, ३ विद्यार्थी, ४ गुरूंचे पालनपोषण करणारा, ५ संन्यासी आणि ६ ब्रह्मचारी

अध्वग क्षीणवृत्तश्च विद्यार्थी गुरुपोषक ।
यतिश्च ब्रह्मचारी च षडेते धर्मभिक्षुका ॥ (स्कद ब्राह्मखड)

**सहाजण महान् परोपकारी** — १ सूर्य, २ चंद्र, ३ घनदाट वृक्ष, ४ नदी, ५ गाय आणि ६ सज्जन

रविश्चंद्रो घना वृक्षा नदी गावश्च सज्जना ।
एते परोपकाराय युगे दैवेन निर्मिता ॥ (सु.)

**सहाजण मदनाचे अवतार** — १ सुदर्शन, २ भरत, ३ प्रद्युम्न, ४ साम्ब, ५ सनत्कुमार व ६ स्कंद

सुदर्शनश्च भरत प्रद्युम्न साम्ब एव च ।
सनत्कुमार स्कदश्च षडेते काम एव च ॥ (गरुड ब्रह्म २९ ३६)

**सहाजणाकडे रिकाम्या हातानें जाऊ नये** — १ राजा (अधिकारी), २ देवता, ३ गुरु, ४ ज्योतिषी, ५ लहान मूल आणि ६ मित्र (सु.)

घृताची मेनका रंभा ऊर्वशी च तिलोत्तमा ।
सुकेशी मंजुघोषाद्या कथ्यन्तेऽप्सरसो बुधैः ॥ ( सु. )

**सप्त अनल** — १ कालानल, २ अत्यानल-दिव्याहुत अग्नि, ३ वडवानल-समुद्रातील, ४ सहस्रानल-सूर्यातील अग्नि, ५ विशानल-शेषनागातील, ६ भुनानल-पृथ्वीगर्भातील आणि ७ हारानल-शिवाचे तृतीय नेत्रातील अग्नि. असे सात प्रकारचे अग्नि आहेत. ( दु. श. को )

**सप्त अरण्यें** — १ दंडकारण्य, २ खंडारण्य, ३ चंपकारण्य, ४ वेदारण्य ५ नैमिषारण्य, ६ ब्रह्मारण्य आणि ७ धर्मारण्य. (भा.रा. किष्किंधा. १४ २२).

**सप्त आशय** — १ वाताशय, २ पित्ताशय, ३ श्लेष्माशय, ४ रक्ताशय, ५ आमाशय, ६ पक्वाशय व ७ मूत्राशय. मानवी शरिरात सात आशय आहेत. पण स्त्रियानाच असणारा गर्भाशय हा एक अधिक आशय आहे. ( सुश्रुत शारीर. ५-८ )

**सप्त उपचार** — १ पाचन, २ रेचन, ३ स्वेदन, ४ शमन, ५ मोहन, ६ स्तंभन आणि ७ मदन ( म. वा. को. )

**सप्त उपधातु ( रसायनशास्त्र )** — १ सुवर्णमाक्षिक, २ मोरचूद, ३ अभ्रक, ४ सुर्मा, ५ मनशीळ, ६ हरताळ आणि ७ कल्लापरी. ( रसायनसंग्रह )

**सप्त उपधातु ( शरीरातील )** — १ स्तन्य, २ आर्तव, ३ वसा, ४ घाम, ५ दात, ६ केस आणि ७ ओज हे शरिरातील सप्तधातूंचे सात उपधातु होत. ( भावप्रकाश )

**सप्त उपरत्नें** — १ वैक्रांत, २ सूर्यकांत, ३ चंद्रकांत, ४ राजावर्त, ५ लाल, ६ पेरोज आणि ७ स्फटिक.

सप्तोपरत्नगणिता मणयो लोकविश्रुता ॥ ( शा. नि. )

**सप्त उपविषें** — १ रुईचा चीक, २ निवडुंगाचा चीक, ३ कळलावी, ४ कण्हेर ५ गुंज, ६ अफू व ७ धोतरा. हीं उपविषें होत.

**सप्त ऋषींची सात प्रकारची रोगचिकित्सा** — १ पापरहित ( ऋतुसरतें आहारविहार )-भरद्वाज, २ प्राणायाम-कश्यप, ३ हवनचिकित्सा गौतम, ४ मानसचिकित्सा अत्रि, ५ प्रार्थनाचिकित्सा-विश्वामित्र, ६ जल

चिकित्सा जमदग्नि आणि ७ स्पर्शचिकित्सा वसिष्ठ अशी सप्तऋषींची सात प्रकारची रोगचिकित्सा प्राचीन काळी केली जात असे (ऋग्वेद ८४ वा अनुवाक)

**सप्त कला (शरीरातील)** — १ मांसधरा, २ रक्तधरा, ३ मेदोधरा, ४ कफधरा, ५ पुरीषधरा, ६ पित्तधरा व ७ रेतोधरा शरिरावर त्वचेची आवरणें सात असतात तशा कलाहि सात आहेत (सुश्रुत शारीर अ ४)

**सप्त काडें (रामायणाची)** — १ बालकांड, २ अयोध्याकांड, ३ अरण्यकांड ४ किष्किंधाकांड, ५ सुंदरकांड, ६ युद्धकांड व ७ उत्तरकांड अशी रामायणाची सात कांडे आहेत

**सप्त कीर्तिलक्षणें** — १ दान, २ पुण्य, ३ विद्या, ४ वक्तृत्व, ५ काव्य, ६ आर्जव व ७ शौर्य

**सप्त कुलाचल** — (अ) १ हिमवान्, २ गंधमादन ३ नैषध, ४ विंध्य, माल्यवान् ६ पारियात्रिक व ७ हेमकूट (आ) १ महेंद्र, २ मलय, ३ सह्य, ४ शुक्तिमान्, ५ ऋक्ष पर्वत, ६ विंध्य व ७ पारियात्र

> महेंद्रो मलय सह्य शुक्तिमानृक्षवानपि।
> विंध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वता ॥ (म भा भीष्म ९ ११)

**सप्त कृत्तिका** — सात तार्‍यांचा एक मोठा नक्षत्र पुंज त्यांची नावें — १ अंबा, २ दुला, ३ नितत्नी, ४ अभ्रयंती, ५ मेघयंती ६ वर्षयंती आणि ७ चुपुणिका (ज्योतिष)

**सप्त गीता** — १ श्रीमद्भगवद्गीता २ रामगीता, ३ गणेशगीता, ४ शिवगीता, ५ देवीगीता ६ कपिलगीता आणि ७ अष्टावक्रगीता अनेक गीतांतील या सात मुख्य गीता मानिल्या आहेत

**सप्त गोदावरी** — गोदावरी नदी सात मुखांनी समुद्रास मिळते त्या सात प्रवाहांची नावें — १ गोदावरी वसिष्ठकोटिलिंगस्थान (राजमहेंद्रीजवळ), २ कौशिका ३ गौतमी, ४ वृद्धगौतमी, ५ भारद्वाज ६ आत्रेया आणि ७ तुल्या यांना सप्त गोदावरी अशी संज्ञा आहे

**सप्त गंगा** — (अ) १ गंगा २ यमुना, ३ सरस्वती, ४ रथस्था, ५ सरयू, ६ गोमती व ७ गण्डकी (म भा आदि १७० २०) (आ)

१ जाह्नवी, २ वृद्धगंगा, ३ कालिंदी, ४ सरस्वती, ५ कावेरी, ६ नर्मदा आणि ७ वेण्णा

जाह्नवी वृद्धगंगा च कालिन्दी च सरस्वती ।
कावेरी नर्मदा वेणी सप्त गङ्गा प्रकीर्तिता ॥ (स्कंद वैष्णव ४ १५)

(इ) राजा भगीरथानें तप केल्यामुळे गंगा मूळ सप्त प्रवाहांनीं पृथ्वीवर प्रकट झाली त्यांची नांवें — १ ह्लादिनी, २ पावनी आणि ३ नलिनी हे तीन ओघ पूर्व दिशेकडे गेले आणि ४ सुचक्षु, ५ सीता व ६ महानदी सिंधू हे तीन पश्चिमेकडे व सातवा गंगा हा प्रवाह राजा भगीरथानें दाखविलेल्या मार्गानें पृथ्वीवर अवतीर्ण झाला (वा. रा. बालसर्ग ४३)

**सप्त गंडकी** — १ बारागर, २ शालग्रामी अथवा नारायणी, ३ श्वेत गंडकी, ४ गंडी, ५ त्रिशूलगंगा, ६ दरडी व ७ मयिअडी. या सात नद्या *मिळून झालेल्या प्रवाहास सप्तगंडकी असें म्हणतात* (Bengal R A Journal VOL 18)

**सप्त चिरंजीव (पौराणिक)** — १ अश्वत्थामा, २ बलि, ३ व्यास, ४ हनुमंत, ५ बिभीषण, ६ कृप आणि ७ परशुराम

अश्वत्थामा बलिर्व्यासो हनूमांश्च बिभीषण ।
कृप परशुरामश्च सप्तैते चिरजीविन ॥ (पद्म-सृष्टि.)

याखेरीज मार्कंडेय हा आठवे होत

सप्तैतान् संस्मरेन् नित्य मार्कंडेयमथाष्टमम् ॥ (मु.)

**सप्त चिरंजीव (आधुनिक)** — १ भगतसिंग, २ राजगुरु, ३ सुखदेव (पंजाब), ४ शिंदे, ५ सारडा, ६ कुरबान हुसेन व ७ मल्लप्पा धनशेट्टी (सोलापूर). हे सात प्रस्थापित सरकारविरुद्ध राज्यक्रांतिकारक म्हणून ब्रिटिश राजवटींत फांशी दिले गेले.

भगतसिंगा राजगुरु सुखदेवश्च सारडा ।
शिन्देहुसेनौ मल्लपा सप्तैते चिरजीविन ॥ (केसरी २८ मार्च १९३१)

**सप्त चक्रें (देहांत) त्यांचीं स्थानें, लोक व देवता** — १ मूलाधार चक्र–गुद–देवलोक–गणेश, २ स्वाधिष्ठानचक्र–षड्स्थान–ब्रह्मलोक–ब्रह्मा, ३ मणिपूरचक्र–नाभि–वैकुंठ–विष्णु, ४ अनाहतचक्र–हृदय–कैलास–शिव,

५ विशुद्धचक्र–कंठ–सत्यलोक–सरस्वती, ६ अग्निचक्र–भ्रुकुटीस्थान–स्वर्गलोक–महाविष्णु आणि ७ सहस्रकमलदलचक्र–ब्रह्मांड–मस्तकस्थान–निराधार लोक–परमात्मा देवता ( पचग्रंथी )

**सप्त चैतन्यें** — १ ब्रह्मचैतन्य, २ ईशचैतन्य, ३ जीवचैतन्य, ४ प्रमाणचैतन्य, ५ प्रमातृचैतन्य, ६ प्रमेयचैतन्य व ७ फलचैतन्य. पहिले शाश्वत ब्रह्मचैतन्य वाकीचीं सहा मायिक चैतन्यें मानिलीं आहेत.

**सप्त जिव्हा ( अग्नीच्या )** — ( अ ) १ कराली, २ धूमाली, ३ श्वेता, ४ लोहिता, ५ कनकप्रभा, ६ अतिरक्ता आणि ७ पद्मरागा. अशीं अग्नीच्या सात ज्वालाचीं नावें आहेत. यावरून अग्नीला सप्तजिह्व म्हणतात. ( म. मध्यमपर्व १–२० ) ( आ ) १ काली, २ कराली, ३ मनोजवा, ४ सुलोहिता, ५ सुधूम्रवर्णा, ६ स्फुलिंगिनी व ७ दिव्य वरुचि, ( मुंडकोपनिषद् १–२–४ )

**सप्त तत्त्वें ( जैन धर्माचीं )** — १ जीव, २ अजीव, ३ आस्रव, ४ बंध, ५ संवर, ६ निर्जरा आणि ७ मोक्ष. अशीं सात तत्त्वें जैन धर्मांत मानिलीं आहेत. कोणी कोणी यांच्या जोडीला ८ पुण्य व ९ पाप हीं धरून नऊ मानतात.

**सप्त तीर्थें** — १ सत्य, २ क्षमा, ३ इंद्रियनिग्रह, ४ सर्वभूतदया, ५ सत्यवादिता, ६ ज्ञान व ७ तप. हे सात प्रकारचे दैवी गुण सप्त तीर्थें म्हणून मानले आहेत.

> सत्यतीर्थं क्षमातीर्थं तीर्थमिन्द्रियनिग्रहः ।
> सर्वभूतदयातीर्थं तीर्थाना सत्यवादिता ॥
> ज्ञानतीर्थं तपस्तीर्थं कथितं तीर्थसप्तकम् ( स्कंद अ. म. १०-४५ )

**सप्त त्वचा** — १ अवभासिता, २ लोहिता, ३ श्वेता, ४ ताम्रा, ५ वेदिनी, ६ रोहिणी आणि ७ मांसधरा. अशा सात तऱ्हेच्या कमी अधिक जाडीच्या पापुद्र्यांची त्वचा बनलेली आहे. त्वचा हें एक शरीराचें सुंदर आवरण आहे. ( शार्ङ्गधर )

**सप्त द्वारें परमार्थ साधनाचीं** — १ श्रवण, २ साधन, ३ नित्यानित्य वस्तु विवेक, ४ मनन, ५ निदिध्यासन, ६ वैराग्य व ७ साक्षात्कार. ( मा. रा. ५-४७ )

**सप्त द्वारें स्वर्गाचीं** — १ तप, २ दान, ३ शम, ४ दम, ५ ह्री, ६ आर्जव व ७ सर्वभूतानुकंपा. ( म. वा. को. )

**सप्तर्षि महामल्यातून वचावलेले** — १ ब्रह्मा, २ वसिष्ठ ३ भृगु, ४ अत्रि, ५ दक्ष, ६ काश्यप व ७ आंगिरस. ( Wisdum of India )

**सप्त द्वीप** — १ जंबुद्वीप, २ प्लक्षद्वीप, ३ शाल्मलीद्वीप, ४ कुशद्वीप, ५ क्रौंचद्वीप, ६ शाकद्वीप आणि ७ पुष्करद्वीप. असे पृथ्वीचे प्राचीन काळचे सात मोठाले विभाग.

> जंबुप्लक्षाभिधानौ च शाल्मलश्च कुशस्तथा ।
> क्रौंचशाकौ पुष्करश्च ते सर्वे देवभूमय ॥ ( वृ. ना. पूर्वखंड )

**सप्त देह** — १ स्थूलदेह, २ सूक्ष्मदेह, ३ प्राणदेह, ४ वासनादेह, ५ मानसदेह, ६ बुद्धिदेह आणि ७ आत्मदेह. अस्तित्वाच्या या सातश्रेणी आहेत. त्याना सात पदें किंवा चैतन्याचीं वसन म्हणतात. ( धवलगिरि )

**सप्त धातु (खनिज)** — १ सोनें, २ रुपें, ३ तांबें, ४ शिसें, ५ कथल, ६ जस्त व ७ लोखंड.

**सप्त धातु ( शरिरांतील सात रस )** — ( अ ) १ रस, २ रक्त, ३ मांस, ४ मेद, ५ अस्थि, ६ मज्जा आणि ७ शुक्र. ( सुश्रुत ), ( आ ) १ त्वचा, २ रुधिर, ३ मांस, ४ मेद, ५ मज्जा, ६ अस्थि आणि ७ शुक्र. हे सात धातू असून हे देहाचें धारण करतात.

> रसो रुधिर मांसश्च मेदा मज्जास्थिरेतस ।
> सप्तधातव इमे प्रोक्ता सर्वदेहसमाश्रिता । ( कर्णहंस )

**सप्त धान्यें** — ( अ ) १ सातु, २ गहू, ३ साळ, ४ तांदूळ, ५ राळ, ६ सावे आणि ७ हरभरे, ( आ ) १ शाळी, २ यव, ३ तीळ, ४ उडीद, ५ राळे, ६ गहू आणि ७ हरभरे.

**सप्त नद** — १ शोणनद, २ सिंधुनद ३ हिरण्याक्ष, ४ कोक, ५ घर्घर ( घग्गर ), ६ लौहित आणि ७ शतद्रु ( शतद्रू ) हे सात नद होत.

" शतद्रुश्च नदा: सप्त पावना इति स्मृतम ॥" ( अ. म. १० १७ )

**सप्त पदार्थ (न्यायशास्त्र)** — १ द्रव्य, २ गुण, ३ कर्म, ४ सामान्य, ५ विशेष, ६ समवाय आणि ७ अभाव अशीं विश्वाचीं सात मूलद्रव्यें वैशेषिक दर्शनात मानिलीं आहेत सृष्टि ही अशी सप्तपदार्थात्मक आहे

**सप्त पदार्थ विद्या** — १ शिल्पविद्या, २ जलविद्या, ३ वातविद्या, ४ दर्शनविद्या, ५ नादविद्या, ६ विद्युल्लताविद्या आणि ७ चुंबकविद्या (म ज्ञा को )

**सप्तपदी** — (अ) विवाहविधीतील प्रमुख अंग—लाजाहोमानंतर वरानें वधूचा हात धरून अग्नि व द्विज यांसमक्ष एकेका अशा सात अक्षतपुंजावर चरण ठेवून सात पावलांनीं आपल्याजवळ आणणें याला सप्तपदी म्हणतात सप्तपदीखेरीज विवाह पूर्ण होत नाही

विवाहहोम झाला संपूर्ण, सप्तपदी पाणिग्रहण (रुक्मि स्वयं १६ २६)

(आ) वधू आपल्या पतीबरोबर सात पावलें चालून आपल्या सात मागण्या मान्य करून घेते पहिल्यात अन्न, दुसऱ्यात बल, तिसऱ्यात धनवस्त्रादि, चौथ्यात सुख पाचव्यात गाय, सहाव्यात सर्व ऋतूंत सुख आणि सातव्यात सख्य सज्जनांची मैत्री सात पावलें बरोबर चालल्यानं होते

(आ) १ अह, २ नायको, ३ पुन, ४ गृह, ५ स्वप्न, ६ धन आणि ७ आशा. असे सात पाश माणसाला बांधून ठेवतात. (भा. रा. सुंदर, ७२-४४).

"आशा पाश सप्तमहा" (हरिवंश अ. ८०).

**सप्त प्रकृति** — १ जाति, २ देश, ३ कुल, ४ काल, ५ वय, ६ बल आणि ७ प्रतिव्यक्ति (व्यक्तिवैशिष्ट्य). या सातांनी सात प्रकारच्या प्रकृती (मनुष्य शरीराच्या) बनतात, असे आयुर्वेदात मानले आहे.

(वाग्भट. शा. ८-२०)

**सप्त प्रयाग** — (अ) १ रुद्रप्रयाग-मंदाकिनी व अलकनंदा संगम, २ नंदप्रयाग, ३ कर्णप्रयाग, ४ देवप्रयाग, ५ पार्वतीप्रयाग, ६ विष्णुप्रयाग-विष्णुगंगा व अलकनंदा संगम आणि ७ प्रयागराज-गंगा व यमुना संगम. हे सात प्रयाग (महानद्यांचे संगम) आहेत; (आ) १ प्रयाग, २ देवप्रयाग, ३ कर्णप्रयाग, ४ नंदप्रयाग, ५ श्यामप्रयाग-श्यामगंगा व भागीरथी संगम, ६ गुप्तप्रयाग आणि ७ हरिप्रयाग.

**सप्त भयें** — १ इहलोकभय, २ परलोकभय, ३ वेदनाभय, ४ मृत्युभय, ५ अगुप्तिभय, ६ अश्लोकभय, व ७ अकस्मात्भय.

(रत्नकरंडक श्रावकाचार अ. १)

**सप्त भूमिका वासनाक्षयाच्या (वेदांतशास्त्र)** — १ योगभूमिका, २ विचारभूमिका, ३ असंसर्गा, ४ स्वप्नभूमिका, ५ सुषुप्तिभूमिका, ६ मनोलय आणि ७ कैवल्य. (चंद्रकांत, भाग २ रा)

**सप्त भूमिका ज्ञानाच्या** — १ शुभेच्छा, २ विचारणा-अध्यात्मशास्त्र आणि सत्समागम, ३ तनुमानसा-मन क्षयकारिणी, ४ सत्त्वापत्ति-चित्तनिर्मळ होणें, ५ असंसक्ति-अनासक्ति, ६ पदार्थाभावना-आत्मवस्तूंची भावना आणि ७ तुर्यगा-अवस्थात्रयाच्या पलीकडे जाणें. सातव्या अवस्थेत मनुष्य जीवन्मुक्त होतो. (रा. गी. ७-३४) (यो. वा.)

**सप्त मधु अथवा सात मधु पदार्थ** — १ ब्राह्मण (ज्ञान), २ राजशासन (प्रजारंजनरूपमधु), ३ धेनु, ४ बैल, ५ तांदूळ, ६ जव आणि ७ मध.

नीहिश्च यवश्च मधुसप्तमम् ॥ (अथर्व-अनु मराठी, भाग २ रा)

**सप्त महारथी** — १ द्रोण, २ कर्ण, ३ कृपाचार्य, ४ कृतवर्मा, ५ अश्वत्थामा, ६ शल्य आणि ७ जयद्रथ. हे कौरव पक्षीय सात महारथी. या सातांनीं मिळून भारतीय युद्धात एकाकी वीर अभिमन्यूचा वध केला.

**सप्त महानद्या** — १ गंगा, २ यमुना, ३ गोदावरी, ४ सरस्वती, ५ नर्मदा, ६ सिंधु, ७ कावेरी. यांचें स्नानसमयीं स्मरण करावें.

**सप्त मातृका** — (अ) १ श्री, २ लक्ष्मी, ३ धृति, ४ मेधा, ५ श्रद्धा, ६ विद्या आणि ७ सरस्वती, ( आ ) १ ब्राह्मी २ माहेश्वरी, ३ कौमारी, ४ वैष्णवी, ५ वाराही, ६ इंद्राणी आणि ७ चामुंडा या सप्त मातृका देवता होत. खेरीज ऐन्द्री ही आठवी मातृका म्हणजे देवीच्या आठ विभूति सांगितल्या आहेत. ( डामरतंत्र )

ब्राह्मी माहेश्वरी चैव कौमारी वैष्णवी तथा ।
वाराही च तथेंद्राणी चामुंडा सप्तमातरः ॥ ( देवी भा. स्कंध १२ )

**सप्त माया** — १ गायत्री, २ सत्यवती, ३ ज्ञानविद्या, ४ लक्ष्मी, ५ उमा, ६ वणिका व ७ धर्मद्रवा. ब्रह्मदेवानें सृष्टि निर्मिताना मायेचें साह्य घेतलें व त तिनें या सप्तरूपानीं दिलें, अशी कथा आहे. ( प्रा. च. को. )

**सप्त मायाः** — १ महामाया, २ वैष्णवीमाया, ३ दैत्येयीमाया, ४ गौहार्दी माया, ५ पैशाची माया, ६ आसुरी माया व ७ राक्षसी माया.

" सप्त माया व्यतिक्रम्य माया सयुयुजेऽष्टमीम् "

सत्त्वात्मिका अथवा सात्विकी माया या आठव्या मायेचा प्रयोग करून प्रद्युम्नानें शंबरासुराचा वध केला. ( विष्णु. ५–७–१८ )

तिनुत्तिया सात्त्विकी माया योग ।
शंबर सवेग पाडिला ॥ ( हरिवरदा ५५–२०४ )

**सप्त मुक्तिप्रद क्षेत्रें** — ( अ ) १ अयोध्या, २ मथुरा, ३ माया, ( हरिद्वार ) ४ काशी, ५ कांची, ६ अवंतिका–उज्जयिनी आणि ७ द्वारका.

अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका ।
पुरी द्वारावती चैव सप्तैते मोक्षदायिका ॥ ( गरुड. १६ ११४ )

( आ ) ( **परशुराम निर्मित** ) — १ रजतपीठ–उडपी, २ कुमार पर्वत–सुब्रह्मण्यक्षेत्र, ३ कुंभकाशी–कुंभकोणम्, ४ ध्वजेश्वर महादेव, ५ मोठ ऋषीच्या आश्रमी शंकर नारायण क्षेत्र, ६ गोकर्ण आणि ७ मूकांबा देवी.

(आ) १ अहं, २ यज्ञे, ३ पुत्र, ४ गृह, ५ स्वप्न, ६ धन आणि ७ आशा असे सात पाश माणसाला बांधून ठेवतात. (ना रा सुन्दर, २२-४४)

" आशा पाश सनमहा " (हारवरदा अ ८०).

**सप्त प्रकृति** — १ जाति, २ देश, ३ कुल, ४ काल, ५ वय, ६ बल आणि ७ प्रतियत्ति (व्यक्तिवैशिष्ट्य) या सातांनी सात प्रकारच्या प्रकृती (मनुष्य शरीराच्या) बनतात असे आयुर्वेदात मानले आहे

(वाग्भट. शा ८-२०)

**सप्त प्रयाग** — (अ) १ रुद्रप्रयाग–मंदाकिनी व अलकनंदा संगम, २ नंदप्रयाग, ३ कर्णप्रयाग, ४ देवप्रयाग, ५ पावनीप्रयाग, ६ विष्णुप्रयाग–विष्णुगंगा व अलकनंदा संगम आणि ७ प्रयागराज–गंगा व यमुना संगम हे सात प्रयाग (महानद्यांचे संगम) आहेत (आ) १ प्रयाग, २ देवप्रयाग, ३ कर्णप्रयाग, ४ नंदप्रयाग, ५ श्यामप्रयाग–श्यामगंगा व भागीरथी संगम, ६ गुप्तप्रयाग आणि ७ हरिप्रयाग.

**सप्त भयें** — १ इहलोकभय, २ परलोकभय, ३ वेदनाभय, ४ मृत्युभय, ५ अगुप्तिभय, ६ अश्लोकभय, व ७ अकस्मात्भय

(रत्नकरण्ड श्रावकाचार अ १)

**सप्त भूमिका वासनाक्षयाच्या (वेदांतशास्त्र)** — १ योगभूमिका, २ विचारभूमिका, ३ असंसंगा, ४ स्वप्नभूमिका, ५ सुषुप्तभूमिका, ६ मनोलय आणि ७ कैवल्य (चंद्रकांत, भाग २ रा)

**सप्त भूमिका ज्ञानाच्या** — १ शुभेच्छा, २ विचारणा–अध्यात्मशास्त्र आणि सत्समागम, ३ तनुमानसा–मन क्षयकारणी, ४ सत्त्वापत्ति–चित्तनिर्मळ होणें, ५ असंसक्ति–अनासक्ति, ६ पदार्थाभावना–आत्मवस्तूची भावना आणि ७ तुर्यगा–अवस्थात्रयाच्या पलीकडे जाणें सातव्या अवस्थेत मनुष्य जीवन्मुक्त होतो (रा गी ७-३४) (यो वा)

**सप्त मधु अथवा सात मधु पदार्थ** — १ ब्राह्मण (ज्ञान) २ राजशासन (प्रजारंजनरूपमधु), ३ धनु ४ दैल, ५. तांबूल, ६ दर आणि ७ मध

मीहश्च यवश्च मधुसप्तमम् ॥ (अथर्व–अनु मराठी भाग २ रा)

**सप्त महारथी** — १ द्रोण, २ कर्ण, ३ कृपाचार्य, ४ कृतवर्मा, ५ अश्वत्थामा, ६ शल्य आणि ७ जयद्रथ. हे कौरव पक्षीय सात महारथी या सातांनीं मिळून भारतीय युद्धांत एकाकी वीर अभिमन्यूचा वध केला.

**सप्त महानद्या** — १ गंगा, २ यमुना, ३ गोदावरी, ४ सरस्वती, ५ नर्मदा, ६ सिंधु, ७ कावेरी. यांचें स्नानसमया स्मरण करावें.

**सप्त मातृका** — (अ) १ श्री, २ लक्ष्मी, ३ धृति, ४ मेधा, ५ श्रद्धा, ६ विद्या आणि ७ सरस्वती, ( आ ) १ ब्राह्मी २ माहेश्वरी, ३ कौमारी, ४ वैष्णवी, ५ वाराही, ६ इंद्राणी आणि ७ चामुंडा या सप्त मातृका देवता होत. खेरीज ऐन्द्री ही आठवी मातृका म्हणजे देवीच्या आठ विभूति सांगितल्या आहेत. ( डामरतंत्र )

ब्राह्मी माहेश्वरी चैव कौमारी वैष्णवी तथा ।
वाराही च तथेंद्राणी चामुंडा सप्तमातरः ॥ ( देवी भा. स्कंध १२ )

**सप्त माया** — १ गायत्री, २ सत्यवती, ३ ज्ञानविद्या, ४ लक्ष्मी, ५ उमा, ६ वर्णिका व ७ धर्मद्रवा. ब्रह्मदेवानें सृष्टि निर्मितांना मायेचें साह्य घेतलें व तें तिनें या सप्तरूपानीं दिलें, अशी कथा आहे. ( भा. च. को. )

**सप्त मायाः** — १ महामाया, २ वैष्णवीमाया, ३ दैत्येयीमाया, ४ गौहर्की माया, ५ पैशाची माया, ६ आसुरी माया व ७ राक्षसी माया.

" सप्त माया व्यतिक्रम्य माया संयुयुजेऽष्टमीम् "

सत्त्वात्मिका अथवा सात्त्विकी माया या आठव्या मायेचा प्रयोग करून प्रद्युम्नानें शंबरासुराचा वध केला. ( विष्णु. ५–७–१८ )

नितुरिया सात्विकी माया योगें ।
शंबर सवेग पाडिला ॥ ( हरिवरदा ५५–२०४ )

**सप्त मुक्तिप्रद क्षेत्रें** — ( अ ) १ अयोध्या, २ मथुरा, ३ माया, ( हरिद्वार ) ४ काशी, ५ कांची, ६ अवंतिका–उज्जयिनी आणि ७ द्वारका.

अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका ।
पुरी द्वारावती चैव सप्तैते मोक्षदायिकाः ॥ ( गरुड. १६ ११४ )

( आ ) ( **परशुराम निर्मित** ) — १ रजतपीठ–उडपी, २ कुमार पर्वत–सुब्रह्मण्यक्षेत्र, ३ कुंभकाशी–कुंभकोणम्, ४ ध्वजेश्वर महादेव, ५ क्रोड ऋषीच्या आश्रमीं शंकर नारायण क्षेत्र, ६ गोकर्ण आणि ७ मूकांबा देवी.

रौप्यपात्र कुमाराद्रि कुम्भकर्णी घनश्वर ।
ज्वालाकर्णभूसान सप्तैते मानदायक ॥ (यात्रामपत्ता)

**सप्त मृत्तिका** — १ अश्वाच्या वारांतील, २ गजाच्या ठाण्यांतील, ३ वल्मीकस्थानचा, ४ वारूळ, ५ संगमावरचा, डोह आणि ७ गाईच्या गोठ्यातील या सात ठिकाणाहून आणलेली मृत्तिका कलशांत इत्यादि कर्मांत लागतात (धर्मशास्त्र)

**सप्त मौक्तिक स्थानें** — १ शिंपा, २ डुकराचे मस्तक, ३ सर्प मस्तक, ४ शंख, ५ मत्स्य ६ वराह (किंवा वेळू) आणि ७ हत्ती, (निर्णयसाद)

**सप्त रक्त** — १ तळहात, २ पायाचे तळवे, ३ नेत्रांचे कोपरे, ४ नख, ५ ओठ, ६ पन्नीम आणि ७ नख या सात ठिकाणच्या रक्ताला सप्तरक्त ही संज्ञा आहे

**सप्त रंग** — १ लाल, २ नारिंगी, ३ पिवळा, ४ हिरवा, ५ निळा, ६ पारवा आणि ७ जांभळा. हे सूर्यकिरणाच्या पृथक्करणानें होणारे अथवा इंद्रधनुष्यात दिसणारे सात रंग

**सप्त रश्मि (किरणें) सूर्याची** — १ सुषुम्ना, २ हरिकेश, ३ विश्वकर्मा, ४ विश्वश्रवा, ५ संयद्वसु, ६ अर्वावसु व ७ स्वराट् हे सात किरण. (कूर्म. ३३)

**सप्त रश्मिमय सृष्टि** — १ सूर्याचा किरण सात, २ पृथ्वीच्या धातु व उपधातूही सात, ३ रत्नाचे रंग सात, ४ मनुष्याच्या शरीरांतील धातु व उपधातूही सात, ५ त्वचा सात, ६ अग्नीच्या कला सात आणि ७ स्वर्गी राहण्याचा ठिकाणेंही सात. अशी सर्व सृष्टी सप्त रश्मिमय आहे (आरोग्य मंदिर आगस्ट १९५४)

**सप्तरस** — १ पृथ्वी, २ जल, ३ वनस्पति, ४ मनुष्य, ५ वाचा, ६ ऋचा व ७ साम असे सात रस अध्यात्म (वेदांत) शास्त्रांत मानले आहेत. सामाचें सार उद्गीथ म्हणजे ओंकार हा आठवा रस होय

"स एष रसानां रसतमः परमः परार्ध्योऽष्टमो यदुद्गीथः" (छां)

(आ) मार्कंडेय पुराणांतर्गत देवीस्तुति. यांत सातशें मंत्र आहेत. आश्विनमासांतील देवीनवरात्रांत यांचें पठण केलें जातें; (इ) राजा हाल यानें रचिलेला ग्रंथ. यांत सातशें गाथा आहेत, म्हणून त्यास गाथासप्तशती म्हणतात. त्यावरून मध्ययुगीन भारतांतील सामाजिक स्थितीचें सम्यक् ज्ञान होतें.

**सप्त संपत्ति** — १ जनसंपत्ति, २ धनसंपत्ति, ३ पुत्रसंपत्ति, ४ कलत्र-संपत्ति, ५ विद्यासंपत्ति, ६ इष्टफलसंपत्ति आणि ७ शरीरसंपत्ति.

**सप्त सम्राट** — १ भरत, २ श्रेणिक, ३ चन्द्रगुप्त, ४ बिंदुसार, ५ अशोक, ६ खारवेल, आणि ७ कुमारपाल. हे सात जैनधर्मीय सम्राट् भारतात होऊन गेले. (सप्त सम्राट्)

**सप्त सरस्वती** — १ सुप्रभा–पुष्कर, २ कांचनाक्षी–नैमिष, ३ विशाला–गया, ४ मनोरमा–उत्तर कोसल, ५ ओघवती–कुरुक्षेत्र, ६ सुरेणु–हरिद्वार ७ विमलोदका–हिमालय. यज्ञ प्रसंगीं ऋषींनीं आमंत्रण केल्यावरून सरस्वती या सात रूपांनीं अवतीर्ण झाली, त्या या सात नद्या होत. (म. भा. शल्य. अ. ३८)

**सप्त सागर** — १ लवणाब्धि, २ इक्षुसागर, ३ सुरार्णव, ४ आज्य-सागर, ५ दधिसमुद्र, ६ क्षीरसागर आणि ७ स्वादुजल (शुद्धोदक). असे सात सागर प्राचीनांनीं सांगितले आहेत. आजहि तांबडा समुद्र, काळा समुद्र अशीं आश्चर्योत्पादक नांवें रूढ आहेतच.

'सप्तमः स्यात्स्वादु जल इत्येते सप्तसागराः ॥ (विश्वब्रह्मपुराण १० २२)

'क्षीरसमुद्र क्षारसमुद्र । दधि मधु घृत समुद्र ।
सहावा तो इक्षुसमुद्र । सुरासमुद्र सातवा ॥' (भा. रा. किष्किंधा १० ९)

**सप्त सिंधु** — १ स्वात, २ गोमती, ३ वितस्ता, ४ चंद्रभागा, ५ इरावती, ६ सरस्वती व ७ सिंधु. या सात नद्यांना सप्तसिंधु अशी संज्ञा आहे.

**सप्त सोमयज्ञसंस्था** — १ अग्निष्टोम, २ अत्यग्निष्टोम, ३ उक्थ्य, ४ षोडशी, ५ वाजपेय, ६ अतिरात्र आणि ७ आप्तोर्याम.

**सप्त स्मर्तृगामी** — १ दत्तात्रेय, २ नारद, ३ व्यास, ४ शुक, ५ मारुति, ६ कार्तवीर्य आणि ७ गोरक्ष. हे सात स्मर्तृगामी म्हणजे स्मरण करणाराकडे जाणारे म्हणून प्रसिद्ध आहेत.

**सप्त स्नानें** — १ मान्त्र–मन्त्रानें जलप्रोक्षण, २ भौम–मृत्तिका स्नान, ३–आग्नेय–भस्मधारण करण्यानें, ४ वायव्य–गोधूलीचा स्पर्श, ५ दिव्य–वृष्टिजलानें (पाऊस पडत असता उन्हहि पडतें अशा वृष्टिजलांत), ६ वारुण–पाण्यांत बुडून आणि ७ मानस–परमेश्वरस्वरूपाचें ध्यान हें मानस स्नान होय.

मान्त्रं भौमं तथाग्नेयं वायव्यं दिव्यमेव च ।
वारुणं मानसं चैव सप्तस्नानं प्रकीर्तितम् ॥ (योगसंहिता)

**सप्त स्वर** — १ षड्ज, २ ऋषभ, ३ गांधार, ४ मध्यम, ५ पंचम, ६ धैवत व ७ निषाद. हे गायनशास्त्रांतील सात स्वर. यांचेच संक्षिप्त पर्याय– सा–रे–ग–म–प–ध–नी हे होत अहोबल नांवाचा गीतशास्त्रज्ञ होऊन गेला. त्यानेंच श्रुति व स्वर निश्चित केले असें म्हणतात.

**सप्त हविर्यज्ञसंस्था** — १ अग्न्याधान, २ अग्निहोत्र, ३ दर्शपूर्णमास, ४ चातुर्मास, ५ आग्रयणेष्टि, ६ निरूढ–पशुबंध आणि ७ सौत्रामणि.

**सप्त हरीतकी** — १ विजया, २ रोहिणी, ३ पूतना, ४ अमृता, ५ चेतकी, ६ अभया आणि ७ जीवती. अशा हिरड्याच्या सात जाती आहेत 'यस्य नास्ति गृहे माता तस्य माता हरीतकी ।' इतकें हिरड्याचें महत्त्व मानलें आहे. इंद्रानें अमृत प्राशन केलें. तेव्हां त्या अमृताचा एक थेंब जमिनीवर पडला. त्यापासून सात प्रकारचे हिरडे उत्पन्न झाले अशी पौराणिक कथा आहे. (भावप्रकाश)

**सप्त क्षार** — १ तिल, २ अपामार्ग, ३ करज, ४ पालाश, ५ अर्क, ६ यव आणि ७ चिंचा.

**सप्ताक्षरी मंत्र** — (अ) "श्रीगणेशाय नमः" हा मंगलवाचक आहे. कोणत्याहि कार्यारंभीं गणेश देवतेस नमन करण्याची रूढी आहे. (आ) "ॐ नमो नारायण" (प्रकाश संप्रदाय), (इ) "सर्वं खल्विदं ब्रह्म" हा उपनिषत् प्रणीत महामंत्र (छां. ३ १४ १) (ई) ॐ श्री विष्णवे नमः, (उ) "ॐ श्री सूर्याय नमः (ऊ) "श्रीगुरुदेवदत्त", (ए) "त्र्यंबकं यजामहे" हा एक महामृत्युंजय मंत्र आहे. (ऋग्वेद. ७ ५९-१२)

**सप्त क्षेत्रें** — १ कुरुक्षेत्र, २ हरिहरक्षेत्र (सोनपूर), ३ प्रभासक्षेत्र (वेरावळ), ४ रेणुकाक्षेत्र–मथुरेजवळ, ५ भृगुक्षेत्र–भडोच, ६ पुरुषोत्तमक्षेत्र व ७ सूकरक्षेत्र–सोरों. (कल्याण तीर्थांक)

**सात अंगें ( चिकित्सेचीं )** — १ रोगी, २ दूत, ३ वैद्य, ४ दीर्घायुष्य, ५ द्रव्य, ७ चांगला नोकर आणि ७ उत्तम औषध.

रोगी दूतो भिषग् दीर्घमायुर्द्रव्य मुसेवक ।
सदौषध चिकित्साया इत्यङ्गानि बुधा जगु ॥ ( नि. र. )

**सात अंगें राज्याचीं** — १ राजा ( राष्ट्रपती ), २ मंत्री, ३ प्रजा, ४ किल्ले ( दुर्गमस्थानें ), ५ कोश, ६ सैन्य व ७ मित्र–मित्रराष्ट्र. हीं प्राचीन सात अंग आजहि थोड्याशा फरकानें आहेत.

सप्तप्रकृतयो ह्येता सप्ताङ्ग राज्यमुच्यते । ( मनु. ९ २९४ )

सेरीज राज्यात दूताचा सचार हें एक आवश्यक अंग आहे असें अथर्ववेदांत सांगितलें आहे.

" अजिर दूत सचराते ॥ (अथर्व, मडळ ३ )

**सात अर्थ ज्ञानाचे ( गीतोक्त )** — १ तत्वज्ञान, २ साक्षरज्ञान, ३ परोक्षज्ञान, ४ साधनज्ञान, ५ विवेकज्ञान, ६ लौकिकज्ञान आणि ७ शास्त्रज्ञान ( तत्त्वचिंतामणि )

**सात अनुष्ठानें (देवीचीं)** — १ नवरात्र विधान, २ नित्यचंडी विधान, ३ नक्तदुर्गानुष्ठान, ४ कालरात्रि, ५ नवचंडी, ६ शतचंडी आणि ७ सहस्रचंडी ( देवीमाहात्म्य अ. १५ )

**सात अरण्यवासी प्राणी** — १ सिंह, २ वाघ, ३ डुक्कर, ४ रेडे, ५ हत्ती, ६ रास आणि ७ वानर. ( म. भा भीष्म. ४–१७ )

**सात अवतार दुर्गा देवतेचे ( भविष्यकालीन )** — १ विंध्याचलवासिनी, २ रक्तदंतिका, ३ शताक्षी, ४ शाकंवरी, ५ दुर्गा, ६ भीमा आणि ७ भ्रामरी. ( कल्याण शक्ति अंक )

**सात अवयव विश्वाचे** — १ शिर–द्युलोक, २ नेत्र–सूर्य, ३ प्राण–वायु, ४ मध्यस्थान–आकाश, ५ मूत्रस्थान–अन्न व पाणी, ६ व ७ दोन चरण–पृथ्वी. आत्मा शरीर धारण करतो त्याप्रमाणें ईश्वर हें विश्व धारण करतो. अशी कल्पना करून ऋषींनीं हे विश्वाचे सात अवयव सांगितले आहेत. ( माण्डूक्य )

**सात अवस्था चिदाभासाच्या ( वेदांतशास्त्र )** — १ अज्ञान, २ आवरण, ३ विक्षेप, ४ परोक्षज्ञान, ५ अपरोक्षज्ञान, ६ शोकनाश व ७ आनंदावाप्ति ( विचार. सा. रहस्य )

**सात अस्तित्व तत्त्वें अथवा प्राचीन ऋषींनीं ऐकलेले महान् शब्द** —१ सत्, २ चित्, ३ आनंद, ४ विज्ञान, ५ मन, ६ प्राण आणि ७ अन्न ( जडद्रव्य ) या सात वस्तु एकाच सत्य वस्तूंची विविध रूपें आहेत.

( दिव्यजीवन खड. २ रा )

**सात अक्षौहिणी सैन्याचे सात सेनापति ( पांडव पक्षीय )** — १ द्रुपद, २ विराट, ३ धृष्टद्युम्न, ४ शिखण्डी, ५ सात्यकि, ६ चेकितान व ७ भीमसेन.

> सात्यकिश्चेकितानश्च भीमसेनश्च वीर्यवान् ।
> एते सेनाप्रणेतारो वीरा सर्वे तनुत्यज ॥ ( म. भा. उद्योग. १५१५ )

श्रीकृष्णाच्या मताप्रमाणे पांडवांकडील सरसेनापति पद धृष्टद्युम्नास देण्यात आले होते.

**सात आखाडे वैराग्याचे** — १ वस्त्रधारा, २ निरंजनी, ३ निर्वाणी, ४ निर्मोही, ५ दिगंबरा, ६ ताम्बरा आणि ७ खाकी (ऐ. गोष्टी. भाग. ३ रा)

**सात आचार तांत्रिकांचे** — १ वेदाचार, २ वैष्णवाचार, ३ शैवाचार, ४ दक्षिणाचार, ५ वामाचार, ६ सिद्धान्ताचार व ७ कौलाचार. असे तंत्र-शास्त्रांत सात प्रकारचे आचार मानले आहेत ( नाथसंप्रदाय )

(**सात आश्चर्यें** — १ आकाशाला-खांब नाहीं, २ तळहाताला-केस नाहात, ३ समुद्राला-झाकण नाहीं, ४ घोड्याला-स्तन नाहीं, ५ देवाला-आईबाप नाहात, ६ जिभेला-हाड नाहीं आणि ७ केसांना-रक्त नाही. हीं सात आश्चर्यें आहेत )

**सात आश्चर्यें (प्राचीन जगातील)** — (अ) १ इजिप्तमधील मनोरे, २ एफिसस येथील डियाना देवतेचे मंदिर, ३ बाबिलोन मधील भिंती ( उंची ३३५ फूट, जाडी ८५ फूट ) व झुलत्या बागा, ४ आलिंपिया येथील ज्युपिटरचा पुतळा ( ग्रीस ), ५ हलिकार्नेस येथील कबर (आशिया मायनर), ६ ऱ्होडस येथील सूर्यदेवतेचा पुतळा आणि ७ अलेक्झांड्रिया बंदराच्या

प्रवेशद्वारावरील दीपगृह; (आ) (मध्ययुगीन) — १ रोम येथील ॲंफी थिएटर, २ रोम येथील शववापिका, ३ चीनमधील मोठी भिंत (लांबी २५०० मैल), ४ इंग्लंडमधील *पाषाणवलय*, ५ *पिसा येथील झुकता मनोरा*, ६ *ईजिप्तमधील* पिरामिड अगर राजांची थडगीं आणि ७ कॉन्स्टँटिनोपल येथील सेंट सोफियाचें मंदिर हीं जगांतील सात आश्चर्यें होत; (इ) (अर्वाचीन) — १ बिनतारी संदेश यंत्र, २ दूरध्वनि यंत्र (रेडिओ), ३ टेलिव्हिजन व ब्रोलपट, ४ विमान, ५ रेडियमचा शोध, ६ विच्छिन्न किरणद्वारा पृथक्करण आणि ७ 'क्ष' किरण आणि अतिनील किरण यांचा शोध; (ई) १ एम्पायर स्टेट बिल्डिंग (न्यूयॉर्क), २ पनामा कालवा, ३ लंडनमधील तळघरें, ४ गोल्डन गेट ब्रिज (सॅन्फ्रॉन्सिस्को), ५ अस्वान धरण (ईजिप्त), ६ वॉशिंग्टनचें स्मारक ७ सिंधु नदीवरील लॉइड बराज.

**सात आश्चर्यें (भारतांतील)** — (अ) आग्र्याचा ताजमहाल, २ वेरूळचीं लेणीं, ३ विजापुरचा गोलघुमट, ४ कुतुबमिनार–दिल्ली ५ मीनाक्षी मंदिर–मदुरा, ६ श्रवणबेळगोळ (म्हैसूर राज्य) येथील गोमटेश्वरचा प्रचंड पुतळा उंची ७० फूट (या पुतळ्यावर असलेल्या आद्य ज्ञात मराठी लेखांतील 'श्री'ची उंची सुमारें दीड फूट आहे) आणि ७ चितोड येथील जयस्तंभ (१२२ फूट उंची व ९ मजल्याचा). इतका भव्य स्तंभ जगांत कोठेंहि नाहीं. (वैदिक संस्कृतीचा विकास). ब्राह्मणांनीं वेदग्रंथ मुखोद्गत करून वेदांचें रक्षण केलें हें आठवें आश्चर्य आहे; (आ) १ अमृतसरचें सुवर्णमंदिर, २ म्हैसूरचें वृंदावन उद्यान, ३ काश्मीरमधील शालीमार बगीचा, ४ गिरसप्पा धबधबा (म्हैसूर राज्य), ५ अजिंठा लेणीं, ६ बावनगजा येथील ऋषभ–देवमूर्ति (अखंड शिळेंत कोरलेली. उंची ८४ फूट. बडवानीहून ५ मैल–मध्यभारत) व ७ भाकरानानगल धरण. (पूर्व पंजाब).

**सात आसरा (अप्सरा) अथवा जलदेवता** — १ मच्छी, २ कूर्मी, ३ *कर्कटी*, ४ *दर्दुरी*, ५ *जलुपी*, ६ *सोमपा* व ७ *मकरी*. (*प्रवाद*)

**सात आचार्य** — बारा आळवारींच्या नंतरच्या कालांत (दहावें शतक) दक्षिण भारतांत सात आचार्य होऊन गेले तेः– १ शठकोपमुनि (नम्माळवार), २ नाथमुनि ३ पुंडरीकाक्ष, ४ राममिश्र, ५ यामुनाचार्य, ६ महापूर्ण व ७ रामानुजाचार्य. (रहस्यत्रयसार)

**सात उपाय** — १ साम, २ दाम, ३ भेद, ४ दंड, ५ मंत्र, ६ औषधि व ७ इंद्रजाल. (मत्रविद्या)–हे सात उपाय राजनीतिशास्त्रात सांगितले आहेत. (म. भा. सभा. ५–२२).

**सात कसोट्या (ग्रंथतात्पर्यनिर्णयाच्या)** — १ आरम्भ, २ शेवट, ३ अभ्यास म्हणजे पुनरुक्ति किंवा वारंवार काय सांगितलें आहे हे पाहणें, ४ अपूर्वता, ५ फल (ग्रंथाच्या अभ्यासाचा वाचकावर घडलेला परिणाम), ६ अर्थवाद (पोकळ स्तुति) आणि ७ उपपत्ति (तर्कशुद्ध विचारसरणी).

उपक्रमोपसंहारौ अभ्यासोऽपूर्वता फलम् ।
अर्थवादोपपत्ती च लिंगं तात्पर्यनिर्णये ॥ (गी. र. २१).

**सात कारणें (पापाचीं)** — १ प्रगतीचा रुद्ध मार्ग बंद होणें, २ मद्यपान, ३ क्रोधी स्वभाव, ४ जुगार, ५ कामाकडे लक्ष लागेनासें होणें, ६ हीन माणूस थोर हुद्यावर येणें आणि ७ आळस वाटणें. हीं पापाकडे प्रवृत्ति होण्याचीं सात कारणें आहेत. (ऋग्वेद ७–८६–६)

**सात काल विभाग** — १ अयन, २ ऋतु, ३ मास, ४ पक्ष, ५ दिन ६ रात्र आणि ७ मुहूर्त.

**सात कार्य मर्यादा यज्ञाच्या** — १ स्थूल शरीर, २ वासनाशरीर, ३ बहिर्मानस शरीर, ४ अन्तर्मानस शरीर, ५ बुद्धि, ६ पराबुद्धि आणि ७ जीव. यज्ञकार्य या सात मर्यादामध्ये होतें. मनुष्याच्या कार्यांच्या याच मर्यादा आहेत. (पुरुषसूक्त स्पष्टीकरण)

**सात कुलीन लक्षणें** — १ तप, २ इंद्रियदमन, ३ अध्ययन, ४ अध्यापनादि कर्मे, ५ पवित्र विवाह, ६ सतत अन्नदान आणि ७ सदाचरण.

**सात कोंकणें (महाराष्ट्राचीं)** — १ लाट, २ डाग, ३ शूर्पारक, ४ अष्टागर, ५ तळकोंकण, ६ गोमांतक आणि ७ वनवासी.

**सात कोंकणें (सह्याद्रीचीं)** — (अ) १ वृपक, २ केरळ, ३ मूषक, ४ आलुक, ५ पशु, ६ कोंकण आणि ७ परकोंकण. (प्रपंच हृदय)

(आ) १ केरळ, २ तुलग, ३ सौराष्ट्र, ४ कोंकण, ५ करहाट, ६ करनाटक व ७ बर्बर.

"इत्येते सप्तदेशा वै कोंकणाः परिकीर्तिताः" (सह्याद्रि खंड)

**सात गुण ऋषींचे** — १ दार्घजीवन, २ मंत्रसाक्षात्कार, ३ शापानुग्रह शक्ति, ४ दिव्यदृष्टि, ५ प्रभुद्धता, ६ धर्म प्रत्यक्ष दिसणें आणि ७ गोत्रप्रवर्तन.

**सात गुण दूतास आवश्यक** – १ कुलीनत्व, २ कुटुंबवत्सलता, ३ भाषणचातुर्य, ४ दक्षता, ५ प्रियभाषित्व, ६ स्मरणशक्ति व ७ सांगितलें असेल तेंच बोलणें.

कुलीन कुलसंपन्नो वाग्मी दक्ष प्रिय वच ।
यथोक्तवादी स्मृतिमान्दूत स्यात्सतभिर्गुणै ॥ (म. भा शांति. ८५–२९)

(आ) १ गुणा, २ शुद्ध ३ चातुर्यनिपुण, ४ अवगुणरहित, ५ क्षमाशील, ६ बुद्धिमान् व ७ शत्रूचें मर्म जाणणारा. (तुलसी रामायण–दीप)

**सात गुण वक्ता व श्रोता या उभयतासहि आवश्यक** – १ सिंहाव लोकन, २ वक्ष्यमाण, ३ उपमा, ४ रूपक, ५ विशेषण, ६ उपक्रम व ७ उप संहरण, 'हे सतगुण उभयांसी ॥' (हरिवरदा १–७७५)

**सात गुण (वधूचे)** — १ कुल, २ शील, ३ शरीर, ४ वय, ५ विद्या, ६ वित्त आणि ७ सनाथता.

**सात गुण (वराचे)** — १ कुल, २ शील, ३ पालक, ४ विद्या, ५ द्रव्य, ६ शरीर आणि ७ वय.

कुल च शील च वयश्च रूप विद्या च वित्त च सनाथता च ।
एतान् गुणान् सप्त परीक्ष्य देया कन्या बुधै शेषमचिन्तनीयम् ॥ (सु)

**सात गुण (सन्मित्राचे)** — १ प्रामाणिकपणा, २ औदार्य, २ शौर्य, ४ सुखदु खात समरसता, ५ प्रेम, ६ दक्षता व ७ खरेपणा.

शुचित्व त्यागिता शौर्य सामान्य सुखदु खयो ।
दाक्षिण्य चानुरक्तिश्च सत्यता च सुहृद्गुणा । (हितो.)

**सात गुण (क्षत्रियाचे)** — १ शौर्य, २ तेजस्विता, ३ मनोधैर्य, ४ कर्तव्यजागरूकता, ५ युद्धपराङ्मुख न होणें, ६ दातृत्व आणि ७ शासन-प्रभुत्व. (भ. गी १८ ४३)

**सात गुरु** — १ मातापिता, २ सुईण, (लेकरू असताना न्हाउमा घालते), ३ विद्यागुरु, ४ उपाध्याय, ५ ज्योतिषी, ६ मंत्र देणारा आणि ७ मोक्षदाता सद्गुरु (सि. बो. ५०-१८)

**सात गोष्टींत अतिरेकानें विनाश** — १ व्यायाम, २ जागरण, ३ प्रवास, ४ स्त्रीसमागम, ५ अतिहास्य, ६ अतिवल्बड व ७ कोणतेहि अति रिक्त साहस

व्यायामजागराध्वस्त्रीहास्यभाष्यादिसाहसम् ।
गज सिंह इवाकर्षन् भजन्नपि विनश्यति ॥ (वाग्भट अ २२ ३)

**सात गोष्टींत अनृत भाषण निंद्य होत नाहीं** — १ स्त्रीला वश करताना, २ विनोदप्रसंगीं, ३ विवाह, ४ उपजीविकेचें साधन मिळवतेवेळीं, ५ प्राणसंकट आल्यावेळीं, ६ गोब्राह्मणहितार्थ व ७ एखाद्याची हिंसा टाळण्यासाठीं

स्त्रीषु नर्म विवाहे च वृत्त्यर्थे प्राणसंकटे ।
गोब्राह्मणहितार्थे हिंसायां नानृतं स्याज्जुगुप्सितम् ॥ (भा ८ १९ ४३)

**सात गोष्टींत श्रीमद्भागवताचें सार** — १ श्रीकृष्णजन्मकथन, २ श्रीकृष्णाचें बालपण, ३ पूतनावध, ४ गोवर्धन पर्वत उचलून धरिला, ५ कंसवध, ६ कौरवांचा निःपात आणि ७ पांडवांचा प्रतिपाळ (भागवत)

**सात गोष्टी प्रकट करूं नयेत** — १ सिद्धमंत्र, २ औषध, ३ दान धर्म, ४ गृहच्छिद्र, ५ मैथुन, ६ पाकदोष व ७ निंद्यगोष्ट

सिद्धमंत्रौषधं धर्मं गृहच्छिद्रं च मैथुनं ।
कुभुक्तं कुश्रुतं चैव मतिमान् न प्रकाशयेत् ॥ (बुधभूषण)

**सात गोष्टी विद्यासंपादनांत विघ्न आणणाऱ्या** — १ आळस, २ उद्धटपणा, ३ दुश्चित्तपणा, ४ गप्पेबाजी, ५ घुम्मपणा, ६ स्वतःला सगळें येतें असा अभिमान आणि ७ दुराग्रह (म भा उद्योग ४० ५)

**सात गोष्टी श्रद्धेय व भावनेप्रमाणें फल देणाऱ्या होत** — १ मंत्र, २ तीर्थ, ३ ब्राह्मण, ४ देव ५ ज्योतिषी, ६ औषधी व ७ गुरु

मंत्रे तीर्थे द्विजे देवे दैवज्ञे भेषजे गुरौ ।
यादृशी भावना यस्य सिद्धिर्भवति तादृशी ॥ (पंचतंत्र)

**सात गोष्टी सेवेला आवश्यक** — १ विश्वास, २ पतिव्रता, ३ गौरव, ४ संयम, ५ शुश्रूषा, ६ प्रेम आणि ७ मधुर भाषण

**सात ग्रामवासी प्राणी** — १ गाय, २ शेळी, ३ मढी, ४ मनुष्य, ५ घोडा, ६ खेचर आणि ७ गाढव

गौरजानि मनुष्यश्च अश्वा वनरगदम ।
एते ग्राम्या समाख्याता पशव सत साधुभि ॥ ( म. भा भीष्म )

**साती ग्रंथ** —— १ शिशुपालवध, २ एकादशस्कंध, ३ नरेंद्र–रुक्मिणी स्वयवर, ४ वत्सहरण, ५ रिद्धपुरवर्णन, ६ सह्याद्रिवर्णन व ७ ज्ञानप्रबोध महानुभाव संप्रदायाच्या या सात ग्रथाना म्हणतात ( महानुभावीय मराठी वाङ्मय )

**सात तत्त्वें जगाचा आधार असलेलीं** —— १ पृथ्वी, २ आप, ३ तेज, ४ वायु, ५ आकाश, ६ तमाना आणि ७ महत्तत्त्व हें जग या सात तत्त्वाच्या आधार चाल्लेलं आहे ( अथन-अनु मराठी )

**सात ताप ( क्लेश ) विद्वानाना होणारे** — १ आधिभौतिक, २ आधिदैविक आणि ३ आध्यात्मिक हे तीन सर्व साधारणासहि होणारे पण या खेराज विद्वानास होणारे ४ अभ्यास ( अभ्यासाला अत नाहीं ) ५ भय ( अपमानाचें भय ) ६ विस्मय ( चूकभूल होण्याची चिंता ) आणि ७ गर्व–विद्वत्तेचा अभिमान ( कल्याण नवबर १९६२ )

**सात तारा वीणेच्या** — १ मध्यम ( मध्यसप्तक ) २ ३ षड्ज जोड ( मध्यसप्तक ), ४ खर्ज, ५ मध्यम ( तारसप्तक ), ६ पचम ( तारसप्तक ), व ७ षड्ज ( तारसप्तक ).

**सात ताल ( सगीत शास्त्र )** — गायनात तालाला महत्त्व आहे असे सात ताल आहेत ते— १ ध्रुवताल–आडचौताल, २ मठ्य–सुरफाक, ३ रूपक–दादरा, ४ झपा–झपताल, ५ त्रिपुट–तेवरा, ६ अड्डताल–पंचदी व ७ एकताल–धुमाळी–परवा

अड्डतालैकतालौ च सप्त ताला प्रकीर्तिता ॥ ( सगीत प्रबध )

**सात तामसी विद्या** — १ जारण, २ मारण, ३ मोहन, ४ उच्चाटन, ५ आकर्षण, ६ वशीकरण व ७ स्तंभन ( तत्त्व निज विवेक )

**सात देवता सिद्धि देणाऱ्या** — १ नृसिंह, २ राम, ३ विष्णु, ४ शंकर, ५ अंबिका, ६ गजानन आणि ७ गुरु

नृसिंहरामौ विष्णुश्च शंकरश्चांबिका तथा ।
गजानना गुरुश्चैव सप्तैते सिद्धमंत्रदा ॥ ( सु. )

**सात दोष ( वधूचे बाबतींत )** — १ भुरे केस असलेली, २ अधिक अवयवाची, ३ असाध्य रोगग्रस्त, ४ मुळींच केस नसलेली, ५ अति केस असलेली, ६ वाचाळ आणि ७ माजरासारखे डोळे असलेली.

नोद्वहेत् कपिलां कन्यां नाधिकाङ्गीं न रोगिणीम् ।
नालोमिकां नातिलोमां न वाचालां न पिङ्गलाम् ॥ (मनु. ३–८)

**सात दोष (स्त्रियाच्या बाबतींत)** — १ अनृत, २ साहस, ३ माया. ४ मूर्खत्व, ५ अति लाभ, ६ अशुचिता व ७ निर्दयत्व.

अनृतं साहसं माया मूर्खत्वमतिलोभता ।
अशौचं निर्दयत्वं च स्त्रीणां दोषाः स्वभावजाः ॥ (देवी भाग )

**सात द्वारें (उच्चार न करितां खोटें सांगण्याचीं)** — १ दोन डोळे, २ दोन कान, ३ दोन नाकपुड्या व एक मुख. या सात द्वारांनी मनांतील उद्देश खरा किंवा खोटा सांगता येतो. डोळे मिचकावणे, कानावर हात ठेवणे, नाक वाकडें करणे, वगैरे प्रकारांनी खोटें सांगता अगर कळविता येते. (राम. गी. १५–५७ )

**सात निसर्गाचीं औषधें** — १ अन्न, २ पाणी, ३ हवा, ४ सूर्य किरणें, ५ विश्रांति, ६ स्वच्छता व ७ व्यायाम ( अक शास्त्र )

**सात पद्धति ( द्रव्य मिळविण्याच्या )** — १ दाय–वडिलार्जित धन, २ लाभ–निधि प्राप्त होणें, ३ क्रय–व्यापार, ४ जय ( विजय ), ५ प्रयोग–व्याजबट्टा, ६ कर्मयोग–शेती आणि ७ सत्प्रतिग्रह. ( मनु. १० ११५ )

**सात पाकयज्ञ** — १ हुत, २ प्रहुत, ३ आहुत, ४ शूलगव, ५ बलिहरण, ६ प्रत्यवरोहण आणि ७ अष्टकाहोम.

**सात पाकयज्ञसंस्था** — १ स्थालीपाक (पार्वण), २ अष्टका ३ अमाश्राद्ध ( मासिक श्राद्ध ) ४ औपासन होम, ५ श्रावणी, ६ आग्रहायणी व ७ चैत्री (शूलगव). या सात पाकयज्ञसंस्था होत. आर्यांचे संस्कार (पूर्वार्ध)

**सात पिण्डफल वृक्ष** — १ खजूर, २ ताड, ३ शिंदी, ४ ताल, ५ खजुरी, ६ पोफळ व ७ माड. हे सात पिंडासारखीं फळें असलेले वृक्ष होत.

खर्जूरस्तालहिंतालौ ताली खर्जूरिकास्तथा ।
गुवाका नारिकेलश्च सप्त पिण्डफलद्रुमाः ॥ (सु. )

**सात पूजेचीं अधिष्ठानें** — १ प्रतिमा, २ स्थंडिल, ३ अग्नि, ४ सूर्य, ५ उदक, ६ हृदय व ७ ब्राह्मण. ( ब्रह्मज्ञानी ) ( भाग ११-२७ ९ )

**सात प्रकारचे ऋषि** — १ देवर्षि, २ ब्रह्मर्षि, ३ राजर्षि, ४ महर्षि, ५ परमर्षि, ६ श्रुतर्षि आणि ७ काडर्षि.

**सात प्रकार ऋषिगणाचे** — १ ब्रह्मर्षि–भृगु, अंगिरा इ , २ देवर्षि–नारद, पर्वत इ , ३ महर्षि–व्यास, वसिष्ठ इ , ४ परमर्षि–पराशर, भेल इ., ५ तै. स. च्या पाच काडाचे द्रष्टे ते काडर्षि, ६ श्रुतर्षि–सुश्रुत, चरक इ. व ७ राजर्षि–ऋतुपर्ण ( सस्कृति कोश )

**सात प्रकार जाणिवेचे** — १ क्रोध, २ लाभ, ३ मोह ४ मद, ५ मत्सर, ६ आनद आणि ७ दु ख ( ज्ञानेश्वरी अ. १२ )

**सात प्रकारचे गुरु** — १ गुरु, २ माता, ३ पिता, ४ सूर्य ५ चद्र, ६ अग्नि आणि ७ मनदाता. हे सात प्रकारचे गुरु हात.

'मन्त्रदाता गुरु ख्यात. सप्तम परिकीर्तित ॥'

**सात प्रकारचे जल** — १ आसिंजल, २ मासींजल, ३ महींजल, ४ अहींजल, ५ पाण्याजल, ६ बगालजल आणि ७ ? सृष्टीच्या उत्पत्तिकालीं जल उत्पन्न झाल तेव्हा असें सात प्रकारचें जल होतें अशी गोंडी लोककथा आहे. ( प्रतिष्ठान १९५४ )

**सात प्रकार ताडव नृत्याचे** — १ आनद ताडव, २ प्रदोष ताडव, ३ कालिका ताडव, ४ त्रिपुर ताडव, ५ गौरी ताडव, ६ ऊर्ध्व ताडव व ७ सहार ताडव ( शैवागम )

**सात प्रकारचे दर्भ** — १ दर्भ, २ काश ( एक प्रकारचें गवत ), ३ दुर्वा, ४ सातूची पानें, ५ व्रीहि, ६ माळ व ७ पादरसाळ.

कुशा काशास्तथा दूर्वा यवपत्राणि व्रीहय ।
बल्वजा पुण्डरीकाश्च कुशा सप्त प्रकीर्तिता ॥ (पद्म सृष्टि. ४९-३५ )

**सात प्रकारचीं दानें** — १ अन्नदान, २ सपत्तिदान, ३ भूदान, ४ बुद्धिदान, ५ श्रमदान, ६ रक्तदान व ७ जीवदान.

**सात प्रकार दीक्षेचे** — १ क्रियावती, २ कलावती, ३ वर्णमयी, ४ वेधमयी, ५ मात्री, ६ आणवी व ७ शाभवी. ( प्रसाद )

**सात प्रकारचे दुष्टजन** — १ सदोदित दुष्कृत्याकडे धावणारा, २ धर्माकडे मुळींच लक्ष न देणारा, ३ झोपाळू, ४ व्यसनासक्त, ५ मद्यपि, ६ अगम्य स्त्रीशीं गमन करणारा आणि ७ सदोदित दुष्टाशीं समापण करणारा.

अकार्ये भ्रमते नित्य धर्मार्थे न व्यवस्थित. ।
निद्रालुर्व्यसनासक्तो मद्यपः स्त्रीनिषेवक. ।
दुष्टै.सह सदालाप. स दुष्टः सप्तधा स्मृतः ॥ (भविष्य मध्यम ५ ५४)

**सात प्रकारचे देशविशेष** — १ जगली प्रदेश, २ गाव वसलेला प्रदेश, ३ डोंगराळ, ४ पाणथळीचा, ५ वाळवटाचा, ६ पठार व ७ उचसखल. असे युद्धशास्त्राच्या दृष्टीनें सात प्रकारचे देशविशेष होत. (कौटिल्य. अधिकरण ९ १)

**सात प्रकार प्राणायामाचे** — १ रेचक, २ पूरक, ३ कुंभक, ४ उत्कर्ष, ५ अपकर्ष, ६ शून्य व ७ उत्क्राति. (परमानुभवबोध)

**सात प्रकारांनीं मिळालेलें धन धर्मसंमत** — १ परपरागत म्हणजे वारसाहक्कान मिळालेले, २ निधिलाभ, ३ क्रयविक्रय, ४ विजय, ५ न्याय्य वृद्धि, ६ कृषि वाणिज्य आणि ७ शास्त्रसमत दान. (मनु. १०–११५)

**सात प्रकारचे यज्ञ** — १ ब्रह्मयज्ञ, २ द्रव्ययज्ञ, ३ शरीरयज्ञ, ४ वाग्यज्ञ, ५ प्राणयज्ञ, ६ बुद्धियज्ञ, ७ कर्मयज्ञ.

**सात प्रकारचें युद्ध** — १ धनु, २ चक्र, ३ कुंत (भाला), ४ खड्ग, ५ क्षुरिका, ६ गदा आणि ७ बाहुयुद्ध. असे युद्धाचे सात प्रकार प्राचीन काळीं असत. (जामदग्न्य धनुर्वेद अ. १)

**सात प्रकारच्या लज्जा** — १ जनोलज्जा, २ मनोलज्जा, ३ वयोलज्जा, ४ धर्मलज्जा, ५ कर्मलज्जा, ६ जातिलज्जा आणि ७ कुललज्जा.

**सात प्रकारचें वायु अंतरिक्षांतलें** — १ आवह–भूमीपासून मेघमडलापर्यंत, २ प्रवह–मेघमडलापासून सूर्यमडला पर्यंत, ३ उद्वह–तिसऱ्या मडलातील, ४ सवह–चद्रमडलापासून नक्षत्रमडलपर्यंत, ५ विवह–नक्षत्रमडलापर्यंत, ६ पराप्रवह अथवा परिवह–शनिमडलापासून सप्तर्षिपर्यंत, आणि ७ परावह– सप्तर्षिपासून ध्रुवापर्यंत. असे अतरिक्षात सचारणारे वायुमडलाचे सात मार्ग वा सात भाग आहेत. यासच सप्तस्कध असेंहि म्हणतात.

परानहो नाम वरो वायु स दुरानिनम ।
एवमेते दिते पुत्रा मस्त परमाद्भुता ॥ (बृहनारदीय पूर्व६० ३०)

**सात विपर्यास ( दोष ) चित्र संबंधी** — १ युगविपर्यास, २ ऋतुविपर्यास ३ कालविपर्यास, ४ वस्तुविपर्यास, ५ चारीरीतांचा विपर्यास, ६ स्थानविपर्यास, व ७ जातिविपर्यास. असे सात दोष चित्रसंबंधी मानले आहेत. ते चित्रकारानें टाळावेत. ( म. ज्ञा. को वि. १३ )

**सात शिष्यवर श्रीकृष्णाचे** — १ ब्रह्मा, २ मनु, ३ वेदव्यास, ४ देवव्यास, ५ अर्जुन, ६ उद्धव आणि ७ भीष्म.

अर्जुन आणि उद्धव । गंगासुत भीष्मदेव ।
हे सप्त शिष्य जाणव । श्रीकृष्णाचे ॥ ( दर्शनप्रकाश )

**सात प्रकारचे विडे** — १ कातरविडा, २ कापूरविडा, ३ फुलपाविडा, ४ गोविंदविडा, ५ गोंदविडा, ६ मोडविडा आणि ७ मोदकविडा. याखेरीज चार्डीनिश, गोपाळविडा असे आणखी कांही प्रकार आहेत.

**सात प्रकारच्या व्याधि** — १ आदिबलप्रवृत्त-आनुवंशिक, २ जन्मबलप्रवृत्त, ३ दोषबलप्रवृत्त, ४ संघातबलप्रवृत्त-अपघात वगैरेमुळें होणारे, ५ कालबलप्रवृत्त-स्वाभाविक ऋतुमानामुळें उत्पन्न होणारे, ६ दैवबलप्रवृत्त आणि ७ स्वभावबलप्रवृत्त म्हणजे तहान, भूक, निद्रा इत्यादि शरीरधर्मामुळें स्वाभाविकपणें होणारे व्याधीचे सात प्रकार. ( सुश्रुत-शारीर )

**सात प्रकार शैवाचे** — १ अनादिशैव ( शिव ) २ आदिशैव-कौशिकादिकऋषि, ३ महाशैव-द्विजकुलसम्पन्न, ४ क्षेत्री ( क्षत्रिय ) अनुमशैव, ५ शूद्र-अवतारशैव, ६ प्रवरशैव-विशेष जाति सनस्त आणि ७ अन्तरशैव अब्राह्मदिसम्पन्न. ( विवेक चिंतामणि )

**सात प्रकारचे संतान** — ( अ ) १ विहार बांधणें, २ तलाव बांधणें, ३ उद्यान तयार करणें, ४ सभागृह बांधण, ५ पाणपोई, ६ सत्पात्री धर्म व ७ पुत्रोत्पत्ति. असे सात प्रकारचे संतान म्हणून सांगितलें आहे.

कूपतडागमुद्यान मंटप च प्रपा तथा ।
सद्धर्मकरण पुत्र संतान सप्तधोच्यते ॥ ( वै. म. ३-१४ )

(आ) १ मुलीचा मुलगा, २ पाळलेला मुलगा, ३ शिष्य, ४ उद्यान, ५ विहीर वा जलाशय निर्माण करणे, ६ अभिजात ग्रंथ निर्मिति व ७ प्रत्यक्ष पुत्र असे सात प्रकार होत.

दौहित्र पोषित शिष्य आरामश्च जलाशय ।
सद्ग्रंथकरण पुत्र सप्तपुत्रा प्रकीर्तिता ॥ (आनंद रामायण)

**सात प्रकारच्या संवेदना (मानसशास्त्र) —** १ जीवनव्यापी संवेदना, २ त्वचिक संवेदना, ३ चलन संवेदना, ४ रस संवेदना, ५ गंध संवेदना, ६ ध्वनि संवेदना आणि ७ दृष्टि संवेदना

**सात प्रकारचे साधकाचे अधिकार —** १ दीक्षा, २ महादीक्षा, ३ पुरश्चरण, ४ महापुरश्चरण, ५ अभिषेक, ६ महाभिषेक व ७ तद्भाव.

**सात प्रकार साक्षात्कारी पुरुषाचे —** १ रूपदर्शी, २ तेजोदर्शी, ३ वर्णदर्शी, ४ नादश्रवा, ५ रसास्वादी, ६ स्पर्शानुभवी आणि ७ गंधानुभवी (रानडे चरित्र आणि तत्त्वज्ञान)

**सात प्रकारचे स्वर काढणारे सात प्राणी —** १ षड्ज-मयूर, २ रिषभ-वृषभ, ३ गंधार-अज, ४ मध्यम-क्रौंच, ५ पंचम-कोकिळा, ६ धैवत-हय आणि ७ निषाद-गज. सा, री, ग, म, प, ध, नी-या सप्त स्वरांची पुरातन शास्त्रीय उपपत्ति अशी मानिली आहे. (गायनाचार्य माला)

**सात प्रकार स्वप्नाचे —** १ भविष्यसूचक, २ प्रतीकात्मक, ३ परप्रेरित, ४ भूतकालदर्शक, ५ दुसऱ्यासमर्थी, ६ मिश्र व ७ चमत्कारिक स्वप्न. (मॅडम ब्लॅव्हट्स्की)

**सात प्रकारच्या हुंड्या —** १ दर्शनी हुंडी, २ मुदतहुंडी, ३ शाहजोग हुंडी, ४ नामजोग हुंडी ५ धनीजोग हुंडी, ६ जोखमी हुंडी आणि ७ जवाबी हुंडी. (बँका आणि त्यांचे व्यवहार)

**सात प्रकृति-विकृति तत्त्वे —** १ महत्-बुद्धि, २ अहंकार आणि ५ पंच तन्मात्रा (मिसळ न होता प्रत्येक गुणाचा अतिसूक्ष्म मूल स्वरूप) (सांख्य कारिका ३, गी. र. १७८)

**सात प्रकार औषधी (आयुर्वेदीय) तयार करण्याचे —** १ पुटपाक, २ गर्तपाक, ३ वेणुपाक, ४ दोल्पाक, ५ सर्परपाक, ६ बैजयूरपाक व ७ कालपाक (गधसार)

**सात प्रकार कीर्तीचे** — १ दानकीर्ति, २ पुण्यकीर्ति, ३ काव्यकीर्ति, ४ वक्तृत्वकीर्ति, ५ वर्तनकीर्ति, ६ शौर्यकीर्ति व ७ विद्वज्जनकीर्ति.

( वस्तुरत्न कोश )

**सात प्रमुख धर्म ( जगांतील )** — १ वैदिक धर्म ( सनातन ), २ कन्फ्यूशियस ( चीन ), ३ जैन धर्म, ४ बौद्ध धर्म, ५ झरतुष्ट्र धर्म, ६ ख्रिस्ती धर्म व ७ महमदी धर्म.

**सात प्रमुख पद्धति योगाच्या** — १ हठयोग, २ भक्तियोग, ३ मनयोग, ४ कर्मयोग, ५ ज्ञानयोग, ६ राज्योग, व ७ लयक्रियायोग, ( Yoga explained )

**सात प्रमुख प्रकार निबंध वाङ्मयाचे** — १ विवरणात्मक, २ वर्णनात्मक, ३ विवेचनात्मक, ४ व्याख्यात्मक, ५ आलोचनात्मक, ६ साहित्यिक —गंभीर निबंध व ७ ललित निबंध ( निबंध प्रबोध )

**सात प्रलयकालचे मेघ** — १ सवर्त, २ भीमनाद, ३ द्रोण, ४ चंड, ५ बलाहक, ६ विद्युत्पताक व ७ शोण. ( मत्स्य. २८ )

**सात प्रसंगीं वपन विहित आहे** — १ गंगातीरीं, २ भास्करक्षेत्रात[1] ३ माता, ४ पिता, ५ गुरु यांच्या निधनप्रसंगीं, ६ अग्न्याधानकालीं व ७ सोमयाग. अशा सात प्रसंगी धर्मशास्त्राने वपन विहित मानिले आहे.

> गंगायां भास्करक्षेत्रे मातापित्रोर्गुरोर्मृते ।
> आधानकाले सोमे च वपनं सप्त सुस्मृतम् ॥ ( मिताक्षरा ३ १० )

**सात भूमिका ( अज्ञानाच्या )** — १ बीजजाग्रत्, २ जाग्रत्, ३ महाजाग्रत्, ४ जाग्रत्, ५ स्वप्न, ६ स्वप्नजाग्रत् आणि ७ सुषुप्त या अज्ञानाच्या सात भूमिका आहेत. ( यो. वा. )

**सात प्राण मस्तकाचे ठिकाणीं असलेले** — १-२ कान, ३-४ दोन डोळे, ५ ६ दोन नाकपुड्या व ७ वाणी हे सात प्राण होत. (तैत्तिरीय श्रुति) " सप्त वै शीर्षण्याः प्राणाः "

---

टीप— १ भारतात भास्करक्षेत्रे दहा आहेत तीं १० अंकाखालीं पाहा

**सात भूमिका मनुष्य जीवनांतल्या** — १ बाल्य, २ पौगंड, ३ प्रेमिक, ४ सैनिक, ५ चाळिशी उलटलेली, ६ न्यायाधीश व ७ वृद्धावस्था. जग ही एक रंगभूमि असून तींत मानवजीवनातल्या या सात भूमिका असतात. (As you like it)

**सात भूमिका योग्याच्या योगाच्या** — १ श्रवण, २ मनन, ३ निदिध्यासन, ४ विलापनी, ५ आनंद स्वरूपाची प्राप्ती, ६ स्वसंवेदनरूप तुर्यावस्था व ७ केवल विदेह-मुक्ति (तुर्यातीत अवस्था) (यो वा. निर्वाण प्रकरण)

**सात मित्रदूषणें** — १ गुह्य प्रकट करणें, २ याचना, ३ निष्ठुरता धरणें, ४ चंचल स्वभाव, ५ राग, ६ खोटें भाषण आणि ७ जुगार.

> रहस्यभेदो याच्ञा च नैष्ठूर्यं चलचित्तता ।
> क्रोधो नि सत्यता द्यूतमेतद्वै मित्रदूषणम् ॥ (सु.)

**सात मुद्रा** — १ खेचरी, २ भूचरी, ३ चाचरी, ४ अलक्ष, ५ अगोचरी, ६ शाम्भ आणि ७ षण्मुखी मुद्रा. (योगशास्त्र)

**सात मूलभूत गंध घ्राणेंद्रियाला समजणारे** — १ अगदीं तरल गंध, २ कर्पूरासमान गंध, ३ कस्तूरीसमान, ४ पुष्प गंध, ५ पुदीना वर्ग ६ तिखट आणि ७ दुर्गंध. इतर सर्व गंध या मूलभूत सात गंधाच्या मिश्रणानें बनले आहेत. (चिन्मयजगत्, आगष्ट १९६३)

**सात मोक्षधर्मप्रवर्तक** — १ सन, २ सनत्सुजात ३ सनक, ४ सनंदन, ५ सनत्कुमार, ६ सनातन आणि ७ कपिल. हे सात प्रमुख सांख्यज्ञानविशारद व मोक्षधर्मप्रवर्तक होत.

> एते योगविदो मुख्याः सांख्यज्ञानविशारदाः ।
> आचार्या धर्मशास्त्रेषु मोक्षधर्मप्रवर्तकाः ॥ (सु.)

**सात मंत्रसिद्धीचे उपाय** — १ भ्रामण, २ रोधन ३ वश्य, ४ पीडन, ५ पोषण, ६ शोषण आणि ७ दाहन. (कल्याण साधनांक)

(**सात यज्ञ** — १ अग्निष्टोम, २ अश्वमेध, ३ बहुसुवर्णक, ४ राजसूय, ५ गोमेध, ६ वैष्णव आणि ७ माहेश्वर. असे सात प्रकारचे यज्ञ करून रावणपुत्र इंद्रजितानें सिद्धि मिळालेली होती. (वा. रा. उत्तर. अ. २९))

**सात रथी यादव सैन्यांतील** —— १ चारुदेष्ण, २ चक्रदेव, ३ सात्यकि, ४ श्रीकृष्ण, ५ बलराम, ६ साम्ब व ७ प्रद्युम्न. (म. भा. सभा १४५८)

**सात महारथी यादव सैन्यातील** —— १कृतवर्मा, २ अनाधृष्टि ३ समीक, ४ समितिंजय, ५ कंक, ६ शंकु व ७ कुंति. (म. भा. सभा. १४५९)

**सात रानधान्यें** —— १ कुलित्थक–कुळीथ, २ श्यामक–सावे, ३ नीवार –देवसाळी, ४ जर्तिल–राननीळ, ५ गवेधुक–तृणधान्य, ६ वेणुयव–वेळूचे तांदूळ आणि ७ मर्कटक–एक प्रकारचे धान्य. (वि. पु.)

**सात रुद्रगण** — १ शंकुकर्ण, २ महाकर्ण, ३ कुम्भकर्ण, ४ सागरालय, ५ गजेंद्रकर्ण, ६ गोकर्ण, आणि ७ पाणिकर्ण. असे सात रुद्रगण आहेत. परंतु शंकराशी अभिन्न असल्यामुळे त्याचींच नांवें शंकरास दिलीं आहेत.

**सात रेषा (हस्तसामुद्रिक शास्त्रांत)** — (अ) १ आयुष्यरेषा, २ मस्तकरेषा, ३ अंतःकरणरेषा, ४ धनरेषा, ५ आरोग्यरेषा, ६ रविरेषा आणि ७ मन्मथ (विवाह) रेषा. अशा हातावरील रेषा हस्तसामुद्रिकात सांगितल्या आहेत. (ग्रहांकित), (आ) १ आयुष्यरेषा, २ मस्तकरेषा, ३ अंतःकरणरेषा, ४ भाग्यरेषा, ५ विद्यारेषा, ६ बुधरेषा आणि ७ चंद्ररेषा.

**सात ललितकला** —— १ काव्य, २ गायन, ३ चित्रकला, ४ मूर्तिकला, ५ वास्तुकला, ६ नर्तनकला व ७ नाट्यकला. अनेक माणसें एक समयावच्छेदेकरून जिचा आस्वाद घेऊं शकतात ती ललितकला.

**सात वस्तूंचा संग्रह कोठूनहि करावा** —— १ क्रिया, २ रत्नें, ३ विद्या, ४ धर्म, ५ सदाचार, ६ सुभाषित आणि ७ विविधकला.

> क्रिया रत्नान्यथो विद्या धर्मं शौचं सुभाषितम् ।
> विविधानि च शिल्पानि समादेयानि सर्वतः ॥ (मनु. २ २४०)

**सात वार** — १ रविवार, २ सोमवार, ३ मंगळवार, ४ बुधवार, ५ गुरुवार, ६ शुक्रवार आणि ७ शनिवार.

> आदित्यः सोमो भौमश्च तथा बुधबृहस्पती ।
> भार्गवः शनैश्चरश्चैव एते सप्त दिनाधिपाः ॥ (अथर्व. ज्योतिष)

याच अर्थाचीं वारांचीं नांवें सर्व मापानून सर्वत्र आढळतात.

**सात वैदिक छंद** —— १ गायत्री, २ उष्णिह, ३ अनुष्टुभ्, ४ बृहती, ५ पंक्ति, ६ त्रिष्टुम् आणि ७ जगती. छंद याचा अर्थ "मनाला प्रसन्न करणारें गानामध्यें रुचिर असें वृत्ताचें रूप."

**सात वैदिक देणग्या (वेदमातेच्या)** —— १ आयु, २ प्राण, ३ प्रजा, ४ पशु, ५ कीर्ति, ६ द्रविण (धन) आणि ७ ब्रह्मवर्चसम् (ब्रह्मतेज).

**सात व्यसनें राज्यशासकांनीं त्यागावींत** —— १ कटु भाषण, २ कठोर दंड करणें. ३ धनाचा अपव्यय, ४ मद्यपान, ५ स्त्रियांसंबंधी आसक्ति, ६ शिकारींत कालहरण व ७ जुगार.

**सात शल्यें** —— (अ) १ दिवसाचा निस्तेज चंद्र, २ यौवन सरलेली स्त्री, ३ कमलहीन सरोवर, ४ निरक्षर सुंदर पुरुष, ५ द्रव्यलोभी प्रभु अथवा धनी, ६ दारिद्र्य असलेला सज्जन आणि ७ राजगृहात दुर्जनाचा प्रवेश. हीं सात शल्यें होत.

> शशी दिवसधूसरो गलितयौवना कामिनी
> सरो विगतवारिजं मुखमनक्षरं स्वाकृतेः ।
> प्रभुर्धनपरायणः सततदुर्गतः सज्जनो
> नृपाङ्गणगतः खलो मनसि सप्त शल्यानि मे ॥ (भ.नी.५६)

(आ) १ समाजकंटकापासून होणारा उपद्रव, २ गर्विष्ठ लोकांचा उद्दामपणा, ३ प्रेमभंगामुळे होणाऱ्या मानसिक वेदना, ४ न्यायाच्या कामीं लागणारा विलंब, ५ अधिकाऱ्यांचें उद्दाम आचरण, ६ सहनशील गुणी माणसांना अज्ञ लोकांकडून मिळणारे लत्ताप्रहार व ७ दुर्वह प्रपंचभार डोईवर घेऊन दु:सह आयुष्य कंठण्याचा प्रसंग. (हॅम्लेट अंक ३)

**अतर्क्य असें दुर्दैव** हें आठवें शल्य होय.

**सात शब्दांत ब्रह्मविद्येचें रहस्य** १ ब्रह्म–अक्षर म्हणजे अविनाशी तत्त्व, २ अध्यात्म–वस्तूचा मूळ स्वभाव, ३ कर्म–सृष्टिव्यापार, ४ अधिभूत–नश्वरवस्तु–देह, ५ अधिदैवत–जीवात्मा, ६ अधियज्ञ–भगवंत आणि ७ अंतकालीं भगवंताचें स्मरण. या सात शब्दांत सर्व ब्रह्मविद्येचें रहस्य भगवान् श्रीकृष्णानें अर्जुनास सांगितलें. (भ. गी. ८–१ ते ५)

**सात शारीर संस्था** — १ अस्थिसंस्था, २ स्नायुसंस्था, ३ अभिसरण संस्था, ४ श्वसनसंस्था, ५ पचनसंस्था ६ उत्सङ्गसंस्था व ७ मज्जासंस्था.

अस्थि स्नायूचाभिसरण श्वसन पचन तथा ।
उत्सङ्ग च मज्जा च सप्त संस्था विशेषत ॥ (सु.)

**सात षड्गुणसंपन्न भगवद्भक्त** — १ वसिष्ठ, २ वामदेव, ३ नारद, ४ व्यास, ५ वाल्मीकि, ६ प्रल्हाद आणि ७ शुकाचार्य. (चतुःश्लोकी भागवत)

**सात 'स' कार दुर्लभ** — १ संपत्ति, २ सरस्वती, ३ सत्य (सचोटी), ४ संतति, ५ सदनुग्रह, ६ सत्ता आणि ७ सुकृतसंचय.

'सत्तासुकृतसंभारा सकारा सप्त दुर्लभा ।' (सु.)

**सात सत्याग्रही (रामायणकालीन)** — १ विश्वामित्र, २ सीतामाई, ३ लक्ष्मण, ४ कच, ५ भरत, ६ श्रीराम आणि ७ शम्बूक. या सातांनी आपल्या ध्येयसिद्धीसाठी सत्याग्रह केला होता (कल्याण-रामायणांक)

**सात सहज प्रेरणा** — १ प्रप्सा-आशा, २ जिजीविषा-जगण्याची इच्छा, ३ चिकीर्षा-करण्याची इच्छा, ४ जिज्ञासा, ५ शोक, ६ भय आणि ७ अतृप्ति या सात सहज प्रेरणा होत (पातञ्जल योगसूत्र)

**सात साधनें उत्कर्षप्राप्तीचीं** — १ उद्योग, २ स्वार्थत्याग, ३ अहंपणाचा विसर, ४ विश्वव्यापक प्रेम, ५ उल्हास, ६ निर्भयता व ७ स्वावलंबन.
(स्वामी रामतीर्थ)

**सात साधनें कीर्तीचीं** — १ दान, २ पुण्य, ३ विद्या, ४ वक्तृत्व, ५ काव्य, ६ आर्जव व ७ शौर्य.

**सात साधनें ब्रह्मज्ञान प्राप्त होण्यचीं** — १ सत्संग, २ गुरूपासन ज्ञान, ३ सार-असार विचार, ४ परमवैराग्य, ५ श्रवण, ६ मनन आणि ७ निदिध्यास. (दा बो.)

**सात सिद्धांत** — १ पांचरात्रसिद्धान्त, २ कापिलसिद्धान्त, ३ अपान्तरतमसिद्धान्त ४ ब्राह्मिष्ठसिद्धान्त, ५ पाशुपतसिद्धान्त, ६ हैरण्यगर्भसिद्धान्त आणि ७ शिवसिद्धान्त. प्राचीन चौदा विद्यांतेरान हे सात स्वतंत्र सिद्धान्त मानले आहेत. (कल्याण-हिंदु संस्कृति अंक).

**सात सिद्धमंत्र** — १ नृसिंह, २ राम, ३ विष्णु, ४ शंकर, ५ देवी, ६ गणेश व ७ गुरु. मनात सांगितलेल्या फलात तत्काल प्राप्ती होण्याचें सामर्थ्य ज्यांना प्राप्त झालें आहे तो 'सिद्धमंत्र' म्हणतात

नृसिंहरामौ विष्णुश्च शंकरश्चाम्बिका तथा।
गजाननो गुरुश्चैव सप्तैते सिद्धमंत्रदा ॥ (शारदातिलक)

**सात सूर्य** — १ आरोग्य, २ भ्राज, ३ पटर, ४ पतंग, ५ स्वर्णर, ६ ज्योतिषिमान् व ७ विभास. जगाला प्रकाशित करणाऱ्या सूर्यांत सात सूर्य समाविष्ट आहेत. खेरीज कश्यप नांवाचा आणखी एक आठवा सूर्य आपण पाहिल्याचें वैदिक कालचें खगोल शास्त्र वर्णितात. (तै-आरण्यक)

**सात सोमसंरक्षक** — १ स्वान, २ भ्राज, ३ अघारि, ४ नभारि, ५ हस्त, ६ सुहस्त, आणि ७ कृशानु. हे सात जण सोमसंरक्षक होत.

(तैत्तिरिय १ २ ७, वैदिक आर्यांचें ज्योतिर्विज्ञान)

**सात सौभाग्य द्रव्यें** — १ हळद, २ कुंकू, ३ शेंदूर, ४ काजळ, ५ गळसरी, ६ मंगळसूत्र आणि ७ चुडा.

हरिद्राकुंकुमश्चैव सिंदुरादिसमन्वितम्।
कज्जल कंठसूत्र च सौभाग्यद्रव्यमुच्यते ॥ (वार्षिक व्रतपूजाविधि)

**सात संकटें (ईतींना)** — १ अतिवृष्टि, २ अनावृष्टि, ३ उंदीर फार होणें, ४ टोळधाड, ५ पाखरांचा उपद्रव, ६ स्वसैन्याकडून अथवा ७ परसैन्याकडून लुटालूट.

अतिवृष्टिरनावृष्टि शलभा मूषका शुका।
स्वचक्र परचक्र च सप्तैता ईतय स्मृता ॥ (सु.)

**सात स्त्रीजातीय विभूति** — १ कीर्ति, २ संपत्ति, ३ वाणी, ४ स्मृति ५ बुद्धि, ६ धैर्य आणि ७ क्षमा. या सात स्त्रीजातींतील सात विभूति (परमेश्वरी अंश) होत.

एथ नारी माझारी। या सातहि शक्ति अवधारी॥
ऐसे सांगे मुरारी। म्हणता जाहला॥ (ज्ञा. १० २८०)

**सात स्वदेशी शृंखला (सावरकरप्रणीत)** — १ वेदोक्तबंदी २ व्यवसायबंदी, ३ स्पर्शबंदी, ४ सिंधुबंदी, ५ शुद्धिबंदी, ६ रोटीबंदी आणि ७ बेटीबंदी. महान् हिंदु राष्ट्राच्या एकतेला बाध आणणाऱ्या पण समाजांत

फार मोठ्यर रुजलेल्या या सात नद्या अथवा सात शत्रूच होत त्या उच्छेदून टाकल्याच पाहिजेत, असे स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी आग्रहानें प्रतिपादिलें आहे.

**सात स्वर्गप्राप्तीचीं महाद्वारें** — १ तप, २ दान, ३ शम, ४ दम, ५ लज्जा ६ सरळपणा आणि ७ सवभूतीं दया. ( म. भा. आदि, ९० २२)

**सात स्वातंत्र्यें** — १ भाषण-स्वातंत्र्य व मतस्वातंत्र्य, २ शान्ततेनें शस्त्राशिवाय एकत्र जमणें, ३ सस्था व सघस्वातंत्र्य, ४ सचारस्वातंत्र्य, ५ वास्तव्य स्वातंत्र्य, ६ संपत्तीचें संपादन, धारण व वासलात लावणें आणि ७ व्यवसाय स्वातंत्र्य. हीं सात स्वातंत्र्यें भारतीय नागरिकांना घटनेनें दिलीं आहेत ( हिंदी राज्यघटना )

**सात स्थानें उच्चाराचीं** — १ ऊर्ध्व, २ टाळू, ३ दांत, ४ कंठ, ५ ओठ, ६ नाक व ७ अप्रयत्न–सहज उच्चारण.

**सात होमद्रव्यें** — १ समिधा, २ तूप, ३ चरु ( भात ), ४ लाह्या, ५ मोहरी, ६ यव आणि ७ तांदूळ. हीं सात प्रकारचीं द्रव्यें हवनीय होत

**सातजण आश्रयास अपात्र** — १ निरुद्योगी, २ अधार्मी, ३ लोकांच्या द्वेषास पात्र झालेला, ४ कपटी, ५ निर्दय, ६ देशकाल न जाणणारा आणि ७ अनिष्ट वेष धारण करणारा. ( म. भा. उद्योग ३७ ३५)

**सात जणांना चरणस्पर्श करू नये** —१ अग्नि, २ गुरु, ३ ब्राह्मण, ४ गाय, ५ कन्या, ६ वृद्ध, आणि ७ शिशु. ( ब्र. चा ७–६ )

**सात जणांचा जन्मच परोपकारार्थ** — १ सूर्य, २ चंद्र, ३ मेघ, ४ वृक्ष, ५ नद्या, ६ गायी, व ७ सज्जन या सातांना परमेश्वरानें सृष्टीच्या आरंभीं परोपकारार्थच उत्पन्न केलें.

" एते परोपकाराय देवेन निर्मिता " ( सु )

**सातजण झोपले तरीहि जागृत कराचे** — १ विद्यार्थी २ सेवक, ३ मार्गस्थ, ४ भुकेलेला, ५ भयभीत, ६ कोठीवाला आणि ७ रखवालदार.

*विद्यार्थी सेवक- पाथ क्षुधार्तो भयकातर ।*
*भाण्डारी प्रतिहारी च सत सुप्तान्प्रबोधयेत् ॥* ( वृ. चा. ७–६ )

**सातजण परभक्षक होत** —१ माश्या, २ डास, ३ वेश्या, ४ उंदीर, ५ याचक, ६ ग्रामाधिकारी आणि ७ ज्योतिषी.

मक्षिका मशको वेश्या मूषको याचकस्तथा ।
ग्रामणीर्गणकश्चैव सप्तैते परभक्षकाः ॥ ( सौर. ६८-१८ )

**सातजण पित्यासमान** — १ जन्म देणारा, २ पालन करणारा, ३ सासरा, ४ थोरला भाऊ, ५ मन्त्रदीक्षा देणारा, ६ अभय देणारा व ७ ज्ञान देणारा. ( तत्त्व निज- विवेक )

**सातजणांमुळें पृथ्वीची धारणा होते** — १ गाय, २ ब्राह्मण, ३ वेद, ४ सती स्त्री, ५ सत्यवादी पुरुष, ६ लोभहीन मनुष्य व ७ दानशूर.

गोभिर्विप्रैश्च वेदैश्च सतीभिः सत्यवादिभि ।
अलुब्धैर्दानशीलैश्च सप्तभिर्धार्यते मही ( स्कद. माहेश्वर २-७१ )

**सात जणी मातेसमान** — १ जन्मदात्री, २ गुरुपत्नी, ३ ब्राह्मणी, ४ राजपत्नी, ५ गाय, ६ दाई व ७ मातृभूमि. ( तत्त्व निज विवेक )

**सातजण योगपारंगत** — १ सुमन, २ कुमुद, ३ शुद्ध, ४ छिद्रदर्शी, ५ सुनेत्रक, ६ सुनेत्र आणि ७ अंशुमान्. असे सातजण योगपारगत होऊन गेले.

सुमन. कुमुदः शुद्धश्छिद्रदर्शी सुनेत्रकः ।
सुनेत्रश्चांशुमांश्चैव सप्तैते योगपारगाः ॥ ( मत्स्य २०-१८ )

**सातजण सत्कर्मी क्षीण झाल्यामुळें अधिक शोभतात** — १ सहाणेवर घासलेला हिरा, २ जखमी झालेला पराक्रमी असा शूर, ३ मदस्रावानें क्षीण झालेला हत्ती, ४ शरदृतूत ओसरलेल्या नद्या, ५ प्रतिपदेचा चद्र, ६ सुरतश्रमानें म्लान झालेली नवयौवना आणि ७ दान दिल्यामुळें धनहीन झालेले दाते.

मणिः शाणोल्लीढ. समरविजयी हेतिनिहतो
मदक्षीणो नागः शरदि सरित श्यानपुलिनाः ॥
कलाशेषश्चन्द्र. सुरतमृदिता बालललना-
स्तनिम्ना शोभन्ते गलितविभवाश्चार्थिषु जनाः ॥ ( भर्तृ. नीति. ४४ )

**सातजण साक्षीस वर्ज्य** — १ सामुद्रिक जाणणारा, २ पूर्वीचा चोर पण नंतर व्यापारी बनलेला, ३ शकुन वगैरे सागून दुसऱ्यास फसविणारा, ४ वैद्य, ५ शत्रु, ६ मित्र आणि ७ नट, ( म. भा. उद्योग. ३५ ४४ )

**सातजण सात गोष्टीमुळें वश्य** — १ देव–भावानें, २ राजसत्ताधारा–कर्तेमुळें, ३ माता–धननें, ४ शत्रु–कपटानें, ५ मित्र–सत्यानें, ६ पुत्र–कृपनें आणि ७ मोक्ष–ज्ञानानें प्राप्त होतो.

भावेन देव कल्या नरेंद्रम् । धनेन माता कपटेन शत्रु ॥
सत्येन मित्र, कृपया च पुत्रम् । ज्ञानेन मोक्ष वशमानयन्ति ॥ (सु.)

**सातजण स्वर्गाचे अधिकारी** — १ आज्ञाधारक पुत्र, २ प्रतिष्ठित *भार्या, ३ नि स्वार्थी सेवक, ४ गुरुजनाविषयी आदर असलेला, ५ प्रजापालक* शासक, ६ स्वधर्मरत ब्राह्मण आणि ७ धारातीर्थी पतन पावलेला वीर पुरुष ( चंद्रकांत भाग २ रा )

**गीतासप्तक** — १ भगवद्गीता, २ रामगीता, ३ गणेशगीता, ४ शिव *गीता, ५ देवीगीता, ६ कपिलगीता व ७ अष्टावक्रगीता. या सात प्रमुख* गीता होत

## ७॥

**साडेसाती** — एखाद्याची जन्मराशी व तिचा मागची व पुढची या तीन राशी क्रमण्याला शनिग्रहाला लागणारा प्रत्येक राशीला अडीच वर्षे याप्रमाणें साडेसात वर्षांचा काल.

## ८

**अष्ट अभिमानस्थानें** — ( अ ) १ कुल, २ रूप, ३ तारुण्य, ४ गव, ५ तप, ६ संपत्ति, ७ राज्य ( अधिकार ) आणि ८ विद्या, ( आ ) १ जात्यभिमान, २ कर्माभिमान, ३ विद्याभिमान, ४ धनाभिमान, ५ मूर्खपणाचा अभिमान, ६ देशाभिमान, ७ मंत्रभाजन आणि ८ अहंकार.

सातवी मन प्राशनाची मस्ती ।
आठवी मस्ती मीपणाची ॥ (सि. बो. ४७-७७)

**अष्ट अमात्य (रामायणकालीन)** — १ धृष्टि, २ जयत, ३ विजय, ४ सुराष्ट्र, ५ राष्ट्रवर्धन, ६ अकोप, ७ धर्मपाल आणि ८ सुमन.

धृष्टिर्जयन्तो विजयः सुराष्ट्रो राष्ट्रवर्धनः ।
अकोपो धर्मपालश्च सुमन्त्रश्चाष्टमोऽर्थवित् ॥ (वा. रा. बाल. ७–३)

**अष्ट आत्मगुण** — १ अनसूया–निर्मत्सरता, २ भूतदया, ३ सहनशक्ति, ४ अनायास–क्षुद्र कामासाठी शरिरास कष्ट न देणें, ५ मांगल्य, ६ दैन्यवाणे नसणें, ७ अंतर्बाह्य–पवित्रता आणि ८ अभिलाषबुद्धि नसणे. (म. ब्राह्म.) (गौतमस्मृति). (आ) १ दया, २ क्षमा, ३ अनसूया, ४ शौच. ५ उद्वेग हीनता, ६ मंगल, ७ अकार्पण्य–उदारता आणि ८ अस्पृहा–निष्कामता. (आश्वलायन गृह्यसूत्र)

**अष्ट आद्य गोत्र प्रवर्तक** — १ कश्यप, २ अत्रि; ३ भरद्वाज, ४ विश्वामित्र, ५ गौतम, ६ जमदग्नि, ७ वसिष्ठ आणि ८ अगस्ति. (म.भा. उपसंहार)

**अष्ट आयुधें (श्रीकृष्णाचीं)** — १ शंख, २ चक्र, ३ गदा, ४ पद्म, ५ गोशृंग, ६ गोवर्धन, ७ पावा व ८ मुरली. भागवतात वर्णन केल्याप्रमाणे ही अशी अष्टभुज असलेली मूर्ति मोहाडी (जि. नाशिक) येथे आहे. (केसरी १४-९-५६)

**अष्ट आयुधें (देवीचीं)** — १ खड्ग, २ शूल, ३ गदा, ४ चक्र, ५ शंख, ६ धनुर्बाण, ७ भुशुंडी व ८ परिघ. (दुर्गा सप्तशती १-८०)

**अष्ट आय (आकार-स्वरूप)** — १ ध्वज, २ धूम, ३ सिंह, ४ श्वान, ५ वृषभ, ६ खर, ७ गज आणि ८ उष्ट्र. आगेच्या आणीरुंदीच्या गुणाकारास आठाने भागून जी बाकी (जो अंक) राहील तीस आय म्हणतात. वास्तुसाठी नियोजिलेल्या क्षेत्राच्या क्षेत्रफळास आठानीं भागून जो शेष राहतो त्यास आय म्हणतात. असे आय आठ आहेत. (शिल्पशास्त्र)

सभा रचिली येणेंवीं । आठही आय साधिले तयीं ।
अष्टदिक्पाळ महान्ठीं । पायाचे सुठी स्थापिले (पा. प्र. १५-२५)

ध्वना धूमश्च सिंहश्च गुनको वृषभलथा ।
खरश्चैव गजश्चैव वायसा वाल्तु योनय ॥ ( पाशुरत्नसमुच्चय )

**अष्ट उपांगें ( वेदाचीं )** -- १ प्रातिशद-व्याकरण, २ अनुपद, ३ छंद, ४ भाषा, ५ धम ६ मीमांसा, ७ न्याय आणि ८ क्रमसंहिता

**अष्ट उपद्वीपें** -- १ स्वणप्रस्थ, २ चुद्र, ३ आवर्तन, ४ रमणक, ५ मदर हरिण, ६ पाचजन्य, ७ सिंहल आणि ८ लंका हीं आठ उपद्वीपें जंबुद्वीपाच्या आसमंतात् क्षार समुद्रात आहेत ( भाग स्कंध ५ अ १९ )

**अष्ट उपरस** — ( अ ) १ गंधक, २ गरु, ३ हिराकस, ४ तुरटी, ५ हरताळ, ६ मनशील, ७ अंजन आणि ८ कुंकुम ( र र समुच्चय )
( आ ) १ हिराकस, २ गरु, ३ शिलाजित, ४ मुमा, ५ गंधक, ६ हरताळ, ७ तुरटी आणि ८ रसकापूर. ( रसायनसार )

**अष्टाध्यायी** — पाणिनीकृत व्याकरण सूत्राचे आठ अध्याय

**अष्ट ऐश्वर्यें** -- १ दासदासी, २ नौकर, ३ पुत्र, ४ बधुवर्ग, ५ वास्तु, ६ वाहन, ७ धन आणि ८ धान्य

दासी भृत्य सुतो बधुवर्गस्तु वाहनमेव च ।
धन धान्यमिद प्रात्कमैश्वर्यं प्रकीर्तितम् ॥ ( सु. )

**अष्ट कमल ( हठयोग )** -- १ मूलाधार, २ त्रिपुट, ३ मणिपूर, ४ स्वाधिष्ठानचक्र, ५ अनाहत, ६ आज्ञाचक्र, ७ सहस्रारचक्र आणि ८ ब्रह्मरंध्र हठयोगात मूलाधारापासून कपाळापर्यंत भिन्न भिन्न स्थाना हीं आठ कमलें मानलीं गलीं आहेत त्यास अष्ट कमल म्हणतात

**अष्टकरिणी** -- १ अभ्रमू, २ कपिला, ३ पिंगला, ४ अनुपमा, ५ ताम्रकर्णी, ६ शुभ्रदती, ७ अंगना व ८ अंजनावती या आठ दिग्गज स्त्रिया होत ( गीर्वाण लघुकोश )

**अष्टकाल** -- १ निशान्त-सूर्योदयापूर्वीचा दोन तासाचा काल, २ प्रात काल, ३ पूर्वाह्न, ४ मध्याह्न, ५ अपराह्न, ६ सायाह्न ७ प्रदोष व ८ निशा-रात्रीचा समय असे अहोरात्राचे आठ भाग मानले आहेत.

**अष्ट कुलाचल** — १ नील, २ निषध, ३ विंध्याचल, ४ माल्यवान्, ५ मलय, ६ गंधमादन, ७ हेमकूट आणि ८ हिमालय

**अष्ट कुमारिका** — १ दयती, २ मालिनी, ३ कौमुदिका, ४ सुशीला, ५ मानि, ६ उन्नति, ७ पुष्पावती व ८ चंद्रिका. ह्या इंद्राच्या कुमारिका मानलेल्या आहेत. ( कथाकल्पतरु )

**अष्ट कृष्ण** — १ श्रीनाथ, २ नवनीतप्रिय, ३ मथुरानाथ, ४ विठ्ठलनाथ, ५ द्वारकानाथ, ६ गोकुळनाथ, ७ गोकुळचंद्रमा आणि ८ मनमोहन. अशा श्रीकृष्णाच्या आठ प्रतिमाप्र वल्लभ संप्रदायात अष्टकृष्ण अशी संज्ञा आहे. ( आदर्श हिंदी शब्दकोश )

**अष्टगण ( काव्यशास्त्र )** — अक्षराच्या-गुरुलघुत्वावरून दिलेली संज्ञा-गण तीन अक्षराचा होतो हे आठ असून त्यांची नावे, म, य, र, स, त, ज, भ, व न अशी आहेत.

**अष्टगण ( वर्ग )** — कवितेत अक्षराच्या गुरुलघुत्वावरून पाडलेले वर्ग. असे आठ आहेत.

'अष्ट तगराचे गध जाण । गधाष्टक देवीचे ' (देवी महात्म्य)

**अष्टगुण अमात्यपदास आवश्यक** — १ शुश्रूषा, २ श्रवण, ३ ग्रहण, ४ धारण, ५ ऊहन (अदाज), ६ तर्क, ७ अपोहन—अविद्या निरसन व ८ असत्क निरसन (म मा मीप्म अ ८५)

सविलास अविद्या निरसन । अपोहन या नाव ।

(ए. मा १३ १८०)

**अष्टगुण (बुद्धीचे)** — १ शुश्रूषा, २ श्रवण, ३ ग्रहण, ४ धारण, ५ चिंतन, ६ ऊहापोह, ७ अर्थविज्ञान आणि ८ तत्त्वज्ञान

शुश्रूषा श्रवण चैव ग्रहण धारण तथा ।

ऊहापोहाऽर्थविज्ञान तत्त्वज्ञान च धीगुणा ॥ (का नीति)

**अष्ट गुरु** — (अ) १ मातापिता, २ दाई, ३ कुलोपाध्याय, ४ विद्या गुरु, ५ मत्र गुरु, ६ उपासना गुरु, ७ ब्रह्मज्ञानी व ८ मुक्तदाता (पचग्रथी) (आ) १ सोचकगुरु, २ वेदकगुरु ३ निषेधगुरु, ४ काम्यगुरु, ५ सूचक गुरु, ६ वाचकगुरु, ७ कारकगुरु व ८ विहितगुरु

विहिता गुरुमित्येवमष्टधा गुरवामता ॥ (विवेकचिंतामणि)

**अष्टग्रही** — एका राशीत आठ ग्रह भ्रमण या योगाला अष्टग्रही म्हणतात असा योग साधारणपणे ८०० वर्षांनी येतो महाभारतकाळी तसेच पृथ्वीराज चव्हाणच्या काळी (अकरावे शतक) हा योग आला होता असे म्हणतात ते ग्रह असे —१ मगळ, २ शनि, ३ चद्र, ४ रवि, ५ बुध, ६ शुक्र, ७ केतु आणि ८ गुरु होत या योगामुळे पृथ्वीवर पुराच्या पाण्याचे लाट वा रक्ताचे पाट वहातात

अष्टग्रहैकराशिस्था यालयागप्रकार्तित ।

प्लावयन्ति मही सर्वा जलेन रुधिरेण वा ॥ (ज्योतिषशास्त्र)

असा योग सन १९६२ फेब्रुवारीत होता त्यानतर पुण्याजवळील पानशेत धरण फुटले (दि. १२ जुलै १९६२) निरनिराळ्या नद्याना महापूर येऊन बिहार वगैरेकडे जलप्रलय झाले

**अष्ट छाप** — १ सूरदास, २ कृष्णदास, ३ परमानददास, ४ कुभनदास, ५ चतुर्भुजदास, ६ छीतस्वामी, ७ नददास व ८ गोविदस्वामी हे श्री वल्लभाचार्यांचे प्रमुख शिष्य व आचार्य होत यांना अष्ट छाप असे म्हणतात

**अष्टतारिणी** — देवी भगवतीच्या आठ मूर्ती. १ तारा, २ उग्रा, ३ महोग्रा, ४ वज्रा, ५ काली, ६ सरस्वती, ७ कामेश्वरी व ८ चामुण्डा. ( आदर्श हिंदी कोश )

**अष्टतारा** — १ तारा, २ उग्रा, ३ महोग्रा, ४ वज्रा, ५ नील, ६ सरस्वती, ७ कामेश्वरा व ८ भद्रकाली अशा तारा देवता आठ प्रकारच्या आहेत ( मायातन )

**अष्टताल** — अष्टताल ८४ इंच. मानवाची उंची सामान्यत आठ ताल मानलेली आहे. नवताल पुरुष हा श्रेष्ठ पुरुष होय. ( संस्कृतिकोश )

**अष्ट तैल** — १ कुसुंब–करडी, २ अतसी–जवस, ३ सर्षप–मोहरा, ४ शिरस, ५ नारळ, ६ करंज, ७ मधु आणि ८ खसखस.

**अष्ट दर्शन** — ( अ ) १ गुरु, २ भाग्यवान्, ३ दाता, ४ कामधेनु, ५ आरसा, ६ प्रभु, ७ सूर्य आणि ८ ईश्वर. ( पाडवप्रताप ), ( आ ) १ दही, २ तूप, ३ आरसा, ४ मोहऱ्या, ५ बैल, ६ गोरोचन, ७ सुवर्ण आणि ८ पुष्पमाला.

**अष्ट दरिद्री** — १ अन्न, २ वस्त्र, ३ निवास ( घर ), ४ भूमि ५ संतती, ६ संपत्ति, ७ आप्तइष्ट व ८ मित्रपरिवार. या आठहि गोष्टींचा, ज्याचे ठिकाणी अभाव, अशास म्हणतात.

**अष्टदिशेच्या आठ सिंहाचीं नावें ( शिवछत्रपतींच्या सिंहासनाचे )** सिंहावरील आसन म्हणजे सिंहासन. १ पूर्वेस–सिंह, २ आग्नेयेस–हयक्ष, ३ दक्षिणेस–नाग, ४ नैऋत्येस–केसरी, ५ पश्चिमेस–मृगेंद्र, ६ वायव्येस–शार्दूल, ७ उत्तरेस–गजेंद्र आणि ८ ईशान्येस–हरि. ( श्रीशिवराज्याभिषेक )

**अष्ट द्वारपाल गौरीचे** — १ जया, २ विजया, ३ अजिता, ४ अपराजिता, ५ निभक्ता, ६ मगला, ७ मोहिनी व ८ स्तंभिनी.

( Vastushastra VOL II )

**अष्टदुर्ग** — १ गिरिदुर्ग, २ वनदुर्ग निबिडअरण्य, ३ गव्हरदुर्ग, ४ गुहा, ५ जलदुर्ग, ६ ग्रामदुर्ग, ७ कर्दमदुर्ग–दलदल व ८ सभावती नगरी. असे संरक्षणाचे आठ प्रकार प्राचीनकाळीं होते.

" सततं ग्रामदुर्गं स्यात् गोप्तदुर्गं तथाष्टकम् " ( देवद्रविलास )

**अष्ट द्वारपाल चाडिकेचे** — १ वताळ, २ कापर, ३ पिगार, ४ भृकुटी, ५ धूम्रक, ६ कक्र, ७ राक्षस व ८ सुलाकन (Vastushastra VOL II)

**अष्टद्वारपाल (श्रीविष्णूचे)** — (अ) १ चड, २ पापदचड, ३ भद्र, ४ सुभद्र, ५ ज्य, ६ विनय, ७ धाता व ८ विधाता (दु श का) (आ) १ जय, २ विजय, ३ प्रचड, ४ चड, ५ नद, ६ सुनद, ७ कुमद आणि ८ कुमुदाक्ष

नद सुनद कुमुद कुमुदाक्षस्तथैव च ।
अष्टौ ह द्वारपालाश्च कालाद्या अपि पापदा ॥ (गरुड ब्रह्मकाड १७ २)

**अष्ट द्वारपाल (श्रीशिवाचे)** — (अ) १ नदी, २ भृगी, ३ रिटी, ४ स्कद, ५ गणश, ६ उमामहेश्वर, ७ वृषभ आणि ८ महाकाल (वृ ना पूव ६६-८३)

(आ) १ नदा, २ महाकाल, ३ हेरब, ४ भृगी, ५ दुमुख, ६ पाडुर, ७ सित आणि ८ असित (Vastushatra VOL II)

**अष्ट दिक्पाल** — आठ दिशा पालन करणाऱ्या दवता १ पूर्वेचा-इद्र, २ आग्नेयीचा-अग्नि, ३ दक्षिणेचा-यम, ४ नैर्ऋत्यचा-निर्ऋति ५ पश्चिमचा-वरुण, ६ वायव्येचा-मरुत्, ७ उत्तरेचा-कुबेर आणि ८ ईशान्येचा-ईश हे अष्ट दिक्पाल होत (अमरकोश)

**अष्ट दिग्गज** — १ ऐरावत, २ पुडरीक, ३ वामन, ४ कुमुद, ५ अजन, ६ पुष्पदत, ७ सार्वभौम आणि ८ सुप्रतीक अस अष्ट दिशाच्या आधारावर ह सव ब्रह्माड स्थिर होऊन राहिल आहे, अस अष्ट हत्ती आहत (बृहन्नारदीय)

**अष्ट देवयोनि** — (अ) १ ब्रह्मा, २ प्रजापति, ३ देव, ४ गधव, ५ यक्ष, ६ राक्षस, ७ पितर आणि ८ पिशाच (आ) १ किन्नर, २ चारण, ३ यक्ष ४ विद्याधर, ५ गधव, ६ सिद्ध, ७ योगी आणि ८ मुनि (तुलसी शब्दप्रकाश) (इ) १ अप्सरा, २ गधव, ३ यक्ष, ४ राक्षस, ५ किन्नर, ६ पिशाच, ७ गुह्यक आणि ८ सिद्ध

विद्याधराप्सरा यक्ष रक्षा गधवकिन्नरा ।
पिशाचो गुह्यक सिद्धो भूतोऽमी देवयोनय ॥ (अमरकोश)

**अष्टदेह** — १ स्थूल, २ सूक्ष्म, ३ कारण, ४ महाकारण, ५ विराट, ६ हिरण्यगर्भ, ७ अव्याकृत व ८ मूलप्रकृति. ( दा. बो. १७-८ ).

**अष्ट दैवप्रकार व त्यांचे अधिपती ग्रह** — १ स्वकर्म-शनि, २ कुलकर्म-राहु, ३ मातृकर्म-चंद्र, ४ पितृकर्म-रवि, ५ संततिकर्म-गुरु, ६ पत्नीमुख-शुक्र ७ बाह्य दैव-बुध व ८ गृहदैव-मंगळ. ( दैवयोगविचार )

**अष्ट दोष जैन धर्म )** — १ शंका, २ कांक्षा, ३ विचिकित्सा, ४ मूढ दृष्टि, ५ अनुपगूहन, ६ अवात्सल्य, ७ अस्थितिकरण आणि ८ अप्रभावना.

**अष्टद्रव्यें** — १ अश्वत्थ, २ उदुंबर, ३ प्लक्ष, ४ न्यग्रोध, ५ समिध्, ६ तिल, ७ पायस व ८ आज्य-हीं यज्ञीय अष्ट द्रव्यें मानलीं आहेत.

( संस्कृति कोश )

**अष्टधातु** — १ सोनें, २ रुपें, ३ तांबें, ४ कथील, ५ शिसें, ६ पितळ, ७ लोखंड आणि ८ तिसें पोलाद किंवा पारा.

**अष्ट धामें श्रीविष्णूचीं स्थानें** — १ निऋगी नारायण-हिमालय, २ मुक्तिनाथ-नेपाळ, ३ बद्रीनाथ, ४ जगन्नाथपुरी, ५ रंगनाथ-श्रीरंगम्, ६ गया, ७ पंढरपूर आणि ८ तिरुपती,

**अष्टधा प्रकृति** — १ प्रकृति, २ महत्तत्त्व, ३ अहंकार, ४ शब्द, ५ स्पर्श, ६ रूप, ७ रस आणि ८ गंध. या अष्टधा प्रकृतीपासून ब्रह्मांडकोश उत्पन्न झाला. ( भागवत, स्कंध, ३ अ. ११ तळटीप ) ( आ ) १ पृथ्वी, २ आप, ३ तेज, ४ वायु, ५ आकाश, ६ मन, ७ बुद्धि व ८ अहंकार. शरीर हें या आठ तत्त्वांचे बनलेलें आहे. ( भ. गी. ७-४ )

> आप तेज गगन । मही मारुत मन ॥
> बुद्धि अहंकार हे भिन्न । आठै भाग ॥( ज्ञा. ७-१८ )

**अष्ट नाग** — १ अनंत, २ वासुकि, ३ तक्षक, ४ कर्कोटक, ५ शंख, ६ कुलिक, ७ पद्म आणि ८ महापद्म. अशीं नागजातीचीं आठ कुलें.

**अष्टनायिका ( अ ) ( श्रीकृष्ण स्त्रिया )** — १ रुक्मिणी, २ सत्यभामा, ३ जांबवती, ४ कालिंदी, ५ मित्रविंदा, ६ नाग्नजिती, ७ भद्रा आणि ८ लक्ष्मणा; ( आ ) **साहित्यांतील** — १ वासकसज्जा, २ विरहोत्कंठिता,

३ स्वाधीनभर्तृका, ४ कलहांतरिता, ५ खंडिता, ६ विप्रलब्धा, ७ प्रोषितभर्तृका आणि ८ अभिसारिका; (इ) १ गुप्ता, २ विदग्धा, ३ लक्षिता, ४ कुलटा, ५ अनुशयना, ६ मुदिता, ७ कन्यका आणि ८ सामान्या; (ई) १ स्वीया, २ परकीया, ३ वेश्या, ४ मुग्धा, ५ प्रौढा, ६ मध्या, ७ मानवती व ८ धीरा. (शृंगारनायिका)

नायिकांचे एकंदर ११५२ प्रकार भानुभट्टकृत रसमंजिरीत वर्णिलेले असून त्यातील या प्रमुख आठ प्रकारच्या नायिका होत. (नाट्यशास्त्र)

तथा अभिसारिका चैव इत्यष्टौ नायिका स्मृताः ॥ (भ.ना. २२–२०४)

**अष्ट निधि** — १ पद्म, २ महापद्म, ३ मकरनिधि, ४ कच्छपनिधि, ५ मुकुंदनिधि, ६ नंदनिधि, ७ नीलनिधि व ८ शंखनिधि. हे आठ निधि म्हणजे मानवाच्या संपत्तीच्या देवता. या आठहि निधींची अधिकारी देवता लक्ष्मी आहे. (मार्कंडेय पु. ६८)

**अष्ट नृत्यांगना देवलोकींच्या**—१ घृताची, २ तिलोत्तमा, ३ ऊर्वशी, ४ रंभा, ५ मेनका, ६ सुकेशी, ७ मंजुघोषा आणि ८ पूर्वचिति.

"अष्टनायिका नृत्य करिती" (शिवलीलामृत, अ ३)

**अष्ट पल्लवी भाषा** — १ अक्षपल्लवी, २ करपल्लवी, ३ नेत्रपल्लवी, ४ शब्दपल्लवी, ५ वाजित्रपल्लवी, ६ चातुर्यपल्लवी, ७ मापापल्लवी आणि ८ ओष्ठपल्लवी.

**अष्ट पाश** — (अ) १ घृणा (किळस), २ शंका, ३ भय, ४ लज्जा, ५ जुगुप्सा (निंदा), ६ कुल, ७ शील आणि ८ जाती.

घृणा शङ्का भय लज्जा जुगुप्सा चेति पञ्चमी ।
कुल शील च मान च अष्टौ पाशा प्रकीर्तिता ॥ (मु.)

(आ) १ आशा, २ भय, ३ लज्जा, ४ भीति, ५ जुगुप्सा, ६ काम, ७ क्रोध आणि ८ अतिलोभ. (वेदान्तसूत्र).

पाशबद्धो भवेज्जीव पाशमुक्त सदाशिव ।

या पाशांनीं बद्ध असतो तो जीव आणि त्याच्यापासून मुक्त असतो तो सदाशिव होय. (संस्कृति कोश)

**अष्टपुत्रा सौभाग्यव्रती भव** — विवाहित सौभाग्यसंपन्न स्त्रीस आशीर्वाद देण्याविषयींचा संकेत. स्त्रीस किमान आठ पुत्र व्हावेत अशी वैदिक ऋषींची मागणी असे.

अष्टपुत्रा भवत्य च सुभगा च पतिव्रता। (ऋग्वेद आठवें अष्टक)

**अष्ट पुष्पें ( पूजेचीं )** — १ अहिंसा, २ इंद्रियसंयम, ३ भूतदया, ४ क्षमा, ५ शम, ६ दम, ७ ध्यान, ८ सत्य. या आठ पुष्पांनीं केलेली पूजा भगवंताला प्रिय आहे.

**अष्ट प्रकार ( गणिताचे )** — १ संकलन-मिळवणी, २ व्यवकलन-वजाबाकी, ३ गुणन-गुणाकार, ४ भाजन-भागाकार, ५ वर्ग, ६ वर्गमूळ, ७ घन व ८ घनमूळ. असे गणिताचे आठ प्रकार आहेत. त्यास गणिताचे परिकर्माष्टक म्हणतात

**अष्ट प्रतिमा** — १ शिला, २ मृत्तिका, ३ धातु, ४ रत्न, ५ काष्ठ, ६ वालुका, ७ चित्रलेखन आणि ८ मनोमय. अशा आठ प्रकारांनीं प्रतिमापूजन करता येतें ( देवीमाहात्म्य )

**अष्ट प्रधान ( शिवनिर्मित )** — (अ) १ पंतप्रधान, २ पंत अमात्य, ३ पंतसचिव, ४ मंत्री, ५ सुमंत, ६ सेनापति, ७ न्यायाधीश आणि ८ पंडितराव. (आ) १ सुमंत्र-आयव्यय प्रविज्ञाता, २ पंडित-धर्मतत्त्ववित्, ३ मंत्री-नीतिकुशल, ४ प्रधान-सर्वदर्शी, ५ सचिव-सेनाधिप, ६ अमात्य, ७ प्राड्विवाक-लोकशासनतज्ज्ञ आणि ८ प्रतिनिधि-कार्याकार्य प्रविज्ञाता. (शुक्रनीति)

**अष्ट भाव ( आध्यात्मिक )** — १ धर्म, २ ज्ञान, ३ वैराग्य, ४ ऐश्वर्य, ५ अधर्म, ६ अज्ञान, ७ अवैराग्य (आसक्ति) आणि ८ अनैश्वर्य. (शांकरभाष्य)

**अष्ट भूतगण** — १ शाकिनी, २ यातुधान, ३ वेताळ, ४ ब्रह्मराक्षस, ५ भूत, ६ प्रेत, ७ पिशाच व ८ प्रमथ ( शिव. पु. अ. ४० )

**अष्ट भैरव** — भैरव म्हणजे भयंकर, शिवाचें एक नाव आहे. (अ) १ असितांग, २ संहार, ३ रुरु भैरव, ४ काल, ५ क्रोध, ६ ताम्रचूड, ७ चंद्रचूड आणि ८ महाभैरव. हीं शिवगणांतील देवतेचीं आठ स्वरूपें होत. (आ) १ असितांग, २ रुरु, ३ चंडभैरव, ४ क्रोध, ५ उन्मत्त भैरव, ६ कपाल भैरव, ७ भीषण आणि ८ संहार भैरव. ( ब्रह्मवैवर्त ) ( इ )

१ शंभुदेव, २ महादेव, ३ त्रिकाळा, ४ विष्णु, ५ कार्लीद, ६ मणिनधन, ७ सुनाम व ८ आलेख (सि ग्रा अ १९)

**अष्ट भोग** — (अ) १ सुगंध, २ स्त्री, ३ वस्त्र, ४ गायन, ५ तांबूल, ६ भोजन, ७ शय्या आणि ८ पुष्पे

सुगंध वनिता वस्त्र गीत ताम्बूलभोजनम् ।
शय्या च कुसुम चैव भोगाष्टकमुदाहृतम् ॥ (कायस्थप्रदीप)

(आ) १ अन्न, २ उदक, ३ तांबूल, ४ पुष्प, ५ चंदन, ६ वसन, ७ शय्या आणि ८ अलंकार (मुक्तेश्वर सभा ३-११२)

**अष्ट मद (जैनधर्म)** — (अ) १ ज्ञानमद, २ पूजामद, ३ शरीरमद, ४ कुलमद, ५ जातिमद, ६ तपोमद, ७ धनमद, आणि ८ बलमद (आ) १ कुळ, २ दुष्पणा, ३ धन, ४ रूप, ५ यौवन, ६ विद्या, ७ अधिकार आणि ८ तपस्या

कुल छल धन चैव रूप यौवनमेव च ।
विद्या राज्य तपश्चैव एते चाष्टमदा स्मृता ॥ (कणहव)

(इ) १ धनमद २ पुत्रमद, ३ राज्यमद, ४ यौवनमद, ५ स्त्रामद, ६ विद्यामद, ७ स्थानमद आणि ८ पानमद (इ) १ देहमद, २ यौवनमद, ३ स्त्रीमद, ४ धनमद हे चार प्रापंचिकदृष्ट्या आणि ५ विद्यामद, ६ तपमद, ७ सिद्धिमद आणि ८ ज्ञानमद हे चार पारमार्थिकदृष्ट्या असे आठ मद होत (निजगुणशिवयोगीकृत)

(आ) १ सिंह, २ वृषभ, ३ गज, ४ पूर्णोदक कुंभ, ५ व्यजन, ६ निशाण, ७ वाद्य आणि ८ दीप.

मृगराजो वृषो नाग कलशो व्यजन तथा ।
वैजयंती तथा भेरी दीप इत्यष्टमंगलम् ॥ ( सु )

**अष्ट मंगलचिह्न ( जैनधर्म )** — १ मत्स्ययुगुलम्, २ नन्दावर्त ३ भद्रासन, ४ कुंभ, ५ श्रीवत्स, ६ दर्पण, ७ सम्पुट आणि ८ स्वस्तिक

**अष्ट मंगल घृत** — १ वखंड, २ कोष्ठ, ३ ब्राह्मी, ४ मोहरा, ५ उपळसरी, ६ सेंधलोण, ७ पिंपळी आणि ८ तूप याच्या मिश्रणाने विधियुक्त बनविलेलें तूप हें बुद्धिवर्धक आहे ( योगरत्नाकर )

**अष्ट मंजरी ( विदूषकी अथवा थट्टेखोर सख्या )** — १ रूपमंजरी, २ मंजुलीलामंजरी, ३ रसमंजरी, ४ रतिमंजरी, ५ गुणमंजरी, ६ विलासमंजरी, ७ लवंगमंजरी, ८ कस्तुरीमंजरी अशा श्रीकृष्णपत्नी राधेच्या आठ सखी होत्या ( कल्याण भाग्ने १९५४ )

**अष्ट मंत्री ( रामायणकालीन )** — १ वसिष्ठ, २ वामदेव हे दोन ऋषि ऋत्विज, ३ सुयज्ञ, ४ जाबालि, ५ काश्यप, ६ गौतम, ७ मार्कंडेय व ८ कात्यायन अशी राज्ययंत्रावर नियमन करणारी मंत्रिसंस्था रामायण काळी होती

वसिष्ठो वामदेवश्च मन्त्रिणश्च तथापरे ।
सुयज्ञोऽप्यथ जाबालिः काश्यपोऽप्यथ गौतम ॥
मार्कंडेयस्तु दीर्घायुस्तथा कात्यायनो द्विज ॥ ( वा रा बा ७४ )

**अष्ट मर्यादागिरी** — १ हिमालय, २ हेमकूट, ३ निषध, ४ गंधमादन, ५ नील, ६ श्वेत, ७ शृंगवान आणि ८ माल्यवान हे आठ मोठे पर्वत जंबुद्वीपात असून ते त्यातील नऊ भागाच्या मर्यादा आहेत

**अष्ट महारोग** — १ वातव्याधि, २ अश्मरी, ३ कुष्ट, ४ मेह, ५ उदर, ६ भगंदर, ७ अर्श ( मूळव्याध ), आणि ८ संग्रहणी ( वाग्भट )

**अष्ट मांगल्य** — १ आरसा, २ फणी, ३ कुंकवाचा करंडा, ४ काजळाची डबी, ५ गंधपान, ६ झारी, ७ माप आणि ८ दिवा ही आठ शुभ चिह्न मानिली आहेत हें अष्ट मांगल्य वऱ्हाडात विशेषत सर्व मंगल प्रसंगी लागतं ( श्री मासिक फेब्रु १९६३ )

**अष्ट महासिद्धि** — १ अणिमा–शरीर सूक्ष्म होणें, २ महिमा–शरीर मोठे होणें, ३ हलके होणें, ४ प्राप्ति–सर्व प्राण्यांच्या इंद्रियांशीं त्या त्या इंद्रियांच्या अधिष्ठानी देवतांच्या रूपानें संबंध घडणें, ५ प्राकाम्य–ऐहिक व पारलौकिक स्थानी भोग व दर्शनाचें सामर्थ्य येणें, ६ ईशिता–मायेची इच्छाच्या ठिकाणीं असणारी प्रेरणा, ७ वशिता–आसक्त न होणें आणि ८ प्राकाम्य–इच्छा करावी ते सुख अमर्याद प्राप्त होणें (ए भा १५–४२ ते ४७) या आठांखेरीज वाटेल ती इच्छा पूर्ण होणें अशी एक "कामावसायित्व" नामक नववी सिद्धि महासिद्धांतच मानतात असे म्हणतात. ( माऊली विशेषांक )

**अष्ट माता ( काव्याच्या )** — १ स्वास्थ्य, २ प्रतिभा, ३ अभ्यास, ४ भक्ति, ५ विद्वत्कथा, ६ बहुश्रुतता, ७ स्मृतिदार्ढ्य आणि ८ अनिर्वेद ( समाधान )

> स्वास्थ्य प्रतिमाभ्यासो भक्तिर्विद्वत्कथा बहुश्रुतता ।
> स्मृतिदार्ढ्यमनिर्वेदश्च मातरोऽष्टौ काव्यस्य ॥ ( सु. )

**अष्ट मातृका ( देवशक्ति )** — ( अ ) १ ब्राह्मी, २ माहेश्वरी, ३ कौमारी ४ वैष्णवी, ५ वाराही, ६ इंद्राणी, ७ चामुंडा आणि ८ महालक्ष्मी या आठ देवता आहेत विवाहादि मंगलप्रसंगी यांची पूजा करतात ( आ ) १ रौद्री, २ वैष्णवी, ३ ब्राह्मी, ४ कुमारी, ५ वाराही, ६ नारसिंही, ७ चामुंडा, ८ माहेन्द्री ( काशीखंड ) ( इ ) १ योगीश्वरी, २ माहेश्वरी, ३ वैष्णवी, ४ ब्रह्माणी ५ कौमारी, ६ इंद्रजा, ७ यमदण्डा व ८ वराहा ( वराहपुराण )

**अष्ट महाद्वादशी** — १ उन्मीलनी, २ वञ्जुली, ३ त्रिस्पृशा, ४ पक्षवर्धिनी, ५ जया, ६ विजया, ७ जयन्ती आणि ८ पापनाशिनी ( ब्रह्मवैवर्तपुराण )

**अष्ट महौषधी** — १ सहदेवी, २ वचा, ३ व्याघ्री ४ बला ५ अतिबला, ६ शङ्खपुष्पी, ७ सिंही व ८ सुवर्चला देवाच्या अभिषेकांत या आठ महौषधींचा उपयोग करावयाचा असतो ( मत्स्य २६७–१८–१० )

**अष्ट महारस** — १ वैक्रान्तमणि, २ हिंगूळ, ३ पारा, ४ हरताळ, ५ कंकुष्ठ, ६ अभ्रक, ७ स्वर्णमाक्षी व ७ रौप्यमाक्षी. ( आयुर्वेद )

**अष्ट मूर्ति** — ( अ ) १ पृथ्वी, २ आप, ३ तेज, ४ वायु, ५ आकाश, ६ सूर्य, ७ चंद्र आणि ८ ऋत्विज. या ब्रह्माच्या आठ मूर्ती होत. (वज्रकोश); ( आ ) ( शिवदेवतेच्या ) — १ शर्व, २ भव, ३ रुद्र, ४ उग्र, ५ भीम, ६ पशुपति, ७ ईशान आणि ८ महादेव. या शिवदेवतेच्या आठ मूर्ति आठ तत्त्वामध्यें अधिष्ठित आहेत. ( वायुपुराण )

**अष्ट मूत्रें औषधी ( आयुर्वेद )** — १ गाय, २ म्हैस, ३ शेळी, ४ मेंढी, ५ हत्तीण, ६ घोडा, ७ गाढवी व ८ उटीण (सुश्रुत सूत्र ४५ १०)

**अष्ट भुजा** — १ सुरभी, २ ज्ञान, ३ वैराग्य, ४ योनि, ५ शंख, ६ पंकज, ७ लिंग व ८ निर्वाणकम्. देवीच्या पूजेचे प्रसंगीं करावयाच्या या आठ प्रकारच्या मुद्रा. जपाच्या शेवटी या मुद्राच प्रदर्शन करतात. ( शुक्ल— आह्निक सूत्रावलि )

**अष्ट योगिनी** — ( अ ) १ मंगला, २ पिंगळा, ३ धन्या, ४ भ्रामरी, ५ भद्रिका, ६ उल्का, ७ सिद्धा आणि ८ संकटा. या पार्वतीच्या आठ सख्या. या शुभाशुभ फल देणाऱ्या आहेत. ( आ ) १ मार्जनी, २ कर्पूर-तिलका, ३ मलयगंधिनी, ४ कौमुदिका, ५ भेरुंडा, ६ माताली, ७ नायकी आणि ८ जया किंवा शुभाचारा. ( म. ज्ञा. को. विभाग ७ )

**अष्टयंत्रबल सिद्धि** — प्राचीनकाळीं युद्धोपयोगी अशा अष्टयंत्रबल सिद्धि प्रमुख होत्या. हा आठ प्रकारची वाहनें हातीं तीं—१ दिव्य विमान, २ पुष्पक विमान, ३ सौभ विमान, ४ सूत विमान, ५ हर्यश्व विमान, ६ प्लव विमान, ७ अमृतावी आणि ८ शिला सनरिणी. ( चिंतनचे नये चरण )

**अष्ट रस** — १ शृंगार, २ हास्य, ३ करुण, ४ रौद्र, ५ वीर, ६ भयानक, ७ बीभत्स आणि ८ अद्‌भुत. हे आठच रस नाट्यशास्त्रांत भरतकालीं मानीत असत.

> शृंगारहास्यकरुणा रौद्रवीरभयानका। ।
> बीभत्साद्‌भुतसंज्ञौ चेत्यष्टौ नाट्ये रसा स्मृता ॥ ( भ. नाट्य ६-१६ )

**अष्ट रस** — ( आ ) शृंगार, वीर, करुण आणि हास्य हे चार प्रकृति रस व बीभत्स, रौद्र, भयानक व अद्‌भुत हे चार गौण रस होत. कोणी कोणी " शांत " हा नववा रस समजतात.

> निर्वेदस्थायिभावोऽस्ति नवमो रस ॥ ( नासदीय सूक्तभाष्य )

**अष्ट रस ( अध्यात्म )** — १ पृथ्वी, २ जल, ३ वनस्पति, ४ मनुष्य, ५ वाचा, ६ ऋचा, ७ साम आणि ८ उद्गीथ म्हणजे ओंकार. हा आठवा श्रेष्ठ रस असे उपनिषदात मानले आहे.

स एष रसाना रसतमः परम परार्ध्योऽष्टमो य उद्गीथः । ( छांदोग्य )

**अष्टलक्ष्मी** — १ धनलक्ष्मी, २ धान्यलक्ष्मी, ३ धैर्यलक्ष्मी, ४ विजयालक्ष्मी ५ वीरलक्ष्मी, ६ संतानलक्ष्मी, ७ गजलक्ष्मी आणि ८ विद्यालक्ष्मी.

**अष्टलवण** — १ पादेलोण, २ आवा, ३ अमसुले, ४ आम्लवेतस हीं एकेक भाग, ५ दालचिनी, ६ वेल्दोडा, ७ मिर्चे प्रत्येकीं अर्धा भाग आणि ८ साखर सर्वांबरोबर घालून केलेले चूर्ण.

**अष्टलोकपाल** — १ चंद्र, २ अग्नि, ३ सूर्य, ४ वायु, ५ इंद्र, ६ कुबेर, ७ यम व ८ वरुण.

'अष्टाना लोकपालाना वपुर्धारयते नृपः ॥' ( मनु. ५-९६ )

**अष्टवर्ग** — ( अ ) वर्णमालेतील आठ वर्ण. अ, क, च, ट, त, प, य, श.

'अकचटतपयश हे ख्यात । अष्टवर्ग असती शास्त्रात ॥' ( क. माहात्म्य )

**अष्टवसु** — ( अ ) १ ध्रुव, २ घोर, ३ सोम, ४ आप, ५ नल, ६ अनिल, ७ प्रत्यूष आणि ८ प्रभास. हे आठ चालू मन्वंतरातील धर्मर्षि व प्रचेतसदक्षकन्या वसु हिचे ठायीं झालेले वसुसंज्ञक देव ( पद्म सृष्टिखंड ); ( आ ) १ द्रोण, २ प्राण, ३ ध्रुव, ४ अर्क, ५ अग्नि, ६ दोष, ७ वसु आणि ८ विभावसु. ( भागवत )

**अष्टवायन** — १ हळकुंड, २ सुपारी, ३ दक्षिणा, ४ लवण, ५ सूप, ६ कंकण, ७ धान्य आणि ८ मणी ( एकसर ). या आठ सौभाग्यसंपन्न पदार्थांचें वाण देतात. त्यास अष्टवायन म्हणतात.

**अष्टविकृति व त्यांचे कर्ते ऋषि** — वेदमंत्रातील अक्षरांचे रक्षण करण्यासाठी केलेले प्रकार अथवा वेदपठणाच्या विशिष्ट पद्धति. या आठ आहेत. १ जटा–व्याडि, २ माला–वसिष्ठ, ३ शिखा–भृगु, ४ रेखा–अष्टावक्र, ५ ध्वज–विश्वामित्र, ६ दंड–पराशर, ७ रथ–कश्यप आणि ८ घन–अत्रि. ( विकृतवल्ली १–५ ) ( सायण भाष्य )

**अष्ट विद्येश्वर** — १ नंदी, २ महाकाल, ३ चंड, ४ भृंगिरिटी, घण्टाकर्ण, ६ पुष्पदंत, ७ कपाली व ८ वीरभद्र.

घण्टाकर्णः पुष्पदंतः वीरभद्रकः

एवमाद्या महाभागा महाबलपराक्रमाः ॥ ( सिद्धांत शिखामणि )

(आ) १ अनंत, २ सूक्ष्म, ३ शिवोत्तम, ४ एकनेत्र, ५ एकरुद्र, ६ त्रिमूर्ती, ७ श्रीकंठ व ८ शिखंडी ( पाशुपतदर्शन )

**अष्ट विनायक** — १ श्रीमोरेश्वर गणनाथ–मोरगाव जि. पुणें, २ श्री-बल्लाळेश्वर–पाली, ३ श्रीगणपति–रांजणगाव, ४ श्रीगजमुखविनायक–कर्जत-नर्जीक, ५ चिंतामणि–थेऊर जि. पुणें, ६ गिरिजात्मज लेण्याद्रि–जुन्नरजवळ. ७ श्री विघ्नेश्वर–ओझर जि. पुणें आणि ८ श्रीसिद्धिविनायक–सिद्धटेक–दौण्डजवळ. हीं महाराष्ट्रांतील अष्टविनायक स्थानें होत.

**अष्ट विवाह** — १ ब्राह्मविवाह–सालंकृत कन्यादान, २ दैवविवाह-यज्ञप्रसंगी ऋत्विजास दान म्हणून, ३ आर्ष–धन घेऊन, ४ प्राजापत्य–धर्मा-चरणार्थ कन्यादान देणें, ५ आसुर–शुल्क घेऊन, ६ गांधर्वविवाह–परस्पर अनुमतीनें, ७ राक्षस–जबरीनें कन्यादान करून आणणें, आणि ८ पैशाचविवाह–चोरून आणून विवाह करणें. असे विवाहाचे आठ प्रकार प्राचीनांनीं कल्पिलेले आहेत. ( मनु. ३–२१ )

**अष्टवृत्ति ( मनाची स्थिति – भावना )** — १ राग, २ करुणा, ३ भीति, ४ काळजी, ५ निराशा, ६ भावुकता ७ लज्जा व ८ अभिमान.

**अष्ट व्यूह ( शरीरस्थ )** — १ अस्थिव्यूह, २ स्नायुव्यूह, ३ पचनेंद्रिय-व्यूह, ४ अभिसरणव्यूह, ५ श्वासेंद्रियव्यूह, ६ उत्सर्जकव्यूह, ७ शोषण–व्यूह व ८ मज्जातंतुव्यूह. मानव शरिरांत अंतरिंद्रियांच्या नैसर्गिक योजनेच्या ह्या आठ व्यवस्था आहेत, त्यास व्यूह अशी संज्ञा शास्त्रकारांनीं दिली आहे. ( म. ज्ञा. को. वि. २० )

**अष्टविध अन्न** — १ भोज्य, २ पेय, ३ चोष्य, ४ लेह्य, ५ खाद्य, ६ चर्व्य, ७ निःपेय (खीर कण्हेरी इ.) व ८ भक्ष्य, असे आठ प्रकार (आपटे–कोश)

**अष्टविध प्रकार दुधाचे** — १ गाय, २ म्हैस, ३ शेळी, ४ उंटीण, ५ स्त्री, ६ मेंढी, ७ हत्तीण व ८ गाढवीण. अशा आठ प्रकारच्या प्राण्यांचे दूध ( औषधाच्या कामीं ) वापरण्याचा सामान्यतः प्रचार आहे.

**अष्ट सौभाग्य द्रव्यें** — १ ऊस, २ पावटे, ३ जिरे, ४ धने, ५ दूध, ६ करडी, ७ केशर किंवा कुंकू आणि ८ मीठ. या आठ पदार्थांस सौभाग्य अष्टक म्हणतात.

'लवण चाष्टमं तद्वत् सौभाग्याष्टकमुच्यते ।' (मत्स्य. अ ५९)

**अष्ट स्वभावधर्म** — १ क्षुधा, २ पिपासा, ३ मल, ४ मूत्र, ५ शीत, ६ उष्ण, ७ भय व ८ निद्रा. हे आठ स्वभाव किंवा देहधर्म होत

**अष्ट स्थायीभाव** — १ रति, २ हास, ३ शोक, ४ उत्साह, ५ क्रोध, ६ भय, ७ निंदा व ८ विस्मय हे आठ स्थायीभाव. ज्या मनोविकारास रस ही संज्ञा प्राप्त होते अशा आठ मनोवृत्ति वा रस भरतकालीं साहित्यशास्त्रांत मानले जात. त्यांना स्थायीभाव म्हणत

रतिर्हासश्च शोकश्च क्रोधोत्साहौ भयं तथा ।
जुगुप्सा विस्मयश्चेति स्थायीभावा प्रकीर्तिता ॥ (म ना ६ १८)

**अष्ट क्षार** — १ पळस, २ निवडुंग, ३ सज्जी, ४ आघाडा, ५ रुई, ६ तीळ, ७ जव व ८ टाकणखार

**अष्टाक्षरी मंत्र (पारमार्थिक)** — (अ) "ॐ नमो नारायणाय" नमो नारायणेति तारक मंत्रमुत्तमम् (रा. गी १३ ११), (आ) "ॐ नमो वासुदेवाय", (इ) "कृष्ण कृष्ण हरि हरि", (उ) (वल्लभ संप्रदाय) "श्रीकृष्ण शरण मम" (ऊ) (व्यावहारिक) "करूं करू काय करू."

**अष्टाक्षरी मंत्र** — (अ) "ॐ भवति भिक्षां देहि" हा वैदिक अष्टाक्षरा मंत्र-समर्थांना लोककार्याथ प्रसन्न झाला. (दा न. १४ ७१) (आ) (वारकरी संप्रदाय) "ज्ञानदेव-तुकाराम" हा वारकरी संप्रदायात उच्चारला जाणारा व भाविक मनाला सुख करणारा महामंत्र (इ) "हरहर महादेव" हा महाराष्ट्राच्या अस्मितेचा महामंत्र होय (ई) "ॐ भवति भिक्षां देहि" उपनयनानंतर बटूनें प्रथम मातेकडून भिक्षा घेतेसमयीं म्हणावयाचा मंत्र.

**अष्टावरण** — १ विभूति लावणें, २ रुद्राक्ष धारण करणें, ३ मंत्र (नम शिवाय) जपणें, ४ गुरु-आज्ञापालन, ५ लिंगपूजन, ६ जंगमाविषयीं

आदर, ७ पादोदक घेणें आणि ८ प्रसाद. हीं वीरशैव संप्रदायाचीं मुख्य आठ आवरणें अथवा तत्त्वें व आचार आहेत. ( कल्याण गो. अंक )

**अष्टांग योग (प्रकार)** — १ लययोग २ तारकयोग, ३ अमनस्कयोग, ४ सांख्ययोग, ५ लंबिकायोग, ६ राजयोग, ७ कुंडलीयोग व ८ हठयोग. असे आठ प्रकार. ( पंचग्रंथी )

**अष्टांग वैद्यक** — १ द्रव्याभिधान, २ गदनिश्चय, ३ कायसौख्य, ४ शल्यादि, ५ भूतनिग्रह, ६ विषनिग्रह, ७ बालवैद्यक आणि ८ रसायन, हीं आयुर्वेदाचीं आठ अंगं; ( आ ) १ कायचिकित्सा, २ बालचिकित्सा, ३ ग्रहचिकित्सा, ४ उर्ध्वांगचिकित्सा, ५ शल्यतंत्र, ६ विषचिकित्सा, ७ रसायन व ८ वाजीकरण. ( वाग्भट अ १ )

**अष्टांगिक मार्ग** — ( अ ) १ सम्यक् दृष्टि, २ सम्यक् संकल्प, ३ सम्यक् वाचा, ४ सम्यक् कर्मान्त, ५ सम्यक् आजीव, ६ सम्यक् व्यायाम, ७ सम्यक् स्मृति आणि ८ सम्यक् समाधि. असे बुद्धधर्मांचे आठ मार्ग; ( आ ) १ श्रद्धा, २ संकल्प, ३ भाषण, ४ वृत्ति, ५ धंदा, ६ योग, ७ स्मृति व ८ ध्यान.

**अष्टांगें ( अर्घ्याचीं )** — १ जल, २ दूध, ३ दर्भाग्र, ४ दहीं, ५ तूप, ६ तांदूळ, ७ सातु व ८ पांढऱ्या मोहऱ्या. या आठ वस्तूंनीं अर्घ्यप्रदान करावयाचें असतें.

' यवाग्रिद्धार्थमाश्चेति ह्यर्घ्योऽष्टागप्रकीर्तित । ' ( व्रतरत्न ) ( भविष्य. पु. )

**अष्टांगें ( औषधींचीं )** — १ मूळ, २ कंद, ३ पान, ४ फळ, ५ पुष्प, ६ सर्वांग, ७ डिंक व ८ साल. अशीं औषधींचीं आठ अंगं. ( नि. र. )

**अष्टांगें ( गायत्रीचीं )** — १ नाद, २ बिंदु, ३ कला, ४ ज्योति, ५ रूप, ६ रेखा, ७ स्वरवर्ण व ८ आवृत्ति. ( प्रणवोपासना )

**अष्टांगें ( चिकित्सेचीं )** — १ निदान, २ पूर्वलिंग, ३ रूप, ४ उपशम, ५ संप्राप्ति, ६ औषधि, ७ रोगी व ८ परिचारिका.

**अष्टांगें ( धर्माचीं )** — ( अ ) १ देवपूजा, २ धार्मिक ग्रंथाचें पठण, ३ दान, ४ तप, ५ सत्य, ६ क्षमा, ७ इंद्रियनिग्रह आणि ८ निर्लोभता.

"ऐममेक्षफ चेति क्षीरमष्टविध स्मृतम्" ( अष्टागसग्रह सूत्रस्थान )

**अष्टविधार्चन** — १ जल, २ गध, ३ अक्षता, ४ पुष्प, ५ धूप, ६ दीप, ७ नैवेद्य व ८ तांबूल या आठ पदार्थांनीं देवतेचें पूजन करतात

नैवेद्यैरपि तांबूलैरनेदष्णविधार्चनम् ॥ ( वी. प्र. अ १९ )

**अष्टविध परीक्षा ( रोग्याची )**—१ नाडी, २ मूत्र, ३ मल, ४ जिव्हा, ५ शब्द, ६ स्पर्श, ७ नेत्र व ८ रूप ( चर्या ). अशी आठ प्रकारची परीक्षा आयुर्वेदांत सांगितली आहे. ( नि र )

**अष्टविध पूजास्थानें ( परमेश्वराचीं )** — १ प्रतिमा, २ स्थंडिल, ३ अग्नि, ४ सूर्य, ५ जल, ६ हृदय, ७ ब्राह्मण आणि ८ गुरु

एवं हीं आठ पूजास्थानें । तुज सांगितलीं सुलक्षणें ।
तेथलीं पूजेचीं लक्षणें । तं ही भिन्नपणें सांगेन ॥ ( ए भा. २७-८२ )

**अष्टविध प्रमाणें** — १ प्रत्यक्ष, २ अनुमान, ३ उपमान, ४ शब्द, ५ ऐतिह्य, ६ अर्थापत्ति, ७ संभव व ८ अभाव अशीं आठ प्रमाणें मानिलीं आहेत ( सत्यार्थप्रकाश )

**अष्टविध प्राणायाम** — १ सूर्यभेदन, २ उज्जयी, ३ सीत्कारी, ४ शीतली, ५ भस्त्रिका, ६ भ्रामरी, ७ मूर्च्छा आणि ८ प्लाविनी ( ह. प्र )

**अष्टविध मूर्ख** — १ निर्लज्ज, २ शठ, ३ क्लीब, ४ निर्घृण, ५ व्यसनी, ६ अतिलोभी, ७ गर्वित, व ८ निष्ठुर ( रत्नकोश )

**अष्टविध रत्न परीक्षा** — १ नाम, २ रूप, ३ उत्पत्ति, ४ गुण, ५ दोष, ६ ताल, ७ मा[illegible] व ८ शुभाशुभ. अशा आठ प्रकारानीं करावयाची असते ( रत्नपरीक्षा )

**अष्टविध समाधि** — १ यम, २ नियम, ३ आसन, ४ प्राणायाम, ५ प्रत्याहार, ६ धारणा, ७ ध्यान व ८ समाधि असे समाधि-योगाचे आठ प्रकार.

**अष्टविधसृष्टि** — (अ) १ शब्दसृष्टि, २ मानसिकसृष्टि, ३ कल्पनासृष्टि, ४ मायावीसृष्टि, ५ पार्थिवसृष्टि, ६ भावसृष्टि, ७ जडसृष्टि व ८ भूतसृष्टि, (आ) १ कल्पनासृष्टि, २ शाब्दिकसृष्टि, ३ प्रत्यक्षसृष्टि, ४ चित्रलेपसृष्टि, ५ स्वप्नसृष्टि, ६ गंधर्वसृष्टि, ७ ज्वरसृष्टि, व ८ दृष्टिबंधनसृष्टि, ( दा. ब. ६–६।३ )

**अष्ट व्याकरणशास्त्रकार** — १ इंद्र, २ चंद्र, ३ काशकृत्स्न, ४ अपिशली, ५ शाकटायन, ६ पाणिनि, ७ अमर आणि ८ जैनेंद्र. हे आठ शब्दशास्त्रप्रणेते व व्याकरणकार होत.

इंद्रश्चन्द्रः काशकृत्स्नापिशली शाकटायनः ।
पाणिन्यमरजैनेंद्रा जयन्त्यष्टादिशाब्दिकाः ॥ ( बोपदेवकृत मुग्धबोध )

**अष्ट व्यूह ( सैन्य रचनाप्रकार )** — १ भोग ( सर्प ) व्यूह, २ दंड व्यूह, ३ मंगलव्यूह, ४ सर्वतोभद्रव्यूह, ५ असह्यव्यूह व ६ असहतव्यूह ७ विजय व्यूह व ८ गरुडव्यूह असे व्यूहाचे मुख्य प्रकार महाभारत–काळीं होते. खेरीज चक्र व्यूह व सूचिमुख असे आणखीहि प्रकार असत. (म. ज्ञा. को. वि. १९)

**अष्ट शक्ति ( श्रीविष्णूच्या )** — १ श्री, २ भू, ३ सरस्वती, ४ प्रीति, ५ कीर्ति, ६ शांति, ७ तुष्टि, व ८ पुष्टि. या अष्टशक्ति १ संपत्ति, २ पृथ्वी, ३ विद्या, ४ प्रेम, ५ कीर्ति, ६ शांति, ७ सुख व ८ बल याच्या देवता होत. ( पद्म. पु. )

**अष्ट शिवगण** — १ नंदी, २ शृंगी, ३ भृंगिरिटि, ४ गोकर्ण, ५ घंटाकर्ण, ६ वीरभद्र, ७ महाविकट, व ८ शैल.

**अष्टशुद्धि जपानुष्ठानास आवश्यक** — १ द्रव्यशुद्धि, २ क्षेत्रशुद्धि, ३ समयशुद्धि, ४ आसनशुद्धि, ५ विनयशुद्धि, ६ मनःशुद्धि, ७ वचनशुद्धि व ८ कायशुद्धि. अशी आठ प्रकारच्या शुद्धि आवश्यक मानली आहे. ( मङ्गल मंत्र–एक अनुचिंतन )

**अष्ट सात्त्विक गुण** — १ शोभा, २ विलास, ३ माधुर्य, ४ गांभीर्य, ५ स्थैर्य, ६ तेज, ७ ललित व ८ औदार्य. ( भ. ना. )

**अष्ट सात्त्विक भाव** — ( अ ) १ कंप, २ रोमांच, ३ स्फुरण, ४ प्रेमाश्रु, ५ स्वेद, ६ हास्य, ७ प्रलास्य आणि ८ गायन. हे शरीराचे सत्त्वगुणाचे आठ भाव–प्रकार आहेत ( हंसकोश ); ( आ ) १ स्तंभ–गति-निरोधन, २ स्वेद, ३ रोमांच, ४ वैस्वर्य, ५ वेपथु–कंप, ६ वैवर्ण्य–वर्ण पालटणें, ७ अश्रुपात आणि ८ प्रलय–चेष्टानिरोध ( भ. ना. ७-१४८ ); ( इ ) परमार्थ पथावराल–१ रोमांच, २ स्वेद, ३ अश्रु ( शारीरिक ) ४ कंप, ५ स्तंभ किंवा ताटस्थ्य ( शारीरिक–मानसिक मिश्र ) ६ मानसिक, ७ शांति आणि ८ आनंद ( मानसिक ) ( म. गी. साक्षात्कार दर्शन )

**अष्ट सौभाग्य द्रव्यें** — १ ऊस, २ पावटे, ३ जिरे, ४ धने, ५ दूध, ६ करडी, ७ केशर किंवा कुंकू आणि ८ मीठ. या आठ पदार्थांस सौभाग्य अष्क म्हणतात.

'लवण चाष्टम तद्वत् सौभाग्याष्टकमुच्यते ।' (मत्स्य. अ. ५९)

**अष्ट स्वभावधर्म** — १ क्षुधा, २ पिपासा, ३ मल, ४ मूत्र, ५ शीत, ६ उष्ण, ७ भय व ८ निद्रा. हे आठ स्वभाव किंवा देहधर्म होत

**अष्ट स्थायीभाव** — १ रति, २ हास, ३ शोक, ४ उत्साह, ५ क्रोध, ६ भय, ७ निंदा व ८ विस्मय. हे आठ स्थायीभाव. ज्या मनोविकारास रस ही संज्ञा प्राप्त होते अशा आठ मनोवृत्ति वा रस भरतकालीं साहित्यशास्त्रानें मानले जात. त्यांना स्थायीभाव म्हणत.

रतिर्हासश्च शोकश्च क्रोधोत्साहौ भयं तथा ।
जुगुप्सा विस्मयश्चेति स्थायीभावाः प्रकीर्तिताः ॥ (भ ना. ६ १८)

**अष्ट क्षार** — १ पळस, २ निवडुंग, ३ सर्ज्जी, ४ आघाडा, ५ रुई, ६ तीळ, ७ जव व ८ टाकणखार

**अष्टाक्षरी मंत्र (पारमार्थिक)** — (अ) "ॐ नमो नारायणाय" नमो नारायणेति तारक मंत्रमुत्तमम् (रा. गी. १३ ११), (आ) "ॐ नमो वासुदेवाय", (ई) "कृष्ण कृष्ण हरि हरि", (उ) (वल्लभ संप्रदाय) "श्रीकृष्ण शरणं मम" (ऊ) (व्यावहारिक) "कम कम काय कम."

**अष्टाक्षरी मंत्र** — (अ) "ॐ भवति भिक्षां देहि" हा वैदिक अष्टाक्षरी मंत्र-समर्थांनीं लोककार्यार्थ प्रसृत केला. (दा. बो. १४ ७१) (आ) (वारकरी संप्रदाय) "ज्ञानदेव-तुकाराम" हा वारकरी संप्रदायात उच्चारला जाणारा व भाविक मनाला मुग्ध करणारा महामंत्र (इ) "हरहर महादेव" हा महाराष्ट्राच्या अस्मितेचा महामंत्र होय (ई) "ॐ भवति भिक्षां देहि" उपनयनानंतर बटूनें प्रथम मातेकडून भिक्षा घेतेसमयीं म्हणावयाचा मंत्र.

**अष्टावरण** — १ विभूति लावणें, २ रुद्राक्ष धारण करणें, ३ मंत्र (नमः शिवाय) जपणें, ४ गुरु-आज्ञापालन, ५ लिंगपूजा, ६ जंगमाविषयीं

आदर, ७ पादोदक घेणें आणि ८ प्रसाद. हीं वीरशैव संप्रदायाचीं मुख्य आठ आवरणें अथवा तत्त्वें व आचार आहेत (कल्याण गो. अंक)

**अष्टांग योग (प्रकार)** — १ लययोग २ तारकयोग, ३ अमनस्कयोग, ४ सांख्ययोग, ५ लंबिकायोग, ६ राजयोग, ७ कुंडलीयोग व ८ हठयोग असे आठ प्रकार (पंचग्रंथी)

**अष्टांग वैद्यक** — १ द्रव्याभिधान, २ गदनिश्चय, ३ कायसौख्य, ४ शल्यादि, ५ भूतनिग्रह, ६ विषनिग्रह, ७ बालवैद्यक आणि ८ रसायन, हीं आयुर्वेदाचीं आठ अंग (आ) १ कायचिकित्सा, २ बालचिकित्सा, ३ ग्रहचिकित्सा, ४ उर्ध्वांगचिकित्सा, ५ शल्यतंत्र, ६ विषचिकित्सा, ७ रसायन व ८ वाजीकरण (वाग्भट अ १)

**अष्टांगिक मार्ग** — (अ) १ सम्यक् दृष्टि, २ सम्यक् संकल्प, ३ सम्यक् वाचा, ४ सम्यक् कर्मान्त, ५ सम्यक् आजीव, ६ सम्यक् व्यायाम, ७ सम्यक् स्मृति आणि ८ सम्यक् समाधि असे बुद्धधर्माचे आठ मार्ग, (आ) १ श्रद्धा, २ संकल्प, ३ भाषण, ४ कृति, ५ धंदा, ६ योग, ७ स्मृति व ८ ध्यान.

**अष्टांगें (अर्घ्याचीं)** — १ जल, २ दूध, ३ दर्भाग्र, ४ दहीं, ५ तूप, ६ तांदूळ, ७ सातु व ८ पांढऱ्या मोहऱ्या. या आठ वस्तूंनीं अर्घ्यप्रदान करावयाचें असत.

'यवसिद्धार्थकाश्चेति ह्यर्घ्योऽष्टाङ्गप्रकीर्तितः ।' (व्रतरत्न) (भविष्य. पु.)

**अष्टांगें (औषधीचीं)** — १ मूळ, २ कंद, ३ पान, ४ फळ, ५ पुष्प, ६ सर्वांग, ७ ठिक व ८ साल. अशीं औषधींचीं आठ अंगें. (नि र.)

**अष्टांगें (गायत्रीचीं)** — १ नाद, २ बिंदु, ३ कला, ४ ज्योति, ५ रूप, ६ रेखा, ७ स्वरवर्ण व ८ आवृत्ति. (प्रणवोपासना)

**अष्टांगें (चिकित्सेचीं)** — १ निदान, २ पूर्वलिंग, ३ रूप, ४ उपशम, ५ समाप्ति, ६ औषधि, ७ रोगी व ८ परिचारिका

**अष्टांगें (धर्माचीं)** — (अ) १ देवपूजा, २ धार्मिक ग्रंथाचें पठण, ३ दान, ४ तप, ५ सत्य, ६ क्षमा, ७ इंद्रियनिग्रह आणि ८ निर्लोभता.

(म. मा. व. २-७५); (आ) १ तप, २ सत्य, ३ क्षमा, ४ दया, ५ शौच, ६ दान, ७ योग व ८ ब्रह्मचर्य. (वामन. पु. अ. २२)

**अष्टांगें (नमनाचीं)** — १ मस्तक, २ छाती, ३ हात, ४ गुडघे, ५ पाय, ६ दृष्टि, ७ वाणी व ८ मन. हीं नमनाचीं आठ अंगें. या आठ अंगांनीं करावयाच्या नमस्कारास साष्टांग नमस्कार म्हणतात.

पद्भ्यां कराभ्यां जानुभ्यामुरसा शिरसा तथा।
मनसा वचसा दृष्ट्या प्रणामोऽष्टांगमुच्यते ॥ (सु.)

**अष्टांगें (न्यायाचीं)** — १ स्मृति (निर्बंध) २ न्यायाधीश, ३ पंच–न्यायाचें कामीं सहाय्यक सभासद, ४ लेखक, ५ ज्योतिषी, ६ सुवर्ण, ७ अग्नि व ८ जल. हीं न्यायाचीं आठ अंगें अथवा न्यायसाधनें म्हणून मानिलीं आहेत.

**अष्टांगें (पात्रतेचीं)** — १ क्षमा, २ निरिच्छता, ३ सत्य भाषण, ४ दान, ५ सुस्वभाव, ६ सदाचार, ७ तप आणि ८ आत्मज्ञान.

क्षान्त्यस्पृहा तथा सत्यं दानं शीलं तपःश्रुतम्।
एतदष्टांगमुद्दिष्टं परं पात्रस्य लक्षणम् ॥ (ब्राह्म. १७२-३३)

**अष्टांगें (पूजेचीं)** — १ पाणी, २ दूध, ३ तूप, ४ दही, ५ दर्भ, ६ तांदूळ, ७ जव व ८ सर्षप. (म. ज्ञा. को. विभाग ७)

**अष्टांगें (बुद्धीचीं)** — १ शुश्रूषा, २ श्रवण, ३ ग्रहण, ४ धारणा, ५ चिंतन, ६ ऊहापोह, ७ अर्थविज्ञान व ८ तत्त्वज्ञान. (म. वा. को.)

**अष्टांगें (मैथुनाचीं)** — १ स्त्रीविषयक चिंतन, २ वर्णन, ३ क्रीडा करणें, ४ कटाक्षयुक्त पाहणें, ५ एकान्तीं भाषण, ६ संकेत, ७ अध्यवसाय (परस्पर निश्चय) आणि ८ प्रत्यक्ष संभोग.

स्मरणं कीर्तनं केलिः प्रेक्षणं गुह्यभाषणम्।
संकल्पोऽध्यवसायश्च क्रियानिर्वृत्तिरेव च ॥ (वृ. स्मृति)

**अष्टांगें (योगाचीं)** — १ यम, २ नियम, ३ आसन, ४ प्राणायाम, ५ प्रत्याहार, ६ ध्यान, ७ धारणा व ८ समाधि. (पा. योगसूत्र) या आठ मार्गांनीं क्रमाक्रमानें साधकाचा होणारा प्रवास हा अष्टांग योग.

**अष्टांग रतिचक्रांतील (कामशास्त्र)** — १ आलिंगन, २ चुंबन, ३ नखच्छेद्य, ४ दशनच्छेद्य, ५ संवेशन, ६ सीत्कृत, ७ पुरुषायित व ८ औपरिष्टक. (नासदीयसूक्त-भाष्य)

**अष्टांगें (शकुनाचीं)** — १ भौम-भूकंप इ., २ उत्पात-उल्कापात, ३ स्वप्न, ४ अन्तरिक्ष-ग्रहांची स्थिति, ५ अंगस्फुरण, ६ स्वर, ७ लक्षण व ८ व्यंजन-शरीरावर नंतर उमटणाऱ्या खुणा. जैनधर्मांत अशीं शकुनाचीं आठ अंगं मानिलीं आहेत. (एम्. एम्. सी संस्कृत दोन दिवसांत)

**अष्टांगें (शरीराचीं)** — (अ) १ शिर, २ कक्ष, ३ हृदय, ४ बाहु, ५ ऊरु, ६ जंघा, ७ ढोपरें व ८ पादांगुलीं. हीं शरिराचीं आठ अंगें. (उड्डीश शास्त्र); (आ) दोन हात, दोन पाय, दोन गुडघे, वाचा व मन अशीं आठ अंगं.

**अष्टांगें (साधनेचीं)** — १ सत्यविश्वास, २ नम्रवचन, ३ उच्चलक्ष्य, ४ सदाचरण, ५ सद्वृत्ति, ६ सद्गुणाचें परिपालन, ७ बुद्धीचा सदुपयोग आणि ८ सद्ध्यान. भगवान् बुद्धानें हीं साधनेचीं आठ अंगं सांगितलीं आहेत. (कल्याण हिं. स. अंक)

**अष्टांगें (सैन्याचीं)** — १ रथ, २ हत्ती, ३ घोडे, ४ पायदळ, ५ मजूर, ६ नाविकदल, ७ गुप्तहेर आणि ८ टेहळणी पथक. हीं सैन्याचीं आठ अंगं भारतकालीं होतीं.

रथा नागा हयाश्चैव पादाताश्चैव पाण्डव ।
विष्टिर्नावश्चराश्चैव देशिका इति चाष्टमः । (म. भा. शांति. अ-५९)

**अष्टांगें (संस्कृतीचीं)** — १ मानवी परिश्रम, २ शासनसंस्था, ३ नीति, ४ धर्म, ५ शास्त्र, ६ तत्त्वज्ञान, ७ वाङ्मय व ८ कला.

**अष्टांगें वा स्थानें पवित्र गोदावरीचीं** — १ शिर-ब्रह्मगिरि, २ मुख-पुणतांबें, ३ कंठ-पैठण, ४ मध्य-हृदयस्थान, ५ शरतीर्थ (नादेड-चकळ)-नाभि, ६ कटी-मंथन, ७ जानु-धर्मपुरी, व ८ चरण-राजमहेंद्री (गोदामाहात्म्य)

**अष्टाधिकार** — १ जलाधिकार, २ स्थलाधिकार, ३ ग्रामाधिकार, ४ प्रशासन (वेठिपाचा अधिकार), ५ कुल्लेरसन, ६ दंडविनियोग,

७ पौरोहित्य व ८ ज्योतिष. यांचा आठ जाती पूर्वकाली गेडेगावानून असत (म श का विभाग ७)

**अष्टक** — (अ) ऋग्वेद संहितेचे पठणाच्या सोयीकरिता आठ भाग केले आहेत. प्रत्येक भागात आठ अध्याय आहेत त्या प्रत्येक भागास अष्टक अशी संज्ञा आहे (आ) आठ वस्तूंचा संग्रह अथवा आठ वस्तूंच्या समुच्चयानें बनलेला पदार्थ उदा हिंगाष्टक, गंधाष्टक इ (इ) स्तोत्र अथवा काव्य ज्यात आठ श्लोक आहेत असे उदा रुद्राष्टक, गंगाष्टक इ

**आठ अंगें आयुर्वेदाचीं** — १ सूत्र, २ शारीर, ३ एंद्रिय, ४ चिकित्सा, ५ निदान, ६ विमान, ७ कल्प व ८ प्रसिद्ध (साथ मा नि प्रस्तावना)

**आठ अवतार गणपतीचे** — १ वक्रतुण्ड, २ एकदंत, ३ महोदर, ४ गजानन, ५ लंबोदर, ६ विकट, ७ विघ्नराज आणि ८ धूम्रवर्ण असे श्रीगणपतीचें आठ अवतार असून ते समुद्रतीराला पाठविण्यात आहेत (मुद्गल पुराण)

**आठ आग्र्याच्या ताजमहालाचे प्रमुख कारागीर** — १ अमानत खा शिराजी–कंदाहार, २ इसा गवंडी–आग्रा, ३ पिरा मुनार–दिल्ली, ४ बन्नुहार, ५ जातमल्ल, ६ जोरावर (नक्षी काम करणारा), ७ इस्माइल खान रूमी (घुमट बनावणारा) आणि ८ रामलाल (काश्मिरा बाग बनविणारा) हे प्रमुख कारागीर व निर्माते होते

(Studis in Moghul India)

**आठ उपरस (रसायनशास्त्र)** — १ गंधक, २ गेरु (सानकाव), ३ हिराकस, ४ तुरटी ५ हरताळ, ६ मनशील, ७ सुरमा आणि ८ कंकुष्ट (सुदाहरिंग) (र. र समुच्चय अ ३ १)

**आठ गुण दूतास आवश्यक** — १ गर्वरहित, २ दुबल नसलेला, ३ चेंगटपणा न करणारा, ४ दयाळू ५ प्रामाणिक, ६ फितुर न होणारा, ७ निरोगी ८ सयुक्तिक तसेंच अर्थपूर्ण भाषण करणारा (म भा उ ३७ २७)

**आठ गुण पुरुषाची योग्यता वाढविणारे** — १ बुद्धि, २ कुलीनता, ३ विद्या, ४ इंद्रियदमन, ५ पराक्रम, ६ मितभाषण, ७ यथाशक्ति दान व ८ कृतज्ञता (म भा उद्योग ३७ ३१)

आठ गुण राज्यशासकाना विहित — १ दम, २ शांति, ३ क्षमा, ४ धम, ५ धैर्य, ६ सत्य, ७ पराक्रम आणि ८ उपद्रव देणाऱ्याना दंड. (वा रा. अयोध्या)

आठ गुण विद्यासंपादनास आवश्यक — १ शांति, २ इंद्रियदमन, ३ स्वदोष दृष्टि, ४ सदाचार, ५ ब्रह्मचर्य, ६ अनासक्ति, ७ सत्याग्रह व ८ सहिष्णुता (नारदीयसूत्र-भाष्य)

आठ गुण आदर्श विद्यार्थ्यांचे — १ सुशील, २ चतुर, ३ सतत ध्यात जागरूक, ४ ज्ञानवान्, ५ सेवापरायण, ६ कल्पक, ७ इष्ट व योग्य काम करणारा व ८ अप्रमादी (निरलस) (सु.)

(आठ गुण हनुमतस्मरणानें प्राप्त होतात — १ बुद्धि, २ बल, ३ कीर्ति, ४ धैर्य, ५ निर्भयपणा, ६ निरोगीपणा, ७ चापल्य आणि ८ वाक्पटुत्व

बुद्धिबल यशो धैर्य निर्भयत्वमरोगता ।
अजाड्य वाक्पटुत्व च हनुमत्स्मरणाद्भवेत् ॥ (वायुस्तुति))

आठ गोष्टी विद्यार्थ्यास वर्ज्य — १ काम, २ क्रोध, ३ लोभ ४ जिभेचे चोचले, ५ शृंगाराची आवड, ६ उत्सव-समारंभ, ७ अतिनिद्रा आणि ८ अति कामधाम

काम क्रोध तथा लोभ स्वादुशृंगारकौतुक ।
अतिनिद्रातिसेवा च विद्यार्थी ह्यष्ट वर्जयेत् ॥ (वृ चा ११९)

(आठ गोष्टींच्या स्वीकारानें व्रतभंग होत नाहीं — १ जल, २ मूळ ३ फळ, ४ दूध, ५ हवि, ६ ब्राह्मणाची इच्छा, ७ गुरूची आज्ञा व ८ औषध (म भा उद्योग ३९७१))

आठ गोष्टी स्थानभ्रष्ट झाल्यास न शोभणाऱ्या — १ राजा अधिकारी, २ कुलवधू, ३ ब्राह्मण, ४ मंत्री, ५ स्तन, ६ दांत, ७ केश व ८ नख

आठ जाती शब्दाच्या — १ नाम, २ सर्वनाम ३ विशेषण ४ क्रियापद, ५ क्रियाविशेषण अव्यय, ६ उभयान्वयी अव्यय, ७ केवल प्रयोगी अव्यय, ८ शब्दयोगी अव्यय (व्याकरण)

**आठ जीवनसत्त्वे** — ए, बी, सी, डी, इ, एफ्, जी व एच हीं आतापर्यंत ज्ञात असां आठ प्रमुख जीवनसत्त्वें मानवी देहधारणेला अवश्य असतात, व तीं अनेक तऱ्हेचीं व महत्त्वाचीं कार्यें करतात असें आधुनिक जीवनशास्त्र सांगतें

**आठ तिथी शुभदायक** — १ प्रतिपदा, २ द्वितीया, ३ तृतीया, ४ पंचमी, ५ सप्तमी, ६ दशमी, ७ द्वादशी व ८ त्रयोदशी या आठ तिथी शुभदायक मानल्या आहेत (अकशास्त्र)

**आठ देवता लक्ष्मीच्या सांनिध्यात राहणाऱ्या** — १ आशा, २ श्रद्धा, ३ धृति, ४ क्षांति, ५ विजिति, ६ सन्नति ७ क्षमा व ८ जय (म भा शांति अ २२)

**आठ दुर्गुणांनीं मनुष्याच्या शक्तींचा संकोच होतो** — १ अहंकार, २ नल, ३ दर्प, ४ काम, ५ क्रोध, ६ वस्तुसंग्रह, ७ ममत्व आणि ८ अशांति

**आठ दोष क्रोधामुळें उत्पन्न होणारे** — १ चहाडी, २ साहस, ३ कपटाचरण, ४ मत्सर, ५ दोषदर्शन, ६ अपदूषण (परद्रव्यापहार), ७ वाणीनें कठोर आणि ८ हातपाइवर येणें (मन ७ ४८)

**आठ दोष मैथुनापासून उत्पन्न होणारे** — १ ग्लानि २ मूर्च्छा, ३ भ्रम ४ कापरें, ५ श्रम ६ घाम, ७ अंग अंगर इंद्रियामध्यें ग्लोपणा येणं व ८ क्षयरोगादि दोष

*ग्लानिमूर्च्छा भ्रम कंप श्रम स्वेदोऽङ्गाविह्वल ।*
*क्षयरोगादयो दोषा मैथुनोत्था शरीरिण ॥ (सु)*

**आठ दोष (मंत्रसंबंधीं)** — १ अभक्ति, २ अक्षरभ्रांति ३ लस (अक्षर गोठून म्हणणें), ४ छिन, ५ ऱ्हस्व, ६ दीर्घ (उच्चार दोष), ७ जागृतींत मंत्र दुसऱ्यास सांगणें आणि ८ स्वप्नकथन (स्वप्नांत दुसऱ्यास सांगणं) (कल्याण साधनांक)

**आठ धर्ममार्ग** — १ यजन, २ अध्ययन, ३ दान, ४ तप, ५ सत्य, ६ क्षमा, ७ दया आणि ८ लोभशून्यता (म भा उद्योग ३५ ५६)

**आठ धन वाढविण्याचीं साधनें** — १ सत्यपणा, २ दक्षता, ३ मनोनिग्रह, ४ बुद्धिमत्ता, ५ विचारशीलता, ६ धैर्य, ७ शौर्य, व ८ स्थलकालविषयक सावधानता. ( म. भा. शांति. १२० ३७ )

**आठ नांवें अच्युताचीं (अच्युत–अविनाशी तत्त्व)** — १ अच्युत, २ केशव, ३ विष्णु, ४ हरि, ५ सत्य, ६ जनार्दन, ७ हंस आणि ८ नारायण. हीं नांवें मंगलरूप मानिलीं आहेत. ( चतुर्वर्ग. भाग. २ रा )

**आठ नांवें तुळशीचीं** — १ वृन्दा, २ वृन्दावनी, ३ विश्वपूजिता, ४ विश्वपावनी, ५ पुष्पसारा, ६ नंदिनी, ७ तुलसी व ८ कृष्णजीवनी.
( देवी. भा. ९–२५ )

**आठ परमेश्वराचीं स्वरूपें** — १ पृथ्वी, २ जल, ३ अग्नि, ४ वायु, ५ आकाश, ६ सूर्य, ७ चंद्र आणि ८ यज्ञकर्ता.

पृथ्वी सलिलं तेजो वायुराकाशमेव च ।
सूर्याचन्द्रमसौ सोमयाजी चेत्यष्टमूर्तयः ॥ ( रघुवंशटीका ).

**आठ प्रकार आत्म्याच्या पुनर्जन्माचे** — १ जलात्मा–आत्मा प्राणाशीं संलग्न होऊन मेघमंडळाचा आश्रय करतो, २ अन्नात्मा–तें जल वृक्ष वनस्पति सेवन करतात, ३ वीर्यात्मा–अन्नाचें वीर्य बनतें, ४ गर्भात्मा–त्या वीर्यापासून गर्भधारणा होते, ५ पुरुषात्मा–मातेच्या उदरांतून जन्म घेतो, ६ ज्ञानात्मा, ७ कर्मात्मा व ८ चिदात्मा. हा आत्म्याचा आठवा पुनर्जन्म होय. येथें त्याला आनंदावस्थेचा अनुभव येतो.

" चिदानंदरूपः शिवः केवलोऽहं " ( पुरुषार्थ नो म. गी. )

**आठ प्रकार आलिंगनाचे ( कामशास्त्र )** — १ वृक्षाधिरूढ, २ तिलतंडुल, ३ लालाटिक, ४ जावन, ५ विद्धक, ६ ऊरूपगूढ, ७ क्षीरनीर व ८ वेष्टरिवेष्टित ( अनगरंग ) सेरीज, ९ सन्मुख आलिंगन हा एक कांहींच्या मतें नववा प्रकार आहे.

**आठ प्रकार गायत्री छंदाचे** — १ आर्षा, २ दैवी, ३ आसुरी, ४ प्राजापत्य, ५ याजुषी, ६ साम्नी, ७ आर्ची व ८ ब्राह्मी ( विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९५८ ).

**आठ प्रकार चित्रांचे ( दर्शनगम्य )** — १ वास्तविक, २ सादृश्यवादी, ३ वस्तुवादी अथवा विषयवादी, ४ चित्रणवादी, ५ विवरणवादी, ६ स्थिररूप, ७ स्थानकचित्र व ८ व्यक्तिचित्र ( कला आणि कलास्वाद )

**आठ प्रकार चित्रतांडव नृत्याचे** — १ थरक, २ चाचरी, ३ मखरी, ४ तिरप, ५ लाड्य, ६ बोडव, ७ गिरडी आणि ८ झप. अशाप्रकारचे नृत्य श्रीकृष्णानें कालियाचे मस्तकावर केलें अशी कथा आहे. ( हरिवरदा अ. १६)

**आठ प्रकारच्या जपमाळा** — १ रुद्राक्ष, २ तुळसी, ३ स्फटिक, ४ मोती, ५ प्रवाळ ( पोवळे ), ६ पुत्रजीव, ७ सुवर्ण व ८ रत्न.

**आठ प्रकारचे दैवी कोप** — १ अग्नि, २ जल, ३, रोग, ४ दुष्काळ, ५ उंदीर, ६ हिंस्रपशु, ७ सर्प व ८ भूत–पिशाच. ( कौटिल्य अ. ८० )

**आठ प्रकार ध्वनींचे** — १ हंस, २ कांसे, ३ मेघ, ४ ढक्का (ढोल), ५ कावळा, ६ वीणा ( सतार ), ७ गाढव व ८ दगड ( बद्द ). असे आठ प्रकार. पहिले चार शुभ व पुढचे चार वाईट असतात.

" गर्दभश्च स्वरश्चैव ध्वनिरष्टविधः स्मृतः " (प्राचीन हिंदी शिल्पशास्त्र).

**आठ प्रकार बीजमंत्राचे** — १ गुरुबीज, २ शक्तिबीज, ३ रमाबीज, ४ कामबीज, ५ योगबीज, ६ तेजबीज, ७ शांतिबीज व ८ रक्षाबीज.

( मन्त्रशास्त्र )

**आठ प्रकार मधुराभक्तीचे** — १ स्वरूपमाधुरी, २ चिंतनमाधुरी, ३ विरहमाधुरी, ४ मीलनमाधुरी, ५ ब्रह्मानंदमाधुरी, ६ लीलामाधुरी, ७ मुरलीमाधुरी व ८ रासमाधुरी. ( म. सा. मधुराभक्ति )

**आठ प्रकार राष्ट्रशासनाचे** — १ साम्राज्य, २ भौज्य, ३ स्वाराज्य, ४ वैराज्य, ५ पारमेष्ठ्यराज्य, ६ महाराज्य, ७ आधिपत्यमय व ८ सामतपर्यायी. असे आठ प्रकार वेदकाली होते. ( ऐतरेय ब्राह्मण ).

**आठ प्रसंगीं पुनरुक्ति क्षम्य** — १ खेद, २ आश्चर्य, ३ क्रोध, ४ आनंद, ५ दैन्य, ६ निर्णय, ७ अनुग्रह व ८ करुणा अथवा सहानुभूति.

विषादे विस्मये कोपे हर्षे दैन्येऽवधारणे ।
प्रसादे चानुकम्पायां पुनरुक्तिर्न दूष्यते ॥ ( काव्यप्रकाश )

**आठ प्रहर अहोरात्राचे** — १ पूर्वाह्न–प्रातःकाल, २ मध्याह्न, ३ अपराह्न, व ४ सायकाल ( दिवसाचे ), ५ प्रदोष अथवा रजनीमुख, ६ निशीथ, ७ त्रियामा आणि ८ उषा अथवा ब्राह्ममुहूर्त ( तत्त्वनिज–विवेक )

**आठ वस्तु सकाळीं पाहाव्या** — १ ब्राह्मण. २ गाय, ३ अग्नि, ४ सुवर्ण, ५ तूप, ६ आदित्य, ७ जल आणि ८ राजा.

लोकेऽस्मिन् मङ्गलान्यष्टौ ब्राह्मणो गौर्हुताशनः ।
हिरण्य सर्पिरादित्य आपो राजा तथाष्टमः ॥ ( आह्निक सूत्रावलि )

**आठ महादशा** — १ मंगला २ पिंगला, ३ धन्या, ४ भ्रामरी, ५ भद्रिका, ६ उल्का, ७ सिद्धा आणि ८ संकटा. या आठ महादशा आहेत. ( फल ज्योतिषशास्त्र )

**आठ प्राचीन व्याकरण शास्त्रकार** — १ गार्ग्य, २ आपिशलि, ३ चाक्रवर्मण, ४ शाकटायन, ५ शाकल्य, ६ भारद्वाज, ७ सेनक व ८ स्फोटायन. ( व्याकरण महाभाष्य प्रस्तावना )

**आठ मौक्तिक उत्पत्ति स्थानें** — १ हत्तीचे मस्तक, २ वराहाचे मस्तक, ३ वेळु, ४ मत्स्य, ५ मेघ, ६ शंख, ७ सर्पाची फणा व ८ शुक्ति ( शिंप ) ( रत्नरत्न समुच्चय–१-२२ )

**आठ प्रकार संकेताचा बोध करून देणारे** — १ व्याकरण, २ उपमान, ३ कोशाचे आधारे, ४ आप्तोपदेश, ५ व्यवहारावरून होणारा अर्थबोध, ६ वाक्यशेष, ७ विवृत्ति–विवरण आणि ८ दुसऱ्या शब्दाचे सान्निध्य उसे -रामकृष्णौ–बलराम व रामलक्ष्मणौ–दाशरथिराम ( भारतीय साहित्यशास्त्र )

**आठ प्रमुख वैष्णव क्षेत्रें** — (अ) १ श्रीरंग, २ श्रीमुष्ण, ३ वेंकटस्थल, ४ शाल्ग्राम ( नेपाळ ) ५ नैमिष, ६ तोताद्रि, ७ पुष्कर आणि ८ बदरिकाश्रम. ( कल्याण तीर्थांक ) ( आ ) १ बदरिका–बदरी नारायण, २ शाल्ग्राम, ३ पुरुषोत्तम–पुरी, ४ द्वारका, ५ विल्वाचल, ६ अनन्त, ७ सिंह व ८ श्रीरंगम् ( बार्हस्पत्यसूत्रम् )

**आठ प्रमुख शाक्त क्षेत्रें** — १ ओग्गीण, २ जाल, ३ पूर्ण, ४ काम, ५ कोट, ६ श्रीशैल, ७ काञ्ची व ८ महेन्द्र ( बार्हस्पत्यसूत्रम् )

**आठ प्रमुख शैव क्षेत्रें** -- (अ) १ श्रीसूर्यदेवनामंदिर, २ सोमनाथ, ३ पशुपतिनाथ ( यजमान मूर्ति ), ४ शिवकांची ( पृथ्वी ), ५ जंबुकेश्वर ( आप ), ६ अरुणाचल ( तेज ), ७ काळहस्ती ( वायु ) आणि ८ चिदंबरम् ( आकाशलिंग ). ( कल्याण तीर्थांक )

( आ ) १ अविमुक्त-काशी, २ गङ्गाद्वार, ३ शिवक्षेत्र, ४ रामेश्वर, ५ यमुना, ६ शिवसरस्वती, ७ मध्य शार्दूल व ८ गज[1]. ( *बार्हस्पत्यसूत्रम्* )

**आठ प्रकारचें शौच** — १ कालशौच, २ अग्निशौच, ३ भस्मशौच, ४ मृत्तिकाशौच, ५ गोमयशौच, ६ जलशौच, ७ पवनशौच व ८ ज्ञानशौच. ( रत्नकरण्डकश्रावकाचार अ. १ ).

**आठ प्रमुख स्मृतिकार** -- १ मनु, २ याज्ञवल्क्य, ३ नारद, ४ विष्णु, ५ कात्यायन, ६ आपस्तंब, ७ व्यास व ८ देवल. एकंदर एशी स्मृतिकारांत हे आठ प्रमुख स्मृतिकार होत.

**आठ ब्रह्मसूत्रकार** — १ जैमिनि, २ आश्मरथ्य, ३ बादरि, ४ बादरायण, ५ औडुलोमि, ६ काशकृत्स्न, ७ कार्ष्णाजिनि, आणि आत्रेय. ( म. गी. साक्षात्कारदर्शन )

**आठ मंगल वस्तु** — १ डाव्या कुशीकडे निजलेल्या पुण्यवती पत्नीचें मुख, २ आरसा, ३ भरलेली घागर, ४ बैल, ५ दोन चामर, ६ श्रीवत्स, ७ कमल व ८ शस्त्र. अशा आठ मंगल वस्तु सकाळीं पाहाव्या.

> वामभागस्थिता नारी निजपुण्यप्रकाशिनीम् ।
> दर्पणं पूर्णकुम्भं च वृषभं युग्मचामरम् ।
> श्रीवत्सं स्वस्तिकं शङ्खमेवमष्टमङ्गलम् ( वी. प्र. )

**आठ मराठी छंद ( शब्दांची गायनयोग्य विशिष्ट रचना )** -- १ अभंग, २ दिंडी, ३ साकी, ४ घनाक्षरी, ५ सवाई, ६ छप्पा, ७ आर्या आणि ८ कटिबंध. ( मराठी छंद )

**आठ महा पंडित जनकसभेचे** -- १ अश्वल, २ जारत्कारव-आर्तभाग, ३ भुज्यु, ४ उषस्त, ५ कहोल-कौषीतकेय, ६ गार्गी, ७ उद्दालक आणि ८ विदग्ध-शाकल्य. ( बृहदारण्यक अ. ३ )

---

[1] तीन-चारेशें वर्षांचा भौगोलिक माहिती आज मिळणें दुरापास्त आहे.

**आठ महारोग** — १ वातव्याधि, २ प्रमेह, ३ कुष्ठ, ४ अर्श (मूळव्याधि), ५ भगंदर, ६ अश्मरी, ७ मूढगर्भ आणि ८ उदररोग. या अशा महारोगांची चिकित्सा व निदान करणें कठीण असतें.

वातव्याधिः प्रमेहश्च कुष्ठमर्शो भगन्दरम् ।
अश्मरी मूढगर्भश्च तथैवोदरस्मृतम् ॥ ( सुश्रुत ३३-४ )

**आठ महारस रस ( रसायन शास्त्र )** — १ अभ्रक, २ वैक्रांत (तुरमळी), ३ माक्षिक (सुवर्ण माक्षिक), ४ विमला (रौप्य माक्षिक), ५ शिलाजतु, ६ मोरचूद, ७ चपला व ८ कलखापरी ( र. र. समुच्चय अ. २-१ ).

**आठ साधारण ( रसायनशास्त्र )** — १ कपिला, २ गौरीपाषाण (सोमल), ३ नवसागर, ४ कवडी, ५ अंबर, ६ गिरिसिंदुर, ७ हिंगुळ आणि ८ मुरदाडशिंगी. ( र. र. समुच्चय अ. ३-१२० )

**आठ राज ( शासन ) कर्तव्यें** — १ आदान–कर घेणें, २ विसर्ग–पगार देणें, ३ प्रैष–अमात्यांच्या कामाची पाहाणी, ४ निषेध–आज्ञा मोडल्याबद्दल नापसती, ५ अर्थवचन, ( शेवटची आज्ञा ) ६ न्यायनिवाडा, ७ जिंकलेल्यापासून दंड घेणें व ८ शुद्धि–अपराधाबद्दल प्रायश्चित्त देणें. ( मुक्तेश्वर सभा. ३-११५ )

( **आठ राष्ट्रीय ध्येय प्रतीकें** — १ उपनिषदांतील विश्वचक्र, २ बौद्धांचें कार्यकारण चक्र, ३ अशोकाचें धर्मचक्र, ४ गीतेतील संसार चक्र, ५ भागवतांतील शिशुमार चक्र, ६ इस्लाममधील दैवीचक्र, ७ कबीराचें योग चक्र आणि ८ संतांच्या अनुभवातील अध्यात्मचक्र. ( रानडे चरित्र आणि तत्त्वज्ञान ) )

**आठ लक्षणें ज्वराचीं** — १ अन्तर्दाह, २ तहान फार लागणें, ३ बडबड, ४ श्वास, ५ चक्कर येणें, ६ सांधे व हाडें दुखणें, ७ घाम न येणें व ८ धातु व मलमूत्रावरोध. ( सार्थ माधवनिदान )

**आठ लक्षणें साधूंचीं** — १ निरपेक्षता, २ मच्चित–चित्स्वरूपी चित्त जडून राहणें, ३ प्रशांत, ४ समदर्शी, ५ निर्मम, ६ निरभिमान, ७ निर्द्वंद्व–अभेदभाव आणि ८ अपरिग्रही.

सन्तोऽनपेक्षा मच्चिता प्रशान्ता समदर्शिन ।
निर्ममा निरहङ्कारा निर्द्वंद्वा निष्परिग्रहा ॥ (भाग–११ २६ २७)

**आठ वर्ग सुगंधी द्रव्यांचे** — १ पानें, २ फुल, ३ फळें, जायफळ वेलदोडे इ. ४ झाडाच्या साली–लवंगा वगैरे, ५ लाकूड–चंदन इ, ६ मुळें, ७ वनस्पतींचा स्राव–कापूर आणि ८ प्राणिज पदार्थ–कस्तुरी, मध, लाख इ. (गंधसार)

**आठ वस्तु लौकिकात मंगलप्रद** — १ दीप, २ आरसा, ३ सुवर्ण, ४ धान्यपात्र, ५ फल, ६ दहीं, ७ हस्तलिखित ग्रंथ आणि ८ पूर्णपात्र.

दीपिका दर्पण हेम धान्यपात्र फल दधि ।
पुस्तामङ्गल्यमात्राणि लौकिक मङ्गलाष्टकम् ॥ (शिवरत्नम् २२ ३७)

(**आठ विवाह (घटित) कूटें** — १ वर्ण, २ वश्य, ३ तारा, ४ योनि, ५ ग्रह, ६ गण, ७ भकूट (सकूट) आणि ८ नाडी हीं आठ घटित कूटें असून यास घटिताष्टक म्हणतात याचे क्रमानें १, २, ३, ४, ५, ६, ७, ८, अशी संख्या मिळून ३६ गुण होतात आणि १८ चे वर गुणांचें मेळन विवाहास ग्राह्य मानलें जातें कोणी कोणी बारा विवाह–कूटें मानतात. (विवाहसार))

**आठ विद्येचे अधिपति** — १ अनंतेश, २ सूक्ष्म, ३ शिवोत्तम, ४ एकमूर्ति, ५ एकरूप, ६ त्रिमूर्ति, ७ श्रीकंठ आणि ८ शिखंडी

अनंतेशश्च सूक्ष्मश्च तृतीयश्च शिवोत्तम ।
एकमूर्त्येकरूपस्तु त्रिमूर्तिरपरस्तथा ।
श्रीकण्ठश्च शिखण्डी च अष्टौ विद्येश्वरा स्मृता ॥ (अग्नि)

**आठ शिष्टाचाराची लक्षणें** — १ दान, २ सत्य, ३ तपस्या, ४ शम, ५ विद्या, ६ स्वार्थत्याग, ७ पूजा व ८ इंद्रियनिग्रह.

दान सत्य तपो लोभो विद्येज्या पूजन दम ।
अष्टौ तानि चरित्राणि शिष्टाचारस्य लक्षणम् ॥ (मत्स्य. ॰ १४४)

**आठ सन्मित्र लक्षणें** — १ कृतज्ञ, २ धार्मिक, ३ सत्यनिष्ठ, ४ अक्षुद्र –मनाचा मोठेपणा असणें, ५ दृढ भक्ति करणारा, ६ जितेंद्रिय, ७ यथायोग्य प्रमाणें वागणारा व ८ कोणताहि प्रसंग आला तरी त्याग न करणारा.

**आठ साधारण धर्म** — १ अक्रोध, २ सत्यभाषण, ३ सविभाग (आपण मिळवितो त्यात सर्वांचा भाग आहे असे समजणें), ४ स्वस्त्रीचे ठायीं प्रजोत्पत्ति, ५ शुचिभूतता, ६ द्रोहाचा अभाव, ७ प्रामाणिकपणा आणि ८ पोष्यवर्गाचें पोषण.

अक्रोध सत्यवचनं संविभागश्च सर्वदा ।
प्रजनः स्वेषु दारेषु शौचमद्रोह एव च ।
आर्जवं भृत्यभरणं त एते सार्वर्णिका ॥ (म. भा. शांति ५९ ९)

**आठ संकेत स्थानें (प्रियकराला भेटण्याचीं)** — १ शेत, २ गृहोद्यान ३, पडके देवालय, ४ दूतीचें घर, ५ वन, ६ एकांतस्थान, ७ स्मशान ८ नदी, तळे, ओढा इत्यादिकांचा काठ.

क्षेत्रं वाटी भग्नदेवालयो दूतीगृहं वनम् ।
मालापञ्चः स्मशानं च नद्यादीनां तटी तथा ॥ (साहित्य दर्पण ३–८०)

**आठ स्थानें कामजनक (मानव देहांतर्ली)** — १ मस्तक, २ हनु, ३ कक्षा व ४ प्रजननाग हीं चार श्मश्रुल आणि ५ ओष्ठ, ६ चुचुक, ७ गुद आणि ८ उपस्थ ही चार श्लेष्मल. (नासदीय सूक्त भाष्य-उत्तरार्ध)

**आठ स्थानें चुंबनाचीं (कामशास्त्र)** — १ ललाट, २ केशकलाप, ३ कपोल, ४ नयन, ५ वक्ष, ६ स्तनद्वय, ७ ओष्ठ आणि ८ अंतर्मुख. (नासदीय सूत्र भाष्य)

**आठ हर्ष स्थानें** — १ सन्मित्रसमागम, २ विपुलद्रव्य, ३ पुत्राचें आलिंगन ४ रतिसमयीं उभयतांची एक कालीं तृप्ति, ५ समयानुरूप प्रिय भाषण, ६ समाजांत उन्नतस्थिति, ७ इष्ट वस्तूंचा लाभ आणि ८ चारचौघांत प्रतिष्ठा. (म. भा. उद्योग ३३ ९८)

**आठ जणांना मार्गांत अग्राधिकार** — १ वाहन हाकणारा, २ नव्वद वयाचे वरील व्यक्ति, ३ रोगी, ४ ओझेवाला, ५ स्त्री, ६ स्नातक, ७ राजा अथवा शासनाधिकारी व ८ वर. (कल्याण मासिक)

**आठजण परदु:ख जाणत नाहींत** — १ राजा–अधिकारी. २ अग्नि, ३ यम, ४ वेश्या, ५ चोर, ६ बाल, ७ याचक आणि ८ गावगुंड.

राजा वेश्या यमो वह्निः प्राघूर्णो बालयाचकौ ।
परदुःखं न जानाति ह्यष्टमो ग्रामकण्टकः ॥ (सु.)

**आठजण विशिष्ट कालपर्यंतच स्वाधीन राहतात**—१ मुलगा झाला नाहीं तोंपर्यंत बायको. २ छोळा वर्षे होईतों मुलगा, ३ लग्न होईपर्यंत मुलगी, ४ यौवनदशा येईपर्यंत सून, ५ सासन्याकडून मिळकत होने तोपर्यंत जांवई, ६ आपण बरे आहों तोंपर्यंत मित्र, ७ गुरुकिल्ली मिळाली नाहीं तोंपर्यंत शिष्य आणि ८ पैसा आहे तोंपर्यंत इतर जन. हे आठजण त्या त्या कालपर्यंत स्वाधीन राहतात. ( सु. )

**आठ स्वर्गाचे अधिकारी होत** — १ मातृपितृभक्त पुत्र, २ पतिव्रता स्त्री, ४ निःस्वार्थी सेवक, ४ गुरुजनाची सेवा करणारा, ५ प्रजापालन करणारा राजा, ६ कर्मनिष्ठ ब्राह्मण, ७ परोपकारार्थ देह झिजविणारा आणि ८ युद्धांत पाठ न दाखविणारा वीर पुरुष. ( चंद्रकांत भाग २ रा. )

**आठजण हिंसक होत** — १ खाणारा, २ संमति देणारा, ३ पाक करणारा ४ विकणारा, ५ विकत घेणारा, ६ प्रत्यक्ष हिंसा करणारा, ७ वाटणारा अथवा वाटणारा आणि ८ सांगून हिंसा करविणारा.

मोक्तानुमन्ता संस्कर्ता क्रयिविक्रयी हिंसकः ।
उपहर्ता घातयिता हिंसकश्चाष्टधा स्मृताः ॥ ( स्कंद काशी ४०-२२ )

**गीताष्टक** — १ कपिलगीता, २ गर्भगीता, ३ परमहंसगीता, ४ उद्धवगीता, ५ अवधूतगीता, ६ हंसगीता, ७ भिक्षुगीता आणि ८ ऐलगीता. या आठ ज्ञानप्रतिपादक ग्रंथांस गीताष्टक म्हणतात. ( भागवत )

**गंगाष्टक** — महर्षि वाल्मीकिविरचित गंगास्तोत्र. यांत आठ पदें आहेत.

## ९

**नऊ अंगें हवेचीं** — १ हवेचा दाब, २ तपमान, ३ वजन ४ संवाहक शक्ति, ५ आर्द्रता, ६ प्रवाहीपणा ७ वाऱ्याची दिशा व वेग ८ घटना, आणि ९ दुय्यम घटक (वायु) ( भूगोलशास्त्र )

**नऊ अभिमान स्थानें** — १ सत्ता, २ संपत्ति, ३ बल, ४ रूप, ५ कुल, ६ विद्या, ७ अनुभव, ८ कर्तृत्व आणि ९ चारित्र्य. ( विचार पोथी )

**नऊ अरण्यें मुक्तिदायक** — १ दण्डकारण्य, २ सैंधवारण्य, ३ जंबूमार्ग, ४ पुष्करारण्य ५ उत्पलावर्तकारण्य, ६ नैमिषारण्य, ७ कुरुजांगल, ८ हिम वदरण्य व ९ अर्बुदारण्य

" हिमवानर्बुदश्चैव नवारण्याश्च मुक्तिदा ॥ " ( अ. म. )

**नऊ अवतार ( देवीचे )** — १ शैलपुत्री, २ ब्रह्मचारिणी, ३ चंद्रघंटा, ४ कूष्मांडा, ५ स्कंदमाता, ६ कात्यायनी, ७ कालरात्री, ८ महागौरी आणि ९ सिद्धिदात्री

' नवमं सिद्धिदात्री च नवदुर्गा प्रकीर्तिता ॥ ' ( चंडीकवचम् )

**नऊ अवस्था ( शरिराच्या )** — १ मातेच्या उदरात निषेक-रेता-स्थान असणें, २ गर्भावस्था ( गर्भ ), ३ जन्म, ४ बाल्य, ५ कौमार्य, ६ तारुण्य, ७ प्रौढत्व, ८ वृद्धत्व आणि ९ मृत्यु

निषेकगर्भजन्मानि बाल्यकौमारयौवनम् ।

वयोमध्यं जरा मृत्युरित्यवस्थास्तनोर्नव ॥ ( भा. ग. ११ २२ ४६ )

**नऊ उपरत्नें** — १ पोवळें, २ शंख, ३ शिंप, ४ कवडी, ५ वैक्रांत, ६ सूर्यकांत, ७ चंद्रकांत, ८ लाल आणि ९ फरोज-नील व पीतवर्ण मणी वगैरे. ( रसायनसार )

**नऊ उपविषें** — १ रुईचा चीक, २ निवारी निवडुंग, ३ कळलावी, ४ गुंज, ५ कण्हेर, ६ विषमुष्टि, ७ धोतरा, ८ अफू आणि ९ जयपाळ ( यो. रत्नाकर )

**नऊ कर्मे ब्राह्मणाचीं स्वभावजन्य** — १ शम, २ दम, ३ तप, ४ शुद्धता, ५ सहनशक्ति, ६ सरळपणा, ७ ज्ञान, ८ विज्ञान आणि ९ आस्तिकता ( ईश्वरावर विश्वास ). ( भ. गी. १८ ४३ )

एवं नवही शमादिक । गुण जेथ निर्दोस ।

तें कर्म जाण स्वाभाविक । ब्राह्मणाचें ॥ ( ज्ञा १८ ८५१ )

**नऊ कुलपरीक्षेचीं लक्षणें** — १ आचरण, २ नम्रता, ३ शास्त्रज्ञान, ४ लोकांतील ( सभा ) मान्यता, ५ शुचिता, ६ श्रद्धा, ७ जीवनाचा धंदा, ८ पाळावयाचे नियम आणि ९ अनुभव ज्ञान

आचारो विनयो विद्या प्रतिष्ठा तीर्थदर्शनम् ।

निष्ठावृत्तिस्तपो ज्ञानं नवधा कुललक्षणम् ॥ ( शब्दार्थ चिंतामणि )

**नऊ गुण गृहस्थाश्रमाला शोभविणारे** — १ घरात सर्वत्र आनंद, २ विद्वान् पुत्र, ३ पत्नी मधुरभाषिणी, ४ एक पत्नीव्रत, ५ आज्ञाधारक सेवक, ६ आतिथ्य, ७ देवपूजन ८ मुग्रास भोजन आणि ९ सज्जनसंगति. ( चाणक्य नीति १०.१ )

**नऊ गुण जीवात्म्याचे** — १ बुद्धि, २ सुख, ३ दुःख, ४ इच्छा, ५ द्वेष, ६ प्रयत्न, ७ धर्म, ८ अधर्म व ९ संस्कार. हे गुण जीवात्म्याचे ठिकाणी असतात. ( न्यायदर्शन )

**नऊ गुण धर्मपत्नीचे** — १ शांत स्वभावी, २ अक्रोधी, ३ मधुभाषिणी, ४ पत्यानुकूल, ५ आज्ञाधारक, ६ पतिनिष्ठ, ७ मनमिळाऊ, ८ अविरोधी आणि ९ पतीस सहाय्यक. ( अथर्व-अनु-मराठी )

**नऊ गुण ब्राह्मण्याचे** — ( अ ) १ धृति, २ क्षमा, ३ दम, ४ अस्तेय, ५ शौच, ६ इंद्रियनिग्रह, ७ बुद्धि, ८ विद्या व ९ लोभत्याग, ( आ ) १ शुद्ध आचरण, २ तपस्वी, ३ संतोषी, ४ क्षमावान्, ५ सुशील, ६ जितेंद्रिय, ७ दाता, ८ ब्रह्मज्ञानी व ९ दयाळु.

ऋतुकालपत्नी सन्तुष्टः क्षमाशीलो जितेन्द्रियः ।
दाता ज्ञानी दयालुश्च ब्राह्मणो नवभिर्गुणैः ॥ ( राजनीति )

**नऊ गुण मनाचे** — १ धैर्य, २ ऊहापोह करण्याचे सामर्थ्य, ३ भ्रांति, ४ कल्पना, ५ वैराग्यादि सद्विचार, ६ रागद्वेषादि असद्विचार, ७ क्षमा, ८ स्मरण व ९ चापल्य. ( म. भा शांति. अ २५५ )

**नऊ गुण श्रेष्ठ सेनानायकास अभिप्रेत** — १ शौर्य, २ धैर्य, ३ युद्धधारणा, ४ शिस्त, ५ राष्ट्राभिमान, ६ राजकारण, ७ नवीनज्ञान, ८ निरलस काम करण्याची शक्ति आणि ९ नीतिमत्ता ( पुरुषार्थ ऑगस्ट १९६२ )

**नऊ गोष्टी नाटकांत प्रत्यक्षात दाखविणें अनुचित** — १ विवाह, २ भोजन, ३ शाप, ४ सुरत, ५ दान किंवा नगरें करणें, ६ लज्जा उत्पन्न करील अशा देखावा, ७ चुंबन, ८ स्नान व ९ भाषण. ( साहित्य दर्पण )

**नऊ गोष्टी पदरीं बाळगाव्या** — १ शेळ्या, २ बैल, ३ मेंढे, ४ मध, ५ दिव्य औषध, ६ पक्षी, ७ वेदवेत्ता ब्राह्मण, ८ वृद्ध नातलग, व ९ एखादें कुलीन दुर्दैवी मनुष्य. ( म. भा. उद्योग ४० १ )

**नऊ गोष्टी सर्व साधारण धर्मांत अंतर्भूत होतात** — १ अहिंसा, २ सत्य, ३ अस्तेय, ४ शौच, ५ इंद्रियनिग्रह, ६ दम, ७ क्षमा, ८ सरळपणा आणि ९ दान.

अहिंसा सत्यमस्तेयशौचमिंद्रियनिग्रहः ।
दम. क्षमार्जव दान धर्म साधारण विदुः ॥ (सु.)

**नऊ गोष्टी सेवनानें वाढणाऱ्या** — १ उद्योग, २ कलह, ३ कण्डू, ४ द्यूत, ५ मद्य, ६ मैथुन, ७ आहार, ८ व्यसन आणि ९ निद्रा.

उद्योगः कलहः कण्डूर्मद्य द्यूत च मैथुनम् ।
आहारो व्यसन निद्रा सेवनात्तु विवर्धते ॥ (सु.)

**नऊ गोष्टींत महाभारताचे सार** — १ कौरव-पांडवांचे जन्मकथन, २ लाक्षागृहांतील अग्नीच्या मध्यस्थानीं पडणें, ३ पांडव द्यूतांत हरतात, ४ पांडवांचा वनवास, ५ विराटाच्या घरीं अज्ञातवास, ६ उत्तरगोग्रहण, ७ श्रीकृष्णशिष्टाई विफळ होणें, ८ युद्धारंभ आणि ९ भीमाकडून दुर्योधनाचा वध. (महाभारत)

**नऊ गोष्टींत रामायणाचें सार** — १ रामवनवास, २ मारीचवध, ३ सीताहरण, ४ जटायुपतन, ५ सुग्रीव-सख्य, ६ वालिवध, ७ समुद्रोल्लंघन, ८ लंकादहन आणि ९ रावण-कुंभकर्ण-वध. (रामायण)

**नऊ चक्रें (शरीरांतर्गत)** — १ मूलाधार चक्र (पृष्ठवंशाच्या मुळाशीं), २ स्वाधिष्ठानचक्र (जननेंद्रियाच्या मार्गे), ३ नाभिचक्र, ४ हृदयचक्र, ५ कण्ठचक्र, ६ तालुचक्र, ७ भ्रूचक्र, ८ आज्ञाचक्र (भ्रूमध्यात) आणि ९ आकाशचक्र. अशीं नऊ चक्रें मानव शरिरात आहेत असें श्रुतींत सांगितलें आहे. हठयोगांत सहा चक्रांचेंच वर्णन बहुधा येतें. (रा. गी. अ. १८)

**नऊ चतुर सभानायक (रामायणकालीन)** — १ विजय, २ मधुमत, ३ कश्यप, ४ मंगल, ५ पुराजित्, ६ कालिय, ७ दंतवक्र, ८ भद्र, आणि ९ सुमागध.

हे नवविध सभानायक परम । याचा विश्वास मानी श्रीराम ।
अति चतुर म्हणोनी ॥ (भा. रा. उत्तर ४३-५)

**नऊ तत्त्वें सूक्ष्म (लिंग) शरीराचीं** — १ चित्त, २ बुद्धि, ३ मन व ४ अहंकार आणि ५ ते ९ पंचप्राण मिळून नऊ तत्त्वें होत.

**नऊ पदार्थांनी जगाची घटना** — १ मात्स्यूह, २ कुल्यूह, ३ नाम यूह, ४ ज्ञानव्यूह आणि चित्त व्यूहातील. १ अहकार, २ चित्त, ३ इच्छा ४ बुद्धि आणि ५ मन ही पचतत्त्वे मिळून अशा नव पदार्थांनी जगाची घटना झाली आहे ( नासदीय सूत्रभाष्य )

**नऊ प्रकार अवताराचे** — १ नित्यावतार, २ गुणावतार, ३ विभवाव ४ सत्त्वावतार, ५ अर्चावतार, ६ अतर्यामी अवतार, ७ लीलावतार, ८ मन्वतरावतार व ९ युगावतार. ( मस्कृतिकोश )

**नऊ प्रकार ईश्वरी अवताराचे** — १ लीलावतार, २ पुरुषावतार, ३ अशावतार, ४ कल्पावतार, ५ गुणावतार, ६ युगावतार, ७ आवेशावतार, ८ विभिन्नावतार व ९ अर्चावतार ( कल्याण वर्ष ३१ अक १० )

**नऊ प्रकारचा नाद** — १ घोषनाद, २ कांचननाद, ३ शृंगनाद, ४ घंटानाद, ५ वीणानाद, ६ वश ( वेणु ) नाद, ७ दुदुभिनाद, ८ शखनाद, आणि ९ मेघनाद. असे नऊ प्रकारचे नाद अथवा ब्रह्मस्वरूप शब्द योग शास्त्रात सांगितले आहेत याच्यामुळे योगी सर्वापासून अलिप्त राहतो.

> तस्माच्छब्दा नव प्रोक्ता प्राणविद्भिस्तु लक्षिता ।
> ता प्रवक्ष्यामि यत्नेन नादसिद्धिमनुक्रमात् ॥
>
> ( शिवउमा-सहिता–२६–४० )

**नऊ प्रकार माणसाचे** —( शुभपक्ष ) १ साधु, २ सुहृत्, ३ मित्र, ४ मध्यस्थ, ५ बधु, ६ उदासीन ( अशुभपक्ष ) ७ पापी, ८ अरि व ९ द्वेष्य असे नऊ प्रकार जगात असतात ( पुरुषार्थ बोधिनी भ गी )

**नऊ दोष ( बुद्धीचे )** — १ काम, २ क्रोध, ३ भय, ४ लोभ, ५ दैन्य, ६ दर्प, ७ लज्जा, ८ कृपा आणि ९ अभिमान हे बुद्धीचे नऊ दोष म्हणून सांगितले आहेत ( म भा शांति अ ३२० )

**नऊ द्रव्ये ( न्यायशास्त्र )** — पृथ्वी, २ आप, ३ तेज, ४ वायु, ५ आकाश, ६ काल, ७ दिशा, ८ आत्मा व ९ मन

**नऊ नाथपथाची वैशिष्ट्ये** — १ मेखला, २ शृगी, ३ पुंगी, ४ कथा, ५ कर्णमुद्रा, ६ कौपीन, ७ व्याघ्राबर, ८ रगवा व ९ झोळी.

**नऊ नित्यकर्मे ब्राह्मणाची** — १ स्नान, २ संध्या, ३ जप, ४ होम, ५ स्वाध्याय, ६ देवपूजन, ७ वैश्वदेव, ८ अतिथिपरामर्श ९ पितृतर्पण.

स्नान संध्या जपो होम स्वाध्यायो देवतार्चनम् ।
वैश्वदेवस्तथाऽऽतिथ्य नवम पितृतर्पणम् ॥ (स्कंद. काशी.)

**नऊ प्रकारची सृष्टि** — १ महत्तत्त्वाची उत्पत्ति, २ अहंकार, ३ सूक्ष्म तन्मात्रांची उत्पत्ति, ४ पंच ज्ञानेंद्रियें व पंच कर्मेंद्रियें, ५ मन, ६ अविद्या, ७ स्थावर, ८ पशु आणि ९ मनुष्य. अशी नऊ प्रकारची सृष्टि परमेश्वरानें क्रमानें उत्पन्न केली. (भाग. स्कंध ३ १०-१३)

**नऊ प्रमुख तत्त्वें (मध्वसिद्धान्त)** — १ विष्णुसर्वोत्तमत्व, २ जगत्-सत्यत्व, ३ जीवेशभेद, ४ सेवकसेव्यभाव, ५ जीवाजीवभेद, ६ मोक्षभक्ति, ७ मोक्षाचें साधन निर्मळभक्ति, ८ प्रमाणत्रय (प्रत्यक्ष, अनुमान व आगम) व ९ सर्ववेदमयत्व. हीं मध्व संप्रदायांत नऊ प्रमुख तत्त्वें मानिलीं आहेत. (मध्वाचार्य आणि त्यांचें तत्त्वज्ञान)

**नऊ प्रमाणें** — १ प्रत्यक्ष, २ अनुमान, ३ उपमान, ४ शब्द, ५ अर्थापत्ति, ६ अनुपलब्धि, ७ संभव, ८ ऐतिह्य आणि ९ चेष्टा. तत्त्वसिद्धिसाठीं कांहींच्या मतें अशीं नऊ प्रमाणें मानिलीं जातात. (अध्यात्मविद्या सिद्धांतसार)

**नऊ ब्रह्मदेवाचे मानसपुत्र** — १ भृगु, २ पुलस्त्य, ३ पुलह, ४ क्रतु, ५ अंगिरा, ६ दक्ष, ७ अत्रि, ८ मरीचि आणि ९ वसिष्ठ. हे नऊ ब्रह्मदेवाचे मानसपुत्र होत.

भृगु पुलस्त्य पुलह क्रतुमङ्गिरस तथा ।
मरीचिं दक्षमत्रिं च वसिष्ठं चैव मानसम् ॥
नव ब्रह्माण इत्येते पुराणे निश्चयंगताः ॥ (पद्म. सृष्टिखंड)

अन्यत्र महर्षि नारद हे ब्रह्मदेवाचे दहावे मानसपुत्र म्हणून सांगितले आहेत. (मत्स्य. ३ ८; मनु. १·३५)

**नऊ मतवाद** — १ पुत्र हाच आत्मा, २ देह हाच आत्मा, ३ इंद्रियें हाच आत्मा, ४ प्राणच–आत्मा, ५ मनच–आत्मा, ६ बुद्धि हाच आत्मा, ७ अज्ञान हाच आत्मा, ८ ज्ञान आणि अज्ञान मिळून आत्मा व ९ शून्य हेंच आत्मा. कारण प्रथम हें सर्व असत् म्हणजे शून्यच होतें. (सर्व वेदांत-सिद्धांतसार–संग्रह)

**नऊ मनुष्य जीवनाचीं ध्येयें** — १ धन, २ मान, ३ यश, ४ पुण्य, ५ मयापासून मुक्ति, ६ परोपकार, ७ निष्कर्मता, ८ आनंद व ९ अनाविलता (निष्पापता). हीं नऊ मनुष्यजीवनाची आचरण प्रेरक ध्येयें होत.

(विचार प्रवाह)

**नऊ महारोग** — १ राज्यक्ष्मा, २ कुष्ठ, ३ रक्तपित्त, ४ उन्माद, ५ श्वास, ६ मधुमेह, ७ भगंदर, ८ उदर आणि ९ मुतखडा.

**नऊ महौषधी व नवग्रह** — ज्या ग्रहाच्यामुळे जो विकार उत्पन्न झाला असेल त्याचा नाश त्या ग्रहाचा वृक्ष करतो असें वैद्यक ज्योतिषानं सांगितलं आहे. समिधा-चिकित्साशास्त्रानुसार जगांत एकंदर उत्तम औषधी वृक्ष नऊ असून त्यांस महौषधी म्हणतात. ते पुढीलप्रमाणें—

| वृक्ष | ग्रह | वृक्ष | ग्रह |
|---|---|---|---|
| १ मांदार | रवि | ६ उंबर | शुक्र |
| २ पळस | सोम | ७ शमी | शनि |
| ३ खैर | मंगळ | ८ फळशीच झाड | राहू |
| ४ जांडेविरे | बुध | ९ कुश | केतु |
| ५ पिंपळ | गुरु | | |

(फलाहारचिकित्सा)

**नऊ प्रकार राज्याचे** — १ राज्य, २ महाराज्य, ३ साम्राज्य, ४ बहुपाज्य, ५ भोज्य, ७ वैराज्य, ८ आधिपत्यमयराज्य आणि ९ जनराज्य. असे नऊ प्रकार प्राचीन काळी असत

**नऊ महाविष** — १ कालकूट, २ बचनाग, ३ शृंगक, ४ प्रदीपन, ५ हालाहल, ६ ब्रह्मपुत्र, ७ हरिद्र, ८ सक्तक आणि ९ सौराष्ट्रिक.

'सौराष्ट्रिक इति प्रोक्ता विषभेदा अमी नव.' (यो. रत्नाकर)

**नऊ मानें कालगणनेचीं** — १ ब्राह्म, २ दिव्य, ३ पैत्र्य, ४ प्राजापत्य, ५ बार्हस्पत्य, ६ सौर, ७ सावन, ८ चांद्र आणि ९ आर्क्ष (नक्षत्र तारकाचा उदय कालावरून) तथापि व्यवहारांत प्राय १ सौर, २ चांद्र, ३ नाक्षत्र व ४ सावन हीं चार मानेंच चालतात.

'सौरं च सावनं चान्द्रमार्क्षं मानानि वै नव ॥" (सूर्यसिद्धान्त)

**नऊ योगाचें अन्तराय (विघ्नें)** — १ रोग, २ कर्मामध्ये अप्रवीणता, ३ संशय, ४ साधनाकडे दुर्लक्ष, ५ देह आणि मन याचें जाड्य, ६ विषयासक्ति, ७ विपरीतज्ञान, ८ समाधि लागावयाच्या स्थानाची प्राप्ति न होणे आणि ९ चित्त स्थिर न होणे. (योगसूत्र १-३०)

**नऊ व्याकरणशास्त्रकार** — १ इंद्र २ चंद्र ३ काशकृत्स्न, ४ कौमार, ५ शाकटायन, ६ सारस्वत, ७ शाकल, ८ आपिशल आणि ९ पाणिनि.

(लघुसिद्धान्त कौमुदी)

**नऊ प्रकारचा संसर्ग** — १ एका पलंगावर शयन, २ एका पंक्तीला भोजन, ३ निषिद्ध मनुष्याचें अन्न सेवन, ४ एकाच भांड्यातील अन्न सेवन, ५ एकाच पातेल्यात घेतलेलें अन्न वाढणें, ६ बहिष्कृताच्या घरी याजन, ७ अध्यापन, ८ शरीरसंबंध आणि ९ एकत्र भोजन. या नऊ प्रकारामुळे संसर्ग दोष उत्पन्न होतो. (वृद्ध बृह. स्मृति)

**नऊ प्रकारचीं भक्तीचीं साधनें** — १ सज्जनसंगति, २ ईशकथावर्णन, ३ त्याचें गुणगान, ४ त्याच्या वचनाचें व्याख्यान करणें, ५ गुरूची उपासना, ६ ईशपूजना एकनिष्ठा, ७ मनाची सांग उपासना, ८ भूतमात्राचे ठिकाणीं ईशभाव, ८ बाह्येंद्रिय निग्रह आणि ९ परमेश्वरी स्वरूपाचा तत्त्वविचार.

'नव नवविधा भक्ति साधनम् ।' (अ रा. अरण्य. सर्ग १० २७)

**नऊ व्यूहमूर्ती व त्यांचे नऊ भक्त** — १ वासुदेव – उद्धव आणि अर्जुन, २ संकर्षण – रैवत, ३ अनिरुद्ध – उषा, ४ प्रद्युम्न – कामुक, ५ हयग्रीव – वेदव्यास, ६ नारायण – ब्रह्मदेव, ७ श्वेतवराह – पृथ्वी, ८ वामन – बळी आणि ९ नृसिंह – भक्तप्रल्हाद.

नवभक्ति नवमूर्ती, तेथील भक्तींची स्थिती,
उद्धवा म्या तुजप्रती । यथार्थ गती सांगितली

(ए. भा. स्कंध. ११ अ १६१)

**नऊ विग्रह (मूर्ती) नृसिंह देवतेच्या** — १ ज्वाला, २ अहोबिल, ३ मालोल, ४ क्रीडाकार, ५ कारंज, ६ भार्गव, ७ योगानंद, ८ छत्रवट व ९ पवन. अहोबिल हें पवित्र क्षेत्र आंध्र प्रदेशातील कर्नूल जिल्ह्यात आहे. हीं प्राचीनकाळीं हिरण्यकश्यपूची राजधानी होती (संस्कृतिकोश)

**नऊ शुभ चिह्नें हस्तसामुद्रिकाचीं** — १ सूर्य, २ चंद्र, ३ ध्वजा, ४ नेत्र, ५ अष्टकोण, ६ त्रिकोण, ७ मंदिर ८ हत्ती आणि ९ घोडा. हीं चिन्हें हातांवर असल्यास अत्यंत शुभ म्हणून मानिलीं आहेत. ( हस्तसामुद्रिकशास्त्र )

**नऊ संख्या विशेष** — आठ या संख्येला वृद्धि, क्षय हीं दोन्ही आहेत पण नऊ ही संख्या अशी आहे कीं ती कोणत्याहि परिस्थितींत मैत्री वाढेल पण क्षीण होणार नाहीं.

उदा ९ × २ = १८, १ + ८ = ९, ९ × ३ = २७, २ + ७ = ९. ९ × ४ = ३६, ३ + ६ = ९. ९ × ५ = ४५, ४ + ५ = ९.

वर्धते क्षीयते चारि मैत्र्यष्टांकमिवासताम् ।
नवांकवत्सतां मैत्री वर्धते न च हीयते ॥ ( सु. )

**नऊ सच्छिष्याचीं लक्षणें** — १ सन्मानाची अपेक्षा नसणें, २ निर्मत्सरता, ३ दक्षता, ४ अहंमन्यता सुटणें, ५ सद्गुरूचीं सहृदयपण, ६ निष्ठा, ७ परमार्थ जिज्ञासा, ८ अनसूया आणि ९ वितंडवाद न करणें.

एवं शिष्याचीं नव लक्षणें । नवखंड पृथ्वीचीं आभरणें ॥
निजकृपेनें नारायणें । भक्ताकारणें दीधलीं ॥ ( ए. भा. १०-२३७ )

**नऊ संवेदना** — १ प्रेम, २ हास, ३ आश्चर्य, ४ उत्साह, ५ घृणा, ६ क्रोध, ७ भीति, ८ शोक व ९ शांति. कोणताहि प्राणी जन्माला येतांना या नऊ संवेदनांनीं युक्त असतो. ( सह्याद्रि एप्रिल १९५३ )

**नऊ स्थायी भाव** — १ रति, २ उत्साह, ३ शोक, ४ विस्मय, ५ भय, ६ हास्य, ७ जुगुप्सा, ८ क्रोध आणि ९ निर्वेद ( वीट येणें किंवा विरक्ति ). हे नऊ स्थायीभाव अथवा मनोवृत्ति होत.

' निर्वेदस्थायिभावोऽस्ति शान्तोऽपि नवमो रसः । ' ( काव्यप्रकाश )

**नऊ हस्त-वाद्यें** — १ झांज, २ टाळ, ३ चिपळी. ४ करताळ, ५ जलतरंग, ६ घंटा, ७ ताम, ८ घुंगुर आणि ९ घागऱ्या.

**नऊजणांकडे विपित्कालीं देखील याचना करूं नये** — १ कृपण, २ निंदक ( शिवीगाळ करणारा ), ३ मूर्ख, ४ पारधी, ५ जुगारी, ६ पूज्यांना मान न देणारा, ७ निष्ठुर, ८ वैरबुद्धीनें वागणारा व ९ कृतघ्न. ( म. भा. उद्योग. ३७-३६ )

**नऊ जण श्रीकृष्णाचे सवंगडी** — १ लोककृष्ण, २ श्रीदाम, ३ सुबल, ४ अर्जुन, ५ विशाल, ६ ऋषभ, ७ तेजस्वी, ८ देवप्रस्थ आणि ९ वरूथप (भाग १०-२२-३१)

**नव खंड पृथ्वी** — (अ) पौराणिक कालीन पृथ्वीवरील नऊ भौगोलिक भूभाग—१ इलावृत्त २ भद्राश्व, ३ हरिवर्ष, ४ किंपुरुषवर्ष, ५ केतुमाल, ६ रम्यक, ७ भरतवर्ष, ८ हिरण्मय आणि ९ उत्तर कुरु हीं नव खंड होत "नव खंड पृथ्वी व न्हावें मन याशीं भरत म्हणतात" (आ) १ भरत खंड, २ पुष्करखंड, ३ द्वारखंड, ४ रम्यखंड, ५ सुवर्णखंड, ६ इलावृत्तखंड, ७ कौरव खंड, ८ विभर खंड आणि ९ केतुलखंड. (मूळ स्तम कथासार) (इ) १ इंद्रखंड, २ कसेरुखंड ३ ताम्रखंड, ४ गभस्ति खंड, ५ नागखंड, ६ वारुणखंड, ७ सौम्य खंड, ८ ब्रह्मखंड व ९ भरतखंड (हस कोश)

**नव खंड (देहांतर्गत)** — १ ब्रह्मखंड-ध्यान २ सौम्यखंड-त्वचा, ३ गभास्तखंड-नेत्र, ४ वरुणखंड-जीभ, ५ नागखंड-नाक, ६ इंद्रखंड-हात, ७ कशेरू खंड-पाय, ८ भरतखंड-लिंग, आणि ९ ताम्रखंड-गुद पृथ्वीवर जसे नवखंड तसे देहांतर्गत नवखंड योगशास्त्रात मानिले आहेत (पचग्रथी)

**नवग्रह** — १ सूर्य, २ चंद्र, ३ मंगळ, ४ बुध, ५ गुरु, ६ शुक्र, ७ शनि, ८ राहू आणि ९ केतु यांशिवाय हर्शल व नेपच्यून हेहि ग्रह आधुनिक मानतात यानाच अनुक्रमें वरुण व प्रजापति असें म्हणतात या शिवाय प्लूटो नामक एक ग्रह अलिकडे (१९३०) पाश्चात्यानीं नवीन शोधून काढला आहे

> सूर्य सोमो महीपुत्र सोमपुत्रो बृहस्पति ।
> शुक्र शनैश्वरो राहु केतुश्चेत ग्रहा स्मृता ॥ (या स्मृति)

**नवग्रहाचीं नव धान्यें** — १ रवि-गहू २ चद्र-तांदूळ, ३ मंगळ-तूर, ४ बुध उडद, ५ गुरु-चणे ६ शुक्र-मूग ७ शनि-तीळ, ८ राहू-उडीद, ९ केतु-कुळीथ (ज्योतिष)

**नव ग्रहाचीं नऊ रत्नें** — १ सूर्य-माणिक, २ चद्र-मोतीं, ३ मगळ-प्रवाळ, ४ बुध-पाचू ५ गुरु-पुष्पराग, ६ शुक्र-हिरा, ७ शनि-नील, ८ राहु-गोमेद आणि ९ केतु-वैडूर्य मणि हीं क्रमानें नवग्रहाचीं रत्नें असून

त्या त्या रत्नाची आगठी धारण केल्याने त्या त्या ग्रहाची प्रसन्नता होऊन इष्टसिद्धि होते. ( र. र. समुच्चय )

**नवगोप्यें** — १ आयुष्य, २ वित्त, ३ गृहच्छिद्र, ४ मंत्र, ५ मैथुन, ६ औषध, ७ दान, ८ मान आणि ९ अपमान. या नऊ गोष्टींची वाच्यता करू नये.

आयुर्वित्त गृहच्छिद्र मन्त्रमौषधमैथुने ।
दान मानापमानौ च नव गोप्यानि कारयेत् ॥ ( सु. )

**नवचक्रें शरीरांतर्गत** — १ मूलाधार, २ स्वाधिष्ठान, ३ मणिपूर, ४ अनाहत, ५ विशुद्ध, ६ लल्ना, ७ आज्ञा, ८ ब्रह्मरंध्र आणि ९ सोमचक्र. या नवचक्रवर लय केला असता अनेक सिद्धि प्राप्त होतात.

कृष्णद्वैपायनाद्यैस्तु साधितो लयसंज्ञित ।
नवस्यैव हि चक्रेषु स्यक्त्वा महात्ममि ॥ ( श्रीगुरुदत्तयोग )

**नवदुर्गा** — (अ) १ शैलपुत्री, २ ब्रह्मचारिणी, ३ चंद्रघंटा, ४ कुष्मांडा, ५ स्कंदमाता, ६ कात्यायनी, ७ कालरात्री, ८ महागौरी आणि ९ सिद्धिदात्री.

' नवम सिद्धिदात्री च नवदुर्गा प्रकीर्तिता । ( चण्डीकवचम् )

( आ ) १ काली, २ कात्यायनी, ३ ईशानी, ४ चामुंडा, ५ मुंडमर्दिनी, ६ भद्रकाली, ७ भद्रा, ८ त्वरिता व ९ वैष्णवी. ( शिव. पु सतीखंड अ. २ )

**नवद्वारें** — २ डोळे, २ कान, २ नाकपुड्या, १ तोंड, १ गुदद्वार आणि १ मूत्रद्वार. अशीं मानवी शरीराचीं नऊ द्वारें आहेत.

' नवद्वारें देही । तो असुतची परि नाहीं. । ' ( ज्ञा. ५ – ७५ )

**नव नाग** — १ अनंत, २ वासुकि, ३ शेष, ४ पद्मनाभ, ५ कंबल, ६ शंखपाल, ७ धृतराष्ट्र, ८ तक्षक आणि ९ कालिया. ( नवनागस्तोत्र ).

**नवनाग सहस्रबळी** — १ दुर्योधन, २ जरासंध व ३ भीमसेन या तिघांना नऊ सहस्रहत्तींचे बळ असे. त्यांत भीमाचा विशेष म्हणजे त्याची पाठ भूमीला लागली असता दुप्पट बळ चढत असे अशी कथा आहे.

**नव नाथ** — ( अ ) १ मच्छिंदर, २ गोरख, ३ जालंधर, ४ कानिफ, ५ चरपटी, ६ नागेश, ७ भरत, ८ रेवण आणि ९ गहिनीनाथ. हे नव नारायणाचे अवतार होत. ( नवनाथ भक्तिसार ), ( आ ) १ आकारनाथ,

२ शैलनाथ, ३ सतोषनाथ, ४ अक्लकंतुनाथ, ५ गज्जली गज्मातनाथ, ६ उदयनाथ, ७ मत्स्येंद्रनाथ, ८ गोरखनाथ आणि ९ पूर्णभरत. ( Gorakhanath and Kanphatas )

**नवनाड्या ( देहांतर्गत )** — १ गणेशनाडी, २ पयस्विनी नाडी, ३ हस्तिनी, ४ पुरुषा नाडी, ५ गांधारी, ६ अलंबुषा, ७ कुहू नाडी, ८ वारुणी आणि ९ शंखिनी नाडी. या नवनाड्या योगशास्त्रात सांगितल्या आहेत. ( पंचग्रंथी )

**नव नारायण** — १ कवि, २ हरि, ३ अंतरिक्ष, ४ प्रबुद्ध, ५ पिप्पलायन, ६ आविर्होत्र, ७ द्रुमिल, ८ चमस आणि ९ करभाजन. हे नऊहि मुनि आत्मविद्याविशारद होते. ( भाग. ११·२·२१ ).

की ते नवही नारायण । स्वयें प्रगटले आपण ।
नवही नृसिंह जाण । देदीप्यमान पैं आले ॥ ( ए. भा. २-१८९ )

**नवनिधि** — (अ) १ महापद्म, २ पद्म, ३ शंख, ४ मकर, ५ कच्छप, ६ मुकुंद, ७ कुंद, ८ नील आणि ९ खर्व. असे कुबेराचे नवनिधि आहेत. ( स्कंद वैष्णव खंड अ. मा. ७-५,१ ); (आ) १ हय, २ गज, ३ रथ, ४ दुर्ग, ५ भांडार, ६ अग्नि, ७ रत्न, ८ धान्य आणि ९ प्रमदा; (इ) १ कामधेनु, २ अंजन, ३ सिद्धपादुका, ४ अन्नपूर्णा, ५ कल्पतरु, ६ चिंतामणि, ७ गुटिका, ८ कल्क आणि ९ परिस. ( दुर्बोध श. कोश )

**नव बालग्रह** — १ स्कंद, २ स्कंदापस्मार, ३ शकुनीग्रह, ४ पूतनाग्रह, ५ अन्धपूतनाग्रह, ६ शीतपूतना, ७ रेवती, ८ मुखमंडिका ग्रह आणि ९ नैगमग्रह. हे नव बालग्रह बालकांना पीडा देणारे आहेत. ( सुश्रुत )

**नव महामणि** — १ स्फटिक, २ शिवहत्या, ३ गंभीर, ४ गरुडोद्गत, ५ नीरोगण, ६ हरडल, ७ केयूर, ८ सलर व ९ मौक्तिक ( भूगोल पुराण )

**नव मेघ** — १ घन, २ दवन, ३ पवन, ४ पाखुळ, ५ निद्रन, ६ धीरधनु, ७ सहदेव, ८ तालसन, ९ पक्षराज. ( क. क. ) ( दु. श. को. )

**नव मूलभूत जीवन प्रेरणा** — १ पोषणेच्छा, २ सरक्षणेच्छा, ३ विश्रामेच्छा, ४ कार्येच्छा, ५ उत्सर्जनेच्छा, ६ कामेच्छा, ७ वात्सल्येच्छा, ८ प्रभुत्वेच्छा आणि ९ अनुसरणेच्छा. ( नवभारत सप्टेंबर १९५७ )

**नवाह पारायण** — नऊ दिवसात करावयाचे पारायण. गुरुचरित्र भागवत इ. ग्रंथाचे पारायण सात दिवसाचे त्यास सप्ताह म्हणतात पण रामायणपारायण नऊ दिवसाचे करण्याचा विधि आहे (श्रीराम चरितमानस)

**नवरत्ने** — १ हिरा, २ मोती, ३ प्रवाळ, ४ गोमेद, ५ इंद्रनील, ६ वैडूर्य, ७ पुष्कराज, ८ पाच व ९ माणिक.

वज्रं मुक्ता प्रवालं च गोमेदश्चेन्द्रनीलकः ।
वैडूर्यं पुष्पराजश्च पाचि माणिक्यमेव च ॥
महारत्नानि चैतानि नव प्रोक्तानि सूरिभिः ॥ (शुक्रनीतिसार)

**नवरत्ने** (अ) (विक्रमाच्या सभेतील) — १ धन्वंतरी (वैद्य) २ क्षपणक (फलज्योतिषी), ३ अमरसिंह (कोशकार), ४ शंकु (भूमापनशास्त्रज्ञ), ५ वेतालभट्ट (मंत्रशास्त्र), ६ घटकर्पर (शिल्पशास्त्र), ७ कालिदास (कवि), ८ वराहमिहिर (ज्योतिषी), आणि ९ वररुचि (वैयाकरणी)

ख्यातो वराहमिहिरो नृपतेः सभायां रत्नानि वै ।
वररुचिर्नव विक्रमस्य । (ज्योतिर्विदाभरण)

(आ) (अकबराच्या) — १ राजा बिरबल, २ अबुल फजल (वैज्ञानिक), ३ अबुल फैजी, ४ राजा तोडरमल, ५ तानसेन (संगीतज्ञ), ६ अब्दुल रहीम (कवि), ७ मानसिंह, ८ खानखाना आणि ९ भगवानदास

**नवरस** — १ शृंगार, २ वीर, ३ करुण, ४ अद्भुत, ५ हास्य, ६ भयानक, ७ बीभत्स, ८ रौद्र आणि ९ शांत असे नऊ रस साहित्यशास्त्र मानते. आहेत कोणी कोणी भक्ति हा दहावा रस मानतात.

**नवविध अन्न** — १ सूप-वरण, २ शाक-शाकभाजी, ३ मिष्टान्न-मधुरान्न, ४ जेमन-भात वगैरे, ५ उपदेश-मूलक इत्यादिक, ६ चितरदश-लोणचे, ७ सधान-मद्यादि, ८ रोचन-कोशिंबिरी आणि ९ व्यञ्जन-कढी इत्यादि. ( कु. श. को. )

**नवविध स्वभाव स्त्रियांचे** — १ देवसत्त्वा, २ गंधर्वसत्त्वा, ३ यक्ष सत्त्वा, ३ मनुष्यसत्त्वा, ५ पिशाचसत्त्वा, ६ नागसत्त्वा, ७ काकसत्त्वा, ८ वानरसत्त्वा आणि ९ खरसत्त्वा. ( अनंगरंग )

**नवविधपरीक्षा ( आयुर्वेदीय )**—१ नाडी, २ मूत्र, ३ मल, ४ शब्द, ५ स्पर्श, ६ रूप, ७ दृक्, ८ मुख व ९ जिव्हा परीक्षा. ( भावप्रकाश )

**नवविध भक्ति व नऊ भक्तश्रेष्ठ** — ( अ ) १ श्रवण-परीक्षिति, २ कीर्तन-शुकाचार्य, ३ स्मरण-प्रल्हाद, ४ पादसेवन-लक्ष्मी, ५ अर्चन-पृथु राजा, ६ वंदन-अक्रूर, ७ दास्य-हनुमान्, ८ सख्य-अर्जुन आणि ९ आत्मनिवेदन-बलि.

> श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।
> अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ ( भाग. स्कंध ७-५ २३ )

( आ ) १ सत्संग, २ हरिकथेविषयीं प्रेम, ३ गुरुसेवा, ४ प्रभुगुणगान, ५ मंत्रजप, ६ दम, शील व वैराग्य, ७ सर्व विश्वांत परमेश्वर पाहणे, ८ मिळेल त्यांत संतोष व परदोष न पाहणे व ९ सर्वस्वी रामावर भरवसा ( तुलसीदास ), ( परमार्थपर व्याख्याने ).

**नवविधशक्ति** — १ धर्मशक्ति, २ दानशक्ति, ३ मंत्रशक्ति, ४ ज्ञान शक्ति, ५ अर्थशक्ति, ६ कामशक्ति, ७ युद्धशक्ति, ८ व्यायामशक्ति व ९ भोजनशक्ति. ( वस्तुरत्नकोश )

**नवसमिधा** — १ रुई, २ पळस, ३ खैर, ४ आघाडा, ५ पिंपळ, ६ उंबर, ७ शमी, ८ हरळी व ९ दर्भ.

**नवसाक्षिदेवता** — १ सूर्य, २ चंद्र, ३ यम, ४ काल, ५ पृथ्वी, ६ आप, ७ तेज, ८ वायु व ९ आकाश.

> सूर्यः सोमो यमः कालो महाभूतानि पञ्च च ।
> एते शुभाशुभाख्याणां कर्मणां नव साक्षिणः ॥ ( सु. )

# १०

**दश आयुधें ( देवींचीं )** ( अ ) — १ खड्ग, २ बाण, ३ गदा, ४ शूल, ५ शंख, ६ चक्र, ७ भुशुंडी, ८ परिघ, ९ कार्मुक आणि १० रुधिरपात्र. ( सप्तशती १–१ ); ( आ ) ( **शंकराचीं** )— १ खड्ग, २ त्रिशूळ, ३ परशु, ४ शंख, ५ डमरू, ६ नागपाश, ७ अक्षमाला, ८ धनुष्य, ( पिनाक ), ९ शर आणि १० पाशुपत ( क. क. )

**दशेंद्रियें व त्याच्या देवता**–( **पंच कर्मेंद्रियें** ) — १ हात–इंद्र, २ पाय–त्रिविक्रम, ३ वाणी–अग्नि, ४ उपस्थ–प्रजापति व ५ गुद–यम (मृत्यु) ( **पंच ज्ञानेंद्रियें** ) — १ कान–दिशा, २ त्वचा–वायु, ३ डोळे–सूर्य, ४ जिव्हा–वरुण, आणि ५ नाक–अश्विनीकुमार ( सर्ववेदान्तसिद्धान्तसार-संग्रह )

**दश कला अग्नीच्या** — १ धूम्रा, २ नीलवर्णा, ३ कपिला, ४ विस्फुलिङ्गिनी, ५ ज्वाला, ६ हैमवती, ७ कव्यवाहिनी ८ हव्यवाहिनी, ९ रौद्री व १० सर्पिणी. अशा वैश्वानराच्या दहा कला आहेत.

" रौद्री सर्पिणी चैव वैश्वानरकला दश " ( ज्ञानार्णवतन्त्रम् )

**दश कामदशा** — १ अभिलाषा, २ चिंता, ३ स्मृति, ४ गुणकीर्तन, ५ उद्वेग, ६ प्रलाप, ७ उन्माद, ८ व्याधि, ९ जडता व १० मरण.

अभिलाषोऽथ चिंता स्यात्स्मृतिश्च गुणकीर्तनम् ।
उद्वेगोऽथ प्रलापः स्यादुन्मादो व्याधिरेव च ॥
जडता मरणं चैव दशमं जायते ध्रुवम् ( शृंगार तिलक )

**दशग्रंथ** ( अ ) — १ संहिता, २ पद, ३ क्रम, ४ ब्राह्मण, ५ व्याकरण, ६ शिक्षा, ७ कल्प, ८ ज्योतिष, ९ छंद व १० निरुक्त, ( आ ) १ संहिता, २ ब्राह्मण, ३ आरण्यक, ४ शिक्षा, ५ मंत्र, ६ व्याकरण, ७ निघंटु, ८ निरुक्त, ९ छंद व १० ज्योतिष. या वेद व त्याचीं उपांग असलेल्या दहा ग्रंथास दशग्रंथ म्हणतात.

छन्दस्तु नवमः प्रोक्तो ज्योतिषो दशमः स्मृतः ।
प्रोक्ता एते दशग्रंथाः व्याडिनैव महर्षिणा ॥ ( सु. )

**दशदशा** (जीवाच्या) — १ गर्भवास, २ जन्म, ३ बाल्य, ४ कौमार, ५ पौगण्ड, ६ यौवन, ७ स्थावीर्य, ८ जरा, ९ प्राणरोध आणि १० नाश.

**दशदिशा व त्यांच्या देवता** —१ पूर्व–इंद्र, २ पश्चिम–वरुण, ३ उत्तर–कुबेर, ४ दक्षिण–यम, ५ ईशान्य–रुद्र, ६ नैर्ऋत्य–निर्ऋति, ७ वायव्य–वायु, ८ आग्नेय–अग्नि, ९ ऊर्ध्व–ब्रह्मा व १० अधोदिशा–शेषनाग.

**दशदानें** — १ गाय, २ भूमि, ३ तीळ, ४ सुवर्ण, ५ तूप, ६ वस्त्र, ७ धान्य, ८ गूळ, ९ लवण व १० गृह हीं दशदानें होत.

**दशागें** (वृक्षाचीं) — १ मूळ, २ साल, ३ पान, ४ फूल, ५ फळ, ६ बोखी, ७ चीक, ८ नार, ९ काटे व १० देठ पानाचा किंवा फुलाचा

**दशांगधूप** — (अ) १ कोष्ठ, २ गूळ, ३ लाख, ४ हरीतकी, ५ राळ, ६ जटामासी, ७ शिलारस, ८ साखर, ९ मोथ व १० गुग्गुळ, (आ) १ नखला, २ वाळा, ३ चंदन, ४ ऊद, ५ विशेष, ६ आगरु, ७ तूप, ८ कापूर, ९ मध आणि १० गुलाबाचीं फुलें. या दहा सुगंधी द्रव्यांच्या मिश्रणानें तयार होणारा धूप (दुर्गंध श को.), (इ) १ कृष्णागरु, २ चंदन, ३ गुग्गुळ, ४ श्वेतागरु, ५ लाख, ६ वेलफळ, ७ तूप, ८ मध, ९ सजरस आणि १० कापूर. हीं दहा धूपाचीं साधनें होत.

'साधनानि दशांगानि धूपस्य चतुरानन। (वी प्र.)

**दश नाड्या** — १ इडा, २ पिंगला, ३ सुषुम्ना, ४ गांधारी, ५ हस्तिजिह्वा, ६ पूषा, ७ यशस्विनी, ८ अलम्बुषा, ९ कुहू व १० शंखिनी. (च्या) १ इडा, २ पिंगला, ३ सुषुम्ना, ४ गांधारी, ५ जीवनी, ६ दशतुंडी, ७ दीक्षा, ८ बाणदशा, ९ शंखिनी व १० सौक्षिणी (म ज्ञा को)

मानव शरिरात एकंदर बहात्तर सहस्र नाड्या असून त्यात प्राणवहा अशा प्रधान बहात्तर नाड्या आहेत, त्यात या दशनाड्या मुख्य होत.

'चक्रवत्सस्थिता ह्येता प्रधाना दश नाड्य' (अग्नि. २१४ ३)

**दश नामें पुल्लिंगी प्रतीकात्मक** (संस्कृत) —

रामो हरि करी भूभृत् । भानु कर्ता च चंद्रमा ।
तरस्विवान् भगवान् आत्मा । दशैते पुंसि नायका ॥

**दश नामें स्त्रीलिंगी प्रतीकात्मक ( संस्कृत )** —

रमा रुचिर्नदी धेनुर्वाग्धीः सरित् अनन्तरम् ।
क्षुत् प्रावृट् च शरद् चैव दशैताः स्त्रीषु नायकाः ॥

**दश नामें नपुंसकलिंगी प्रतीकात्मक ( संस्कृत )** —

ज्ञानं दधि: पयो वर्म धनुर्वारि जगत् तथा ।
मधु नाम मनोहारि दशैतानि नपुंसके ॥

**दशनाम संन्यासी** — १ गिरी, २ पुरी, ३ पर्वत, ४ सागर, ५ वन, ६ तीर्थ, ७ भारती, ८ सरस्वती, ९ अरण्य आणि १० आश्रम. ( दर्शनप्रकाश )

**दश पारमिता ( बुद्धांची परिपूर्णता )** — १ दान, २ शील, ३ नैष्कर्म्य, ४ प्रज्ञा, ५ वीर्य, ६ क्षांति, ७ सत्य, ८ अधिष्ठान, ९ मैत्री व १० उपेक्षा. या दहा पारमिता म्हणजे गुणांची पूर्णता किंवा पराकाष्ठा बुद्ध धर्मांत मानिल्या आहेत. ( बुद्धधर्म )

**दशधर्म** — १ क्षमा, २ मार्दव, ३ आर्जव, ४ सत्य, ५ शौच, ६ संयम, ७ तप, ८ त्याग, ९ आकिंचन्य व १० ब्रह्मचर्य. हीं दहा धर्माचीं अंगें होत. ( जैन धर्म )

**दशभक्ति** — १ सिद्धभक्ति, २ श्रुतभक्ति, ३ चारित्र्यभक्ति, ४ योगी भक्ति, ५ आचार्य, ६ निर्वाण, ७ पंचपरमेष्ठी, ८ तीर्थंकरभक्ति. ९ नंदीश्वरभक्ति, १० शांतिभक्ति. असे दहा प्रकार जैन धर्मांत मानले आहेत. ( दशभक्ति )

**दश महादानें** — १ सुवर्ण, २ अश्व, ३ तीळ, ४ हत्ती, ५ दासी, ६ रथ, ७ भूमि, ८ घर, ९ कन्या आणि १० कपिला धेनू. या दहा वस्तूं-पैकीं कोणत्याहि वस्तूचें दान तें महादान म्हणून मानलें जातें.

कनकाश्वतिला नागदासीरथमहीगृहाः ।
कन्या च कपिला धेनुर्महादानानि वै दश ॥ ( अग्नि २०९-२४ )

**दश महाविद्या** — १ काली, २ तारा, ३ षोडशी, ४ भुवनेश्वरी, ५ भैरवी, ६ छिन्नमस्ता, ७ धूमवती, ८ बगला, ९ मातंगी आणि १० कमला. या दहा महाविद्या म्हणून शक्ति उपासनेंत सांगितल्या आहेत. ( कल्याण शक्ति अंक )

**दशमुळें** — (अ) १ शालिपर्णी (रानगांजा), २ पृष्टिपर्णी, ३ रिंगणी, ४ डोरली, ५ गोखरू, ६ बिल्व, ७ ऐरण (टाहाकळा), ८ टट्ट, ९ महान्मूळ व १० शिवणमूळ, (आ) १ बेल, २ टाकळा, ३ टट्ट, ४ शिवण, ५ पाडळ, ६ सालवण, ७ गोखरू, ८ पिठवण, ९ डोरली व १० रिंगण या दहा वनस्पतींची मुळें यांचा आर्य वैद्यकांत उपयोग करतात.

**दशामृत** — १ दही, २ दूध, ३ मध, ४ तूप, ५ साखर, ६ गुळ, ७ जिरें, ८ सैंधेलोण, ९ वेलदोडे व १० मिरें. या पदार्थांच्या मिश्रणास दशामृत म्हणतात. अशी दशामृत पूजा चौरंग्रेवास विहित आहे. (सि. पु)

**दशमान पद्धति** — एक परिमाण पद्धति. हींत परिमाणें दसपटीनें चढत किंवा उतरत जातात हीं आता भारतात नव्यानें रूढ करण्यांत आली आहेत प्राचीन काळीं देखील एकम्, दशम्, शतम् अशी दसपटीनें संख्या मापली जात असे.

**दश रूपकें (दृश्य काव्य प्रकार)** — १ नाटक, २ प्रकरण, ३ भाण, ४ व्यायोग, ५ समवकार ६ डिम, ७ ईहामृग, ८ अंक, ९ वीथि आणि १० प्रहसन. असे नाट्याचे संस्कृत वाङ्मयातले दहा प्रकार. (भ. ना. १८ २ ३)

**दश लक्षणें सम्यग् ज्ञानाचीं** — १ अक्रोध, २ वैराग्य, ३ इंद्रिय निग्रह, ४ क्षमा, ५ दया, ६ शांति, ७ लोकप्रेम, ८ औदार्य, ९ एखाद्याचें भय निवारण व १० दुःख परिहार करणें

> अक्रोध वैराग्य जितेंद्रियत्व । क्षमा दया शांति जनप्रियत्व ।
> निर्लोभदाने भयशोकहानि । ज्ञानस्य चिह्न दश लक्षणानि च ॥
> (योग तत्वामृत)

**दशलक्षणें भागवत पुराणाचीं** — १ सर्ग-संसार, २ विसर्ग-संहार, ३ स्थान-वैकुंठ, ४ पोषण-भगवद्भजन ५ ऊति-कर्मानुसार होणारी वासना, ६ मन्वन्तरें-चौदा मनूंची व्यवस्थिति, ७ ईशानुकथन-दशावतारचरित, ८ निरोध-एकाग्रता, ९ मुक्ति-ज्ञानयोग, १० आश्रय-सर्व प्रकाशक परमात्मा. सर्व पुराणें पंचलक्षणात्मक पण भागवत पुराण दशलक्षणात्मक आहे दश

लक्षणानीं तं महापुराण व पाच लक्षणाना युक्त तं उपपुराण– यशी सवसाधा रणपणें व्यवस्था आहे (भाग १२७)

सग, विसग, स्थान, पोषण । ऊति मन्वन्तरें इशानुस्थन ।
निरोध मुक्ति आश्रयपूण । एव दश लक्षण भागवत ॥

(चतु श्लोकी भागवत)

**दशवायु** — १ प्राण, २ अपान, ३ व्यान, ४ उदान, ५ समान, ह पिंडीचे व ६ नाग ७ कूम, ८ कृकल, ९ देवदत्त आणि १० धनञ्जय ह ब्रह्मांडीच (दासबोध)

**दशविघ्नें (योगाला)** — १ आलस, २ व्याधिपीडा, ३ प्रमाद, ४ सशय, ५ अनवस्थितचित्त, ६ अश्रद्धा, ७ भ्रान्तदर्शन, ८ दुःख, ९ दौमनस्य (इच्छा सफल न झाल्यामुळें मन क्षुब्ध होण) आणि १० अयोग्य विषयासक्तीनें लोलुपता (लिंग ९–८)

**दशोपनिषदें** — १ ईश, २ केन, ३ कठ, ४ प्रश्न, ५ मुण्ड, ६ माण्डुक्य, ७ तैत्तिरीय, ८ ऐतरेय, ९ छांदोग्य आणि १० बृहदारण्यक.

**दशावतार व त्यांच्या जयंत्या** — १ मत्स्य–चैत्र शु ३ प्राह्ण, २ कूम वैशाख शु १५ सायकाळीं ३ वराह–भाद्रपद शु ३ प्राह्णीं, ४ नृसिंह–वैशाख शु १ सायकाळीं, ५ वामन–भाद्रपद शु १२ मध्याह्नीं, ६ परशुराम–वैशाख शु ३ सायकाळीं, ७ राम–चैत्र शु ९ मध्याह्नी, ८ कृष्ण–श्रावण व ८ मध्यरात्रीं, ९ बौद्ध– श्रावण शु १० सायकाळीं, १० कल्की–श्रावण शु ६ सायकाळीं (धर्मसिंधु) (म भा शांति अ ३३९)

**दशविध द्विदल धान्यें** — १ चणक, २ मसूर, ३ मूग, ४ उडीद, ५ राजमा, ६ वाटाणे, ७ तूर, ८ वाल, ९ चवळी व १० कुळीथ

**दशविध नाद** — १ चिनचिनी नाद, २ चिंगी नाद, ३ घंटा नाद, ४ ताळ नाद, ५ सुस्वर नाद, ६ गर्जना नाद, ७ शंख नाद, ८ घोष नाद, ९ भेरी नाद, १० मेघ नाद असे दहा प्रकारचे नाद साधकास कांहीं ज्ञान पूर्ण झाल्यावर एकू येतात व मादाचा अनुभव येतो असें योगशास्त्रात सांगितले आहे 'दशमो मघनाद' (हंसोपनिषत्)

**दशविध रंग** — १ हिरवा, २ तांबडा, ३ निळा, ४ काळा, ५ अत्यंत लाल, ६ शेंदरी, ७ पिंगट, ८ करडा, ९ पारवा आणि १० मोराच्या गळ्यावरील रंगासारखा मेचक (म. भा. शांति अ. २८४)

**दशविध वक्तृत्व** — १ परिभाषित, २ सत्य, ३ मधुर, ४ सार्थक, ५ परिस्फुट, ६ परिमित, ७ मनोहर, ८ चित्र, ९ प्रसन्न व १० भावानुगत असे वक्तृत्वाचे दहा प्रकार (वस्तुरत्नकोश)

**दशविधशौच (शुद्धि)** — १ भावशौच, २ स्नानशौच, ३ जलशौच, ४ मृत्तिका शौच, ५ स्मश्रुशौच, ६ सत्कारशौच, ७ पवित्र वाक्य, ८ प्राणिदया शौच, ९ अर्थशौच व १० आचारशौच. (वस्तुरत्नकोश)

**दाशराज्ञ युद्ध** — ऋग्वेदकालीन एक फार मोठी ऐतिहासिक घटना. एका बाजूला राजा सुदास व त्याचे विरुद्ध, १ कवि चायमान, २ राजा तुर्वश, ३ वैकर्ण राजे, ४ शिम्यु, ५ देवक, ६ शंबर, ७ भेद, ८ पक्थ, ९ श्रुत व १० कवष. या दहा बलाढ्य राजामधील घनघोर युद्ध. हे दहा राजे अथवा त्यांचे सर्व त्यांचें पौरोहित्य विश्वमित्राकडे होतें. सुदास राजाचें पौरोहित्य वसिष्ठाकडे होतें. वसिष्ठानें संघटना करून सुदास राजाला दहा संघाविरुद्ध जय मिळवून दिला. हे युद्ध परुष्णी आणि यमुना या नद्यांमधील प्रदेशात झालें अशी कथा आहे (ऋग्वेद दर्शन) (दाशराज्ञ युद्ध)

**दहा अंगें (यमाचीं)** — १ अहिंसा, २ सत्य, ३ अस्तेय, ४ ब्रह्मचर्य, ५ क्षमा, ६ धृति, ७ दया, ८ आर्जव, ९ मिताहार व १० शौच.

**दहा अंगें (नियमाचीं)** — १ तप, २ संतोष ३ आस्तिक्य, ४ दान, ५ ईशपूजन, ६ सिद्धांत–वाक्य, ७ ह्री (लज्जा) ८ मति, ९ जप व १० व्रत.

**दहा अवतार (शिवदेवतेचे)** — १ महाकाल, २ तार, ३ बालभुवनेश, ४ षोडशश्री विद्येश, ५ भैरव, ६ छिन्नमस्तक, ७ धूमवान्, ८ बगलामुख, ९ मातङ्ग आणि १० कमल (शिव. पु शतरुद्र अ. १७)

**दहा अवस्था (कामविकाराच्या)** — १ दृष्टादृष्ट, २ चित्त अस्वस्थ होणें, ३ निश्चय, ४ निद्रानाश, ५ कृश होणें, ६ लक्ष न लागणें, ७ निर्लज्जता, ८ उन्माद, ९ मूर्च्छा, १० मरण. (रतिरहस्य)

**दहा अवस्था (ग्रहांच्या)** — १ दीप्त, २ स्वस्थ, ३ मुदित, ४ शांत, ५ शक्त, ६ पीडित, ७ दीन, ८ खल, ९ विकल आणि १० भीत. (सुलभ ज्योतिष)

**दहा अपराध नामजपासंबंधीं** — १ सताची निंदा, २ असत् मार्गी मनुष्यापुढें नामगुणाचें कीर्तन, ३ दैवतामध्यें भेदबुद्धि, ४ वेदावर अश्रद्धा, ५ शास्त्रावर अविश्वास, ६ गुरुवचनावर अश्रद्धा, ७ परमेश्वर नाममहिमा याला अर्थवाद समजण्याचा भ्रम, ८ नुसत्या नामानें पापक्षालन होतें असें समजून पाप करीत राहणें, ९ नामानेंच पुण्यलाभ होतो म्हणून आश्रमविहित कर्म न करणें आणि १० परमेश्वर नामस्मरण हें इतर यज्ञ, तप, व्रत आदि शुभकर्मांबरोबर समजणें. (पद्मपुराण)

**दहा आद्य आचार्य शकुन शास्त्राचे** — १ श्रीशंकर, २ अत्रि, ३ गर्ग, ४ गुरु, ५ शुक्र, ६ वसिष्ठ, ७ व्यास, ८ कौत्स, ९ भृगु आणि १० गौतम (वसंतराज शाकुन)

**दहा आत्म्याचीं विधेयें (साक्षात् बोधक) विशेषणें** — १ सत्, २ चित्, ३ आनंद, ४ ब्रह्म, ५ स्वयंप्रकाश; ६ कूटस्थ, ७ साक्षी, ८ द्रष्टा, ९ उपद्रष्टा व १० एक (तत्त्व-निज-विवेक)

**दहा आत्म्याचीं निषेध्यें (प्रपंचाचे निषेध द्वाराबोधक) विशेषणें** — १ अनंत, २ अखंड, ३ असंग, ४ अद्वितीय, ५ अजन्मा, ६ निर्विकार, ७ निराकार, ८ अव्यय, ९ अव्यक्त आणि १० अक्षर (तत्त्व-निज-विवेक)

**दश आद्य आचार्य संन्यास मार्गाचे** — १ गौडपादाचार्य, २ गोविंद पादाचार्य, ३ विवरणाचार्य, ४ शंकराचार्य, ५ विश्वरूपाचार्य, ६ पृथ्वीधराचार्य ७ सद्गुणाचार्य, ८ हस्तामलक, ९ पद्मपादाचार्य व १० तोटकाचार्य.

"संन्यासमार्गी हें अतिवर्य, हे परम सूर्य ज्ञानाचे" (हस्तामलक)

**दहा आरोग्याचीं सूत्रें** — १ स्वच्छता, २ मोकळी हवा व सूर्यप्रकाश, ३ व्यायाम, ४ आहार, ५ विश्रांति, ६ ताठ बसणें, ७ नियमित आहार-विहार, ८ पाणी, ९ वस्त्र आणि १० मन प्रवृत्ति. (Health. May 1951)

**दहा आज्ञा (बायबलमधील)** १ रविवार हा विश्रांतीचा दिवस, २ परद्रव्याचा लोभ धरू नको, ३ परस्त्रीचा लोभ धरू नको, ४ व्यभिचार करू नये, ५ हिंसा करू नको, ६ चोरी करू नको, ७ खोटी साक्ष देऊं

नको, ८ मातापितराची आज्ञा पाळ, ९ मूर्तिपूजा करू नको व १० ईश्वराचें नाव व्यर्थ घेऊ नको. या आज्ञा खिस्ती धर्मग्रंथात ( जुना करार ) सांगितलेल्या आहेत. ( जुना करार Exodus अ. २० ).

**दहा ईश्वर प्राप्तीच्या वैदिक विद्या** — १ उद्गीथविद्या, २ सवर्ग-विद्या, ३ मधुविद्या, ४ पञ्चाग्निविद्या, ५ उपकोसल आत्मविद्या, ६ शांडिल्य-विद्या, ७ दहरविद्या, ८ भूमविद्या, ९ दीर्घायुष्यविद्या, १० मथविद्या ( रामगीता )

**दहा ईश्वरविषयक बुद्धिगम्य कल्पना अथवा गुण** — १ पुरुषोत्तम, २ विश्वाचे अंतर्यामीसूत्र, ३ वैश्वानर–जीवात्मा किंवा परमात्मा, ४ शाश्वत, चिन्मय विश्वातील सूत्र, ५ मायी–अपूर्वशक्ति "मम माया दुरत्यया" ( भ. गी. ७–१४ ) ६ विश्वातील रस, ७ तज्जलान् किंवा जगाचे प्रभव–प्रलय–स्थिति, ८ अतिष्ठान–सर्वातीत पुरुष, ९ परम ज्ञेय व १० परमाश्चर्य. चिंतनाला योग्य असे हे दहा गुण. ( भ. गी. सा. दर्शन )

**दहा उपाय ( उपजीविकेचे )** — १ विद्या ( वेदव्यतिरिक्त ), २ शिल्प, ३ रोजगार, ४ नोकरी, ५ गोरक्षण, ६ व्यापार, ७ शेती, ८ अंतःकरणाची विविध वृत्ति, ९ भिक्षेवर निर्वाह आणि १० व्याजबट्टा.

विद्या शिल्पं भृतिः सेवा गोरक्ष्यं विपणिः कृषिः ।
धृतिं भैक्ष्यं कुसीदं च दश जीवनहेतवः ॥ ( मनु १०–११६ )

**दहा कुलें विवाहास वर्ज्य** — १ क्रियाहीन, २ पुरुषरहित, ३ वेदरहित, ४ रोमश, ५ अर्शस ( मूळव्याधि रोग असलेले ) ६ क्षयरोग युक्त, ७ आमयनी ( अग्निमांद्य ), ८ अपस्मार, ९ श्वेतकुष्ठयुक्त व १० कुष्ठयुक्त. ( मनु. ३-७ )

**दहा खेळ बुद्धिबळाचे** — १ शह, २ मात, ३ प्यादी, ४ हुक्मप्यादी, ५ चाडमात, ६ मारेमात–फकीरी, ७ काटशह, ८ अविरतशह, ९ ठाण-बंधमात व १० द्विगुणशह. ( बु. शा. को. )

**दहा गुण ( काव्याचे )** — १ श्लेष, २ प्रसाद, ३ समता, ४ समाधि, ५ माधुर्य, ६ ओज, ७ सौकुमार्य, ८ अर्थव्यक्ति, ९ उदारता, व १० कांति.

औदार्यं समता कांतिरर्थव्यक्तिः प्रसन्नता ।
समाधिः श्लेष ओजोऽथ माधुर्यं सुकुमारता ॥ ( भ. ना. )

**दहा गुण (गायनाचे)** — १ सुरक्त–वाद्यें स्वरांत मिळवून घेणें, २ पूर्ण–उच्चार उत्तम तऱ्हेनें करणें, ३ अलंकृत–आवाज यथायोग्य लावणें, ४ प्रसन्न–निःशंक होऊन गंभीर आवाजानें गाणें, ५ व्यक्त–उच्चार अर्थानुरूप व स्पष्ट करणें, ६ विक्रुष्ट–आलापांचे स्वर स्पष्ट रीतीनें लावणें, ७ श्लक्ष्ण–लयीमध्यें स्वरांचा विस्तार करवून दाखविणें, ८ सम–तालबद्ध गाणें ९ सुकुमार–मृदुस्वर येतील तेथें मृदु उच्चार करणें आणि १० मधुर–गाणें, मधुर गाऊन दाखविणें. ' दशैते स्युर्गुणा गीते ।' (संगीत रत्नाकर)

**दहा गुण गोदुग्धाचे** — १ गोड, २ थंड, ३ मऊ, ४ स्निग्ध, ५ दाट, ६ श्लक्ष्ण (खरखरीत नव्हे तें) ७ बुळबुळीत, ८ जड, ९ मंद आणि १० निर्दोष (चरक-सूत्र-२७–२२१)

**दहा गुण परमात्म्याचे** — १ सर्वाहून मोठा, २ प्रकाशवान् ३ दिव्यत्व, ४ ऐश्वर्य वाढविणारा, ५ संसारसमुद्राच्या अत्यंत सखोल भागातहि असणारा, ६ सत्यस्वरूप, ७ चिरयुवा, ८ सेवा करण्यास योग्य, ९ हिंसारहित शब्दांची प्रेरणा करणारा आणि १० अनंतसुखांना देत राहिला आहे.

(अथर्व–अनु. मराठी)

**दहा गुण सात्विक अन्नाचे** — १ आयुष्य, २ सत्त्व वाढविणारे, ३ बल, ४ आरोग्य, ५ सुख, ६ प्रीति वाढविणारे, ७ रसयुक्त, ८ स्निग्ध, ९ शरीरांत स्थिर रूपानें फार वेळ राहणारे आणि १० मनाला आनंद देणारे (म. गी. १७–८)

**दहा गुण स्नानाचे** — (अ) १ रूप, २ तेज, ३ बल, ४ शुचिता, ५ दीर्घायुष्य, ६ आरोग्य, ७ पवित्रता, ८ दुःस्वप्ननाश, ९ तप व १० बुद्धि. (दक्षस्मृति); (आ) १ बल, २ रूप, ३ शुद्धस्वनि, ४ वर्णांचा स्पष्ट उच्चार, ५ मृदुपणा, ६ सुगंध, ७ स्वच्छता, ८ संपत्ति, ९ लावण्य व १० उत्कृष्ट स्त्रिया. हे दहा गुण स्नानशील पुरुषाचा आश्रय करतात. (म. भा. उद्योग. ३७.३३)

**दहा गोष्टी अन्नावर अवलंबून** — १ वर्ण, २ कांति, ३ सुस्वरता, ४ आयुष्य, ५ प्रतिभा, ६ सुख, ७ संतोष, ८ पुष्टि, ९ शरीरबल व १० बुद्धि. असा आयुर्वेदाचा सिद्धांत आहे.

तुष्टिपुष्टी बलं मेधा सर्वं अन्ने प्रतिष्ठितम् (आयुर्वेद)

**दहा गोष्टी वर्ज्य ( व्यवहारांत )** — १ चाकर-गर्विष्ट, २ मुलगा-अति लाडका, ३ शत्रु-वर्म जाणणारा, ४ भाऊ-बाईलबुद्धीचा, ५ जामात-हट्टी व वेडा, ६ वक्ता-भिना अथवा भिडस्त, ७ मित्र-कपटी, ८ विद्वान्-स्तुतिपाठक, ९ रोगी-पथ्य न करणारा, व १० गायक-मानी. या दहा गोष्टी व्यवहारात वर्ज्य म्हणून सांगितल्या आहेत.

**दहा गुरु ( शीखपंथाचे )** — १ गुरु नानक, २ गुरु अगडशहा, ३ अमरदास, ४ रामदास, ५ गुरु अर्जुन, ६ हरिगोविंद, ७ हरिराय, ८ हरिकृष्णजी, ९ तेजबहादूर व १० गुरु गोविंदसिंग.

**दहा गुणजन्य सिद्धि** — १ क्षुधा-तृषाप्रभृति ऊर्मींच्या पलीकडे जाणे, २ दूरचें पाहणें, ३ दूरश्रवण ४ शीघ्रगति, ५ रूपसिद्धि, ६ परकायाप्रवेश, ७ इच्छामरण, ८ स्वर्गागमनाप्राप्ति, ९ सकल्पसिद्धि, व १० निरंकुश आज्ञा. या दहा गुणजन्य सिद्धि होत. ( भाग. स्क. ११-१५ )

**दहा ग्राम धान्यें** — १ तांदूळ, २ जव, ३ तीळ, ४ उडीद, ५ अणु, ६ प्रियंगु ( राळे ), ७ गहूं, ८ मसूर, ९ वाल आणि १० कुळीथ.

( तैत्तिरीय ब्राह्मण. अ. ८ )

**दहा ज्योति शास्त्राचे ग्रंथकार आचार्य** — १ वराह, २ नृसिंह, ३ श्रीपति, ४ सत्य, ५ भास्कर, ६ ब्रह्मगुप्त, ७ वैद्यनाथ, ८ लल्ल, ९ श्रीधर व १० रेणुक. ( श्रीपट्पचाशिका )

**दहा घन वाद्यें** — १ चिपळ्या, २ करताल, ३ झांज, ४ टाळ, ५ मंजिरी, ६ ताश, ७ घटा, ८ घुंगरू, ९ टिपऱ्या व १० जलतरंग. ही दहा घन म्हणजे एकावर एक आघात करून वाजविली जाणारीं वाद्यें होत.

**दहा तामस ऋषि** — १ कणाद, २ गौतम, ३ शक्ति, ४ उपमन्यु, ५ जैमिनि, ६ कपिल, ७ दुर्वास, ८ मृकंडु, ९ बृहस्पति आणि १० जामदग्न्य ( परशुराम )

भार्गव जामदग्न्य च दशैतान्तामसानृषीन् । ( पद्म. उत्तरखंड )

**दहा थाट (गायनशास्त्र)** — १ कल्याणथाट, २ विलावल, ३ खमाज, ४ भैरव, ५ पूर्वा थाट, ६ मारवा, ७ काफी, ८ असावरी, ९ भैरवी व १० तोडी थाट. थाट म्हणजे स्वरानुरोधानें रागाचें वर्गीकरण.

**दहा देवयोनि** — १ विद्याधर, २ अप्सरा, ३ यक्ष, ४ राक्षस, ५ गंधर्व ६ किन्नर, ७ पिशाच, ८ गुह्यक, ९ सिद्ध आणि १० भूत. ( अमर )

**दहा दोष काव्याचे**—१ गूढार्थ, २ अर्थांतर, ३ अर्थहीन, ४ भिन्नार्थ, ५ एकार्थ, ६ अभिप्लुतार्थ, ( तुटकतुटक ), ७ न्यायाला सोडून, ८ कठीण, ९ विसगत व १० शब्द गाळून.

शब्दच्युत वै दश काव्यदोषाः । ( भरत नाट्य १६-८४ )

**दहा दोष ( वरासंबंधी )** — (अ) १ मुका, २ आंधळा, ३ बहिरा, ४ कुज्या बाळ्याचा, ५ मूर्ख, ६ पागळा, ७ नपुसक, ८ कुष्ठी, ९ महारोगी आणि १० फेपरें येणारा ( विवाहचार ); ( आ ) १ उन्मत्त, २ उपजीविकेचें साधन नसलेला, ३ फेपरें येणारा, ४ दूरदेशीं वास करणारा, ५ कुष्ठ असलेला, ६ मूर्ख, ७ मोक्षमार्गाला अनुसरलेला, ८ शूर-सैनिकपेशा पत्करलेला, ९ अक्षरशून्य व १० विवाह परावृत्त असलेला. अशाना कन्या देऊ नये.

> उन्मत्ता वृत्तहीनाश्च तथापस्मारदूषिताः ।
> दूरस्था कुष्ठिनो मूर्खा मोक्षमार्गानुसारिण ॥
> शूरा अवेद्या निर्वृत्ता दश दोषयुता वराः ।
> तथा पदाश्च पतिता चक्षुःश्रोत्रविवर्जिताः ॥ ( ज्योतिर्मयूख )

**दहा दोष ( वाणीचे )** — १ विरोधी भाषण, २ एखाद्याला फसवील असें, ३ उपहास, ४ छळ, ५ वर्मस्पर्श, ६ कोरडे आवेशाचें बोलणें, ७ कोटीभाज, ८ आशा पोटात ठेवून बोलणें, ९ शका उत्पन्न होईल असें व १० प्रतारणा ( फसवेगिरी ). हे भाषणप्रसगीं दहा दोष मानले आहेत.

> आड वेगु विंदाणु । आशा शका प्रतारणु ।
> हे सन्यसिले अवगुणु । ज्या वाचा ॥ ( ज्ञाने. १३ २७२ )

**दहा दृष्टियोग ( ज्योतिष )** — १ युती योग, २ एकरान्यांतर योग, ३ अर्ध षडाष्टक योग, ४ द्विरान्यांतर, ५ षडाष्टक, ६ त्रिकोण, ७ सार्ध षडाष्टक, ८ षडष्टक, ९ प्रीतियोग आणि १० समसप्तक योग. असे दहा दृष्टियोग ज्योतिषात मानले आहेत.

**दहा धर्मलक्षणें** — १ धृति ( धैर्य ), २ क्षमा, ३ सहिष्णुता, ४ चोरी न करणे, ५ पवित्रता, ६ इंद्रियनिग्रह, ७ बुद्धि, ८ विद्या, ९ सत्य व १० अक्रोधता.

धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ।
धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ॥ ( मनु. ६-९२ )

**दहा धर्मसाधनें** — १ अहिंसा, २ क्षमा, ३ सत्य, ४ लोभलज्जा, ५ श्रद्धा, ६ इंद्रियनिग्रह, ६ दान, ८ यज्ञ, ९ तप व १० ध्यान. हीं दहा धर्मसाधनें होत. ( म. ब्रह्म. १८९ ३५ )

**दहा धातूंचें शरीर** — १ वात, २ पित्त, ३ कफ, ४ चर्म, ५ रुधिर, ६ मांस, ७मेद, ८ हाडें, ९ मज्जा व १० शुक्र. प्रत्येक शरीर या दहा धातूंचें बनलें आहे. ( भा. दर्शनसंग्रह )

**दहा नांवें अर्जुनाचीं** — १ अर्जुन, २ फाल्गुन, ३ जिष्णु, ४ किरीटी, ५ श्वेतवाहन, ६ बीभत्सु, ७ विजय, ८ कृष्ण, ९ सव्यसाची आणि १० धनंजय.

अर्जुनः फाल्गुनो जिष्णुः किरीटी श्वेतवाहनः ।
बीभत्सुर्विजयः कृष्णः सव्यसाची धनंजयः ॥ ( म भा विराट ४४-९ )

**दहा नांवें शनीचीं** — १ कोणस्थ, २ पिंगल, ३ बभ्रु, ४ कृष्ण, ५ रौद्र, ६ अंतक, ७ यम, ८ सूर्यपुत्र, ९ शनैश्चर (शनि) आणि १० मंद.

कोणस्थः पिंगलो बभ्रुः कृष्णो रौद्रोऽन्तको यमः ।
सौरिः शनैश्चरो मंदः पिप्पलादेन संस्तुतः ॥ ( श्रीशनैश्चरस्तोत्र )

**दहा नियम** — ( अ ) १ तप, २ संतोष, ३ आस्तिकता, ४ इंद्रियदमन, ५ देवपूजा, ६ सच्छास्त्रश्रवण, ७ लज्जा, ८ बुद्धि, ९ जप आणि १० हवन. हे दहा नियम म्हणजे आत्मसंयमनासाठीं करावयाचीं कृत्यें.

तपः संतोष आस्तिक्यं दानं देवस्य पूजनम् ।
सिद्धान्त श्रवणं चैव ह्रीर्मतिश्च जपो हुतम् ।
दशैते नियमाः प्रोक्ता मया पर्वतनायक । ( देवीगीता )

**दहा निरनिराळे अर्थ " योग " शब्दाचे** — १ ध्यान धारणा—अध्यात्मशास्त्र, २ औषधी योजना—वैद्यशास्त्र, ३ दोन वस्तूंना जोडणें—वास्तुशास्त्र, ४ कामधंदा—व्यवहारशास्त्र, ५ हस्तलाघव—इंद्रजाल,

६ युद्धसाहित्य जुळवणी–युद्धशास्त्र, ७ कुशाग्रतेनें होणारें कर्म–कर्मयोग, ८ ग्रहांची युति–ज्योतिष, ९ अनेक रसांचे मिश्रण–रसायन आणि १० कुशलतापूर्ण शासनप्रबंध–राज्यशासन. असे योग शब्दाचे अर्थ निरनिराळ्या शास्त्रांत अभिप्रेत आहेत. ( गीतेंतील राजकीय तत्वज्ञान )

**दहा पदार्थ गुणोत्पादक** — १ शास्त्र, २ तीर्थे, ३ पुत्रादिसमाज, ४ देश, ५ काल, ६ कर्म, ७ जन्म, ८ ध्यान, ९ मन, आणि १० जातकादि संस्कार. ( भाग ११–१३–४ )

**दहा पापकर्मे ( शारीरिक तीन )** — १ हिंसा, २ चोरी व ३ निषिद्ध कामवासना, **( वाचिक चार )**–१ चहाडी, २ कठोर, ३ खोटे व ४ अप्रसिद्ध असे बोलणें आणि **( मानसिक तीन )**–१ दुसऱ्याचा घात करण्याची इच्छा, २ मत्सर व ३ खोटी समजूत.

**दहा पुराणकालीन मूर्ख** — १ दुर्योधन, २ रावण, ३ शिशुपाल, ४ जरासंध, ५ कंस, ६ हिरण्यकशिपु, ७ भस्मासुर, ८ रुक्मी, ९ जयद्रथ आणि १० शकुनि हे दहा पुराणकालीन मूर्ख होत असे भीष्म सांगतात.

'एसे दशमूर्ख संसारीं । म्या ऐकिले पाहिले नेत्रीं ॥ ' (सिद्धान्तबोध)

**दहा पुष्टी** — १ वाक्पुष्टि, २ ज्ञानपुष्टि, ३ शरीरेंद्रियपुष्टि, ४ गृहजनपुष्टि, ५ धनधान्यपुष्टि, ६ प्रजापुष्टि, ७ पशुपुष्टि, ८ ग्रामपुष्टि, ९ धर्मपुष्टि व १० अणिमादिपुष्टि. अशा दहा पुष्टी सांगितलेल्या आहेत. ( रुद्रार्थ दीपिका )

**दहा प्रकारच्या कपिला गाई** — १ सुवर्ण कपिला, २ गौर पिंगला, ३ आरक्त पिंगाक्षी, ४ जल पिंगला, ५ बभ्रुवर्णाभा, ६ श्वेत पिंगला, ७ रक्त पिंगाक्षी, ८ खुर पिंगला, ९ पाटल आणि १० पुच्छ पिंगला. ( जिच्या शेपटाच्या केसांचा रंग पिवळा असतो ती ) ( म. भा. अश्वमेध–१०–२ )

**दहा प्रकारचे गारुड मंत्र** — १ वेदगारुड, २ देवीगारुड, ३ वीरगारुड, ४ कृष्णगारुड, ५ मंत्रगारुड, ६ यंत्रगारुड, ७ सिद्धगारुड, ८ नाथगारुड, ९ अघोरगारुड आणि १० कालभैरवगारुड. ( मंत्रशास्त्र व मंत्रशक्तियोग )

**दहा प्रकारचे गुरु** — १ उपाध्याय, २ पिता, ३ माता, ४ वडील बंधु, ५ शासक, ६ मामा, ७ श्वशुर, ८ आईचे वडील, ९ पित्याचे वडील व १० चुलता. ( कूर्म पुराण )

**दहा प्रकार चुंबनाचे** — १ मिलित, २ स्फुरित, ३ घाटिक, ४ तिर्यक्, ५ उत्तरोष्ठ, ६ पीडित, ७ सपुट, ८ हनुवक्त्र, ९ प्रतिबोध आणि १० समौष्ठ चुंबन. ( अनंगरंग )

**दहा प्रकारची बळें** — १ विद्या, २ कुलीनता, ३ मित्रपरिवार, ४ बुद्धि, ५ सत्त्व, ६ धन, ७ तपस्या, ८ सहाय्यता, ९ सामर्थ्य आणि १० दैव.

> विद्याभिजनमित्राणि बुद्धिसत्त्वधनानि च ।
> तप सहायवीर्याणि दैवं च दशमं बलम् ॥
>
> ( म. भा. शांति. अ. १५८ )

**दहा प्रकारच्या मुद्रा ( योगशास्त्र )** — १ महामुद्रा, २ महाबंध, ३ महावेध, ४ खेचरी, ५ जालंदरबंध, ६ मूलबंध, ७ विपरीत कृति, ८ उड्डीयान, ९ वज्रोली, व १० शक्ति चालना. ( शिवसंहिता ) ह्या दहा मुद्रा जरा व मरण यांचा नाश करणाऱ्या आहेत. ( ह. प्र. )

**दहा प्रसिद्ध भाट** — १ वेलग, २ वल्गज, ३ भीमसी (कृतयुग), ४ विंगट, ५ रपाल ( त्रेतायुग ), ६ सूत, ७ संजय ( द्वापारयुग ), ८ चदभाट, ९ वेताळभाट आणि १० गंगभाट (कलियुग). असे दहा प्रसिद्ध भाट होऊन गेले. ( अमृत आगष्ट १९५५ )

**दहा प्रकार मनोव्यवसायाचे** — १ ग्रहण, २ धारण, ३ स्मरण, ४ व्याप्ति, ५ व्यवस्था, ६ चिकित्सा, ७ निर्णय, ८ निश्चय किंवा श्रद्धा, ९ प्रकटीकरण व १० क्रिया या सर्वांना बुद्धि लागते व त्या प्रत्येक प्रकारा संबंधाने बुद्धीच प्रामाण्य सांभाळावें लागत ( केळकराची निबंधमाला )

**दहा प्रकारचे यज्ञ** — १ अग्निहोत्र, २ दर्शपौर्णमास, ३ चातुर्मास्य, ४ पशुयाग, ५ सोमयाग हे पाच नैमित्तिक व १ देवयज्ञ, २ पितृयज्ञ, ३ ब्रह्मयज्ञ, ४ भूतयज्ञ आणि ५ मनुष्ययज्ञ. हे पाच नित्य मिळून दहा यज्ञ होत.

१० गुद–मलत्याग चार अंतःकरण, ११ मन–संकल्पविकल्प, १२ बुद्धि–निश्चय, १३ चित्त–चिंतन व १४ अहंकार–अहंपणा

(विचारचंद्रोदयदर्शन)

**चौदा कामिनी** — १शांति, २ क्षमा, ३ दया, ४ उन्मनी, ५ उपरति, ६ सद्‍बुद्धि, ७ तितिक्षा, ८ स्वरूपस्थिति, ९ ममुक्षा, १० निष्कामना, ११ प्रतीति, १२ सुलीनता, १३ समाधि व १४ निर्वाणदीक्षा (हारविजय)

**चौदा कुलमातृका** – १ गौरी, २ पद्मा, ३ शची, ४ मघा ५ सावित्री, ६ विजया, ७ जया, ८ देवसेना, ९ स्वधा, १० स्वाहा, ११ मातर, १२ धृति, १३ पुष्टि व १४ तुष्टि (पुण्याहवाचन)

**चौदा कुलें अप्सरांचीं** — १ ब्रह्मदेवाची मानसमृष्टि २ वेदांपासून, ३ अग्नि, ४ वायु, ५ अमृतापासून, ६ जलापासून, ७ सूर्यकिरण, ८ चंद्रकिरण, ९ पृथ्वी, १० विद्युत्, ११ मृत्यु १२ मदन, १३ मुनि आणि प्रजापतिकन्या यांपासून व १४ नारद यांपासून झालेली हीं चौदा अप्सराकुलें होत (नाणभट्ट कादंबरी)

**चौदा गुण महत्त्वाचे** — १ देशकालज्ञता, २ दार्ढ्य – खंबीरपणा, ३ सर्वक्लेशसहिष्णुता, ४ सर्वज्ञता ५ दक्षता, ६ बल, ७ गुप्तमसलत, ८ मागल्यापुढल्या स्वतःच्या वचनाचा मळ, ९ शौर्य, १० भक्तिमत्त्व ११ कृतज्ञता १२ शरणागतावर दया, १३ क्रोधराहित्य व १४ स्थैर्य, हे गुण महत्त्वाचे मानले आहेत. वालिपुत्र अंगद हा या चौदा गुणांनीं संपन्न होता (वा रा किष्किंधा सर्ग, ५४)

**चौदा जागतिक आश्चर्ये** – १ बिनतारी तारायंत्र टेलिफोन, २ रेडिओ टेलिव्हिजन व रडार ३ विमान, ४ क्ष–किरण आणि अन्य ह्यावलेंग्थ किरण, ५ न्यूक्लिअर अनालिसिस, ६ राडयमचा शोध, ७ आगमोमाइल आणि लोकोमोटिव्ह ८ रक्तपरिवर्तन ९ नेत्र परिवर्तन, १० पेनिसिलीन आणि स्ट्रेप्टो मायसीन ११ इतर एन्टिबायोटिक्स, १२ रक्तचा शोध, १३ इलेक्ट्रॉनिक्स व्हॉल्व्ह, १३ मिसिलाज, व १४ अणु बाँब, हैड्रोजन बॉंब व पृथ्वीचे उपग्रह (Bharat year 1960)

**चौदा टाळकरी (तुकारामाचे)** — १ निळोबाराय, २ रामेश्वरभट, ३ गंगाराम मवाळ, ४ महादजी कुलकर्णी, ५ काडोपंत लोहकरे, ६ मालजी

गाडे, ७ गवरशेट वाणी, ८ मल्हारपंत कुळकर्णी, ९ अबाजीपंत लोहगावकर, १० मान्होबा, ११ संताजी जगनाडे, १२ कोंडे पाटील, १३ नावजी माळी व १४ शिवबा कासार. ( तुकारामचरित्र )

**चौदा तंतु वाद्यें** — १ वीणा, २ बीन, ३ रुद्रवीणा, ४ एकतारी, ५ सारंगी, ६ सतार, ७ सारमंडळ, ८ तबूरी, ९ सरोद, १० कोका, ११ रवाब, १२ मदनमंडळ, १३ ताऊस व १४ तुणतुणें. ( म. श. को. )

**चौदा दानें** — १ अन्नदान, २ उदकदान, ३ दीपदान, ४ तांबूलदान, ५ कमंडलुदान, ६ चमा जोडादान, ७ छत्रीदान, ८ काठीदान, ९ वस्त्रदान, १० लोहदंडदान, ११ रोगर्डीदान, १२ तिळदान, १३ चंदनदान आणि १४ पुष्पदान. असे चौदा प्रकार.

**चौदा देवनक्षत्रें** — १ कृत्तिका, २ रोहिणी, ३ मृग, ४ आर्द्रा, ५ पुनर्वसु, ६ पुष्य, ७ आश्लेषा, ८ मघा, १० उत्तरा, ११ हस्त, १२ चित्रा, १३ स्वाति व १४ विशाखा. ( तै. ब्रा. )

**चौदा दोष ( गायनाचे )** — १ शंकित, २ भीषण, ३ भीत, ४ उद्‌घुष्ट, ५ आनुनासिक, ६ काकस्वर, ७ मूर्द्धगत, ८ स्थान-विवर्जित, ९ विस्वर, १० विरस, ११ विश्लिष्ट, १२ विषमाहत, १३ व्याकुल व १४ तालहीन.

"व्याकुल तालहीन च गीतिदोषाश्चतुर्दश"

( बृहन्नारदीय-पूर्वखंड. ५०-४५ )

**चौदा दोष ( राज्यशासकांस )** — १ नास्तिकता-ईश्वर व धर्म नाहीं असें मानणें, २ अनृत, ३ क्रोध, ४ प्रमाद ( लक्ष न ठेवणें ), ५ दीर्घसूत्रता ( चेंगटपणा ), ६ ज्ञात्याचा सल्ला न घेणें, ७ आळस, ८ इंद्रियसुखाविषयीं आसक्ति, ९ अनावर द्रव्यलोभ, १० मूर्खांशीं मसलत, ११ निश्चय करून तें न करणें, १२ गुप्तता न राखणें, १३ उत्सव वगैरे न करणें व १४ एकाच वेळीं अनेकांशीं शत्रुत्व करणें. ( म. भा. सभा. ५-११२ )

**चौदा नावें चांगदेवाचीं** — चांगदेव एक महायोगी होते. योग साम-र्थ्यानें दर शंभर वर्षांनीं जुना देह टाकून नवा देह धारण केल्यावेळीं घेतलेलीं निरनिराळे चौदा नावें — १ चांगदेव, २ वटेश्वर चांगा, ३ चक्र-पाणी, ४ चांगासिद्ध, ५ शिवयोगी चांगा, ६ मणी सिद्धचांगा, ७ अनंतर

चागा, ८ नाहमा, ९ नागेश, १० मुवेश, ११ सन्यसिद्ध चागा, १२ निश्चल-दास, १३ चिंधादवीचागा व १४ वुटीचागा ( निळोनाची नाथा )

**चौदा नावें चित्रगुप्ताचीं** — १ यम, २ धर्मराज, ३ मृत्यु, ४ अन्तक, ५ वैवस्वत, ६ काल, ७ सर्वभूतक्षय, ८ औदुम्बर, ९ दध्नाय, १० नील, ११ परमेष्ठिन्, १२ वृकोदर, १३ चित्र आणि १४ चित्रगुप्त ( क्षत्रियांचा इतिहास )

**चौदा नावें मूळमायेचीं** — १ चैतन्य, २ गुणसाम्य, ३ अर्धनारी-नटेश्वर, ४ षड्गुणेश्वर, ५ प्रकृतिपुरुष, ६ शिवशक्ति, ७ शुद्धसत्त्व, ८ गुण-क्षोभिणी, ९ सत्त्व, १० रज, ११ तम, १२ मन, १३ माया आणि १४ अंतरात्मा.

मन माया अंतरात्मा । चौदा जीनसाची सीमा ।
विद्यमान ज्ञानात्मा । इतुके ठाई ( दा. बो. २०-५-१० )

**चौदा पत्री ( अनंत पूजेस )** — १ अपामार्ग, २ जाई, ३ मोगरा, ४ जास्वद, ५ विष्णुक्रांत, ६ शतपत्र, ७ अश्वत्थ, ८ औदुंबर, ९ आंबा, १० वड, ११ पारिजात, १२ करवीर, १३ आवळी व १४ केतकी.

**चौदा परम भागवत ( पुराणान्तर्गत )** — १ प्रल्हाद, २ नारद, ३ पराशर, ४ पुंडरीक, ५ व्यास, ६ अंबरीष, ७ शुक, ८ शौनक, ९ भीष्म, १० दाल्भ्य, ११ अर्जुन, १२ रुक्मांगद, १३ वसिष्ठ व १४ बिभीषण.

**चौदा पार्षदगण श्रीविष्णूचे** — १ नंद, २ सुनंद, ३ बल, ४ प्रबल, ५ अर्हण, ६ विधाता, ७ जय, ८ विजय, ९ चंड, १० प्रचंड, ११ भद्र, १२ सुभद्र, १३ कुमुद व १४ कुमुदाक्ष.

चंड प्रचंड सुशील भद्र सुभद्र, पुण्यशील ।
कुमुद कुमुदाक्ष सकळ हा पार्षदमेळ श्रीहरीचा ॥
( चतुःश्लोकी भागवत )

**चौदा पुष्पें ( अनंत पूजेस )** — १ पद्म, २ जाति, ३ चंपक, ४ कल्हार, ५ कनकी, ६ बकुळ, ७ शतपुष्प, ८ पुन्नाग, ९ करवीर, १० धत्तूर, ११ कुंद, १२ मल्लिका, १३ मालती व १४ कर्णिका. हीं चौदा पुष्पें अनंत पूजेस लागतात.

**चौदा प्रकारचे जप** — १ नित्यजप, २ नैमित्तिक जप, ३ काम्यजप, ४ निषिद्ध जप, ५ प्रायश्चित्त जप, ६ अचल जप, ७ चल जप, ८ वाचिक जप, ९ उपांशु जप, १० भ्रमर जप, ११ मानस जप, १२ अखंड जप, १३ अजपा जप आणि १४ प्रदक्षिण जप.

**चौदा प्रकारचा भूतसमुदाय** — १ सिद्ध, २ गुह्यक, ३ गंधर्व, ४ यक्ष, ५ राक्षस, ६ सर्प, ७ विद्याधर, ८ पिशाच–या आठ देवयोनि आणि ९ सरीसृप, १० वानर, ११ पशु, १२ मृग (जंगली प्राणी) १३ पक्षी–या पाच तिर्यग् योनि व १४ मनुष्य योनि. अशा चौदा प्रकारचा भूतसमुदाय अथवा प्राणिमात्र होत. (वि पु. अ. ३)

**चौदा प्रकार यज्ञाचे** — १ अग्निष्टोम, २ अत्यग्निष्टोम, ३ उक्थ, ४ षोडशी, ५ वाजपेय, ६ अतिरात्र, ७ आप्तोर्याम, हे सात सोमसंस्था आणि ८ अग्निहोत्र, ९ दर्शपूर्णमास, १० आग्रयण, ११ पिण्डपितृयज्ञ, १२ चातुर्मास्य, १३ निरूढ पशुबंध आणि १४ सौत्रामणि. अशा सात हविर्यज्ञ संस्था मिळून चौदा प्रकार होत.

**चौदा प्रकार रुद्राक्षाचे** — एक ते चौदा मुख असलेल्या रुद्राक्षांची चौदा नावें क्रमानें — १ शिव, २ देवदेवेश्वर, ३ अनल, ४ ब्रह्मा, ५ कालाग्निरुद्र, ६ कार्तिकेय, ७ अनङ्ग, ८ विनायक, ९ भैरव, १० जनार्दन, ११ रुद्र, १२ आदित्य, १३ विश्वेदेव व १४ परम–शिव. (शिव पु विद्येश्वर संहिता अ. २५)

**चौदा प्रकारच्या शालिग्राम शिळा** — १ प्रलंबघ्न, २ पुंडरीक, ३ वैकुंठ, ४ मधुसूदन, ५ सुदर्शन, ६ नर ७ राम, ८ लक्ष्मीनारायण, ९ वारनारायण, १० क्षीराब्धिशयन, ११ माधव, १२ हयग्रीव, १३ परमेष्ठी व १४ विष्वक्सेन. असे एक चक्र असलेले शालिग्रामाचे चौदा प्रकार माध्व संप्रदायात शालिग्रामपूजनाचे विशेष महत्त्व मानले आहे

"विष्वक्सेनश्च विज्ञेया एकचक्राश्चतुर्दश ।" (द्वैतसिद्धान्त केसरी)

**चौदा प्राकृत भाषा** — १ शौरसेनी, २ महाराष्ट्री, ३ मागधी, ४ अर्धमागधी, ५ प्राच्य किंवा गौडी, ६ अवन्तिका, ७ दाक्षिणात्य ८ शाकरी, ९ बाल्हिकी, १० द्राविडी, ११ आभीरी, १२ चाण्डाली, १३ शाबरी व १४ पैशाची. (भारतीय साम्राज्य)

**चौदा प्रांत भाषा** — १ आसामी, २ बंगाली, ३ गुजराथी, ४ हिंदी, ५ कानडी, ६ काश्मिरी, ७ मल्याळी, ८ मराठी, ९ ओरिया, १० पंजाबी, ११ संस्कृत, १२ तामिळ, १३ तेलगु व १४ उर्दू. या चौदा प्रमुख भाषा प्रांतभाषा म्हणून भारतीय घटनेने मान्य केल्या आहेत. अनेक पोटभाषा मिळून एकंदर भारतात २५० वर भाषा प्रचलित आहेत (हिंदी राष्ट्रभाषा) वेगळे साहित्य असल्यामुळे इंग्रजी व सिंधी या दोन भाषांस पुढे प्रमाणात मान्यता दिली आहे.

**चौदा प्रमुख नाड्या** — १ सुषुम्ना, २ इडा, ३ पिंगला, ४ कुहू, ५ गांधारी, ६ हस्तिजिव्हा, ७ सरस्वती, ८ पूषा, ९ पयस्विनी, १० शंखिनी, ११ यशस्विनी, १२ वरुणा, १३ विश्वोदरा आणि १४ अलम्बुषा (योगशास्त्र)

**चौदा प्रमुख स्रोतसें** (कलाघटित सूक्ष्म छिद्रावयव) — १ प्राणवह २ उदकवह, ३ अन्नवह, ४ रसवह, ५ रक्तवह, ६ मांसवह, ७ मेदोवह, ८ अस्थिवह, ९ मज्जावह, १० शुक्रवह, १२ आर्तववह, १३ पुरीषवह, व १४ स्वेदवह. शरीरात उत्पन्न होणाऱ्या असंख्य भावांचे उत्पादन व वहन करणाऱ्या असंख्य स्रोतसांत चौदा प्रमुख स्रोतसें शास्त्रकारांनी वर्णिली आहेत.

**चौदा मनु** — १ स्वायंभुव, २ स्वारोचिष, ३ उत्तममनु, ४ तामसमनु, ५ रैवत, ६ चाक्षुष, ७ वैवस्वत, ८ सावर्णि, ९ दक्षसावर्णि, १० ब्रह्मसावर्णि, ११ धर्मसावर्णि, १२ रुद्रसावर्णि, १३ देवसावर्णि व १४ इंद्रसावर्णि. सृष्टिचक्रात असलेली,[1] लोकस्थिति कांहीं कालानें बिघडते व पुन्हा ती ताळ्यावर आणण्यासाठीं जुळवाजुळव होते. हा जो जुळवाजुळव होऊन मोडेपर्यंतचा काल त्यास मन्वन्तर म्हणतात. त्या मन्वन्तराचा अधिपति तो मनु. असे चौदा मनु आहेत, अशी कल्पना आहे. ( भागवत स्कंध ८–१३ )

**चौदा मन्वन्तरें** — १ स्वायंभुव, २ स्वारोचिष, ३ उत्तम, ४ तामस, ५ रैवत, ६ चाक्षुष, ७ वैवस्वत, ८ सावर्णी, ९ धर्म, १० सावर्णिक, ११ पिशंग, १२ अपिशगाम, १३ शबल आणि १४ वर्णक. ब्रह्मदेवाचें एक अहोरात्र म्हणजे कल्प, असे तीस कल्प सांगितले आहेत. एका कल्पात चौदा मन्वन्तरें होतात. सध्या चालू असलेल्या वाराह कल्पातल्या सातव्या मन्वन्तराचें नाव वैवस्वत आहे. ( लिंगपुराण अ. ७–२२–२३ )

**चौदा मन्वतरावतार** — १ यज्ञ, २ विभु, ३ सत्यसेन, ४ हरि, ५ वैकुंठ, ६ अजित, ७ वामन, ८ सार्वभौम, ९ ऋषभ, १० विष्वक्सेन, ११ धर्मसेतु, १२ सुदामा, १३ योगेश्वर व १४ बृहद्भानु.

( कल्याण–भक्ति–अंक )

**चौदा माहेश्वरी सूत्रें** — १ अइउण्, २ ऋऌक्, ३ एओङ्, ४ एऔच्, ५ हयवरट्, ६ लण्, ७ ञमङणनम्, ८ झभञ्, ९ घढधष्, १० जबगडदश्, ११ खफछठथचटतव्, १२ कपय्, १३ शषसर् आणि १४ हल्. हीं मूळ सूत्रें पाणिनीनें अठ्ठावीस दिवस तप करून शंकराकडून मिळविलीं. ( भ. प्रतिसर्ग ४–३० ) पाणिनीच्या कठोर तपामुळें भगवान् शंकरानें प्रसन्न होऊन ताण्डव नृत्य करीत असताना जो डमरू वाजविला त्यातून निघालेल्या चौदा ध्वनि–नादामुळें हीं मूळ चौदा सूत्रें ध्वनिरूपानें निघालीं.

" नृत्तावसाने नटराजराजो ननाद ढक्का नव पञ्चवारम् ॥ "

( नन्दिकेश्वर कारिका )

**चौदा यज्ञ** ( गीतोक्त ) — १ ब्रह्मयज्ञ, २ द्रव्ययज्ञ, ३ देवयज्ञ, ४ ज्ञानेंद्रिययज्ञ, ५ विषययज्ञ, ६ स्वाध्याय–ज्ञानयज्ञ, ७ प्राणयज्ञ, ८ अपान-

यज्ञ, ९ प्राणापानयज्ञ, १० आतरपानयज्ञ, ११ योगयज्ञ, १२ तपोयज्ञ, १३ जपयज्ञ व १४ इंद्रियप्राण–कर्मयज्ञ. या सर्वांत जपयज्ञ महत्त्वाचा होय. (भ. गी अ. ४ श्लोक २४ ते ३२)

**चौदा यमधर्म** — १ यम, २ धर्मराज, ३ मृत्यु, ४ अंतक, ५ वैवस्वत, ६ नील, ७ दध्न, ८ काल, ९ सर्वभूत, १० परमेष्ठी, ११ वृकोदर १२ औदुंबर, १३ चित्र व १४ चित्रगुप्त. (तत्त्व–निज–बोध)

**चौदा रत्नें** — (अ) देव आणि दानव यानीं समुद्रमथन करून चौदा रत्नें अथवा मूल्यवान् वस्तु काढल्या. त्या—१ लक्ष्मी, २ कौस्तुभ, ३ पारिजातक, ४ सुरा, ५ धन्वंतरी, ६ चंद्र, ७ कामधेनु, ८ ऐरावत, ९ रंभा (आदि अप्सरा), १० उच्चैःश्रवा नामक सप्तमुखी अश्व (हा श्वेतवर्ण व उन्नतकर्ण असा होता), ११ कालकूट विष, १२ शार्ङ्ग धनुष्य, १३ पांचजन्य शंख व १४ अमृत होय. पद्यरावें रत्न–दाता

लक्ष्मी कौस्तुभपारिजातकसुरा धन्वंतरिश्चंद्रमाः
गावः कामदुघाः सुरेश्वरगजो रम्भादिदेवाङ्गनाः ।
अश्वः सप्तमुखो विषं हरिधनुः शङ्खोऽमृतं चाम्बुधेः
रत्नानीह चतुर्दश प्रतिदिनं कुर्वन्तु मे मङ्गलम् ॥ (मंगलाष्टक)

(आ) प्रत्येक जातींतील श्रेष्ठ वस्तूला रत्न अशी संज्ञा आहे. अशीं चौदा प्रकारचीं रत्नें पुराणांत वर्णिलीं आहेत तीं.—१ हत्ती, २ घोडा, ३ रथ, ४ स्त्री, ५ पुरुष, ६ कोश (धन), ७ पुष्पमाला, ८ वस्त्र, ९ वृक्षराजि, १० शक्ति, ११ पाश, १२ मणि, १३ छत्र व १४ विमान.

गजवाजिरथस्त्रीषु निधिमाल्याम्बरद्रुमाः ।
शक्तिः पाशः मणिः छत्रं विमानानि चतुर्दश ॥ (सु.)
जातौ जातौ यदुत्कृष्टं तद्रत्नमभिधीयते । (मल्लिनाथ)

**चौदा रत्नें वेदाब्धिमंथनांतून निघालेलीं** — १ विष–काम, २ मणि–अर्थ, ३ रंभा–नरकप्रदवेश्या, ४ वाजी–उच्चैःश्रवा (गमनशील सूर्य), ५ श्री–शक्ति, ६ वारुणी–अभिमान, ७ धन्वंतरि–विष्णु, ८ शंख–मोक्ष, ९ धेनु–धर्म, १० धनु–मर्त्य–युद्ध–संघर्ष, ११ चंद्र–आल्हाद तत्त्व शिव, १२ कल्पवृक्ष–स्वर्ग (निर्वाणभोग), १३ गज ऐरावत–गणेश गजानन आणि १४ अमृत–क्रिया. (कल्याण नोव्हेंबर १९६०)

**चौदा रोगभेद** — १ सहजरोग, २ गर्भजरोग, ३ जातजातरोग, ४ पीडाजनितरोग, ५ कालरोग, ६ प्रभावजरोग, ७ स्वभावजरोग, ८ देशज रोग, ९ आगतुकरोग, १० कायिकरोग, ११ आतररोग, १२ कर्मजरोग, १३ दोषजरोग आणि १४ कर्मदोषजरोग (नूतनामृतसागर)

**चौदा लाभ शिक्षा धारणाने प्राप्त होणारे** — १ निष्णातता, २ जीवनशक्ति, ३ दीर्घायुष्य, ४ बल, ५ तेज, ६ अन्न, ७ धन, ८ सुमन, ९ दृष्टि, १९ देवताप्रसाद ११ यश, १२ प्रजननशक्ति, १३ सुप्रजा आणि १४ उत्तम वीर्य (प्रेरणा शके १८७१ अंक २)

**चौदा वाचा दोष** — १ पद्यातील प्रयोग गद्यात व गद्यातील प्रयोग पद्यात करणे, २ नाददोष, ३ क्रमदोष, ४ पददोष, ५ वाक्यदोष, ६ शक्ति दोष, ७ सामर्थ्यदोष, ८ गुणदोष ९ प्रसाददोष, १० माधुर्य व ओजदोष, ११ अर्थदोष, १२ उपदेशदोष, १३ क्रियादोष व १४ अकांक्षा दोष (चातुर्यचंद्रोदय)

**चौदा विद्या** — (अ) १ ऋग्वेद, २ यजुर्वेद, ३ सामवेद, ४ अथर्व वेद हे चार वेद व १ छंद, २ शिक्षा ३ व्याकरण, ४ निरुक्त, ५ ज्योतिष व ६ कल्प–ही सहा वेदांगे आणि १ न्याय, २ मीमांसा, ३ पुराण व ४ धर्मशास्त्र–ही सर्व मिळून चौदा विद्या होत

अङ्गानि वेदाश्चत्वारो मीमांसा न्यायविस्तर ।
पुराण धर्मशास्त्र च विद्यास्त्वेता चतुर्दश ॥ (भ ब्राह्म २ ६)

(आ) १ आत्मज्ञान, २ वेदपठण, ३ धनुर्विद्या ४ लिहिणे, ५ गणित, ६ पोहणे, ७ विणण, ८ शस्त्र धरण, ९ वैद्यक, १० ज्योतिष, ११ रमल विद्या, १२ सूपशास्त्र १३ गायन व १४ गारुड (मूळ स्तंभ,) (इ) १ ब्रह्मज्ञान, २ रसायन ३ श्रुतिकथा ४ वैद्यक, ५ नाट्य, ६ ज्योतिष, ७ व्याकरण, ८ धनर्विद्या ९ जलतरण, १० कामशास्त्र, ११ सामुद्रिकशास्त्र, १२ तन्त्रशास्त्र, १३ मन्त्रशास्त्र आणि १४ परस्वहरण, (चौर्य)

ब्रह्मज्ञान रसायन स्वरगर वैद्य नाट्य ज्योतिष ।
व्याकरण च धनुर्धर जलतर काम च सामुद्रिकम् ।
तन्त्र मन्त्र तथा परस्वहरण एत च चातुर्दशम् ॥ (सु.)

चालू युगात जाहिरात ही पंधरावी विद्या आहे (कळकर)

**चौदा वेग मानव शरीरातले** — १ अधो वायुवेग, २ रेचन (मळ) वेग, ३ मूत्रवेग, ४ ढेकर, ५ शिंक, ६ तृषा, ७ क्षुधा, ८ निद्रा, ९ खोकला. १० श्रमजनित श्वासवेग, ११ जांभई, १२ अश्रुवेग, १३ वमन (ओकारी) आणि १४ कामवेग. या वेगांचा अवरोध केला असता शरीरात विकृति निर्माण होते. (नूतनामृत सागर)

**चौदा शिलाशासन लेख व विषय (अशोकाचे)** — १ अहिंसा, २ धार्मिक कृत्यें, ३ अधिकाऱ्यांची पंचवार्षिक फिरती, ४ धर्माचरण, ५ धर्म महासभा, ६ कामाचा उरक, ७ धार्मिक गुण, ८ धर्मयात्रा, ९ मंगल समारंभ, १० यश व कीर्ति, ११ दानधर्म, १२ परमतसहिष्णुता, १३ धर्मविजय व १४ उपसंहार. असे चौदा महत्त्वाचे शिलाशासन लेख सर्व भारतात अनेक ठिकाणीं आढळले असून त्यावरून भारताच्या प्राचीन इतिहासाची महत्त्वाची माहिती मिळते. (म. ज्ञा. कोश. विभाग ७)

**चौदा शुभयोग** — १ आनंद, २ प्रजापति, ३ सौम्य, ४ ध्वज, ५ श्रीवत्स, ६ छत्र. ७ मित्र, ८ मानस, ९ सिद्धि, १० शुभ, ११ अमृत, १२ मातंग, १३ स्थिर व १४ वर्धमान. हे चौदा संपूर्ण शुभयोग मानले आहेत. (ज्योतिष)

**चौदा शैव (वेदकालीन)** — १ दुर्वास, २ विश्वामित्र, ३ चतुरानन, ४ मार्कंडेय, ५ इंद्र, ६ बाणासुर, ७ नारायण, ८ कार्तिकेय, ९ दधिचि, १० श्रीराम, ११ कण्व, १२ भार्गव, १३ बृहस्पति व १४ गौतम. (दे मा. अ. १)

**चौदा समाधिस्थानें चांगदेवाचीं** — १ ब्रह्मगिरि, २ पुण्यस्तंभ, ३ नारायण डोह, ४ गिरनार, ५ निर्मळ, ६ प्रयाग, ७ निर्गुंद, ८ सेतुबंध, ९ जगन्नाथपुरी, १० मणिपुरी, ११ चंद्रगिरि, १२ शरयूतीर, १३ अविमुक्त क्षेत्र (वाराणशी) व १४ गोदातीरीं पुणतांबें. चांगदेव महायोगी होते. दर चवदा वर्षांनीं योगसामर्थ्यांनें जुना देह टाकून नवा देह धारण करीत. अशा रीतीनें ते चवदाश वर्षे जगले. शेवटची समाधि पुणतांबें येथ गोदातीरीं आहे.

**चौदा सहजप्रवृत्ति व त्यांच्या जोडीनें प्रगट होणाऱ्या भावना** — १ विमोचन प्रवृत्ति–भीति, २ युद्ध प्रवृत्ति–राग, ३ जुगुप्सा प्रवृत्ति–

तिरस्कार, ४ वात्सल्य प्रवृत्ति–मृदुभाव, ५ याचना प्रवृत्ति–आर्तभाव, ६ समोग प्रवृत्ति–काममाव, ७ आत्मसमर्पण प्रवृत्ति–हीनभाव, ८ जिज्ञासा प्रवृत्ति–आश्चर्य, ९ आत्मविधान प्रवृत्ति–अहभाव, १० सघ प्रवृत्ति–एकाकी भाव, ११ अन्नसाधन प्रवृत्ति–क्षुधा, १२ निर्माण प्रवृत्ति–कृतभाव, १३ सपादन प्रवृत्ति–स्वाम्यभाव व १४ हास्य प्रवृत्ति–विनोदभाव ( मानसशास्त्र-प्रवेश )

चादा हेर प्राणिमात्राच्या वर्तनावर देखरेख करणारे — १ सूर्य, २ चद्र, ३ वायु, ४ अग्नि, ५ आकाश, ६ भूमि, ७ जल, ८ अत करण, ९ यम, १० दिवस ११ रात्र, १२ सूर्योदय व १३ सूर्यास्त समयाचे सधिकाल आणि १४ धर्म

आदित्यचद्रावनिलोऽनलश्च द्यौर्भूमिरापो हृदय यमश्च ।
अहश्च रात्रिश्च उभे च संध्ये धर्मो हि जानाति नरस्य वृत्तम् ( म भा. आदि ७४–३० )

**पधरा कौरवाचे प्रमुख साह्यकर्ते** — १ भगदत्त, २ भूरिश्रवा, ३ शल्य ४ कृतवमा, ५ जयद्रथ, ६ सुदक्षिण, ७ नील, ८ विन्द व अनुविन्द ९ केकय, १० बृहद्बल, ११ शकुनि, १२ बाल्हिक, १३ कर्ण, १४ अलम्बुष, ( राक्षस ) व १५ संशप्तकगण, ( म भा उद्योग अ १९ )

**पधरा तत्त्वें स्थूल शरीराचीं** — १ ते ५ पच ज्ञानेंद्रिय, ६ ते १० पचकर्मेंद्रिय आणि ११ ते १५ पचविषय हीं मिळून पधरा तत्त्वाचा स्थूल देह निमाण झाला आहे

**पधरा तेजस्वी तारे** — तारे व इतर आकाशस्थ ज्योति असख्य असल्या तरी त्यात अधिक तेजस्वी अस पधरा तारे आहत त्याचीं नावें — व्याध, २ अगस्ति, ३ मित्र, ४ अभिजित्, ५ ब्रह्महृदय, ६ स्वाती, ७ नील, ८ प्रश्वा, ९ अशिर, १० ब्रह्मा, ११ श्रवण, १२ आहत, १३ रोहिणी, १४ चित्रा, व १५ ज्येष्ठा ( म श का २० )

**पधरा नावें मायेचीं** — १ माया, २ अविद्या, ३ प्रकृति, ४ शक्ति, ५ सत्या, ६ मूला, ७ तूला, ८ योनि, ९ अव्यक्त, १० अव्याकृत, ११ धना, १२ अज्ञान, १३ तम, १४ तुच्छा आणि १५ अनिर्वचनीया ( तत्त्व-निज-विवक )

**पधरा प्रकार नमनाचे** — १ दडवत, २ रामराम, ३ मुजरा, ४ सलाम, ५ कुरनिसात, ६ कुरनिस, ७ अभिनदन, ८ आदेश, ९ जय गोपाळ, १० जोहार, ११ आशीवाद, १२ जय सीताराम, १३ शिरसाष्टाग, १४ नमस्कार व १५ साष्टाग नमस्कार ( शब्दरत्नावली ) आधुनिक-हस्त दोलन हा सोळावा प्रकार होय

**पधरा प्रतिष्ठा** — १ मान, २ क्षात, ३ पत, ४ लौकिक ५ प्रसिद्धि, ६ बहुमानाच्या जागीं स्थापना, ७ देवालयाच्या सन्मानाथ उभारलेल्या स्मारकाची स्थापना, ८ देवमूर्तीचा यथाविधि स्थापना, ९ वास्तुशाति, १० स्वत च घर असणें, ११ देवाच उपासन इत्यादि, १२ सालकृत कन्यादान, १३ आयुष्यात स्थिर व स्थायिक होणें, १४ टापण नाव व सभा वगैरे ठिकाणीं वळून जाण्याचा पोषाख आणि १५ एखादी सन्माननीय पदवी ( म श को )

**पंधरा प्रमुख गंधर्व** — १ विराध, २ तुंबरु, ३ दनु, ४ चित्ररथ, ५ धृतराष्ट्र, ६ किशोर, ७ हूहू, ८ हाहा, ९ विद्याधर, १० उग्रसेन, ११ विश्वावसु, १२ परावसु, १३ चित्रसेन, १४ गोपाल व १५ बल.

'चित्रसेनश्च गोपालो बल पञ्चदश स्मृता ॥' (ग. ब्रह्म ९ ३)

**पंधरा मुख्य प्रकार औषधींचे (आयुर्वेद)** — १ घृत, २ तैल, ३ कषाय, ४ गुटिका, ५ मोदक, ६ पुटपाक, ७ चूर्ण, ८ कल्क, ९ स्वरस, १० लेह ११ अवलेह, १२ यवागू, १३ अरिष्ट, १४ आसव व १५ चूर्णारिष्ट. (म. ज्ञा को वि. ५)

**पंधरा स्थितप्रज्ञाचीं लक्षणें** — १ कामनात्याग, २ आत्मसंतुष्ट, ३ दु खानें उदास होत नाहीं, ४ सुखाची आसक्ति नाहीं, ५ प्रीति, भय व क्रोध यांपासून अलिप्त, ६ ममत्वत्याग, ७ आसक्तिरहित ८ शुभप्राप्तीचा आनंद नाहीं, ९ अशुभाचा द्वेष नाहीं, १० इंद्रियनिग्रह करून परमेश्वरपरायण, ११ संयमी, १२ प्रसन्नचित्त, १३ भोगासंबंधी उदासीन, १४ स्वस्वरूपीं स्थिर, १५ कामना, ममता व अहंकार वगैरेंचा त्याग, निरिच्छता. (म गीता २-५५-७१)

# १६

**षोडशाक्षरी मंत्र** — (अ) " हरेराम हरेराम रामराम हरेहरे । "

(आ) " हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरेहरे । "

इति षोडशकं नाम्ना कलिकल्मषनाशनम् ॥

या मंत्राच्या जपानें सर्व पापांचा नाश होतो असें कलियुगांतील महान् साधन म्हणून हिरण्यगर्भानें नारदास उपदेशिलें आहे (कलि–संतरणोपनिषद्).

**षोडशोपचार (पूजेचे)** — १ आवाहन, २ आसन, ३ पाद्य, ४ अर्घ्य, ५ आचमन, ६ स्नान, ७ वस्त्र, ८ यज्ञोपवीत, ९ गंध, १० पुष्प, ११ धूप, १२ दीप, १३ नैवेद्य, १४ नमस्कार, १५ प्रदक्षिणा व १६ मंत्र पुष्प (पृथ्वीचे मंत्र) "समर्पण." (मेरुतंत्र प्रकाश ११)

**षोडशावतार श्रीदत्तात्रयाचे** — १ योगिराज, २ अत्रिवरद, ३ दत्तात्रेय, ४ कालाग्निशमन, ५ योगीजन वल्लभ, ६ लीला विश्वंभर, ७ सिद्धराज, ८ ज्ञानसागर, ९ विश्वंभर, १० मायामुक्त, ११ मायायुक्त, १२ आदिगुरु, १३ शिवरूप, १४ देवदेव, १५ दिगंबर आणि १६ कृष्णश्याम कमलनयन ( माऊली विशेषांक १९६० )

**षोडशकला ( चंद्राच्या )** — १ शंखिनी, २ पद्मिनी, ३ लक्ष्मणी, ४ कामिनी, ५ पोषिणी, ६ पुष्टिवर्धनी, ७ आल्हादिनी, ८ अश्वपदिनी, ९ व्यापिनी, १० प्रमोदिनी, ११ मोहिनी, १२ प्रभा, १३ क्षीरवर्धनी, १४ मेघवर्धनी, १५ विकाशिनी, व १६ शौनिनी (क. क.); (आ) १ अमृता, २ मानदा, ३ पूषा, ४ तुष्टि, ५ पुष्टि, ६ रति, ७ धृति, ८ शशिनी, ९ चंद्रिका, १० कांति, ११ ज्योत्स्ना, १२ श्री, १३ प्रीति, १४ अंगदा, १५ पूर्णा आणि १६ पूर्णामृता.

> अमृता मानदा पूषा तुष्टिः पुष्टी रतिर्धृतिः ।
> शशिनी चंद्रिका कांतिर्ज्योत्स्ना श्रीः प्रीतिरेव च ।
> अंगदा च तथा पूर्णाऽमृता षोडश वै कलाः ॥

अशा चंद्राच्या सोळा कला असून सतरावी अमृतकळा म्हणून मानिली आहे.

> ऐशा तुझ्या षोडशकला । सत्रावी बोलिजे अमृतकळा ॥
>
> ( काशीखंड–१७.१९ )

**षोडश दर्शनें ( तत्त्वज्ञानविषयक )** — १ चार्वाक, २ बौद्ध ( माध्यमिक, योगाचार, सौत्रान्तिक व वैभाषिक या चार पोटभेदांसह ) ३ जैन किंवा आर्हत, ४ रामानुज, ( विशिष्टाद्वैतवादी ), ५ माध्व किंवा पूर्णप्रज्ञ ( द्वैतवादी ), ६ नकुलीश पाशुपत, ७ शैव, ८ प्रत्यभिज्ञा, ९ रसेश्वर, १० औलुक्य किंवा काणाद अथवा वैशेषिक, ११ अक्षपाद किंवा गौतम अथवा न्याय, १२ जैमिनी किंवा पूर्वमीमांसा, १३ पाणिनीय–व्याकरण दर्शन, १४ सांख्य किंवा कापिल, १५ पातंजल किंवा योग आणि १६ शाङ्कर किंवा अद्वैत. निरनिराळ्या आस्तिक आणि नास्तिक तत्त्वज्ञान विषयक विचारांचे हे सोळा दर्शन ग्रंथ होत. ( सर्वदर्शनसंग्रह )

**सोळा अंगें अथवा मूलाधार ( हिंदु संस्कृतीचे )** — १ सदाचार, २ सद्विचार, ३ वर्णाश्रमधर्म, ४ सतीत्व प्राधान्य, ५ आश्रम धर्म, ६ देवावर विश्वास, ७ परमेश्वरी अवतारावर विश्वास, ८ योग आणि भक्तिमूलक उपासना, ९ मूर्तिपूजा, १० शुद्धाशुद्ध विवेक, ११ यज्ञ, १२ वेद, स्मृति पुराणें यांवर विश्वास, १३ कर्म व संस्कार यांवर निष्ठा, १४ पुनर्जन्म, १५ सगुण व निर्गुण उपासना आणि १६ जीवात्मा कैवल्य प्राप्ति. ( कल्याण हिंदु सं. अंक )

**सोळा अंगें मंत्रयोगाचीं** — १ भक्ति, २ शुद्धि, ३ आसन, ४ पंचांग सेवन, (१ उपास्य देवतेची गीता, २ सहस्रनाम, ३ स्तव, ४ कवच व ५ हृदय ) ५ आचार, ६ धारणा, ७ दिव्यदेश सेवन, ८ प्राणक्रिया, ९ मुद्रा, १० तर्पण, ११ हवन, १२ बलि, १३ याग, १४ जप, १५ ध्यान व १६ समाधि. ( शक्तिपात रहस्य )

" प्राणक्रिया तथा मुद्रा तर्पणं हवनं बलिः ।
योगो जपस्तथा ध्यानं समाधिश्चेति षोडशः ॥ " ( योगशास्त्र )

**सोळा आणे** — सोळा आण्यांचा एक बंदा रुपया होतो. तसें कोणतेंहि काम संपूर्णपणे पूर्ण झाल्यावर उत्तम या अर्थी ' सोळा आणे ' असा संकेत मानला जातो. आता दशमानपद्धति रूढ करण्यात आल्यामुळें आणा हें नाणें व्यवहारबाह्य झालें आहे.

**सोळा आधारस्थानें ( मानवी शरीरांतील जीवनकार्य चालविणारीं )** — १ पादांगुष्ठाधार, २ मूलाधार, ३ गुदाधार, ४ मेंढ्राधार, ५ उड्डियानाधार, ६ नाभ्याधार, ७ हृदयाधार, ८ कंठाधार, ९ घंटिकाधार, १० तस्वाधार, ११ जिह्वामूलाधार, १२ ऊर्ध्व दंतमूलाधार १३ नासाग्राधार, १४ भ्रूमध्याधार, १५ ललाटाधार व १६ ब्रह्मरंध्राधार.

षट् चक्रं षोडशाधारं द्विलक्ष्यं व्योमपञ्चकम् ।
स्वदेहे ये न जानन्ति कथं सिध्यन्ति योगिनः ॥ (गोरक्षशतक )

**सोळा आश्चर्ये ( गीतेंतील )** — १ अनंत अर्थ, २ ज्ञान, क्रिया, सर्वनाम आणि अव्यय यांचें आधिक्य, ३ मनोद्गार, ४ कैंस्यवधि गूढें, ५ सर्व धातूंची प्राप्ति, ६ सुरूप लिंगांग, ७ सुग्मता, ८ स्पष्ट शब्दांत नामोच्चार, ९ अर्थचमत्कार, १० धर्म्य दिव्यार्थी इतर ग्रंथांशी साम्यता,

११ सव शब्दशास्त्राची उपपत्ति, १२ सव शास्त्रशार्चा एकवाक्यता, १३ सव तत्वेत्त्याची निष्ठा, १४ गृहाथ, १५ दुनाना अगम्य आणि १६ सव वर्णो धाराचा समावश (कल्याण-श्रीमद्भगवद्गीतांक)

**सोळा आयुर्वेद (प्राचीन) प्रथकार व त्याचे ग्रंथ अनुक्रमें —** १ धन्वन्तरि-चिकित्सातत्वविज्ञान, २ दिवोदास-चिकित्सादर्पण, ३ काशी राज-दिव्यचिकित्साकौमुदी, ४-५ दोघ अश्विनी कुमार-चिकित्सासारतन्त्र, ६ नकुल-वैद्यकसर्वस्व, ७ सहदेव-व्याधिसिंधुविमर्दन, ८ यमराज-ज्ञानार्णव, ९ च्यवन-जीवदान, १० जनक-वैद्यसंदेहभञ्जन, ११ बुध-सर्वसार, १२ जाबाल-तन्त्रसार, १३ जाजलि-वेदाङ्गसार, १४ पैल-निदानतन्त्र, १५ करथ-सर्वधरतन्त्र आणि १६ अगस्ति-द्वैधनिर्णयतन्त्र.

> धन्वन्तरिर्दिवोदास काशीराजाऽश्विनासुतौ ।
> नकुल सहदेवोऽर्किश्च्यवनो जनको बुध ॥
> जाबालो जाजलि पैल करथोऽगस्त्य एव च ।
> एते वेदाङ्गवेदज्ञ षोडश व्याधिनाशका ॥ (ब्रह्मवैवर्त ब्रह्मखंड अ १६)

**सोळा कला व त्याच्या नियामक सोळा देवता —** १ प्राण-वायु २ श्रद्धा-भारती, ३ आकाश-गणेश, ४वायु-प्रवाह वायु, ५ अग्नि-अग्नि, ६ जल-वरुण, ७ पृथिवी-शनैश्चर, ८ इंद्रिय सयादिदेवता, ९ मन-रुद्र अथवा अनिरुद्ध, १० अन्न-सोम, ११ वीर्य-वरुण, १२ तप-पावक, १३ मन्त्र-स्वाहा, १४ कर्म-पुष्कर, १५ लोक-पर्जन्य व १६ नाम-उषा

"परिदृष्ट इमा कला पुरुषायणा पुरुष प्राप्यास्त गच्छन्ति" (प्रश्नोपनिषद्)

**सोळा कला पुरुषाच्या (वेदान्तशास्त्र) —** १ प्राण, २ श्रद्धा, ३ आकाश ४ वायु ५ तेज ६ आप, ७ पृथ्वी, ८ इंद्रियें, ९ मन, १० अन्न ११ वीर्य, १२ तप, १३ मन्त्र, १४ कर्म, १५ लोक व १६ नाम अशा सोळा तत्त्वानीं पुरुष व्याप्त असतो (म भा शांति अ ३०१)

**सोळा कामधेनु —** १ सुमना, २ सुनन्दा, ३ सुशीला, ४ सुरभि, ५ कपिला, ६ कपिलधारा ७ कमादनी, ८ मधुगा, ९ सिद्ध, १० पूर्ण भद्रा, ११ महासिद्धि, १२ कामभूता, १३ ब्रह्मघातिनी, १४ मोक्षदायनी, १५ वसुमती व १६ निपदा अथवा प्रणवी या सोळा कामधेनु दधि, समुद्रमथ नातून निघाल्या अशी कथा आहे (काशीखंड ६१५७)

**सोळा चिह्नें भगवंताचे चरणकमलीं असलेलीं** — १ उजवा चरण–१ चक्र, २ कमल, ३ ध्वज, ४ वज्र, ५ अङ्कुश, ६ यव, ७ स्वस्तिक, ८ ऊर्ध्वरेखा, डावा चरण–९ अष्टकोण, १० इंद्रचाप, ११ त्रिकोण, १२ कलश, १३ अर्धचंद्र, १४ अंबर, १५ मत्स्य आणि १६ गोष्पद (कल्याण वर्ष. ३२ अंक. ३)

**सोळा तिथींचे सोळा अधिपति** — १ प्रतिपदा–अग्नि, २ द्वितीया–ब्रह्मा, ३ तृतीया–यक्षराज, ४ चतुर्थी–गणेश, ५ पंचमी–नागराज, ६ षष्ठी–कार्तिकेय, ७ सप्तमी–सूर्य, ८ अष्टमी–रुद्र, ९ नवमी–दुर्गा, १० दशमी–यमराज, ११ एकादशी–विश्वेश्वर, १२ द्वादशी–विष्णु, १३ त्रयोदशी–मदन, १४ चतुर्दशी–शंकर, १५ पौर्णिमा–चंद्र व १६ अमावास्या–पितर.

देवेभ्यस्तिथयो दत्ता भास्करेण महात्मना ।

यस्यैव यद्दिनं दत्तं स तस्यैवाधिपः स्मृतः ॥ (भ. ब्रा. १०२–९).

**सोळा तेजाचीं प्रतीकें** — १ सिंह, २ वाघ, ३ सर्प, ४ अग्नि, ५ ब्राह्मण, ६ सूर्य, ७ हत्ती, ८ तरस, ९ सोनें, १० जल, ११ गाय, १२ पुरुष, १३ वृषभ, १४ वायु पर्जन्य, १५ क्षत्रिय व १६ दुन्दुभि अश्व हा तेजाची निरनिराळी प्रतीकें होत. (अथर्व–अनु. मराठी भाग २ रा)

**सोळा दुःखें अथवा दुःखकारणें (प्रपंचात)** — १ पारतन्त्र्य, २ आधि–मानसिकचिंता ३ व्याधि, ४ मानखंडन ५ शत्रु असणें, ६ कुभार्या, ७ दारिद्र्य. ८ कुग्रामवास, ९ दुर्जन सेवा, १० कन्या संतति अधिक असणें, ११ म्हातारपण, १२ दुसऱ्याच्या घरीं राहण्याचा प्रसंग येणें, १३ पर्जन्यकाळीं प्रवास, १४ दोन भार्या असणें, १५ दुर्गुणी नौकर आणि १६ बाईंनं नांगरानें केलेली शेती–भयाण साधनानें करावें लागणारें कोणतेंहि काम (न्यायकोश)–(कविकल्पलता)

**सोळा ध्रुवताल** — १ जयंत, २ नागर, ३ उत्साह, ४ कदंब, ५ जयमंगल, ६ मधुर, ७ निर्मल, ८ कुंतल, ९ कमला, १० चारी, ११ नंदन, १२ चंद्रशेखर, १३ कामद, १४ विजय, १५ तिलक आणि १६ ललित. (गायन प्रकाश)

**सोळा नांवें तुळशीचीं** — १ तुलसी, २ श्री, ३ आवश्यक, ४ लक्ष्मी, ५ महालक्ष्मी, ६ विद्या, ७ यशश्री, ८ धर्माधर्म, ९ देवी, १० देवदेवी,

११ सखी, १२ गुप्त, १३ भूमि, १४ अचल, १५ अमिला व १६ अमला. ( ब्रह्मांड पुराण )

**सोळा नावे श्रीविष्णूचीं व तीं घेण्याचा काळ** — १ विष्णु-औषध, २ जनार्दन-भोजन, ३ पद्मनाभ-शयन, ४ प्रजापति-विवाह, ५ चक्रधर-युद्ध, ६ त्रिविक्रम-प्रवास, ७ नारायण-अन्तकाल, ८ श्रीधर-प्रियसंग समया, ९ गोविंद-दुःस्वप्न, १० मधुसूदन-संकट, ११ नारसिंह-अरण्य, १२ जलशायिन्-भयान, १३ वराह-जलांत, १४ रघुनंदन-गमन १५ वामन-गमनकाळीं व १६ माधव-सर्वप्रसंगा ( बृहत्स्तोत्र रत्नाकर )

**सोळा भूषण शृंगार (स्त्रियांचे)** — १ पातिव्रत्य-हा जरतारी पातळ, २ सदाचार-व्यवहार-दक्षता-जरतारी चोळी, ३ शिशु संगोपन चातुर्य-कनकपट्टा ४ सासू सासऱ्यांची सेवा-कर्णभूषणें, ५ गृह-आश्रमधर्म-संपादनत्व-हस्तभूषणें, ६ निर्मल गृह व्यवस्था, ७ अतिथिसत्कार-मस्तकभूषण, ८ लेखन वाचनादिकला-मोहनमाळ, ९ ईश्वर आस्तिक्य-मंगळसूत्र, १० मृदु मंजुळ भाषण-मूदराएंडा, ११ परिस्थितीनुरूप कालक्रमण-गोठ, १२ पतिसेवा परायणत्व-कुंकुमतिलक १३ दुःखितांस साह्य-बिंदुली, १४ अढळ धैर्य-बुगडी, १५ संकटकाली वीरता-चाप आणि १६ स्वकुलधर्माभिमान-कंकण. या सोळा शृंगारांनीं युक्त असते ती जगद्वंद्य होते. ( गृहिणी रत्नमाला. वर्ष १ अंक २, १९३६ .

**सोळा पदार्थ** — १ प्रमाण, २ प्रमेय, ३ संशय, ४ प्रयोजन, ५ दृष्टांत, ६ सिद्धांत, ७ अवयव, ८ तर्क, ९ निर्णय, १० वाद, ११ जल्प, १२ वितण्डा, १३ हेत्वाभास, १४ छल, १५ जाती, व १६ निग्रहस्थान या सोळा पदार्थांचे उद्देश-लक्षण परीक्षा इत्यादींना तत्त्वज्ञान होतें. गौतमप्रणीत न्यायदर्शनांत असे सोळा पदार्थ मानले आहेत व त्यामुळें दुःख नाश होऊन निःश्रेयस मिळतें असें न्यायशास्त्र मानतें. ( न्यायशास्त्र )

**सोळा प्रतीकें लक्ष्मीचीं** — १ श्री ( लक्ष्मी ), २ भूति, ३ श्रद्धा, ४ मेधा, ५ सन्नति, ६ विजिति, ७ स्थिति, ८ धृति, ९ सिद्धि, १० शांति, ११ समृद्धि, १२ स्वाहा, १३ स्वधा, १४ संस्तुति, १५ नियति व १६ स्मृति ( म. भा. शांति. अ. २२२ )

**सोळा प्रकारच्या जपमाळा** — १ करमाला, २ वर्णमाला, ३ मणिमाला, ४ रुद्राक्ष, ५ तुळसी, ६ शख, ७ पद्मबीज, ८ जीवपुत्रक, ९ मोतीं, १० स्फटिक, ११ मणि, १२ रत्न, १३ सुवर्ण, १४ चांदी, १५ चंदन आणि १६ कुशमूळ ( दर्भमूळ ). ( श्रीगायत्रीजप–यज्ञविधि )

**सोळा प्रकारची पत्री** — १ अशोक, २ अघाडा, ३ कण्हेर, ४ चाफा, ५ जाई, ६ डाळिंब, ७ तुळस, ८ दूर्वा, ९ धोतरा, १० पुनाग (नागचाफा), ११ बकुल, १२ बेल, १३ बोर, १४ रुई, १५ विष्णुक्रांता व १६ हदगा. अशी सोळा प्रकारची पत्री मंगलागौरीच्या पूजेला लागते. ( मंत्रराज )

**सोळा प्रकारचे संधि ( तह )** — १ कपालसंधि–बरोबरीचा तह, २ उपहारसंधि–खडणी देऊन, ३ संतानसंधि–सोयरीक करून, ४ संगतसंधि–मैत्री करून, ५ काचनसंधि, ६ उपन्याससंधि–हेतु धरून, ७ प्रतिकारसंधि–परस्पर कार्य साधेल असा, ८ संयोगसंधि–सामायिक उद्देशानें, ९ पुरुषांतरसंधि–शर्त ठेवून केलेला, १० अदृष्टपुरुषसंधि–शत्रूची शर्त पतकरून, ११ आदिष्टसंधि–प्रदेश देऊन, १२ आत्मादिष्टसंधि–प्राण सरक्षण करण्याकरिता, १३ परिक्रयसंधि–सामान्याचे रक्षण व्हावें म्हणून, १४ उच्छिन्नसंधि–भूमि देऊन, १५ परभूषणसंधि–जमिनीच्या सर्व उत्पन्न देऊन, १६ स्कंधोपनेयसंधि–जमिनींतील पीक आपण वाहून नेऊन देऊन ( हितोपदेश )

**सोळा प्रमुख वैदिक छंद** — १ अत्यष्टि, २ अनुष्टुभ्, ३ अष्टि, ४ आस्तारपंक्ति, ५ उष्णिह, ६ ककुभ, ७ गायत्री, ८ जगती, ९ त्रिष्टुप्, १० पंक्ति, ११ प्रस्तार पंक्ति, १२ बृहती, १३ महापंक्ति, १४ विराज्, १५ शक्करी व १६ सतोबृहती. ( ऋग्वेददर्शन )

**सोळा प्रमुख शिष्य गौतम बुद्धाचे** — १ सारिपुत्र, २ मोग्गलान, ३ अज्ञात कौण्डिण्य, ४ महाकाश्यप, ५ महाकात्यायन, ६ आनंद, ७ अनुरुद्ध, ८ भद्दिय, ९ सुभूति, १० सोण, ११ बक्कुल, १२ उपालि, १३ स्वाती, १४ नंद, १५ सुनीत व १६ सोपाक. ( बुद्धदर्शन )

**सोळा भारतीय संवत (कालगणना)**— १ कल्पाब्द, २ सृष्टिसंवत्, ३ वामन संवत्, ४ श्रीराम संवत्, ५ श्रीकृष्ण संवत्, ६ युधिष्ठिर संवत्, ७ बौद्ध संवत्, ८ महावीर (जैन संवत्,) ९ श्रीशंकराचार्य संवत्, १० विक्रमसंवत्, ११ शालिवाहन संवत्, १२ कलचुरी संवत, १३ वल्भी, १४ नागार्जुन,

१५ नगल्या आणि १६ हर्षाब्द सवत्, (कल्याण हि. स. अंक) शिवशक हा सतरावा सवत् होय.

**सोळा माता** — १ स्तनपान करविणारी, २ गर्भधात्री, ३ भक्ष्यदात्री, ४ गुरुपत्नी, ५ इष्टदेवपत्नी, ६ सापत्नमाता, ७ कन्या, ८ गर्भस्थभगिनी, ९ स्वामिपत्नी, १० सासू, ११ आईची आई, १२ बापाची आई, १३ बन्धुपत्नी, १४ मावशी, १५ आत्या व १६ मामी.

मातुः पितुश्च भगिनी मातुलानी तथैव च ।
स्नाना वेदविहिता मातरः षोडश स्मृताः ॥ (ब्रह्मवैवर्त गणपति खंड)

**सोळा मातृका (पुण्याहवाचनांतील)** — १ गौरी, २ पद्मा, ३ शची, ४ मेधा, ५ सावित्री, ६ विजया, ७ जया, ८ देवसेना, ९ स्वधा, १० स्वाहा, ११ माता, १२ लोकमाता, १३ धृति, १४ पुष्टि, १५ तुष्टि व १६ कुलदेवता. या सोळा मातृकांचें सर्व शुभकार्यांत गणपतिपूजनाबरोबर पूजन केलें जातें.

**सोळा मुहूर्त** — १ रौद्र, २ श्वेत, ३ मैत्र, ४ चार्व, ५ जयदेव, ६ रोचन, ७ वैतुर, ८ अभिजित्, ९ रावण, १० बालव, ११ निर्भीषण, १२ नंदन, १३ याम्य, १४ सौम्य, १५ भग व १६ सावित्र. (ज्योतिष)

**सोळा राज्यें भारतीय संघराज्यान्तरगत** — १ आंध्र, २ आसाम, ३ उत्तरप्रदेश, ४ ओरिसा, ५ केरळ, ६ गुजराथ, ७ जम्मू व काश्मीर, ८ नागाप्रदेश, ९ पूर्वपंजाब, १० पश्चिम बंगाल, ११ बिहार, १२ महाराष्ट्र, १३ मद्रास, १४ मध्यप्रदेश, १५ म्हैसूर व १६ राजस्थान.

**सोळा विकारात्मक मनुष्य देह** — ५ ज्ञानेंद्रियें व त्यांचे ५ विषय (शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध) ५ कर्मेंद्रियें व १६ वें मन. असा सोळा विकारात्मक मनुष्य देह आहे असें अध्यात्मांत मानलें आहे.

**सोळा विद्या** — १ सत्यविद्या, २ दहरविद्या, ३ वैश्वानरविद्या, ४ पंचाग्निविद्या (ॐकाराचें ध्यान), ५ षोडशकला विद्या (या विद्येच्या साहाय्यानें विवेकी पुरुषास प्रत्यक्ष ब्रह्मात्मा प्रसन्न होतो), ६ दहरोपासनविद्या, ७ शाण्डिल्य विद्या, ८ पुरुषविद्या, ९ पर्यंकविद्या—पर्यंकावर बसून अभ्यास करितां करितां ब्रह्मदेवाकडे जाऊं लागतो, १० अक्षरविद्या, ११ संवर्गविद्या, १२ मधुविद्या—सूर्याची उपासना, १३ प्राणविद्या, १४ उपकोसलविद्या—उपकोसल नामक

शिष्याला सांगितलेली १५ सद्विद्या–सत्यब्रह्माचं परोक्ष ज्ञान, १६ भूमाविद्या–अपरोक्ष ज्ञान वेदान्तात (उपनिषदात) सांगितलेल्या विद्यांपैकीं या सोळा मुख्य विद्या होत ( श्रीतत्त्वसारायण रामगीता अ १७ )

**सोळा वृत्ति ( मनोव्यापार ) अंत करणाच्या** — १ संज्ञान ( चेतनभाव ), २ आज्ञान ( ईश्वरभाव ), ३ विज्ञान, ४ प्रज्ञान, ५ बुद्धि, ६ दृष्टि, ७ धृति, ८ मनन, ९ इच्छा, १० जुति ( मनाची व्यग्रता ), ११ स्मृति १२ संकल्प १३ क्रतु, १४ प्राणवृत्ति १५ विषयतृष्णा व १६ लोभ ( एतरेयोपनिषद् ५ २ )

**सोळा शृंगार** — (अ) १ मज्जन, २ चीर, ३ हार, ४ तिलक, ५ अंजन, ६ कुंडल, ७ नासामौक्तिक, ८ केशपाशरचना, ९ कंचुक, १० नूपुर, ११ सुगंध ( अंगराग ), १२ कंकण, १३ चरणराग (अलक्तक), १४ मेखलारणन ( क्षुद्रघंटिका ), १५ तांबूल आणि १६ करदर्पण (आंगठ्यात घालावयाचा एक अलंकारविशेष यावर आरसा बसविलेला असे त्यांत मुखा लोकन करता येत असे )

आदौ मज्जनचीरहारतिलकं नेत्राञ्जनं कुंडले
नासामौक्तिककेशपाशरचना सत्कंचुकं नूपुरौ ।
सौगंधं करकङ्कणं चरणयो रागो रणन्मेखला
ताम्बूलं करदर्पणं चतुरता शृंगारका षोडश । ( म. ) ( कविवल्लभदेव–पथरावे शतक )

(आ) १ मज्जन, २ वस्त्र, ३ आलक्तक, ४ केशपाश, ५ सौगंध्य, ६ भूषण, ७ मुखसुवास, ८ काजल, ९ भाषण, १० हास्य, ११ चातुर्य, १२ चालन, १३ पातिव्रत्य १४ गान १५ कटाक्ष व १६ प्रीति ( दुर्बोध शब्दकोष ) (इ) १ शौच, २ उटणें, ३ स्नान, ४ वेणीफणी, ५ वस्त्र–आभूषणें, ६ काजळ, ७ अळत्याचा रंग, ८ दंतरंजन, ९ तांबूल, १० बसंत, ११ अलंकार, १२ सुगंध, १३ पुष्पहार, १४ कुंकू, १५ तिलक व १६ हनुवटीवर गोंदणें ( तत्त्व–निज–विवेक )

**सोळा शृंगार ( हिंदी दोहरा )** — (ई) १ चार चतुष्पद, चार एकपद, चार फूल, फल चार राधाजीनें वदनपर ये सोळा सिनगार स्पष्टीकरण असें —

चार चतुष्पद १ तुरगवत्–खुराट.
२ कुरगवत्–नेत्र.
३ गज–गति.
४ सिंह–कटि.
चार खगपद १ कोकिला–स्वर.
२ भ्रमराकृति–भावई.
३ शुकचुवत्–नासिका.
४ मीनखेचनावत्–चचलता.
चार फूल १ चपकवत्–काति.
२ केतकीवत् सुगध.
३ कमलाकृति–नाभि.
४ गुलाबवत्–गाल.
चार फल १ कपित्थवत्–कुच.
२ दाडींमीबीजवत्–दत.
३ आम्रमीनापरि–हनुवटी.
४ प्रवालाप्रमाणें–अधर.

**सोळा संस्कार** — १ गर्भाधान, २ पुसवन, ३ सीमतोन्नयन, ४ जातकर्म, ५ नामकरण, ६ निष्क्रमण, ७ अन्नप्राशन, ८ चौल, ९ उपनयन, १० ते १३ वेदव्रतचतुष्टय — (१० महानाम्नीव्रत, ११ महाव्रत, १२ उपनिषद्व्रत व १३ गोदान), १४ स्नान, १५ समावर्तन आणि १६ विवाह.

गर्भाधान पुसवन सीमतोन्नयन तथा।
जातक नामसस्कारा निष्क्रमश्चान्नप्राशनम्॥
चौलकर्मोपनयन वेदव्रतचतुष्टयम्।
केशान्त स्नानमुद्वाह सस्कारा षोडशा: स्मृता॥ (ज्योतिर्मयूख)

**सोळा सांदे (सांधे) मानव शरीराचे** — १ मान, १ कबर, २ खांदे, २ कोपरे (हाताचे) २ मनगटे, २ बेंगचे, २ जानु, २ गुडघे आणि २ घोटे मिळून सोळा.

घरा सोळा खांबी। बहात्तर कोठे (कोठड्या)।
नवही दारवटे। शरीरांत द्वारें (श. स्वदेहप्रसग अभग)

**सोळा स्वर** — अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, ऌ, ॡ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः.

**सोळा स्त्री–जीवनाचे आंतर व बाह्य शृंगार – आंतर शृंगार** — १ दया, २ क्षमा, ३ शांति ४ प्रीति, ५ नीति, ६ भक्ति, ७ चातुर्य, ८ धैर्य, ९ पातिव्रत्य, १० परोपकार, ११ मनमिळाऊपणा, १२ समाधान, १३ सत्यवचन, १४ नम्रता, १५ सहिष्णुता व १६ ज्ञानलालसा. **बाह्य शृंगार** — १ चोळी, २ डोक्यावरून पदर घेणें, ३ दागिने बेतानें धारणें, ४ हळू चालणें, ५ हरिणाक्षी, ६ वेणीफणी नित्य करणें, ७ वस्त्र व्यवस्थित असणें, ८ काजळ घालणें, ९ कुंकू लावणें, १० सडपातळ असणें, ११ गोरेपण १२ अल्प निद्रा, १३ हसतमुख, १४ मधुर भाषण, १५ हात राखून खर्च करणे व १६ आदरातिथ्य राखणें. हे सोळा स्त्री जीवनाचे अनुक्रमें आंतर व बाह्य शृंगार शास्त्रकारांनीं सांगितले आहेत

" नारीणां षोडश कला शृंगाराः प्रमाणका "

(ब्रह्मवैवर्त श्रीकृष्णखंड ३८–११०)

## १७

**सतरा अक्षरी मंत्र ( खालसा पंथाचा )** — " वाहे गुरुका खालसा श्री वाहे गुरुजीकी फत्ते " परमेश्वर म्हणजे खालसा आणि परमेश्वराचा जय "

( शिखांचा इतिहास )

**सतरा तत्त्वांचें शरीर** — ५ पंचज्ञानेंद्रिय, ५ पंचकर्मेंद्रिय, ५ पंच प्राण, १ मन, आणि १ बुद्धि. या सतरा तत्त्वांच्या गटाला लिंगशरीर अथवा लिंगदेह म्हणतात त्यांत असणारा आत्मा हें अठरावें तत्त्व होय

पंचज्ञानेंद्रिय पंचकर्मेंद्रिय । पंचप्राण आणि मन बुद्धि द्वयें ।

ऐसा सतरा कळांचा समुदाये । लिंगदेह ॥ ( ज्ञानमोदक )

**सतरा ततवाद्यें (तारा व तांती लावून वाजणारीं)** — १ तंबोरा, २ तंबोरी, ३ सुरसोंग, ४ एकतारी, ५ रुद्रवीणा, ६ बीन, ७ सतार, ८ कछवा, ९ ताऊस, १० दिलरुबा, ११ सारंगी, १२ सारमंडल, १३ रबाब, १४ सुरसिंगार, १५ सरोद, १६ फिडल् व १७ तुणतुणें

**सतरा प्रकारचे गुरु** — १ गुरु, २ मंत्रगुरु, ३ यंत्रगुरु, ४ तंत्रगुरु, ५ वस्तादगुरु, ६ राजगुरु, ७ कुलगुरु, ८ मानिला गुरु, ९ विद्यागुरु, १० अविद्यागुरु. ११ असद्गुरु, १२ यतिगुरु, १३ मातागुरु, १४ पितागुरु, १५ राजगुरु, १६ देवगुरु, १७ जगद्गुरु. (दासबोध ५.२)

**सतरा प्रबंध (गीतप्रकार)** — १ धृपद, २ धमार, ३ ख्याल, ४ चीज, ५ तराणा, ६ चतरंग, ७ होरी, ८ टप्पा, ९ ठुमरी, १० सा, रे, ग, म, ११ लक्षणगीत, १२ अष्टपदी, १३ गझल, १४ अभंग, १५ रासगर्भा, १६ लावणी आणि १७ पोवाडे. (संगीतशास्त्र)

**सतरा शब्ददोष** — १ अप्रयुक्त, २ अपुष्टार्थ, ३ असमर्थ, ४ निरर्थक, ५ नेयार्थ, ६ च्युतसंस्कार, ७ संदिग्ध, ८ अप्रयोजक, ९ क्लिष्ट, १० गूढार्थ, ११ ग्राम्य, १२ अन्यार्थ, १३ अप्रतीतिक, १४ अविसृष्ट विधेयांश, १५ विरुद्धमतिकृत, १६ अश्लील व १७ परुष (श्रुतिकटु). (प्रतापरुद्र)

**सतरा जण मूढ होत** — १ उपदेशास अपात्र असलेल्यास उपदेश करणारा, २ अल्प लाभानें संतुष्ट होणारा, ३ आपला द्वेष करणाराशीहि दीर्घकाळ व्यवहार करणारा, ४ स्त्रीच्या जिवावर मोठेपणा मिळविणारा, ५ न मागण्यासारखी वस्तु मागणारा, ६ आत्मस्तुति करणारा, ७ चांगल्या कुलांतील असूनहि निंद्य कृत्य करणारा, ८ दुर्बल असूनहि बलवानाशीं वैर करणारा, ९ श्रद्धा नसलेल्यास उपदेश करणारा, १० भलतीच इच्छा करणारा, ११ सुनेच्या माहेरच्या साहाय्यानें भीतीनें पार पडला असूनहि तेथें मानमान्यतेची इच्छा करणारा, १२ सुनेची थट्टा करणारा सासरा, १३ परस्त्रीगमन करणारा, १४ वेळीं अवेळीं पत्नीची निंदा करणारा, १५ एखादी गोष्ट माहीत असूनहि आठवत नाहीं म्हणणारा, १६ याचनेनंतर आत्मप्रशंसा करणारा आणि १७ असत्य गोष्टीचें सत्यत्व प्रतिपादन करणारा. (म. भा. १७.१ ते ६)

## १८

**अष्टदश शाळा (राजी-शिवकालीन)** — १ गजशाळा, २ धान्यसंग्रह, ३ भेरीदुदुंभी, ४ यंत्रशाळा, ५ वैद्यशाळा, ६ पारोखशाळा, ७ उष्ट्र-

शाला, ८ शिबिरशाला, ९ सेन्यशाला, १० मल्लशाला, ११ रत्नशाला, १२ पाकशाला, १३ शस्त्रशाला, १४ ताम्बूलशाला, १५ रथशाला, १६ निनसखाना १७ स्यनशाला आणि १८ नाम्यशाला ( पुण्यश्लोक शिवाजी महाराज )

**अठरा ऋत्विज मनुष्यरूपी यज्ञाचे** — १-२ दान डोळे ३-४ दान कान, ५-८ दोन नाकाचा भोक, ७ एक त्वगिंद्रिय, ८-९ दोन हात, १०-११ दोनपाय, १२ एकमूत्रिय, १३ एक गुद, १४ एक मुख, १५ वागिंद्रिय, १६ मन, १७ चित्त आणि १८ अहकार पुरुष म्हणजे मनुष्य हा एक यज्ञच आहे " पुरुषो वाव यज्ञ " ( छांदोग्य ३-१६-१ )

**अठरा अनि पुराणें** — १ कार्तव, २ ऋजु ३ आद, ४ मुद्गल, ५ पशुपति, ६ गणेश, ७ सौर, ८ परानन्द, ९ बृहद्धम, १८ महाभागवत, ११ देवी, १२ कल्कि, १३ भार्गव, १४ वासिष्ठ, १५ कौम, १६ गग, १७ चण्डी व १८ लक्ष्मी

**अठरा अवतार श्रीशिवाचे** — १ लकुलीश, २ कौशिक, ३ गार्ग्य, ४ मैत्र्य, ५ कौरुष, ६ इशान, ७ पारगार्य, ८ कपिलाण्ड, ९ मनुष्यक, १० अपर कुशिक, ११ अत्रि, १२ पिङ्गलाक्ष, १३ पुष्पक, १४ बृहदार्य १५ अगस्ति, १६ सन्तान, १७ राशीकर तथा आणि १८ विद्यागुरु ( भारतीय वास्तुशास्त्र प्रतिमाविज्ञान )

**अठरा अक्षौहिणी* दळभार** — ११ अक्षौहिणी कौरवपक्षीय व ७ अक्षौहिणी पाण्डवपक्षीय असे अठरा अक्षौहिणी सैन्य भारतीय युद्धात होत

एक अक्षौहिणी—२१८७० रथ, २१८७० हत्ती, १०९३५० पायदळ व ६५६१० घोडे एकूण दोन लक्ष अठरा हजार सातशे ( म भा भीष्म १६ २५ )

---

* प्रत्येक अक्षौहिणीतील घटक म्हणजे रथ, हत्ती वगैरेंच्या सख्या मांडिल्या असता त्यातील अकांची बेरीज १८ च येते. अक्षौहिणीच काय पण एकाएका चमू ( पद्धण ) ची गमत अशीच आहे जसे—रथ ७२९ (७ + २ + ९ = १८) एक चमू म्हणजे २७ रथाचा ओरसचौरस चौकोन होय म्हणजे एका आळीत २७ रथ अशा २७ ओळी

( केळकराची नियमाला )

**अठरा आयुधें देवीचीं** — १ चक्र, २ त्रिशूळ, ३ शंख, ४ शक्ति, ५ शतघ्नी, ६ बाण, ७ धनुष्य, ८ वज्र, ९ पद्म, १० दण्ड, ११ कमंडलु, १२ तलवार, १३ ढाल, १४ परशु, १५ पानपात्र, १६ कमळ, १७ गदा व १८ कवच (देवी भाग स्कंध ५ अ ८, ९)

**अठरा आयुर्वेदसंहिता** — १ हारीत, २ सुश्रुत, ३ पराशर, ४ भोज, ५ भेड, ६ भृगु, ७ अग्निवेश, ८ चरक, ९ च्यवन, १० अगस्त्य, ११ वाराह, १२ नारायण, १३ नारसिंह, १४ आत्रेय, १५ अत्रि, १६ चंद्रमा, १७ राव व १८ सूर्य अशा आयुर्वेदाच्या प्राचीन संहिता साहता व शास्त्रकार होत (हारितसंहिता)

**अठरा उपधान्यें** — १ सजगरा (बाजरी), २ मादली, ३ वरी, ४ नाचणी ५ राळ, ६ वाग, ७ सजले गहू, ८ मका, ९ करडई, १० राजगिरा, ११ मक्की १२ पावटा, १३ वाल, १४ मूग, १५ काराळ, १६ देवभात, १७ सातु आणि १८ अबाडी (आ) १ सजगुरा, २ नाचणा, ३ वरा ४ मका, ५ मक्का, ६ राजगिरा, ७ शिरस, ८ पादरफळी, ९ तिर, १० मथी, ११ वगुवान, १२ देवभात, १३ कमळबीज, १४ पाकड, १५ अबाडी, १६ मर्डीबीज, १७ गोवारा आणि १८ कुड्याचे बाज. यांत सत्रचस व पात्रा राळा धरून कोणी वीस संख्या मानतात. (म ज्ञा को वि)

**अठरा उपपुराणें** — (अ) १ भागवत, २ माहेश्वर, ३ ब्रह्मांड, ४ आदित्य, ५ पराशर, ६ सौर, ७ नंदिकेश्वर, ८ साम्ब, ९ ब्रह्माण्ड, १० वारुण, ११ औशनस, १२ मानव, १३ कापिल, १४ दुर्वासस्, १५ शिवधर्म, १६ बृहन्नारदीय, १७ नरसिंह व १८ सनत्कुमार (आ) १ सनत्कुमार २ नृसिंह ३ नंदी ४ दुर्वास ५ नारद ६ कापिल ७ मानव ८ उशनस ९ वरुण १० काली ११ वासिष्ठ १२ माहेश्वर, १३ साम्ब १४ सौर, १५ पाराशर, १६ शिव (धर्म) १७ मारीच व १८ भागवत (भागवत) (इ) (देवी भागवत) १ सनत्कुमार २ बृहन्नारदीय ३ पराशर, ४ सिंह, ५ नारद ६ सनत्कुमार ७ सौर, ८ दुर्वास ९ कपिल, १० मानव ११ विष्णुधर्मोत्तर, १२ वरुण १३ महेश्वर, १४ नंद, १५ कुमार, १६ औशनस, १७ देवी व १८ दत्त (सरस्वती ग्रंथ)

**अठरा कारखाने** — १ उष्ट्र, २ मुतुर, ३ जनान, ४ ज्वाहीर, ५ जामदार, ६ चिर्गीर, ७ तालीम, ८ तोफ, ९ पट्टी, १० दप्तर, ११ दारू, १२ दिवान, १३ नगार, १४ पील, १५ फराश, १६ बंदी, १७ मोदी व १८ शिकार. असे अठरा कारखाने मराठयांच्या राज्यांत सरकारी असून त्यावर स्वतंत्र अधिकारी असत.

**अठरा गृह्यसूत्रें** — १ बौधायन, २ आपस्तंब, ३ सत्याषाढ, ४ द्राह्यायण, ५ शाडिल्य, ६ आगस्त्य, ७ आश्वलायन, ८ शाम्बन, ९ कात्यायन ही नऊ पूर्वगृह्यसूत्रे आणि १० वैखानस, ११ शौनकीय, १२ भारद्वाज, १३ अग्निवैश्य, १४ जैमिनीय, १५ वाधूल, १६ माध्यंदिन, १७ कौंडिण्य व १८ कौषीतकी. ही नऊ अपरगृह्यसूत्र होत. (म. ज्ञा. को. वि. १२)

**अठरा ज्योतिषशास्त्रप्रवर्तक** — १ सूर्य, २ पितामह, ३ व्यास, ४ वसिष्ठ, ५ अत्रि, ६ पराशर, ७ कश्यप, ८ नारद, ९ गर्ग, १० मरीचि, ११ मनु, १२ अंगिरा, १३ लोमश, १४ पुलिश, १५ च्यवन, १६ यवन, १७ भृगु व १८ शौनक.

लोमश. पुलिशश्चैव च्यवन यवनो गुरुः ( भृगु ) ।
शौनकोऽष्टादशैवैते ज्योति शास्त्रविशारदा· ॥ ( सम्प्रदायवृत्तम् )

**अठरा तत्त्वें लिंगशरीराचीं** — १ बुद्धि, २ अहंकार, ३ मन, ५ पंचज्ञानेंद्रियें, ५ कर्मेंद्रिय व ५ पंचतन्मात्रा या अठरा तत्त्वाचें लिंग अथवा सूक्ष्म शरीर तयार होतें. असें वेदान्तशास्त्र मानतें.

**अठरा दोष मोक्ष प्राप्तीच्या आड येणारे** — १ क्षुधा २ तृषा, ३ जरा ४ रोग, ५ जन्म, ६ मरण, ७ भय, ८ मद, ९ राग, १० द्वेष, ११ मोह, १२ चिंता, १३ अरति १४ निद्रा, १५ विस्मय, १६ विषाद, १७ स्वेद व १८ खेद. (रत्न–श्रावकाचार अ. १)

**अठरा धान्यें** — १ गहू, २ साळ, ३ तूर, ४ जव, ५ जोंधळा, ६ वाटाणा, ७ लाख, ८ चणा, ९ जवस, १० मसूर, ११ मूग, १२ राळा, १३ तीळ, १४ हराक, १५ कुळीथ, १६ सावा, १७ उडीद व १८ चवळी. यात नऊ एकदल व नऊ द्विदल धान्यें आहेत.

गोधूमशालियवसर्षपयवयावनाल-
वानलकचणकमसूरमसूरा ॥
मुद्गप्रियंगुतिलकोद्रवकाः कुलित्था ।
श्यामाकमाषचवला इति धान्यवर्ग ॥ ( म. ज्ञा. को. )

**अठरा नारू-अलुतेदार** — १ तेली, २ तांबोळी, ३ साळी, ४ सनगर, ५ शिंपी, ६ माळी, ७ गोंधळी, ८ डौरी, ९ भाट, १० ठाकर, ११ गोसावी, १२ जंगम, १३ मुलाणी, १४ वाजंत्री, १५ घडशी, १६ कलावंत, १७ तराळ किंवा कोरवू आणि १८ भोई ( गावगाडा )

**अठरा नांवें ( श्रीगीतेचीं )** — १ गीता, २ गंगा, ३ गायत्री, ४ सीता, ५ सत्या, ६ सरस्वती, ७ ब्रह्मविद्या, ८ ब्रह्मवल्ली, ९ त्रिसंध्या, १० मुक्तिगेहिनी, ११ अर्धमात्रा, १२ चिदानंदा, १३ भवघ्नी, १४ भयनाशिनी, १५ वेदत्रयी, १६ परानन्ता, १७ तत्त्वार्थ व १८ ज्ञान मंजिरा.

गीता गङ्गा च गायत्री सीता सत्या सरस्वती ।
ब्रह्मविद्या ब्रह्मवल्ली त्रिसंध्या मुक्तिगेहिनी ॥
अर्धमात्रा चिदानंदा भवघ्नी भयनाशिनी ।
वेदत्रयी परानन्ता तत्त्वार्थज्ञानमंजिरा ॥ ( कल्याण गीतातत्त्वांक )

**अठरा नांवें ( शिवाचीं )** — १ शिव, २ पशुपति, ३ मृत्युंजय, ४ त्रिनेत्र, ५ कृत्तिवास, ६ पञ्चवक्त्र, ७ शितिकण्ठ, ८ खण्डपरशु, ९ प्रमथाधिप, १० गङ्गाधर, ११ महेश्वर, १२ रुद्र, १३ विष्णु, १४ पितामह, १५ संसारवैद्य, १६ सर्वज्ञ, १७ परमात्मा, व १८ कपाली. ( कल्याण शिवांक )

**अठरा न्याय** — १ हंसक्षीर न्याय, २ उदकाप्रप न्याय, ३ बीजांकुर न्याय, ४ कूर्मचक्र न्याय, ५ वह्निधूम न्याय, ६ स्थालीपुलाक न्याय, ७ स्वामिभृत्य न्याय, ८ रविघूक न्याय, ९ कूपमण्डूक न्याय, १० सिंहावलोकन न्याय, ११ अरुंधतिदर्शन न्याय, १२ अंधचटक न्याय, १३ गृहीयव्रत न्याय, १४ कण्टकवेष्टन न्याय, १५ पङ्कप्रक्षालन न्याय, १६ शिष्टपेशन न्याय, १७ कवळगोलक न्याय, व १८ घुणाक्षर

न्याय असे अठरा न्याय, तर्कशास्त्रात सांगितले आहेत. न्याय म्हणजे निदाप विचारचर्चा, अनुमान याना अवश्य असे नियम

**अठरा पगड जात** — १ तांबट, २ पाथरवट, ३ लोहार, ४ सुतार, ५ सोनार, ६ कासार, ७ कुंभार, ८ गुरव, ९ धनगर, १० गवळी, ११ वाणी, १२ जैन, १३ कोळी, १४ साळी, १५ चितारा, १६ माळी, १७ तेली व १८ रंगारी.

**अठरा पर्वे ( महाभारताची )** — १ आदि, २ सभा, ३ आरण्यक, ४ विराट, ५ उद्योग, ६ भीष्म, ७ द्रोण, ८ कर्ण ९ शल्य, १० सौप्तिक, ११ स्त्री, १२ शांति १३ अनुशासन, १४ अश्वमेध १५ आश्रमवासिक, १६ मौसल, १७ महाप्रस्थान व १८ स्वर्गारोहण.

**अठरा पक्वान्नें** — १ मांडे, २ वडे, ३ घतपुऱ्या, ४ लाडू, ५ तिळवे, ६ गुळवऱ्या, ७ तेळवऱ्या, ८ फेण्या, ९ कुरवडाया, १० घाऱ्या, ११ घारग, १२ वडोरीया, १३ चारवे, १४ वर्मीग, १५ खान्वी, १६ शिखरण, १७ साजोऱ्या व १८ खिरी. ( क. क. )

**अठरा पुराणें** — १ बृहद्विष्णु, २ शिव उत्तर खंड, ३ लघुबृहन्नारदीय, ४ मार्कंडेय, ५ वह्नि, ६ भविष्योत्तर, ७ वराह, ८ स्कंद, ९ वामन, १० बृहद्वामन, ११ बृहन्मत्स्य, १२ स्वल्पमत्स्य, १३ लघुवैवर्त आणि पाच प्रकारची भविष्य पुराणें. या सर्वां मिळून अठरा पुराण होत

**अठरा पुराणें ( वर्गीकरण )** सहासात्त्विक — १ वैष्णव, २ नारदीय, ३ भागवत, ४ गारुड, ५ पाद्म व ६ वाराह सहा राजस — १ ब्रह्मांड, २ ब्रह्मवैवर्त, ३ मार्कंडेय, ४ भविष्य, ५ वामन, व ६ ब्राह्म. सहा तामस — १ मात्स्य, २ कौर्म, ३ लिंग, ४ शैव, ५ स्कांद व ६ आग्नेय ( भारत-दर्शन संग्रह )

**अठरा पौराणिक विषय** — १ सृष्टि २ प्रतिसृष्टि, ३ वंश, ४ वंशानुचरित, ५ मन्वंतर, ६ आख्यान, ७ उपाख्यान, ८ गाथा, ९ कल्पशुद्धि, १० सिद्धान्त ११ संहिता, १२ डामर ( अद्भुत ) १३ जामल, १४ तंत्र, १५ ज्योतिश्चक्र, ( खगोल ), १६ भुवनकोश, ( भूगोल ) १७ वेद आणि १८ पुराण. ( गीता विज्ञान भाष्य–भूमिका )

**अठरा पथ बौद्ध धर्माचे** — १ स्थविरवाद, २ महासांघिक, ३ गोकुलिक, ४ एकव्यवहारिक, ५ प्रज्ञप्ति, ६ बाहुलिक, ७ चैत्य, ८ महीशासक, ९ वत्सीपुत्रक, १० धर्मोत्तरीय, ११ भद्रयानिक, १२ छन्नागरिक, १३ सम्मिति, १४ सर्वास्तिवादी, १५ धर्मगुप्तीय, १६ काश्यपीय, १७ संक्रांतिक आणि १८ सूत्रवाद (महावंश परिच्छेद ५)

**अठरा प्रकार भूताचे** — १ देवग्रह, २ दैत्यग्रह, ३ गंधर्वग्रह, ४ सर्पग्रह, ५ यक्षग्रह, ६ ब्रह्मराक्षस, ७ राक्षसग्रह, ८ पिशाचग्रह, ९ प्रेतग्रह, १० कुष्माण्डग्रह, ११ निषादग्रह, १२ औदुंबिरणग्रह, १३ वेताळ, १४ पितृग्रह, १५ ते १८ गुरु, वृद्ध, ऋषि व सिद्ध यांचे शाप (वाग्भट अ ४)

**अठरा प्रकारची व्यसनें** — १ मृगया, २ जुगार, ३ दिवसा झोंप, ४ निंदा, ५ स्त्रियांबद्दल आसक्ति, ६ निशा करणें, ७ गीत, ८ वाद्य, ९ नृत्य, १० उगीचच भटकणें, ११ चहाडी, १२ वाईट काम, १३ विश्वासघात, १४ मत्सर, १५ द्वेष, १६ चौर्य, १७ कटु भाषण आणि १८ मारझोड करणें (तत्त्व-निज-विवेक)

**अठरा प्रकारचे सत्त्वगुण** — १ प्रीति, २ प्रसिद्धि, ३ उन्नति, ४ विनयशीलता, ५ सुख, ६ दैन्य न दाखविणें, ७ निर्भयता, ८ समाधान, ९ श्रद्धाळूपणा, १० क्षमा, ११ धैर्य, १२ अहिंसा, १३ शुचिर्भूतता, १४ अक्रोध, १५ आर्जव, १६ समता, १७ सत्य व १८ निमत्सरता. (म भा शांति-अ ३४१ तळटीप)

**अठरा प्रमुख उपनिषदें** — १० दशोपनिषद (१० च अंकी पाहा) ११ श्वेताश्वतर, १२ कौषीतकी, १३ मैत्रायणी, १४ नाथ्यभ्यतापनिषद्, १५ छागल्य, १६ आर्षेय, १७ शौनक आणि १८ जैमिनीय या प्रमुख अठरा उपनिषदांचा सर्वोत्कृष्ट ग्रंथ-भगवद्गीता (म. गी साक्षात्कारदर्शन)

**अठरा भार वनस्पति** — पृथ्वीवरील सर्व वृक्ष, वनस्पति यांस समुच्चयानें —अठरा भार वनस्पतींची लागवड (व्यवहार सूत्र)

**अठरा महारथी (पांडवांकडील)** — दहा हजार वीरांशीं एकटा युद्ध करूं शकतो त्याला महारथी म्हणतात —१ भीम, २ अर्जुन ३ सात्यकि, ४ विराट, ५ द्रुपद, ६ धृष्टद्युम्न, ७ चेकितान, ८ काशिराज, ९ पुरुजित् कुंतिभोज, १० शैब्य, ११ युधामन्यु, १२ उत्तमौजा, १३ अभिमन्यु,

१४ प्रतिविंध्य, १५ श्रुतसोम, १६ श्रुतकीर्ति, १७ शतानीक आणि १८ श्रुतकर्मा. हे गेरटचे पाच द्रौपदेय होत.

**अठरा महारथी** (श्रीकृष्णपुत्रांत) — १ प्रद्युम्न, २ अनिरुद्ध, ३ दीप्तिमान्, ४ भानु, ५ साम, ६ मधु, ७ बृहद्भानु, ८ चित्रभानु, ९ वृक, १० अरुण, ११ पुष्कर, १२ वेदबाहु, १३ श्रुतदेव, १४ सुनंदन १५ चित्रभानु, १६ विरूप, १७ कवि व १८ न्यग्रोध. भगवान् श्रीकृष्णाच्या पुत्रांत हे अठरा महारथी होते.

'तेषामुद्दामवीर्याणामष्टादश महारथाः ॥' (भा स्क. १०.९०-३२)

**अठरा महापुराणें** — १ ब्राह्म, २ पद्म, ३ विष्णु, ४ शिव अथवा वायु, ५ भागवत, ६ नारद, ७ मार्कंडेय, ८ अग्नि, ९ भविष्य, १० ब्रह्मवैवर्त, ११ नृसिंह किंवा लिंग, १२ वाराह, १३ स्कंद, १४ वामन, १५ मत्स्य, १६ कूर्म, १७ गारुड आणि १८ ब्रह्माण्ड.

> मात्स्यं च गारुडं चैव ब्रह्माण्डं च ततः परम् ।
> अष्टादशपुराणाना नामधेयानि यः पठेत् ॥
> अष्टादश पुराणें । तींची मणि भूषणें ।
> पदपद्धतिखेवणें । प्रमेय रत्नांची (ज्ञा. ४-५)

**अठरा पुराणकर्ते** — १ वकदालभ्य-मत्स्य पुराण, २ मृकंडी-मार्कंडेय पुराण, ३ व्यास-भारत, ४ लोमहर्षण-भविष्योत्तर, ५ कूर्म-बृहन्नारदीय, ६ अगस्ति-ब्रह्माट, ७ कश्यप-ब्रह्मवैवर्त, ८ भारद्वाज-वराहपुराण ९ अंगिरा-वायुपुराण, १० भृगऋषि-विष्णुपुराण, ११ कण्व-वामनपुराण, १२ अत्रि-आदित्यपुराण, १३ पराशर-लिंगपुराण, १४ पद्मऋषि-पद्मपुराण, १५ विभाण्डक-अग्निपुराण, १६ वसिष्ठ-कूर्मपुराण, १७ कार्तिक-स्कंदपुराण आणि १८ बृहस्पति-गरुडपुराण. (सिद्धान्तबोध अ. २३)

**अठरा मर्म स्थानें** (शरीरातील) — सर्व शरीरातील वायूचा निरोध करून त्याला शरीरातील अठरा मर्मस्थानांच्या ठिकाणीं खिळून ठेवणें. या अठरा प्रत्याहार धारणा होत. (म. भा. शांति अ. ३७८)

**अठरा मुनीश्वर** — १ जाबालि, २ नाचिकेत, ३ स्कन्द, ४ लोकाक्षि, ५ काश्यप, ६ लिखित, ७ सनत्कुमार, ८ शन्तनु, ९ जनक, १० व्यास,

११ कात्यायन, १२ नन्द, १३ जातुकर्ण्य, १४ कपिंजल, १५ नाधायन, १६ कणाद, १७ विश्वामित्र आणि १८ सुमन्तु (यमलाष्टकतन्त्रम्)

**अठरा यज्ञनामें** — १ अतियाज २ अतिरात्र, ३ अनुयाज ४ अश्वमेध, ५ इष्टापूर्त, ६ डाग, ७ उक्थ्य, ८ निरूढक, ९ दर्शपौर्णमास १० पारवत्सर, ११ पशुयाग, १२ पितृयज्ञ, १३ पुरुषमेध, १४ प्रयाज, १५ प्रातःसव, १६ बृहस्पतिसव, १७ माध्यंदिनसवन व १८ सामयाग (ऋग्वेद दर्शन)

**अठरा मंत्री विश्वराज्याचे** — १ जातवेदा अग्नि–शिक्षणमंत्री, २ इंद्र–युद्धमंत्री या आत्मरक्षा–संरक्षण, ३ उपेंद्र–उपयुद्धमंत्री ४ रुद्र सेनासंचलनमंत्री ५ अश्विनौ–आरोग्यमंत्री, ६ पूषा–पोषणमंत्री, ७ सूर्य–शोधनमंत्री, ८ भग–अर्थमंत्री, ९ विश्वकर्मा–उद्योगमंत्री, १० वास्तोष्पति–गृहमंत्री, ११ त्वष्टा–शस्त्रास्त्र–निर्माण–मंत्री, १२ ऋभु–लघुउद्योगमंत्री, १३ वरुण–नौका–युद्धमंत्री, १४ चंद्रमा मानस समाधान मंत्री १५ पर्जन्य–कृषिमंत्री १६ वायु–जीवनमंत्री, १७ मरुत्–संरक्षण मंत्री आणि १८ पुत्र–संरक्षणमंत्री (पुरुषार्थ डिसेंबर १९६०)

**अठरा योग (गीतेंतील)** — १ अर्जुनविषादयोग, २ सांख्ययोग, ३ कर्मयोग, ४ कर्मब्रह्मार्पणयोग ५ कर्मसंन्यासयोग, ६ आत्मसंयमयोग, ७ ज्ञानविज्ञानयोग ८ अक्षरब्रह्मयोग ९ राजविद्याराजगुह्ययोग १० विभूतियोग, ११ विश्वरूपदर्शनयोग, १२ भक्तियोग, १३ क्षेत्रक्षेत्रज्ञविभागयोग, १४ गुणत्रयविभागयोग १५ पुरुषोत्तमयोग १६ दैवासुरसंपद्विभागयोग, १७ श्रद्धात्रयविभागयोग आणि १८ मोक्षसंन्यासयोग (अर्जुन उपायनयोग–गीता तत्त्व मंदिर) हे श्रीमद्भगवद्गीतेंतील अठरा अध्यायांत वर्णिलेले अठरा योग होत हे अठराहि योग मिळून गीतेचें योगशास्त्र होत

**अठरा लक्षणें ज्ञानाचीं** — १ निरभिमानी, २ निर्दंभ, ३ निरुपद्रवी ४ सहनशील ५ सरळ, ६ गुरुभक्त, ७ निर्मळता ८ दृढनिश्चयी, ९ आत्मसंयमन, १० नित्यवैराग्य, ११ अहंकाररहित १२ जन्म जरा, मृत्यु, व्याधि आणि दुःख हे दोष आहेत असें समजणें १३ अनासक्ति १४ पुत्र दारा गृहादिकांनाहि लिप्त नसणें, १५ स्थिरचित्त, १६ एकनिष्ठभक्त, १७

लक्ष समुदायाचा कंगाळा व १८ एकतार्चा आवट (भ गी. १३–७ ते १०) मागा श्लोकाचेनि अधार्धे । ऐस सांगितलें श्रीमुकुंदे ।

ना उफरांटें इय ज्ञानपद । तचि अज्ञान (ज्ञा. १३–८५३)

ज्ञानाचाच लक्षणे उलटी करा म्हणजे तींच अज्ञान लक्षणे ठरतात एव इयें अठरा । ज्ञान लक्षणें अवधारा । श्रीकृष्णे धनुधरा, निरूपिली ॥

(ज्ञा न १३)

**अठरा वादस्थानें (व्यवहारात)** — १ कर्ज घेणे, २ ठेव ठेवणे, ३ धनी नाहीं अशा वस्तूचा केलेला विक्रय, ४ समाइक व्यापार, ५ दिलेलें दान परत घेणें, ६ सेवकाचे वेतन, ७ करेल्या सन्ताच उल्लघन, ८ विकत घेतलेली वस्तु पसत न पडल्यान उत्पन्न होणारा वाद, ९ धनी व गुराखी यात जनावरासंबधा होणारा वाद, १० ग्रामादि सीमा, ११ शिवीगाळ, १२ मारा, १३ अपहार, १४ स्त्री, १५ स्त्री व पुरुषाचा धर्मामध्य व्यवस्था, १६ वडिलोपार्जित धनविभाग, १७ द्यूत आणि १८ पक्षीक्रीडा वगैरे बाबत अशा व्यवहारात वाद उत्पन्न होण्याची अठरा वादस्थानें आहेत

स्त्रीपुधर्मो विभागश्च द्यूतमाह्वय एव च ।
पदान्यष्टादशैतानि व्यवहारस्थिताविह ॥ (मनु. ८ ७)

**अठरा विद्या** — चौदा विद्या (चौदाच्या अर्की पाहा) आणि १ आयुर्वेद, २ धनुर्वेद, ३ गांधर्व वेद आणि अर्थशास्त्र हीं चार मिळून अठरा विद्या होतात

आयुर्वेदो धनुर्वेदो गान्धर्वश्चेव त त्रय ।
अर्थशास्त्र चतुर्थ तु विद्या ह्यष्टादशैव तु ॥ (वायु पूर्वार्ध ३–६१)

**अठरा व्यक्तिवैशिष्ट्यें-(श्री शिवछत्रपतीचीं)** — १ सन्मार्गाची साथी राहणी, २ नियधर्मी, ३ परस्त्री मातृसमान समजणारा, ४ धर्मव्रत, ५ साक्षात्कारी, ६ आध्यात्मिक स्थायी भावाचा, ७ स्थितप्रज्ञ, ८ आपण यत्र व ईश्वर यत्री समजणारा, ९ भौतिक सुखाविषयी उदासीन, १० अग्रगण्य मुत्सद्दी ११ विधायक बुद्धिमत्ता १३ राजपुरुष, १४ अष्टमनांनी, १५ साहसी शूरयोद्धा, १६ सर्वंकषप्रतिभा १७ द्रष्टा व, १८ आत्म-यशस्वी. (पु छत्रपति शिवाजी भाग ४ था)

**अठरा विदेशीय कालगणना** ( जगांतील विविध देशीय सन )— १ चिनी, २ खताई, ३ पारसी, ४ मिश्री, ५ तुर्की, ६ आदम, ७ इसवी, ८ यहुदी, ९ इब्राहीम, १० मूसा, ११ युनानी, १२ रोमन, १३ ब्रह्मा, १४ मल्यकेतु, १५ पार्थियन, १६ इराणी, १७ जाया आणि १८ धृनाचि. ( भारतीय साम्राज्य )

(**अठरा विश्वें दारिद्र्य** — विश्वा म्हणजे एका अथवा पै याचा $\frac{1}{20}$ भाग म्हणजे कमालीचें दारिद्र्य. ( आ ) 'विश्वें' हें 'विसा' या शब्दाचें अकारण संस्कृतीकरण आहे. 'वीस' ही संख्या गणनाचें एक परिमाण म्हणून ग्रामीण भागात अजूनहि वापरलें जातें. अठरा विसा म्हणजे ३६०. ३६० दिवस म्हणजे वर्ष. वर्षाचे सर्व दिवस म्हणजे सदासर्वकाळ दारिद्र्य, हा भाव.)

**अठरा व्यसनें** — १० कामवासनेपासून उत्पन्न होणारीं (१० च्या अर्थी पहा ) ११ चहाडी, १२ दुस्साहस, १३ द्रोह, १४ ईर्ष्या, १५ द्वेष, १६ अपहरण, १७ कटु भाषण आणि १८ अत्यंत मारपीट. हीं क्रोधापासून उत्पन्न होणारीं आठ, मिळून अठरा.

**अठरा शिल्पशास्त्रप्रणेते** — १ भृगु, २ अत्रि, ३ वसिष्ठ, ४ विश्वामित्र, ५ मय, ६ नारद, ७ नग्नजित्, ८ विशालाक्ष, ९ पुरंदर, १० ब्रह्मा, ११ कुमार, १२ नंदीश, १३ शौनक, १४ गर्ग, १५ वासुदेव, १६ अनिरुद्ध, १७ शुक्र आणि १८ बृहस्पति.

अष्टादशैते विख्याता शिल्पशास्त्रोपदेशकः ।
संक्षेपेणोपदिष्टं यन्मनवे मत्स्यरूपिणा ॥ ( मत्स्य. २५२-४ )

**अठरा संख्यान पदें** ( संख्यागणनेचीं स्थानें ) — १ एकम्, २ दहम्, ३ शतम्, ४ सहस्र, ५ दशसहस्र, ६ लक्ष, ७ दशलक्ष, ८ कोटि, ९ दशकोटि, १० अब्ज, ११ खर्व, १२ निखर्व, १३ महापद्म, १४ शंकु, १५ जलधि, १६ अंत्य, १७ मध्य व १८ परार्ध. अशीं हीं दहाच्या पटींनें वाढणारी अठरा संख्यान पदें होत. हीच प्राचीन भारतीय दशमानपद्धति होय.

**अठरा सिद्धि** — १ अणिमा, २ महिमा, ३ लघिमा, ४ प्राप्ति, ५ प्राकाम्य, ६ ईशिता ७ वशिता आणि ८ प्राकाम्य या आठ स्वाभाविक सिद्धि आणि १ अनूर्मिमत्व, २ दूरश्रवण, ३ दूरदर्शन, ४ मनोजव, ५ कामनासिद्धि, ६ पर

प्रायाम्रय, ७ स्वच्छा मृत्यु ८ सुरक्रीडादर्शन, ९ सकल्पसिद्धि आणि १० अप्रतिहता या दहा गुणमूलक सिद्धि या दोन्ही मिळून अठरा सिद्धि योग शास्त्रात सागितल्या आहेत

> सिद्धयोऽष्टादश प्रोक्ता धारणा योगपारगै ।
> तासामष्टौ मत्प्रधाना दशैव गुणहेतव ॥ (भाग ११-१५-५)

**अठरा सिद्ध पुरुष** — सिद्धि प्राप्त करून घणें हेंच मुख्य कर्तव्य मानणार अगस्त्य वगैरे अठरा सिद्ध पुरुष होऊन गले ते अधिकारी असल्या मुळे त्याना ( सिद्ध व मुक्ति ) दोन्ही प्राप्त झाल्या होत्या

> अष्टादश प्रसिद्धास्ते सिद्धिप्राधान्यवादिन ।
> अगस्त्यप्रमुखा सिद्धीस्त्वधिकारादुभे गता ॥ ( रामगीता १६ १५ )

**अठरा सिद्धान्त ( ज्योतिषशास्त्राचे )** — १ ब्रह्मसिद्धात, २ सूर्य सिद्धात ३ सोमसिद्धात, ४ वसिष्ठसिद्धात, ५ रोमक, ६ पौलस्य, ७ बृहस्पति ८ गर्गसिद्धात, ९ व्यास, १० पाराशर ११ भोज, १२ वराह, १३ ब्रह्मगुप्त १४ सिद्धान्तशिरोमणि, १५ सुदरसिद्धात, १६ तत्वविवेक, १७ सार्वभौम सिद्धात व १८ लघु आर्यसिद्धात असे अठरा सिद्धात ज्योतिषात मानले आहेत ( नैमिष–सूर्यसिद्धात )

**अठरा सूक्तद्रष्टे ऋषि** — १ कक्षीवान् २ कवष ३ गय ४ गृत्समद, ५ गौरवीति ६ नाभाक ७ नाभानेदिष्ट ८ नोधा, ९ परुच्छेप, १० दक्ष, ११ भरद्वाज, १२ वसिष्ठ १३ वामदेव १४ विमद, १५ विश्वामित्र, १६ शार्यात १७ सुत्रात व १८ हिरण्यस्तूप

अठरा संख्याविशेष भारतात मानला आहे त्यावरून भारताचे प्राचीन काळी अठरा प्रमुख भाग असावेत असा तर्क आहे (प्रा हिंदी शिल्पशास्त्रसार),
**(महाभारतांतर्गत)** — १ महाभारताची पर्वे अठरा, २ भारतांतर्गत भगवद्गीतेचे अध्याय अठरा, ३ भारतीय युद्ध अठरा दिवस झाले, ४ भारतीय युद्धात सैन्य अठरा अक्षौहिणी होतें, ५ भारतीय युद्धानंतर अठरा वर्षांनी व्यासांनी महाभारत लिहिलें, ६ पांडवांकडील प्रमुख वीर अठरा होते, ७ भारतीय युद्धानंतर अठरा वर्षांनी धृतराष्ट्राचें पतन झालें, ८ युद्धारंभी अठराव्या दिवशी राजा युधिष्ठिरानें पतिव्रता गांधारीचा 'यतो धर्मस्ततो जय' असा आशीर्वाद घेतला होता ९ राजा जनमेजयानें परीक्षिताच्या मृत्यूचा सूड म्हणून पिपीलिका पर्वतावर अठरा दिवसांनी पूर्णाहुति करावयाचा नरयाग आरंभिला, १० या यज्ञाला अठरा ऋत्विज होते पण त्यानंतर भगवंतांनी मोहिनी घातली तेव्हा यज्ञसमय जनमेजयानें सिंचन केल्याच्या जलकणामुळे ते ब्राह्मण मृत झाले, ११ व्यासांना तीं अठरा प्रेतें मंडपांत आणून अठरा हात कृष्णवस्त्र मध्यें धरून वैशंपायनाकडून जनमेजयास भारत ऐकविलें. प्रत्येक पर्वाबरोबर एकेक हात कृष्णवस्त्र पांढरें होत गेलें संपूर्ण अठरा पर्वें भारत ऐकल्यावर ते अठराहि ब्राह्मण जिवंत झाले

व्यासगुरुआज्ञाप्रमाणें । भारत सांगितलें वैशंपायनें ।
अठरा पर्वें संपूर्ण । अनुक्रमेसी ॥ (क. क. स्तबक ८५-८६)

**(आधुनिक) कवि मोरोपंत** यांनीहि अठरा या संख्या संकेताचा आपल्या आर्या भारतात कुशलतेनें उपयोग केला आहे आर्याभारताची पद्यसंख्या १७१३६ येते या संख्यांची बेरीजहि अठराच (रोहिणी ऑगस्ट १९६३)

**अठरा संदेष्टे (कुराणोक्त)** — १ आब्राहाम–इब्राहिम २ इसाक, ३ जेकब–याकुब, ४ नूह, ५ दाऊद, ६ सुलेमान, ७ अय्युब ८ युसूफ, ९ मोझेस (मूसा), १० हारून–हरून, ११ जकरिय्या, १२ याह्या १३ जीझस, १४ इलियास १५ इस्माइल, १६ अल्यसूआ, १७ युनस आणि १८ लूत हजरत महम्मद पैगंबरापूर्वी हे अठरा संदेष्टे होऊन गेले आणि त्या प्रत्येकाला ईश्वराने एकेक पुस्तक दिलें अशी कथा आहे (कुराण अ ६ ऋचा ८४ ते ८७)

**अठरा स्मृतिकार** — १ विष्णु, २ पराशर, ३ दक्ष, ४ संवर्त, ५ व्यास, ६ हारीत, ७ शातातप, ८ वसिष्ठ, ९ यम, १० आपस्तंब, ११ गौतम, १२ देवल, १३ शंख, १४ लिखित, १५ भारद्वाज, १६ उशना, १७ शौनक आणि १८ याज्ञवल्क्य.

'शौनको याज्ञवल्क्यश्च दशाष्टौ स्मृतिकारिणः ।' (सु.)

**अठरा हावभाव (शृंगारचेष्टा)** — १ भाव, २ हाव, ३ हेला, ४ माधुर्य ५ धैर्य, ६ लीला, ७ विलास, ८ विच्छित्ती, ९ विभ्रम, १० किलकिंचित्, ११ मोट्टायित, १२ कुट्टमित १३ बिब्बोक, १४ ललित, १५ कुतूहल, १६ चकित, १७ विहृत आणि १८ हास. (प्रतापरुद्र)

## १९

**एकोणीस नांवें गंगेची** — १ गंगा, २ त्रिपथगा, ३ भागीरथी, ४ त्रिदशदीर्घिका, ५ त्रिस्रोता, ६ जाह्नवी, ७ मंदाकिनी, ८ भीष्मजननी ९ सरिद्वरा, १० विष्णुपदी, ११ सिद्धगा, १२ स्वर्गा, १३ स्वर्गंगा, १४ समगा, १५ आपगा, १६ ऋषिकुल्या, १७ हैमवती, १८ सर्वापि आणि १९ हरशेखरा. (हेमचंद्रकोश)

**एकोणीस धन संपादनाचे कामीं साहाय्यक सद्गुण** — १ शास्त्र, २ बुद्धि, ३ धैर्य, ४ दक्षता, ५ प्रगल्भता, ६ धारणाशक्ति, ७ उत्साह, ८ वक्तृत्व, ९ औदार्य, १० संकटाला सहनशीलता, ११ तेज, १२ पावित्र्य, १३ मित्रत्व, १४ त्याग, १५ सत्य, १६ कृतज्ञता, १७ कुल, १८ शील आणि १९ दम.

> शास्त्रं प्रज्ञा धृतिर्दाक्ष्यं प्रागल्भ्यं धारयिष्णुता ।
> उत्साहो वाग्मितौदार्यमापत्कालसहिष्णुता ॥
> प्रभावः शुचिता मैत्री त्यागः सत्यं कृतज्ञता ।
> कुलं शीलं दमश्चेति गुणाः सम्पत्तिहेतवः ॥ (अग्नि. २३८-५)

**एकोणीस प्राचीन संगीत शास्त्रवेत्ते** — १ शिव, २ गौरी, ३ ब्रह्मा, ४ माधव, ५ नंदिकेश्वर, ६ दत्तिल, ७ कोहल, ८ रावण, ९ हनुमान्,

१० याज्ञवल्क्य, ११ गणेश, १२ नारद, १३ तुंबर, १४ हाहा १५ हूहू, १६ पम्मुख, १७ बृहस्पति, १८ अर्जुन आणि १९ बाणासुरकन्या उषा. (संगीतरत्नाकर)

**एकोणीस प्रकारच्या वीणा** — १ कच्छपी. २ कुब्जिका, ३ चित्रा, ४ वहन्ती, ५ परिवाहिनी, ६ जया, ७ घोषवती, ८ ज्येष्ठा, ९ नकुली, १० महती, ११ वैष्णवी, १२ ब्राह्मी, १३ रौद्री, १४ कूर्मी, १५ रावणी, १६ सरस्वती १७ किन्नरी १८ सैरंध्री व १९ घोषका. (संगीत मकरंद)

# २०

**वीस अक्षरी मंत्र** — मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्रधर्म वाढवावा॥ हा महाराष्ट्राचा सघन्ना मन. (श्रीसमर्थ)

**वीस धर्मशास्त्रप्रवर्तक** — १ मनु, २ अत्रि, ३ विष्णु, ४ हारीत, ५ याज्ञवल्क्य, ६ उशना, ७ अंगिरा, ८ यम, ९ आपस्तंब, १० संवर्त, ११ कात्यायन, १२ बृहस्पति, १३ पराशर, १४ व्यास, १५ शंख, १६ लिखित, १७ दक्ष, १८ गौतम, १९ शातातप आणि २० वसिष्ठ. हे धर्मशास्त्रकर्ते होत.

"शातातपो वसिष्ठश्च धर्मशास्त्रप्रयोजका" । (स्मृति)

**वीस स्मृति ग्रंथ** — प्राचीन ऋषींनीं केलेले धर्मशास्त्रविवेचन असे अनेक स्मृतिग्रंथ होत. १ मनु, २ याज्ञवल्क्य, ३ बृहस्पति, ४ विष्णु, ५ वसिष्ठ, ६ गौतम, ७ व्यास, ८ बौधायन, ९ शंख व लिखित, १० अत्रि, ११ हारीत, १२ उशना, १३ अंगिरा, १४ यम, १५ आपस्तंब, १६ संवर्त, १७ कात्यायन, १८ पराशर, १९ दक्ष व २० शातातप स्मृति.

**वीस उपस्मृतिकार** — १ अंगिरस, २ अत्रि, ३ आपस्तंब, ४ बौधायन, ५ गोभिल, ६ पठ, ७ देवल, ८ प्रचेतस, ९ बृहस्पति, १० यम, ११ विष्णु, १२ शंख, १३ शातातप, १४ हारीत, १५ आश्वलायन, १६ लिखित, १७ वसिष्ठ, १८ व्यास, १९ संवर्त आणि २० बौधायन. (स्मृतिसमुच्चय)

**वीस कुलें वनस्पतींचीं** — १ सीताफळ, २ मोहरी, ३ कापास, ४ नारग, ५ शिंबा, ६ गुलाब, ७ जबू, ८ कूष्माड, ९ कुसुम, १० जाती, ११ करवीर, १२ धत्तुर, १३ तुलसी, १४ औदुबर, १५ एरड, १६ नारिरुल, १७ कुमारी, १८ कदली, १९ नागदन आणि २० तृणधान्य कुल,

**वीस भाव अथवा विकार सर्व भूतांचे ठायीं असलेले** — १ बुद्धि, २ ज्ञान, ३ असमोह, ४ क्षमा, ५ सत्य, ६ दम, ७ शम, ८ सुख, ९ दु ख, १० भव, ११ अभाव, १२ भय, १३ अभय, १४ अहिंसा, १५ समता, १६ सतोष, १७ तप, १८ दान १९ यश आणि २० अपयश (भ गी १०-४।५)

**वीस लक्षणें समर्थसाप्रदायाचीं** — १ लेखन, २ वाचन, ३ अर्थांतर सागणें, ४ आशका निवृत्ति, ५ प्रचीति, ६ गायन, ७ नर्तन, ८ टाळी वाजविणे, ९ अथभेद, १० प्रबध, ११ प्रबोध, १२ वैराग्य, १३ विवेक, १४ लोक राजी राखणें, १५ राजकारण, १६ अ यग्रता, १७ प्रसग जाणणे, १८ वृत्ति उदासीन, १९ समता व २० राम उपासना (श्री समर्थांचा गाथा)

# २१

**एकवीस कल्प**[1] — १ कापिल, २ प्राजापत्य, ३ ब्राह्म, ४ सौम्य, ५ सावन, ६ बार्हस्पत्य, ७ प्राभासक, ८ माहिंद्र ९ अग्नि, १० जयत, ११ मारुत, १२ वैष्णव, १३ बहुरूप, १४ ज्योतिष, १५ मायूर, १६ कौम, १७ नर, १८ मात्स्य, १९ पाद्म, २० वग्कल्प आणि २१ वाराह कल्प (चालू असलेला)

**एकवीस नावें तापी (नदी) चीं** — १ सत्या, २ सत्योद्भवा, ३ श्यामा, ४ कपिला, ५ कापिलांबिका, ६ तापिनी, ७ तपनहरा, ८ नासत्या, ९ नासिकोद्भवा, १० सावित्री, ११ सहस्रकरा, १२ सनका, १३ अमृतस्यादनी, १४ सुषुम्ना, १५ सूर्यमरमणा, १६ सपापपविपापहा, १७ तिग्मा, १८ तिग्मरसा, १९ तारा, २० ताम्रा व २१ तापी (तापी म अ. २)

१ मन्व म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस (स्कद—आवतिका अ १३)

**एकवीस नांवें बिल्ववृक्षाचीं** — १ बिल्व, २ मालूर, ३ श्रीफल, ४ शाण्डिल्य, ५ शैलूष, ६ शिव, ७ पुण्य, ८ शिवप्रिय, ९ देवावास, १० तीर्थपद, ११ पापघ्न, १२ कोमलच्छद, १३ जय, १४ विजय, १५ विष्णु, १६ त्रिनयन, १७ वैर, १८ धूम्राक्ष, १९ शुक्लवर्ण, २० संयमी आणि २१ श्राद्धदेवक. (कल्याण मासिक)

**एकवीस नांवें सूर्यदेवतेचीं** — १ विकर्तन, २ विवस्वान्, ३ मार्तंड, ४ भास्कर, ५ रवि, ६ लोकप्रकाशक, ७ श्रीमान्, ८ लोकचक्षु, ९ महेश्वर, १० लोकसाक्षी, ११ त्रिलोकेश, १२ कर्ता, १३ हर्ता, १४ तमिस्रहा, १५ तपन, १६ तापन, १७ शुचि, १८ सप्ताश्ववाहन, १९ गभस्तिहस्त, २० ब्रह्मा आणि २१ सर्वदेवनमस्कृत.

"एकविंशतिरित्येष स्तव इष्टः सदा रवेः" (मार्कंडेय पु. ३१-३१ ३३)

विघ्नेश क्षेत्र ( कुंभकोणम् जवळ कावेरीतीरीं ) ( एकविंशति–गणेश–क्षेत्र–महिमा )

**एकवीस प्रथम श्रेणीच्या तारका** — १ शालिनी ( व्याध ), २ अगस्ति, ३ मित्र, ४ अभिजित्, ५ ब्रह्म, ६ स्वाति, ७ राजन्य, ८ सरमा, ९ अग्निम, १० मित्रक, ११ श्रवण, १२ काश्वि, १३ निशाक्र १४ रोहिणी, १५ पुनर्वसु ( प्लक्ष ), १६ चित्रा, १७ ज्येष्ठ, १८ मीनास्य, १९ सोह ( हस ), २० मघा आणि २१ नत

"अवश्य लक्षणीया हि एकविंशतितारका ।" ( तारका नगरी )

**एकवीस मृत्युलोकींचीं रत्नें** — १ माणिक अथवा पद्मराग, २ मोतीं, ३ प्रवाल, ४ मरकतमणि, ५ पुष्पराग, ६ वज्रमणि, ७ इंद्रनील मणि, ८ मेदकमणि ( गोमेदक ), ९ सूत्रमणि ( लसणा ), १० वैडूर्यमणि, ११ चंद्रकांतमणि, १२ घृतमणि, १३ तैलमणि, १४ भीष्मकमणि, १५ अमृतमणि १६ उपलकमणि ( ओपल ), १७ पारसमणि, १८ उल्कामणि, १९ राजावर्तमणि, २० मासरमणि आणि २१ भीष्मकपाषाण अथवा मणि हीं सर्व एकवीस रत्न देवदानव युद्धात पडलेल्या राजा बलीच्या निरनिराळ्या अगापासून उत्पन्न झालीं अशी कथा आहे ( रत्नदीपिका )

**एकवीस मूर्छना (संगीतशास्त्र)** —(अ) १ उत्तरमंद्रा, २ रजनी, ३ उत्तरायता, ४ शुद्ध षड्जा, ५ मत्सरीकृता, ६ अश्वक्रान्ता ७ अभिरुद्गता, ८ सौवीरी, ९ हरिणाश्वा, १० कलोपनता, ११ शुद्धमध्या, १२ मार्गी, १३ पौरवी, १४ हृष्यका, १५ नन्दा, १६ विशाला, १७ सुमुखी, १८ चित्रा ( विचित्रा ), १९ चित्रावती ( मोहिनी ), २० सुखा आणि २१ आलापा ( आलापन ). ( सुरतरंगिणी ) सप्त स्वरांचा आरोह अवरोह करणें त्यास अथवा त्या स्वरसमुदायास मूर्च्छना म्हणतात ( रागविबोध ).

"सप्त स्वरास्त्रयो ग्रामा मूर्च्छना एकविंशति ।" ( नारदीय पूर्वरंग )

( आ ) १ नंदा, २ विशाला, ३ सुमुखी, ४ चित्रा, ५ चित्रवती, ६ सुखा आणि ७ बला या सात ( देवांच्या ) मूर्च्छना, ८ आप्यायनी, ९ विश्वभृता, १० चंद्रा, ११ हमा, १२ कपर्दिनी, १३ मैत्री व १४ बार्हती या सात ( पितरांच्या ) मूर्च्छना आणि १५ उत्तरचंद्र, १६ अभिरुद्गता, १७ अश्वक्रांता, १८ सौवीरा, १९ हृषिका, २० उत्तरायता आणि

२१ रजनी या सात ऋषींच्या होत गधवगण देवताच्या मूर्च्छनाचा स्वीकार करतात व मानव ऋषींच्या मूर्च्छना घेतात

## २२

**बावीस अक्षरी मंत्र** —

' श्रीकृष्ण गोविंद हरे मुरारे । हे नाथ नारायण वासुदेव ॥ "

**बावीस प्रेरणा इंद्रियाच्या** — अठरा प्रत्याहार प्रेरणा (वायूचा निरोध करून शरीरातील मर्मस्थानाच ठिकाणी खिळून ठेवणे) १९ ध्यान २० धारणा, २१ समाधि या तीन व २२ शुद्ध सत्त्वमय भाव हा मिळून बावीस होत (म भा शांति अ ३०६)

**बावीस मनोधर्म** — १ संकल्प, २ वासना, ३ इच्छा, ४ स्मृति, ५ धृति, ६ श्रद्धा, ७ उत्साह, ८ कारुण्य, ९ कळकळ, १० प्रेम ११ दया, १२ कृतज्ञता, १३ काम, १४ लज्जा, १५ आनंद, १६ मौन, १७ राग, १८ द्वेष, १९ लोभ, २० मद, २१ मत्सर व २२ क्रोध (देहसाधकता)

**बावीस श्रुति (गायनोपयोगी नाद)** — १ गायनोपयोगी नादास श्रुति हा पारिभाषिक शब्द शास्त्रकाराना योजिला आहे. नाद हा गायनाचा आत्मा आहे अस नाद अथवा श्रुति बावीस आहेत. त्या—१ तीव्रा, २ कुमुद्वती, ३ मंदा, ४ छंदोवती, ५ दयावती, ६ रंजना, ७ रतिका, ८ रौद्री, ९ क्रोधी, १० वज्रिका, ११ प्रसारिणी, १२ प्रीति, १३ मार्जनी, १४ क्षिति, १५ रक्ता, १६ संदीपनी, १७ आलापिनी, १८ मदन्ती, १९ रोहिणी, २० रम्या २१ उग्रा आणि २२ क्षोभिणी (नारदप्रणीत)

## २३

**तेवीस प्राचीन व्याकरण प्रवक्ते** — १ इंद्र, २ वायु ३ भरद्वाज, ४ भागुरि, ५ पौष्करसादि ६ चारायण, ७ काशकृत्स्न, ८ वैयाघ्रपाद, ९ माध्यंदिनी, १० रौढि, ११ शौनकि, १२ गौतम, १३ व्याडि,

१४ आश्वलायन, १५ काश्यप, १६ गार्ग्य, १७ गालव, १८ चाक्रवर्मण, १९ भारद्वाज, २० शाकटायन, २१ शाकल्य, २२ सेनक व २३ स्फोटायन.
(कल्याण हिं. स. अंक)

**तेवीसजण परमात्म शक्ति साह्य असलेले व त्यांचे ते ते व्यक्तिगुण** — १ सत्यवान्–सत्यप्रतिज्ञ, २ आंगिरस–अंगातील जीवनरसाचे ध्यान करणारा, ३ अगस्ति–पापे दूर करण्यात दत्तचित्त, ४ जमदग्नि–अग्नि प्रज्वलित करणारा, ५ अत्रि–उद्धारार्थ प्रयत्न, ६ काश्यप–सूक्ष्मदर्शी, ७ वसिष्ठ–सर्वत्र सुखानें निवास, ८ शावाश्व प्रयत्नशील, ९ वध्र्यश्व–इंद्रिय निग्रही, १० पुरुमीढ–सधन, ११ विमद–निगर्वी, १२ सप्तवध्रि–इंद्रिय दमन, १३ भरद्वाज–अन्नदान, १४ गविष्ठिर–वचन पाळणारा, १५ विश्वामित्र–सर्वांचा मित्र, १६ कुत्स–दोषाची निंदा करणारा, १७ कक्षीवान्–गतिशील, १८ कण्व–शब्दविद्याप्रवीण, १९ मेधातिथि–बुद्धीस प्राप्त करणारा, २० त्रिशोक–स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीन विषयाचा शोक होतो असा. २१ उशना–संयमी कवि, २२ गौतम–गतिशील आणि २३ मुद्गल–आनंदीवृत्ति. (अथर्व–अनु. भाग २ रा)

## २४

**चोवीस अक्षरी मंत्र व त्याच्या देवता** —

ॐ तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि।
धियो यो नः प्रचोदयात् ॥ (गायत्री मंत्र)

**देवता** — १ अग्नि, २ वायु, ३ सूर्य, ४ आकाश, ५ यम, ६ वरुण, ७ बृहस्पति, ८ पर्जन्य, ९ इंद्र, १० गंधर्व, ११ पूषा, १२ मित्र, १३ त्वष्टा, १४ वसु, १५ मरुद्गण, १६ सोम, १७ अंगिरा, १८ विश्वेदेव, १९ अश्विनीकुमार, २० प्रजापति, २१ सपूर्ण देवता, २२ रुद्र, २३ ब्रह्मा आणि २४ श्रीविष्णु. गायत्री मंत्र हा चोवीस अक्षराचा आहे. प्रत्येक अक्षराची एक देवता अशा या चोवीस देवता मानल्या आहेत. (देवी. भाग. स्कंध १२-१)

**चोवीस अणु** — मनुष्य बीजाच्या लहानात लहान पेशीमध्यें एकदर चोवीस जातांणु असतात. परिपूर्ण-वर्धित जीवाणूपासून स्त्री निर्माण होते, तर खुरटलेल्या अशा भक तुकड्यापासून पुरुष निर्माण होतो असें आधुनिक जीवन वा अनुवंशशास्त्र सांगतें. ( वनिता सारस्वत )

**चोवीस अवतार** — मत्स्य, कूर्म वराह, इत्यादि दहा अवतार ( दशावतार पाहा ) ११ नारायण. १२ शौनक, १३ नारद, १४ स्वायंभू, १५ कपिल, १६ दत्तात्रेय, १७ ऋषभदेव, १८ हंस, १९ हयग्रीव, २० पृथुराजा, २१ ध्रुव, २२ धन्वंतरि, २३ मोहिनी व २४ व्यास, असे अनेक कारणास्तव विष्णूनें घेतलेले १४ अवतार ( याना लीलावतार म्हणतात ) मिळून चोवीस. ( भाग. स्क १ अ. २ )

**चौवीस एकादशा** — प्रत्येक मासात दोन एकदशा असतात. एक शुद्ध पक्षात आणि एक कृष्ण पक्षात. त्यांची नावें मासपरत्वें—

| | | | |
|---|---|---|---|
| कामदा शु.<br>वरुथिनी कृ. | चैत्र | मोहिनी शु.<br>अपराजिता कृ. | वैशाख |
| निर्जला शु<br>योगिनी कृ. | ज्येष्ठ | शयनी शु<br>कामिका कृ. | आषाढ |
| पुत्रदा शु.<br>अजा कृ. | श्रावण | परिवर्तिनी शु.<br>इंदिरा कृ. | भाद्रपद |
| पाशांकुशा शु.<br>रमा कृ. | आश्विन | प्रबोधिनी शु.<br>उत्पत्ति कृ. | कार्तिक |
| मोक्षदा शु.<br>सफला कृ. | मार्गशीर्ष | पुत्रदा शु.<br>षट्तिला कृ. | पौष |
| जया शु.<br>विजया कृ. | माघ | आमलकी शु<br>पापमोचनी कृ. | फाल्गुन |

अधिक महिना आल्यास दोन एकादशा अधिक येतात त्या—

( १ ) कमला अधिक शु. ( २ ) कमला अधिक कृ ( धर्मसिंधु )

**चोवीस गुण ( न्यायशास्त्र )** — १ रूप, २ रस, ३ गंध, ३ स्पर्श, ५ संख्या, ६ परिमाण, ७ पृथक्त्व, ८ संयोग, ९ विभाग, १० परत्व,

११ अपरत्व, १२ गुरुत्व, १३ द्रवत्व, १४ स्नेह, १५ शब्द, १६ बुद्धि, १७ सुख, १८ दुःख, १९ इच्छा, २० द्वेष २१ प्रयत्न २२ धर्म २३ अधर्म व २४ संस्कार असे चोवीस गुण न्यायशास्त्रात मानलें आहेत (न्यायदर्शन)

**चोवीस गुरु ( अवधूताचे )** — अवधूतानं एकंदर चोवीस गुरु केले होते, अशी भागवतात कथा आहे ते गुरु व त्यापासून घतलेले गुण अनुक्रमे—१ पृथ्वी क्षमावृत्ति व परोपकारित्व २ वायु–निर्लेपता, ३ आकाश–सर्वत्र व्यापून असंग राहणें, ४ उदक–स्वच्छता आणि पवित्रता, ५ अग्नि–तेजस्विता, उपयोग करून घणारा भेटेल त्याप्रमाणें होणें, ६ चद्रमा–आत्मा अविनाशी आहे, विकार देहाला असतात ७ सूर्य–भेदाभेदशून्यत्व ८ कपोत–अति आसक्ति नाशास कारण होते, ९ अजगर–निरलस उदासीनता, १० समुद्र–सदैव स्थिर, ११ पतंग–बाह्य स्वरूपाला भुलू नये, १२ मधुकर–गुणाला भुलून आसक्त झाले असता नाश होतो, १३ हत्ती–विषयाला लपट झाला असता नाश होतो, १४ मधुपा ( मधुमक्षिका ) उपभोग न घेता केलेला संचय नष्ट होतो, १५ हरिण–नादमोहित चालू असता नाश होतो, १६ मीन–रसना ताब्यात ठेवता आली नाहीं तर मरण ओढवते १७ पिंगला ( वेश्या )–आशेनें दुःख व निराशेपासून सुख होते, १८ कुरर ( टहिरी ससाणा )–पक्षी–प्रियवस्तूचा त्याग, १९ बाल–चिताशून्यता, २० कुमारी–एकाकी असणं, २१ शरकृत–चित्ताची एकाग्रता, २२ सर्प–सगरहित, एकस्थान सचार करणें योग्य २३ ऊर्णनाभि ( कोळी )–एकाकी–ईश्वर जगत् सर्ग निर्माण करतो व त्याचा संहार होतो हे ज्ञान आणि २४ सुपशकृत ( भिंगरी )–ध्यानसामर्थ्य ( भागवत स्कंध ११ अ ६–२ )

**चोवीस तीर्थंकर ( जैन धर्म )** — १ ऋषभ ( आदिनाथ ), २ अजितनाथ ३ संभवनाथ ४ अभिनंदननाथ, ५ सुमतिनाथ, ६ पद्मप्रभ, ७ सुपार्श्वनाथ, ८ चंद्रप्रभ, ९ पुष्पदंत १० शीतलनाथ, ११ श्रेयांसनाथ, १२ वासुपूज्य, १३ विमलनाथ, १४ अनंतनाथ, १५ धर्मनाथ, १६ शांतिनाथ, १७ कुंथुनाथ १८ अरनाथ, १९ मल्लिनाथ २० मुनिसुव्रत, २१ नमिनाथ, २२ नेमिनाथ २३ पार्श्वनाथ आणि २४ महावीर अथवा वर्धमान असे चोवीस तीर्थंकर होऊन गेले, असे जैन धर्मात मानले आहे. ( म शा को )

**चोवीस धमन्या** — मानव शरिरात रस वाहणाऱ्या धमनी म्हणजे नाड्या चोवीस आहेत. ( सुश्रुत शारीर )

**चोवीस नावें ( श्रीविष्णूचीं )** – १ केशव, २ नारायण, ३ माधव, ४ गोविंद, ५ विष्णु, ६ मधुसूदन, ७ त्रिविक्रम, ८ वामन, ९ श्रीधर, १० हृषिकेश, ११पद्मनाभ, १२ दामोदर, १३ संकर्षण, १४ वासुदेव,१५ प्रद्युम्न, १६ अनिरुद्ध, १७ पुरुषोत्तम, १८ अधोक्षज, १९ नारसिंह, २० अच्युत, २१ जनार्दन, २२ उपेंद्र, २३ हरि आणि २४ श्रीकृष्ण. हीं संध्यावंदनाच्या वेळीं घेतलीं जातात तीं चोवीस नावें.

**चोवीस नावें गायत्रीचीं** — १ गणेश गायत्री, २ विष्णु गायत्री, ३ लक्ष्मी गायत्री, ४ हंस गायत्री, ५ दत्त गायत्री, ६ देवी गायत्री, ७ अग्नि गायत्री, ८ राम गायत्री, ९ लक्ष्मण गायत्री, १० हनुमान गायत्री ११ कृष्ण गायत्री, १२ परशुराम गायत्री, १३ रुद्र गायत्री, १४ गरुड गायत्री, १५ नाग गायत्री, १६ नरसिंह गायत्री, १७ गुरु गायत्री, १८ चंद्र गायत्री, १९ सूर्य गायत्री, २० गंगा गायत्री, २१ गोप गायत्री, २२ ब्राह्मण गायत्री, २३ क्षत्रिय गायत्री आणि २४ वैश्य गायत्री.

**चोवीस प्रकार शौर्याचे** — १ शब्दशौर्य, २ प्रतापशौर्य, ३ दान शौर्य, ४ स्थानशौर्य, ५ उदयशौर्य, ६ तेजशौर्य, ७ संग्रामशौर्य, ८ प्रतिपत्ति शौर्य, ९ जयशौर्य, १० मानशौर्य, ११ ज्ञानशौर्य, १२ साहसशौर्य, १३ शरणागतशौर्य, १४ प्रमोदशौर्य, १५ उत्तमशौर्य, १६ अर्थशौर्य, १७ आचारशौर्य, १८ बलशौर्य, १९ कीर्तिशौर्य, २० धर्मशौर्य, २१ रक्षणशौर्य, २२ गुणशौर्य, २३ परितोषशौर्य, आणि २४ प्रबोधशौर्य. ( वस्तुरत्न कोश )

**चोवीस प्रकार सोमाचे ( सोमवल्ली )** — १ अंशुमान्, २ मुंजवान्, ३ चंद्रमा, ४ रजतप्रभा, ५ दूर्वासोम, ६ कनीयान्, ७ श्वेताक्ष, ८ कनकप्रभा, ९ प्रतापवान्, १० तालवृंत, ११ करवीर, १२ अंशवान, १३ स्वयंप्रभ, १४ महासोम, १५ गरुडाहृत, १६ गायत्र, १७ त्रैष्टुभ, १८ पांक्त, १९ जागत, २० शाक्वर, २१ अग्निष्टोम, २२ रैवत, २३ त्रिपदागायत्री व २४ उडुपति. ( सुश्रुत–चिकित्सा–अ. २९ )

**चोवीस प्रमुख मुद्रा कथकली नृत्याच्या** — मुद्रा म्हणजे विशिष्ट आशयाचा आविष्कार करण्यासाठीं दोन्ही या एक हाताच्या अंगुलींनी विशिष्ट

प्रकारचे गुपण किंवा रचना म्हणजे मुद्रा. त्या अशा :— १ हस्तपताक २ कटक, ३ मुष्टि, ४ कर्तरीमुख, ५ शुकतुण्ड, ६ कपित्थक, ७ हस, ८ शिखर ९ हसास्य, १० अंजलि, ११ अर्धचन्द्र, १२ मुकुर, १३ भ्रमर, १४ सूचिकामुख, १५ पल्लव, १६ त्रिपताका १७ मृगशीर्ष, १८ आह्वय, १९ सर्पशिर, २० वर्धमानक, २१ अराल, २२ ऊर्णनाभ, २३ मुकुल व २४ कटकामुख.

अराल ऊर्णनाभश्च मुकुलं कटकामुखं ।
चतुर्विंशतिरित्येते करशास्त्रज्ञसमताः ॥ ( कथकलीशास्त्र )

**चोवीस बुद्ध** — १ दीपंकर, २ कौंडिण्य, ३ मंगल, ४ सुमन, ५ रैवत, ६ शोभित, ७ अनोमदर्शी, ८ पद्म, ९ नारद, १० पद्मोत्तर, ११ सुमेध, १२ सुजात, १३ प्रियदर्शी, १४ अथदर्शी, १५ धर्मदर्शी, १६ सिद्धार्थ, १७ तिष्य, १८ पुष्य, १९ विपश्यी, २० शिखी, २१ वेस्सभू, २२ ककुसंध, २३ कनकमुनि आणि २४ काश्यप. असे चोवीस बुद्ध होऊन गेले गौतमबुद्ध हे पंचविसावे बुद्ध होत. ( बुद्धवंसो )

**चोवीस मावळें** — जुन्नर ते चाकण १२ मावळे १ शिवनेर, २ जुन्नर, ३ भीमनेर, ४ घोडनेर, ५ माननेर, ६ भामनेर, ७ जामनेर, ८ पिंपळनेर, ९ पारनेर, १० सिन्नेर, ११ संगमनेर व १२ अकोळनेर पुण्यापासून शिरवळ पर्यंतची सह्याद्रीच्या पूर्व उतरणीवरील बारा खोरी—१ अंदरमावळ, २ नाणें मावळ, ३ पवनमावळ, ४ घोरणमावळ, ५ पौडखोरें, ६ मोसेमावळ, ७ मुठेमावळ, ८ गुंजणमावळ, ९ वेळवंडमावळ, १० भोरखोरें, ११ शिवतर-खोर, व १२ हिरडसमावळ. एकूण चोवीस. ( म. ज्ञा. को. वि. १८ )

**चोवीसभेद मंत्राचे** — १प्रशंसा, २ स्तुति, ३ आक्रोश, ४ निंदा, ५ परिदेवना, ६ अभिशाप, ७ विशाप, ८ प्रश्न, ९ प्रतिवचन, १० आशी ११ यज्ञ, १२ आक्षेप, १३ अथाख्यान, १४ सकथा, १५ नियोग, १६ अभियोग, १७ कथा, १८ सख्या, १९ वरप्रदान, २० प्रतिबंध, २१ उपदेश, २२ नमस्कार, २३ स्पृहा आणि २४ विलाप.

( ब्रह्मांड. पु. अ. ३३–३४ )

**चोवीस मुद्रा गायत्री जपाच्या** — १ सुमुख, २ संपुट, ३ वितत, ४ विस्तृत, ५ द्विमुख, ६ त्रिमुख, ७ चतुर्मुख, ८ पंचमुख ९ षण्मुख,

१० अधोमुख, ११ व्यापकांजलि, १२ शकट, १३ यमपाश, १४ ग्रथित, १५ उन्मुखोन्मुख, १६ प्रलंब, १७ मुष्टिक, १८ मत्स्य, १९ कूर्म, २० वराह, २१ सिंहाक्रांता, २२ महाक्रांता, २३ मुद्गर आणि २४ पल्लव

( गुरुचरित्र, अ ३६ )

**चोवीस रत्नें** — देव-दानवांनी केलेल्या समुद्रमथनापासून निघालेल्या रत्नांची नांवें, सरव्या व क्रम चोहीकडे सारखी नाहींत. काहीं चौदा तर कोठें चोवीस रत्नें सांगितलीं आहेत तीं अशीं — १ हालाहल विष, २ चंद्र, ३ सुरभि धेनु, ४ कल्पवृक्ष, ५ पारिजातक, ६ आम्र, ७ संतानक, ८ कौस्तुभ रत्न ( चिंतामणि ), ९ उच्चैःश्रवा, १० ऐरावत — चौसष्ट हत्तींच्या कळपासह, ११ मदिरा, १२ विजया, १३ भाग, १४ लसूण, १५ गाजर, १६ धोतरा, १७ पुष्कर, १८ ब्रह्मविद्या, १९ सिद्धि, २० ऋद्धि, २१ माया, २२ लक्ष्मी, २३ धन्वंतरि आणि २४ अमृत ( स्कंद १-१-११ )

**चोवीस वादलक्षणें** – १ उत्पत्ति २ समाप्ति, ३ सत्यवाद, ४ प्रतिवाद, ५ पक्ष, ६ प्रतिपक्ष, ७ प्रमाण, ८ प्रमेय, ९ प्रभेद, १० प्रश्न, ११ प्रत्युत्तर, १२ दूषण, १३ अर्थान्तर, १४ उपन्यास, १५ अनुवाद, १६ आदेश, १७ निर्वाह, १८ निर्णय, १९ निग्रहस्थान, २० अर्थान्तरसमता, २१ सुस्वरत्व, २२ उच्चारण, २३ जय व २४ पराजय ( वस्तुरत्नकोश )

**चौवीस शब्दगुण** — १ श्लेष, २ प्रसाद, ३ समता, ४ माधुर्य, ५ सुकुमारता, ६ अर्थव्यक्ति, ७ कांति, ८ उदारत्व ९ उदात्तत्व, १० ओज, ११ और्जित्य, १२ प्रेयान्, १३ सुशब्दता, १४ समाधि, १५ सौक्ष्म्य, १६ गांभीर्य, १७ विस्तार, १८ संक्षेप १९ संमितत्व, २० भाविकत्व, २१ गति, २२ रीति, २३ उक्ति आणि २४ प्रौढी

( म मा शांति ३२० तळटीप )

**चौवीस शिलालेख सातवाहन कालीन व त्यांचीं स्थानें** — ८ नासिक ५ कान्हेरी, ३ कार्ले २ अमरावती, २ नाणेघाट, १ भल्सा, १ मैकाडोनी, १ कृष्णा, आणि १ कोल्हापूर पहिली वीस ( पश्चिम महाराष्ट्र ) व शेवटची चार ( आंध्र प्रदेश ), ( प्रेरणा मासिक )

**चोवीस शिवगणाचे अधिपति** — १ वीरभद्र, २ नंदी, ३ महाकाल, ४ सुभद्रक, ५ विशालाक्ष, ६ बाण, ७ पिंगलाक्ष, ८ विकंपन, ९ विरूप,

१० विश्रुति, ११ मणिभद्र, १२ बाष्कल, १३ कपिल, १४ दीर्घदंष्ट्र, १५ विकट, १६ ताम्रलोचन, १७ कालकर, १८ बलिभद्र, १९ कालजिह्व, २० कुटीचर २१ बालोन्मत्त, २२ रणश्लाघी, २३ दुर्जय व २४ दुर्गम.

( शिवपुराण रुद्रसंहिता, युद्धखंड, अ. ३३ )

# २५

**पंचवीस तत्त्वें काव्याचीं** — ९ नवरस ( नवाचे अर्का ) व १६ अंगे मिळून पचवीस तत्त्वें — १ लालित्य, २ अर्थ, ३ गौरव, ४ साहित्य, ५ संगीत, ६ शृंगार, ७ ठेव ( रचना ), ८ पद, ९ सिद्धांत. १० भाव, ११ दृष्टांत, १२ न्याय, १३ वर्णक, १४ उपमा, १५ श्लेष, आणि १६ समयोचित प्रकरण.

" जे नवरस आणि सोळा आंगें; ते काव्य महापवित्र सांगे ॥

( गोपाळकविकृत रुक्मिणी स्वयंवर )

**पंचवीस तत्त्वें ( सांख्यशास्त्र )** — १ प्रकृति, २ पुरुष, ३ बुद्धि, किंवा महत्तत्त्व, ४ अहंकार, ५ मन, ६ ते १० पंच ज्ञानेंद्रियें, ११ ते १५ पंच कर्मेंद्रियें, १६ ते २० पंच तन्मात्रें म्हणजे पंचमहाभूतांचे सूक्ष्म अंश. उदा —१ शब्दतन्मात्रा, २ स्पर्शतन्मात्रा, ३ रूपतन्मात्रा, ४ रसतन्मात्रा, आणि ५ गंधतन्मात्रा व २१ ते २५ पंचमहाभूतें. या पचवीस तत्त्वांवर सृष्टीची उभारणी आहे, असें सांख्यशास्त्र मानतें. सांख्य शब्दाचे दोन अर्थ आहेत—एक ज्ञान अथवा तत्त्वज्ञान. विशेषेंकरून कपिलमुनींनी प्रतिपादिलेलें दर्शन असा बोध होतो. सांख्य शास्त्रांत सृष्टीची उभारणी पंचवीस तत्त्वांवर झाली असल्यामुळें व इतर अनेक प्रकारांनीहि विवक्षित संख्या निर्दिष्ट केली असल्यामुळें सांख्य म्हणजे मोजणारें शास्त्र असाहि दुसरा अर्थ आहे. या पचवीस तत्त्वांच्या पलीकडला जो सविसावा तो वेदान्तप्रतिपादित परमात्मा. या पंचवीस तत्त्वांचें ज्ञान होईल त्या पुरुषाला तो ब्रह्मचारी, गृहस्थ वा संन्यासी असो तो सर्व दुःखापासून मुक्त झाल्याशिवाय रहात नाहीं. असें सांख्यशास्त्र मानतें.

पंचविंशतितत्त्वज्ञो यत्र तत्राश्रमे वसन् ।
जटी मुण्डी शिखी वापि मुच्यते नात्र संशयः ॥

( सा. का. गौडपादभाष्य )

**पंचवीस तत्त्वें ( स्थूल शरीराचीं )** — १ अस्थि, २ मांस, ३ त्वचा, ४ नाडी, ५ केंस ( पृथ्वीचे गुणधर्म ), ६ लाळ, ७ मूत्र, ८ रक्त, ९ रेत आणि १० स्वेद ( आप ), ११ क्षुधा, १२ तृषा, १३ आलस्य, १४ निद्रा, १५ मैथुन ( तेज ), १६ चलन, १७ वलन, १८ निरोधन, १९ प्रसरण, २० आकुंचन ( वायु ) २१ काम, २२ क्रोध, २३ लोभ, २४ मोह आणि २५ भय ( आकाश गुण ) ( दासबोध १७ ८ )

**पंचवीस दोष ( गायकाचे )** — १ दांत चावून गाणें, २ ओरडून गाण्याचा निरस करणें, ३ सू सू असा आवाज निघणें, ४ भीत भीत गाणें, ५ गडबडीनें गाणें, ६ कंपयुक्त, ७ तोंड वेडेंवाकडें करणें, ८ बेसूर, ९ कर्कश, १० बेताल, ११ मान उंच करून गाणें, १२ कावळ्याप्रमाणें तोंड करून गाणें, १३ चेहरा फुगवणें, १४ मान वाकडी करणें, १५ तुंब्याप्रमाणें तोंड फुगवून गाणें, १६ हात व पाय आपटणें, १७ डोळे मिचकावून गाणें, १८ रसहीन, १९ रागांत न लागणारे स्वर लावून गाणें, २० स्वर आणि वर्ण यांचा उच्चार बरोबर न करणें, २१ स्वराच्या योग्य जागी ज्याचा आवाज लागत नाहीं असे, २२ नियमाप्रमाणें न गाणें, २३ एका रागांत अनेक अयोग्य राग मिश्रण करून गाणें, २४ बेफिकीर गाणें व २५ नाकांतून आवाज काढून गाणें.

मिश्रकोऽनवधानश्च तथाऽन्यः सानुनासिकः ।
पंचविंशतिरित्येते गायका निन्दिता मताः ॥ ( संगीतरत्नाकर )

**पंचवीस वाद** — १ अद्वैतवाद, २ द्वैतवाद, ३ विशिष्टाद्वैतवाद, ४ कर्मवाद, ५ कालवाद, ६ ईश्वरवाद, ७ योगवाद, ८ सांख्यवाद, ९ ब्रह्मवाद शुद्धाद्वैतवाद, १० निराकारवाद, ११ अहब्रह्मवाद, १२ वायुवाद ( दरवेश ), १३ पृथ्वीवाद ( योगी ), १४ चंद्रमुक्त स्वयं शिलावाद ( जैनी ), १५ महदाकाशवाद ( जंगम ), १६ पौराणिक स्वर्गवाद, १७ ज्ञानस्वरोदयवाद, १८ शब्दवाद, १९ ज्योतिषवाद, २० नास्तिक्यवाद, २१ शून्यवाद ( बौद्ध ), २२ वीर्यवाद ( नास्तिकविषयी ) २३ देहवाद–भौतिकवादी पाश्चात्य,

२४ भक्तिवाद, आणि २५ (मुस्लीम). असे अध्यात्मात पंचवीसवाद या मत मतांतरें आहेत. (पंचग्रथी)

**वेताळ पंचविशी** — एक कथासग्रह. यात वेताळानें सांगितलेल्या लोकप्रिय अद्भुत अशा पंचवीस कथा आहेत. म्हणून यास वेताळपञ्चविंशी म्हणतात. हा ग्रंथ डभलदत्तकृत असून तो सोळाव्या शतकात होऊन गेला असे म्हणतात.

# २६

**सव्वीस गुण (गोष्टी) उपासनेस आवश्यक** — १ गीत, २ वाद्य, ३ नृत्य, ४ पुराणपाठ, ५ धूप, ६ दीप, ७ नैवेद्य, ८ पुष्प, ९ गंध, १० चंदनधारण, ११ फल, १२ अर्घ्य, १३ श्रद्धा, १४ दान, १५ इंद्रिय-संयम, १६ सत्यनिष्ठा, १७ निद्राहीनता, १८ आनंद प्रकाश, १९ क्रियानुष्ठान, २० विराग, २१ उत्साहप्रदर्शन, २२ आळसाचा त्याग, २३ प्रदक्षिणा २४ नमस्कार, २५ नीराजन आणि २६ आरति. (स्कंदपुराण)

**सव्वीस दैवी गुण** — १ अभय, २ अंतःकरणाची शुद्धता, ३ ज्ञान व कर्म याविषयीं समान निष्ठा, ४ दातृत्व, ५ दम, ६ यज्ञ, ७ धर्माप्रमाणे आचरण, ८ तप, ९ सरळपणा, १० अहिंसा, ११ सत्य, १२ क्रोध नसणें, १३ (कर्मफल) त्याग, १४ शांति १५ चहाडी न करणे, १६ सर्व भूताचे ठायीं दया, १७ अनासक्ति–निर्लोभता, १८ मनाचें मार्दव, १९ दुराचरणाची लाज, २० चंचलपणा नसणें (स्थिर बुद्धि), २१ तेजस्विता, २२ क्षमा, २३ धैर्य–सहनशीलता, २४ अंतर्बाह्य शुद्धता, २५ द्रोह न करणें आणि २६ दुरभिमान नसणें (भ. गी. १६ १ ते ३).

**सव्वीस प्राचीन कोशग्रंथ** — १ मेदिनी, २ अमरमाला, ३ त्रिकांड, ४ रत्नमालिका, ५ रतिदेव, ६ भागुरि, ७ व्याडि, ८ शब्दार्णव, ९ द्विरूप, १० वलिम, ११ रभस, १२ पुरुषोत्तम, १३ दुर्ग, १४ अभिधानमाला, १५ मंसारावर्त, १६ शाश्वती १७ विश्व, १८ बोपालित, १९ वाचस्पति, २० हलायुध, २१ हारावली, २२ साहसांक, २३ विक्रमादित्य, २४ हेमचंद्र, २५ रुद्र आणि २६ अमर. हे सव्वीस प्राचीन संस्कृत कोशग्रंथ होत.

एते मात्रा समाख्याता सरशा षड्विशति स्मृता ॥
इति मातृनामानि। (एकाक्षर कोश)

**सत्तावीस ब्रह्मवादिनी स्त्रिया** — १ घोषा, २ गोधा, ३ विश्ववारा, ४ अपाला, ५ उपनिषद्, ६ ब्रह्मजाया जुहू, ७ अदिति, ८ इंद्राणी, ९ इंद्र माता, १० सरमा, ११ रोमशा, १२ ऊर्वशी, १३ लोपामुद्रा, १४ नद्या, १५ यमी, १६ शश्वती, १७ श्री, १८ लाक्षा, १९ सार्पराज्ञी, २० वाक्, २१ श्रद्धा, २२ मेधा, २३ दक्षिणा, २४ रात्री, २५ सूर्या व २६ सावित्री
' रात्री सूर्या च सावित्री ब्रह्मवादिन्य ईरिता ॥ (ऋग्वद–बृहद्देवता)

# २७

**सत्तावीस नक्षत्रें** — १ अश्विनी, २ भरणी ३ कृत्तिका, ४ रोहिणी, ५ मृग, ६ आर्द्रा, ७ पुनर्वसु ८ पुष्य, ९ आश्लेषा, १० मघा, ११ पूर्वा, १२ उत्तरा, १३ हस्त, १४ चित्रा, १५ स्वाती, १६ विशाखा १७ अनु राधा, १८ ज्येष्ठा १९ मूळ, २० पूर्वाषाढा, २१ उत्तराषाढा २२ श्रवण, २३ धनिष्ठा, २४ शततारका २५ पूर्वाभाद्रपदा, २६ उत्तराभाद्रपदा आणि २७ रेवती (ज्योतिष) हीं सत्तावीस नक्षत्र देवाचा मंदिरें होत पहिलीं चौदा देवनक्षत्रें व शेवटचीं तेरा यमनक्षत्रें होत अभिजित् हें अठ्ठाविसावें नक्षत्र नक्षिकन मानले नाव या सत्तावीस नक्षत्रांपैकी मृग नक्षत्रापासून हस्त नक्षत्रापर्यंत नऊ नक्षत्र पर्जन्यमानाचा होत (तै ब्रा)

**सत्तावीस योग** — १ विष्कंभ, २ प्रीति, ३ आयुष्यमान्, ४ सौभाग्य, ५ शोभन, ६ अतिगंड, ७ सुकर्मा, ८ धृति, ९ शूल, १० गंड, ११ वृद्धि, १२ ध्रुव १३ व्याघात, १४ हर्षण, १५ वज्र १६ सिद्धि, १७ व्यतिपात, १८ वरीयाण, १९ परिघ, २० शिव, २१ सिद्धि, २२ साध्य, २३ शुभ, २४ शुक्र २५ ब्रह्म, २६ एंद्र आणि २७ वैधृति (ज्योतिषसार)

**सत्तावीस प्रकार लोककथेच** — १ राजकथा, २ चोरकथा, ३ महा मात्रकथा, ४ सेनाकथा, ५ भयकथा, ६ युद्धकथा, ७ अन्नकथा, ८ पानकथा,

९ वस्त्रकथा, १० शयनकथा, ११ मालाकथा, १२ गंधकथा १३ ज्ञातिकथा, १४ यानकथा, १५ ग्रामकथा, १६ निगमकथा, १७ नगरकथा, १८ जनपद कथा, १९ स्त्रीकथा, २० पुरुषकथा, २१ शूरकथा, २२ विशिखाकथा (बाजारातील गप्पा) २३ कुम्भस्थाकथा ( पाणवठ्यावरील कथा ), २४ पूर्वप्रेत कथा ( मृतांच्या गोष्टी ) २५ निरर्थककथा, २६ लोकाख्यायिका आणि २७ समुद्राख्यायिका ( दीघनिकाय १ ८ )

**सत्तावीस रसायनशास्त्र प्रवर्तक** — १ आदिनाथ २ चन्द्रसेन, ३ लंकेश, ४ विशारद, ५ कपाली, ६ मत, ७ माण्डव्य, ८ भास्कर, ९ शूरसेन, १० रत्नकोष, ११ शंभु १२ सात्त्विक १३ नरवाहन, १४ इन्द्रद, १५ गोमुख १६ कम्बलि, १७ व्याडि १८ नागार्जुन, १९ सुरानंद, २० नागबोधि, २१ यशोधन, २२ खण्ड २३ कापालिक, २४ ब्रह्मा, २५ गोविंद, २६ लम्पक आणि २७ हरि हे सत्तावीस रसशास्त्राचे आद्यप्रवर्तक व रससिद्धि देणार होत

सप्तविंशतिसंख्याका रससिद्धिप्रदायका ॥' ( अ र र १ )

**सत्तावीस ( मराठी ) वृत्तें** — १ स्रग्धरा किंवा फटका २ वालानंद, ३ शार्दूली किंवा रसवाहिनी, ४ चंद्रकांत किंवा सुरम्भा, ५ सूर्यकांत किंवा राजसा, ६ माधवकरणी तथा मधुरा, ७ मनका, ८ कुसुमकरणी, ९ राजहंस तथा रसतरंगिणी, १० हंसराणी, ११ शारदा, १२ नृपममता, १३ भूपति वैभव, १४ अनूर, १५ मुद्रिका १६ पादाकुलक १७ वधुसरी, १८ देवला, १९ म्हातारा, २० माळीण, २१ पना २२ पंचकल्याणी, २३ आद्रा, २४ धुगुरवाळा २५ कृष्णाकायना, २६ कुसुमगंधा व २७ कबीर कवितेच्या प्रत्येक चरणात किती अक्षर असावीत याचे मापन असलेली ही सत्तावीस प्रमुख मराठी वृत्त होत ( म ज्ञा को विभाग ५ वा )

**सत्तावीस शास्त्रें** — १ शब्दशास्त्र २ छंद शास्त्र, ३ अलंकारशास्त्र, ४ काव्यशास्त्र, ५ कथाशास्त्र ६ नाट्यशास्त्र, ७ वाद्यशास्त्र, ८ निघंटु, ९ धर्मशास्त्र, १० अर्थ, ११ काम १२ मन्त्रशास्त्र १३ वाद, १४ शिल्प, १५ वास्तुशास्त्र, १६ विज्ञान, १७ कल्पशास्त्र, १८ ज्योतिषशास्त्र, १९ कल्पशास्त्र, २० शिक्षा, २१ लक्षणशास्त्र २१ पुराण, २३ मनशास्त्र, २४ तर्कशास्त्र, २५ गणित, २६ गांधर्व आणि २७ सिद्धान्तशास्त्र ( वस्तुरत्नकोश )

# २८

**अठ्ठावीस नक्षत्राधिपति** — १ दस (अश्विनीकुमार), २ यम, ३ अग्नि, ४ ब्रह्मा, ५ चंद्र, ६ शिव, ७ अदिति, ८ गुरु, ९ सर्प, १० पितर, ११ भग, १२ अर्यमा, १३ सूर्य, १४ विश्वकर्मा, १५ वायु, १६ अग्नि, १७ मित्र, १८ इंद्र, १९ राक्षस, २० जल, २१ विश्वेदेव, २२ विष्णु, २३ वसु, २४ वरुण २५ अजैकपाद, २६ अहिर्बुध्न्य आणि २८ पूषा. हे अठ्ठावीस नक्षत्रांचे अधिपति होत.

**अठ्ठावीस योगेश्वर** — १ श्वेत, २ सुतार, ३ मदन, ४ सुहोत्र, ५ कंकण, ६ लोगाक्षि, ७ जैगीषव्य, ८ दधिवाहन, ९ ऋषभ, १० मुनि, ११ उग्र, १२ अत्रि, १३ सुबालक, १४ गौतम, १५ वेदशीर्ष, १६ गोकर्ण, १७ गुहवासी, १८ शिखंडभृत, १९ जटामाली, २० अट्टहास, २१ दारुक, २२ लांगली, २३ महाकाय मुनि, २४ शूली, २५ मुंडिश्वर, २६ सहिष्णु, २७ सोमशर्मा आणि २८ नकुलीश.

सहिष्णुः सोमशर्मा च नकुलीश्वर एव च ।
अष्टाविंशतिसंख्याता योगाचार्या युगक्रमात् ॥

(शिवमहापुराण वायवीय संहिता)

**अठ्ठावीस व्यास** — १ ब्रह्मदेव, २ मनु, ३ उशना, ४ बृहस्पति, ५ सूर्य, ६ मृत्यु, ७ इन्द्र, ८ वसिष्ठ, ९ सारस्वत, १० त्रिधामा, ११ त्रिवृषा, १२ भरद्वाज, १३ अन्तरिक्ष, १४ वर्णी, १५ त्रय्यारुण, १६ धनञ्जय, १७ कृतञ्जय, १८ ऋणज्य, १९ भारद्वाज, २० गौतम, २१ उत्तम (हर्यात्मा), २२ वेनराजस्व, २३ तृणबिंदु, २४ भार्गवऋक्ष, २५ शक्ति, २६ पराशर, २७ जातुकर्ण व २८ कृष्णद्वैपायन. असे अठ्ठावीस व्यास होऊन गेले.

अष्टाविंशतिरित्येते वेदव्यासाः पुरातना. । (विष्णु अंश ३ अ. ३)

**अठ्ठावीस शुभाशुभ योग** — १ आनंद, २ कालदंड, ३ धूम्र, ४ धाता, ५ सौम्य, ६ ध्वांक्ष, ७ ध्वज, ८ श्रीवत्स, ९ वज्र, १० मुद्गर, ११ छत्र, १२ मित्र, १३ मानस, १४ परम, १५ लंबक, १६ उत्पात,

१७ मृत्यु, १८ कोण, १९ सिद्धि, २० शुभ, २१ अमृत, २२ मुसल, २३ गद, २४ मातग ( कुजर ) २५ राक्षस, २६ चर, २७ स्थिर आणि २८ वर्धमान.

" स्थिरः प्रवर्धमानश्च योगाष्टाविंशतिक्रमात् " ( ज्योतिष )

**अठ्ठावीस शैवागम** — श्रीशिवाच्या पाच मुखापासून आविर्भूत झालेले शैवधर्माचे सिद्धातग्रथ. यास शैवागम म्हणतात. ते असे — १ **सद्योजात** — १ कायिक, २ योगज, ३ चिन्त्य, ४ कारण व ५ अजित. २ **वामदेव** — ६ दीप्त, ७ सूक्ष्म, ८ सहस्र, ९ अंशुमान् व १० सुप्रभेद. ३ **अघोर** — ११ विजय, १२ निःश्वास, १३ स्वायम्भुव, १४ अनल व १५ वीर. ४ **तत्पुरुष** — १६ रौरव, १७ मुकुट, १८ विमल, १९ चन्द्रज्ञान, २० विम्ब, व ५ **ईशान** — २१ प्रोद्गीत, २२ ललित, २३ सिद्ध, २४ सन्तान, २५ सर्वोत्तर, २६ परमेश्वर, २७ किरण आणि २८ वातुल. ( भारतीय वास्तुशास्त्र प्रतिमा विज्ञान )

**अठ्ठावीस साधूंची लक्षणें** — १ दयालुत्व, २ अद्रोह, ३ तितिक्षा ( सहनशीलता ), ४ सत्य, ५ अनघ ( पवित्र ), ६ समबुद्धि, ७ परोपकार, ८ अकामता, ९ बाह्येंद्रियनिग्रह, १० कनवाळुपणा, ११ स्वकर्माचरण, १२ अकिंचनता, १३ निरिच्छ, १४ मितभोजन, १५ शांति, १६ स्थिरता, १७ परमेश्वराला शरण जाणें, १८ मननशीलता, १९ सावधानता, २० गांभीर्य, २१ धैर्य, २२ षड्विकारावर जय, २३ निरभिमानता. २४ प्राणिमात्राविषयीं सद्भाव, २५ परबोधकता, २६ निष्कपटता २७ कारुणिकता आणि २८ वेदशास्त्ररहस्याचे ज्ञान

कवि या पदाचें व्याख्यानें । झालीं अठ्ठावीस लक्षणें ।
उरलीं जे अति गहन । ते दो श्लोकीं कृष्णें आदरिलें सागों ॥
( ए. भा. ११–१०५० )

## २९

**एकोणतीस प्रकारच्या वीणा** — १ अलावणी, २ ब्रह्मवीणा, ३ किन्नरी, ४ लघुकिन्नरी, ५ विपंची, ६ वल्लकी, ७ ज्येष्ठा, ८ चित्रा, ९

घोषवती, १० जया, ११ हस्तिका, १२ कुनाशिका, १३ कूर्मी, १४ सारंगी, १५ परिवादिनी, १६ त्रिसरी, १७ शतचंद्री, १८ नकुलोष्ठी, १९ दसवी, २० उडंबरी, २१ पिनाकी, २२ नि शंक, २३ शुष्कल, २४ गदावारण हस्त, २५ रुद्र, २६ स्वरमण्डळ, २७ कपिलास, २८ मधुस्यंदी आणि २९ घोण.

**एकोणतीस शस्त्रास्त्रें** — १ धर्मचक्र, २ काळचक्र, ३ धर्मास्त्र, ४ दिव्यास्त्र, ५ धर्मपाश, ६ काळदण्डास्त्र, ७ धनुष्य, ८ मुसळ, ९ शूळ, १० दण्डास्त्र, ११ वज्रास्त्र, १२ शैलास्त्र–पर्वतास्त्र, १३ पौंचास्त्र, १४ लोलास्त्र, १५ परिघास्त्र, १६ गदनाकरास्त्र–वरुणास्त्र, १७ अम्न्यस्त्र, १८ मानवास्त्र, १९ मोहनास्त्र, २० घातनास्त्र, २१ पातनास्त्र, २२ सोमनास्त्र, २३ धर्मास्त्र, २४ निद्रास्त्र, २५ देवास्त्र, २६ उदकास्त्र, २७ पर्जन्यास्त्र, २८ दुर्मदास्त्र व २९ विद्याधराशक्ति–( कथा कल्पतरु )

# ३०

**तीस कल्प** — १ श्वेत, २ नीललोहित, ३ वामदेव, ४ रथांतर, ५ रौरव, ६ देव, ७ बृहत्, ८ कदर्प, ९ सद्य, १० ईशान, ११ तम, १२ सारस्वत, १३ उदान, १४ गरुड, १५ कौर्म, १६ नारसिंह, १७ समान, १८ आग्नेय, १९ सोम, २० मानव, २१ तत्पुरुष, २२ वैकुंठ, २३ लक्ष्मी, २४ सावित्री, २५ घोर, २६ श्वेतवाराह ( चालू ), २७ वैराज, २८ गौरी, २९ माहेश्वर आणि ३० पितृ मानवाचीं सहस्त्रवर्षे म्हणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस याला कल्प म्हणतात. असे तीस कल्प आहेत. अशी जगाच्या कालमर्यादेची गणना प्राचीनानीं केली आहे.

**तीस गुणांचें शरीर** — ५ ज्ञानेंद्रियें व त्याचे ५ विषय, ११ मन, १२ बुद्धि, १३ सत्त्व, १४ अहंकार, १५ वासना, १६ अविद्या, १७ माया, १८ व्यक्ति, १९ सुख दुःख इ द्वंद्वें, २० काल, ५ पंचमहाभूतें, २६ अस्तित्व, २७ नास्तित्व, २८ पापपुण्य, २९ संस्कार, आणि ३० बल म्हणजे इच्छिलेली वस्तु मिळविण्याकरिता केलेली धडपड. हे तीस गुण ज्या ठिकाणीं एकत्र असतात त्यास शरीर म्हणतात. ( म. भा. शांति, अ. ३२० )

**तीस ताल** — १ केरवा, २ दादरा, ३ तीव्रा, ४ रूपक, ५ पश्तु, ६ धुमाळी, ७ मध्यमावती, ८ गजल, ९ ठेका, १० झपताल, ११ सूलताल, १२ रुद्रताल, १३ भानुमती, १४ चौताल, १५ एकताल, १६ खेमटा, १७ फरोदस्त, १८ अडा चौताल, १९ झुमरा, २० दीपचंद, २१ धमार, २२ सवारी, २३ गजझंपा, २४ तिलवाडा, २५ त्रिताल, २६ पंजाबी, २७ टप्प्याचा ठेका, २८ शिखर, २९ विष्णुताल आणि ३० ब्रह्मताल. असे तीस ताल प्रचारात आहेत. (संगीतशास्त्र) ताल म्हणजे गीत, वाद्य आणि नृत्य यांच्या क्रियेच्या गतीचें कालदर्शक नियमित प्रमाण. (म. ज्ञा. को.)

**तीस तिथी व त्या तिथींच्या देवता** — १ प्रतिपदा–ब्रह्मन्, २ द्वितीया–त्वष्टा, ३ तृतीया–विष्णु, ४ चतुर्थी–यम, ५ पंचमी–सोम, ६ षष्ठी–कुमार, ७ सप्तमी–मुनि, ८ अष्टमी–वसु, ९ नवमी–शिव, १० दशमी–धर्म, ११ एकादशी–रुद्र, १२ द्वादशी–वायु, १३ त्रयोदशी–काम, १४ चतुर्दशी–अनंत, १५ पौर्णिमा–विश्वेदेव, ३० अमावास्या–पितर. (संस्कारविधि) (आ) १ प्रतिपदा–अग्नि, २ द्वितीया–ब्रह्म, ३ तृतीया–गौरी, ४ चतुर्थी–गणेश, ५ पंचमी–सर्प, ६ षष्ठी–कार्तिकेय, ७ सप्तमी–सूर्य, ८ अष्टमी–शिव, ९ नवमी–दुर्गा, १० दशमी–धर्म, ११ एकादशी–विश्वेदेव, १२ द्वादशी–विष्णु, १३ त्रयोदशी मदन, १४ चतुर्दशी शिव, १५ पौर्णिमा–चंद्र, ३० अमावास्या–पितर. (सुलभ ज्योतिषशास्त्र)

**तीस धर्म लक्षणें** — १ सत्य, २ दया, ३ तप, ४ शुद्धता, ५ सहनशीलता, ६ योग्यायोग्य विचार, ७ मनोनिग्रह, ८ बाह्येंद्रियदमन, ९ अहिंसा, १० ब्रह्मचर्य, ११ दान, १२ उचित मंत्राचा जप, १३ सरळपणा, १४ संतोष, १५ समत्व समदर्शी महात्म्यांची सेवा, १६ हळूहळू भोग निवृत्त होणें, १७ निष्फल कर्माचें अवलोकन न करणें, १८ निरर्थक भाषण न करणें, १९ आत्मचिंतन, २० प्राणिमात्राच ठिकाणीं समता, २१ सर्वत्र आत्मबुद्धि व देवता बुद्धि धारण करणें २२ भगवताचे गुणगान, २३ श्रवण, २४ स्मरण, २५ सेवन २६ पूजन, २७ नमन, २८ दास्य, २९ सख्य आणि ३० आत्मनिवेदन. अशा तीस लक्षणांनीं युक्त असा सर्व मानवांचा उत्कृष्ट धर्म ऋषींनीं सांगितला आहे.

"त्रिंशल्लक्षणवान् राजन् सर्वात्मा येन तुष्यति" (भाग. स्कंद ७ अ. ११)

# ३१

**एकतीस उपग्रह** — सूर्याभोवती फेऱ्या घालीत राहिलेले नवग्रह, त्या सर्वांचे मिळून एकतीस उपग्रह आहेत ते असे—पृथ्वी १, मंगळ २, गुरू १२, शनि ९, युरेनस् ५, व नेपच्यून २. ( ज्योतिर्विभव )

**एकतीस तत्त्वें सविकार क्षेत्राची ( शरीराची )** — १ ते ५ पंचमहाभूतें, ६ अहंकार, ७ बुद्धि, ८ प्रकृति (अव्यक्त), ९ ते १८ दशेंद्रियें, १९ अन्तःकरण ( मन ), २० ते २४ पंचविषय, २५ इच्छा, २६ द्वेष, २७ सुख, २८ दुःख, २९ संघात ३० चैतन्य आणि ३१ धृति. या एकतीस तत्त्वांच्या समुदायाला सविकार क्षेत्र म्हणतात. ( वेदांतील राष्ट्रदर्शन )

# ३२

**बत्तीस अक्षरी मंत्र** — (अ) *सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः*
*सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित् दुःखमाप्नुयात्*
*( विश्वशांति मंत्र )*

( आ ) कृष्णाय वासुदेवाय हरये परमात्मने । प्रणतक्लेशनाशाय गोविंदाय नमो नमः ॥ संकट नाशनाकरिता म्हटला जाणारा महामंत्र.

( इ ) हरेराम हरेराम हरेराम हरेहरे
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ' ( रामगीता १३–८ )

**बत्तीस अलंकार** — १ मणि, २ मंगळसूत्र, ३ वज्रटीक, ४ गळसरी, ५ पुतळ्यांची माळ, ६ दुशी, ७ चंद्रहार, ८ हुल्लड पाच पदरी, ९ मूद, १० राखडी, ११ वेळ, १२केवडा, १३ कुड्ं, १४ कर्णफुल, १५ बाळ्या, १६ बुगड्या, १७ बाजुबंद, १८ वाकी, १९ कांकण्या, २० गोट, २१ तोडे, २२ बागड्या, २३ विल्वर, २४ माजपट्टा, २५ शिंदेशाही तोडे, २६

तोरड्या, २७ रणजोडवी, २८ जोडवी, २९ विरोया, ३० मासोळ्या. ३१ नथ व ३२ चमकी. असे स्त्रियांचे पूर्वकाळीं प्रमुख बत्तीस अलंकार होते.

न्हाईनाईचे रूप नटला सावळा वनमाळी।
सोळा शिणगार बत्तीस अलंकारलेणीं ल्याला सगळीं॥

( पट्टे बापुराव लावण्या व गवळणी )

**बत्तीस आसनें इहलोकीं सिद्धिप्रद** — १ सिद्ध, २ पद्म, ३ भद्र, ४ मुक्त, ५ वज्र, ६ स्वस्तिक, ७ सिंह, ८ गोमुख, ९ वीर, १० धनुरासन, ११ शव, १२ गुप्त, १३ मत्स्य, १४ मत्स्येन्द्र, १५ गोरक्ष, १६ पश्चिमोत्तान, १७ उत्कट, १८ संकट, १९ मयूर, २० कुक्कुट, २१ कूर्म, २२ उत्तानकूर्मक, २३ उत्तानमण्डुक, २४ वृक्ष, २५ मण्डुक, २६ गरुड २८ वृष, २८ शलभ, २९ मकर, ३० उष्ट्र, ३१ भुजंग आणि ३२ योगासन.

" द्वात्रिंशदासनानि तु मर्त्यलोके च सिद्धिदम्॥ ( मु. )

**बत्तीस उपराग** — १ शकराभरण, २ यमनकल्याण, ३ पूर्वा, ४ भैरवी, ५ कालिंगडा, ६ काफी, ७ तोडी, ८ पिलु, ९ सोहनी, १० ललत, ११ शकरा, १२ भूप, १३ देशकार, १४ सारंग, १५ मालकंस, १६ धानी, १७ तिलंग, १८ खमाज, १९ बागेसरी, २० बिहाग, २१ भीमपलासी, २२ सिंदुरा, २३ मुलतानी, २४ देव, २५ जौनपुरी, २६ असावरी, २७ वसंत, २८ दरबारी कानडा, २९ हमीर, ३० केदार, ३१ तिलककामोद व ३२ अडाणा ( गायनवादन शिक्षक )

सहा राग रागिणी सहित॥ पुन जातक छत्तीस॥ कळा बाहात्तर अभ्यास॥ बावीस श्रुति॥ मूर्छना एकवीस॥ सतस्वर तान एकुणपन्नास॥ बत्तीस उपराग अभ्यासिले ( काशीखंड ६–३० )

**बत्तीस औषधें शांतिप्रीत्यर्थ** — १ उंबर, २ कुश, ३ दूर्वा, ४ कमल, ५ चाफा, ६ वेल, ७ विष्णुक्रांत, ८ तुळसी, ९ वाळा, १० शतस्र-हुळी, ११ शतावरी, १२ आस्कंद, १३ निर्गुंडी, १४ पांढऱ्या मोहऱ्या, १५ लाल मोहऱ्या, १६ ( जीवक ) अघाडा, १७ पळस, १८ फणस, १९ काटेरी आघाणा, २० राळे, २१ गहू, २२ भात, २३ पिंपळ, २४ दूध,

२५ दहीं, २६ तूप, २७ कमळाचें पान, २८ कमळ, २९ तीन प्रकारच्या फोराटी ३० गुग्गुळ, ३१ चंदन आणि ३२ नागरमोथा. (संस्कार कौस्तुभ)

**बत्तीस प्रकार सूत्र-स्वरूप-लक्षणाचे** — १ प्रतिज्ञासूत्र, २ प्रमाणसूत्र, ३ दृष्टान्तसूत्र, ४ उपपत्तिसूत्र, ५ व्यावृत्तिसूत्र, ६ नियमप्रदानसूत्र, ७ विशेषप्रबोधकसूत्र, ८ उत्सर्गसूत्र, ९ अपवादसूत्र, १० निषेधसूत्र, ११ न्यायसूत्र, १२ विरोधपरिहारसूत्र, १३ पाकुसूत्र, १४ कथासूत्र, १५ भावार्थसूत्र, १६ प्रकरणसूत्र, १७ आम्नितनसूत्र, १८ निर्देशसूत्र, १९ निर्णयसूत्र, २० पक्षसूत्र, २१ प्रभेदसूत्र, २२ बाधकासूत्र, २३ आक्षेप सूत्र, २४ कार्यसूत्र, २५ लक्षणसूत्र, २६ स्वरूपसूत्र, २७ कारणसूत्र, २८ हेतुसूत्र, २९ सम्बन्धसूत्र, ३० प्रतीतिसूत्र, ३१ विशेषणसूत्र, आणि ३२ प्रतिज्ञासूत्र. अशा बत्तीस लक्षणांनीं युक्त असलेला भाव ज्यांत प्रतीत होतात त्यास "सूत्र स्वरूप" म्हणतात. (श्रीचक्रधर सिद्धांत सूत्रें)

**बत्तीस प्रमुख विद्या** — विद्या अनंत असल्या तरी या बत्तीस विद्या प्रमुख विद्या होत —४ वेद, ४ उपवेद, ६ वेदांग मिळून १४ व १५ मीमांसा, १६ तर्क, १७ सांख्य, १८ वेदांत, १९ योग, २० इतिहास, २१ पुराणें, २२ स्मृति, २३ नास्तिकमत, २४ अर्थशास्त्र, २५ कामशास्त्र, २६ शिल्प, २७ अलंकृति, २८ काव्य, २९ देशभाषा, ३० अवसरोचित, ३१ यावनमत व ३२ देशादिधर्म. (शुक्रनीतिसार)

**बत्तीस ब्रह्म विद्या** — १ सद्विद्या, २ आनंदविद्या, ३ अंतरादित्य विद्या, ४ आकाशविद्या, ५ प्राणविद्या, ६ गायत्री-ज्योतिर्विद्या, ७ इंद्रप्राणविद्या, ८ शाण्डिल्यविद्या, ९ नाचिकेतसविद्या, १० उपकोसलविद्या, ११ अन्तर्यामीविद्या, १२ अक्षरविद्या, १३ वैश्वानर विद्या, १४ भूमाविद्या, १५ गार्ग्य अक्षरविद्या, १६ प्रणवोपास्यपरमपुरुषविद्या, १७ दहरविद्या, १८ अंगुष्ठप्रमितविद्या, १९ ज्योतिर्विद्या, २० मधुविद्या, २१ संवर्गविद्या, २२ अजाशरीरकविद्या, २३ बालाकि विद्या, २४ मैत्रेयीविद्या, २५ द्रुहिणरुद्रादिशरीरकविद्या, २६ पंचाग्निविद्या, २७ आदित्यस्थाहर्नामिकविद्या, २८ मामकविद्या, २९ पुरुषविद्या, ३० ईशावास्यविद्या ३१ उषस्तिकहोलविद्या आणि ३२ व्याहृतिशरीरक विद्या (कल्याण उपनिषद् अंक)

**बत्तीस मतवादी सृष्टीच्या उत्पत्तिसंबंधी** — १ प्राणोपासक व वैशेषिक, २ चारभूत व स्थूलदेह हेंच जगाचें कारण मानणारे, ३ सत्त्व, रज व तम हे त्रिगुणच जगाचें कारण मानणारे, ४ शैव ५ पादवेत्ते (विश्व तैजस व प्राज्ञ हे पाद जगन्निर्मितीचें कारण मानणारे), ६ वात्स्यायनादिक-शब्दादि विषय हेच मानणारे, ७ पौराणिक, ८ मीमांसक, ९ वेदपाठक, १० बौधायन अग्निहोत्रादि यज्ञ हेच जगाचें मानणारे, ११ सांख्य, १२ सूपशास्त्रवेत्ते, १३ वैशेषिक (अणुवादी), १४ चार्वाक-स्थूल देह हेंच जगाचें कारण मानणारे १५ सांप्रदायिक, १६ शून्यवादी, १७ कालवादी, १८ दिग्वादी, १९ धातुवादी, २० भुवनकोशवेत्ते, २१ बौद्ध–मन हेंच जगाचें कारण मानणारे, २२ बुद्धि हेंच जगाचें कारण मानणारे, २३ चित्त हेच मानणारे २४ कर्म हेंच मानणारे. २५ सांख्य-पचवीस तत्त्वें जगाचें कारण मानणारे, २६ सेश्वरसांख्य, २७ पाशुपत, २८ अनंत तत्त्वें मानणारे, २९ लोकतत्त्ववेत्ते ३० दक्ष प्रभृति स्मृतिकार, ३१ वैयाकरण आणि ३२ परब्रह्म व अपरब्रह्म म्हणून ओंकार हेंच जगाचें कारण मानणारे असे बत्तीस मतवादी सृष्टीच्या उत्पत्तिसंबंधी विचार करणारे प्राचीन काळीं होऊन गेले (माण्डूक्यकारिका वैतथ्य प्रकरण)

**बत्तीस लक्षणें (मनुष्य शरीराचीं)** — पांच ठिकाणें सूक्ष्म म्हणजे नाजूक असावीं —१ त्वचा २ केस ३ अंगुली, ४ दांत, ५ बोटांची पेरं पांच ठिकाणें दीर्घ म्हणजे लांब असावीं — ६ भुज ७ नेत्र, ८ हनुवटी, ९ नाक व १० नाक. सात ठिकाणें आरक्त असावीं —११ हाताचे तळवे, १२ पायाचे तळवे, १३ अधरोष्ठ १४ नख, १५ टाळू, १६ जीभ व १७ नेत्र सहा ठिकाणें उन्नत असावीं —१८ वक्षस्थळ, १९ कुक्षी, २० केस, २१ खांदे २२ हात व २३ तोंड तीन ठिकाणें विस्तीर्ण म्हणजे रुंद असावीं —२४ वक्षस्थळ, २५ कटि व २६ ललाट तीन ठिकाणें ह्रस्व म्हणजे आखूड असावीं —२७ ग्रीवा, २८ जंघा व २९ शिश्न तीन ठिकाणें गंभीर असावीं —३० स्वर, ३१ सत्त्व व ३२ नाभि

पंच सूक्ष्मं पंच दीर्घं सप्त रक्तं षडुन्नतं ।
त्रि पृथुलघुगंभीरो द्वात्रिंशल्लक्षणः पुमान् ॥ (बौद्ध–धर्मसारसंग्रह)

एकूण हीं मनुष्य शरीराचीं बत्तीस शुभ लक्षणे होत. (काशीखंड अ ४१). या बत्तिसांत सर्वश्रेष्ठ नाक हे आहे.

तुका म्हणे काय करावीं तीं बत्तीस लक्षणें ।
नाक नाहीं तेणें वाया गेलीं ॥ (तुकाराम)

**बत्तीस लक्षणें शककर्त्या शिवाजीचीं** — १ निश्चयाचा महामेरू, २ बहुत जनांसी आधारू, ३ अखंड स्थितीचा निर्धारू, ४ श्रीमंत योगी, ५ परोपकारी, ६ नरपति, ७ हयपति, ८ गजपति, ९ गडपति, १० भूपति, ११ आदिशक्ति–पुत्रमार्गी, १२ यशवंत, १३ कीर्तिवंत, १४ सामर्थ्यवंत, १५ वरदवंत, १६ पुण्यवंत, १७ सुकृति, १८ नीतिवंत, १९ जाणता, २० आचारशील, २१ विचारशील, २२ दानशील, २३ धर्मशील, २४ सर्वज्ञ, २५ सुशील सकळांठायीं, २६ धीर, २७ उदार, २८ सुंदर, २९ शूर, ३० क्रियेसीं तत्पर, ३१ सावधानी व ३२ देव–धर्म–गोब्राह्मण संरक्षण समर्थ.
(दासायन)

**बत्तीस शुभ लक्षणें (सामुद्रिक)** — १ छत्र, २ कमल, ३ धनुष्य, ४ रथ, ५ वज्र, ६ कासव, ७ अंकुश, ८ विहीर, ९ स्वस्तिक, १० तोरण, ११ चामर, १२ सिंह, १३ वृक्ष, १४ चक्र, १५ शंख, १६ हत्ती, १७ समुद्र, १८ कलश, १९ प्रासाद, २० मच्छ, २१ यव, २२ स्तंभ (स्तूप), २३ सूर्य, २४ कमंडलु, २५ पर्वत, २६ चवरी, २७ दर्पण, २८ उक्षा (वृष), २९ पताका, ३० लक्ष्मी, ३१ पुष्पमाला व ३२ मयूर हीं बत्तीस लक्षणें पुण्यवान् राजपुरुषाच्या ठिकाणीं असतात असें हस्ती संजीविनी ग्रंथात सांगितलें आहे. (हस्तसामुद्रिक शास्त्र)

**बत्तीस विद्या (शिल्पशास्त्र)** — १ वृक्षविद्या, २ पशुविद्या, ३ मनुष्यविद्या, ४ ससेचनविद्या, ५ सहरणविद्या, ६ स्तंभनविद्या, ७ दृति विद्या, ८ भस्मीकरणविद्या, ९ सकरविद्या, १० पार्थवविद्या, ११ तरीविद्या, १२ नौविद्या, १३ नौकाविद्या १४ अध्वविद्या, १५ पथविद्या, १६ घंटापथ विद्या, १७ सेतुविद्या, १८ शकुनविद्या, १९ विमानविद्या, २० वायोविद्या, २१ कुटीविद्या, २२ मंदिरविद्या, २३ प्रासादविद्या, २४ दुर्गविद्या, २५ कूपविद्या, २६ आकरविद्या, २७ युद्धविद्या, २८ आपणविद्या, २९ राज राल्यविद्या, ३० नगररचनाविद्या, ३१ वनोपवनविद्या. व ३२ देवालयविद्या.

शिल्पशास्त्रांत अगणित विद्या आहेत, त्यापैकीं बत्तीस विद्या व चौसष्ट कला मुख्य आहेत.

विद्या ह्यनंताश्च कलाः संख्यातुं नैव शक्यते
विद्या मुख्यास्तु द्वात्रिंशच्चतुःषष्टिः कलाः स्मृताः ॥ ( भृगुसंहिता अ. १ )

**बत्तीस वैज्ञानिक रहस्यें ( विमानशास्त्र )** — १ मांत्रिक रहस्य, २ तांत्रिक रहस्य, ३ कृतक रहस्य, ४ अंतराळ रहस्य, ५ गूढ रहस्य, ६ दृश्य रहस्य, ७ अदृश्य रहस्य, ८ परोक्ष रहस्य, ९ अपरोक्ष रहस्य, १० संकोचन रहस्य, ११ विस्तृत रहस्य, १२ विरूपकरण रहस्य, १३ रूपान्तर रहस्य, १४ सुरूप रहस्य, १५ ज्योतिर्भाव रहस्य, १६ तमोमय रहस्य, १७ प्रलय रहस्य, १८ विमुख रहस्य, १९ तार रहस्य, २० महाशब्द विमोहन, २१ लंघन रहस्य, २२ सार्पगमन, २३ चापल रहस्य, २४ सर्वतोमुख रहस्य, २५ परशब्द ग्राहक रहस्य २६ रूपाकर्षण रहस्य, २७ क्रियाग्रहण रहस्य, २८ दिक् प्रदर्शन, २९ आकाशाकार रहस्य, ३० जलदरूप रहस्य, ३१ स्तब्धीकर रहस्य व ३२ कर्षण रहस्य. ( यन्त्रसर्वस्वे विमान प्रकरणम् )

**बत्तीस सिद्ध ( रसग्रंथकार )** — १ अगस्ति, २ अग्निवेश, ३ अन्नपोतमदास, ४ अष्टावक्र, ५ अश्विनौ, ६ कालनाथ, ७ काश्यप, ८ काशीराज, ९ कृष्णात्रेय, १० गहनानंद ११ गोरखनाथ, १२ चंद्रट, १३ चंद्रनाथ, १४ त्रिपुरांतक, १५ धन्वतरि, १६ नंदिनाथ, १७ नागार्जुन, १८ नित्यनाथ, १९ भृगु, २० भैरव, २१ भालुकि, २२ मंजुनाथ, २३ मन्थान भैरव, २४ मत्स्येंद्रनाथ, २५ रेवणसिद्ध २६ वासुदेव, २७ विष्णु, २८ वैद्यनाथ, २९ शंभु, ३० पूज्यपाद गोविंद, ३१ सिद्धनाथ व ३२ सोमनाथ. ( रसयोग सागर )

**सिंहासन बत्तिशी** — एक कथासंग्रह. राजा विक्रमाचें रत्नजडित सिंहासन भोजराजास भूमिगर्भात एके ठिकाणीं सांपडलें, तें बत्तीस हात लांब व आठ हात उंच व बत्तीस रत्नजडित पुतळ्या जडविलेलें होतें त्यांचीं नावें:— १ जया, २ विजया, ३ जयंती, ४ अपराजिता, ५ जयघोषा, ६ लीलावती, ७ मंजुघोषा, ८ जयसेना, ९ मदनसेना, १० मदनमंजिरी, ११ शृंगारकलिका, १२ नरमोहिनी, १३ भोगनिधि, १४ रतिप्रिया, १५ सुमित्रा, १६ प्रेमावती, १७ सुलक्ष्मा, १८ कुरंगनयना, १९ चंद्रज्योति, २० चंद्रकांति,

२. वारकरी म्हटलं म्हणजे तो कोणत्याहि वयाचा व जातीचा असो एक मेकास दोन्ही पायावर हात व मस्तक ठेवून नमस्कार करावयाचा असा सांप्रदायिक संकेत आहे.

३. वारकरी भजनाचा प्रारंभ "रूप पहाता लोचना" याच अभंगानें करावयाचा असतो.

४. नामसप्ताहात वीणा खालीं ठेवावयाचा नसतो.

## वैदिक संकेत

१. वेद हे अपौरुषेय आहेत.

२. गुरूजवळ अध्ययन केल्याविना विद्या प्राप्त होत नाही

३. महिन्यातल्या दोन अष्टम्या, दोन चतुर्दशा, पौर्णिमा व अमावास्या असे सहा दिवस वेदाध्ययनास वर्ज्य मानिले आहेत

४ मृत्यूनंतर पूर्व जन्म घेण्याच्या आधीच्या काळात जीवात्मा ज्याचा आश्रय करतो त्यास लिंग देह म्हणतात

५. वेदाक्षराचा उच्चार हाहि एक प्रकाराचा वायु आहे त्याला बाह्य वायु पासून पीडा होऊ नये म्हणून वदवेत्ते ब्राह्मण वारा सुटला असता वेदाध्ययन करीत नाहींत ( म भा. शांति अ. ३२८ )

६. सवत्सराची योग्य तऱ्हेने जोपासना करून मनुष्यानें त्याचा लय यज्ञा मध्ये करावा असा रुद्राचा संकेत आहे. ( माऊली मासिक )

७. वेदाध्ययन इतिहास व पुराण ह्यांच्या साह्यानें करावे.

"इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्" ( म. भा. आदि १-६७ )

८ प्रथारंभी कार्यसिद्धि व्हावी म्हणून श्रीगणेशाचे मंगलरूप आठवावे व यास तसेच गुरु व माता पिता यास नमन करावे असा वैदिक संप्रदायाचा संकेत आहे

## वैद्यकीय संकेत

१. वैद्यानं शत्रुमित्र याचा विचार न करिता रोगचिकित्सा व उपाय करावा.

## व्यावहारिक संकेत

१. वरिष्ट न्यायालयाचा निवाडा, वैद्याचें प्रमाणपत्र व स्थापत्य विशारदाचा अंदाज या तीन गोष्टींत पुनर्विचार नाहीं.

२. जिज्ञासूवृत्तीनें व निरहंकारपणें विचारल्याविना कोणी कोणास उपदेश करूं नये.

३. लिलावात एकाद्या वस्तूचे मूल्य तीन वार म्हणून पुकारलें म्हणजे तो लिलाव पूर्ण झाला असे समजवयाचे म्हणजे एखाद्या गोष्टीचा त्रिवार उच्चार ही पूर्णतादर्शक निश्चिति.

५. अतृप्ति हा मानवी मुखाला मिळालेला अतिकर्कश निर्दय शाप आहे.

६. आपण विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर त्वरित पाहिजे असल्यास जोडकार्ड लिहावें.

## संगीत शास्त्रातील संकेत

१. दीप राग गायिल्यानें दिवे लागतात.

२ हिंदोल राग गायिल्यानं झोंपाळा आपोआप हालत राहतो.

३. वागश्री रागाच्या ध्वनिमुद्रिका रात्रं ऐकवारीं झाडें अधिक वहरतात.

४. दापक रागाच्या गायनाला गवई वर्ज्य मानतात

५. संगीतानें नाग मंत्रमुग्ध होतात.

६. हरणें पक्षी वगैरे आकर्षित होतात.

७. मेघानून जलधारा सुरू होतात.

८. धार काढण्याचे वेळीं गाईना मधुर स्वर ऐकवले तर त्या अधिक दूध देतात. ( मनोहर डिसेंबर १९५९ )

९. मेघ मल्हार राग आळवला म्हणजे पाऊस पडतो.

१०. साधना हीं महींतरी अंधारीच असली पाहिजे असा एक मूक संकेत रूढ आहे. ( संगीताची घराणीं )

### हस्तसामुद्रिक

१ हातावरील रेषांनुसार परिस्थिती घडावी असा हस्तसामुद्रिक शास्त्राचा संकेत आहे

---

# पुरवणी



## २

**दोन गोष्टी अखंड चालणाऱ्या** — ( अ ) १ जनन आणि २ मरण "पुनरपि जनन पुनरपि मरण" (शंकराचार्य स्तोत्र). (आ) १ काळ आणि २ सावकाराचें व्याज. ( विरबल )

**दोन प्रकारचें वृद्धत्व** — १ ज्ञानानें–ज्ञानवृद्ध आणि २ नुसतें वयानें —वयोवृद्ध.

**दोन प्रकार वृक्षांचे** — १ फूल न येतां फळ देणारे व २ फुलें व फळें देणारे.

> अपुष्पा फलवन्तो ये ते वनस्पतय. स्मृताः ।
> पुष्पिणः फलिनश्चैव वृक्षास्तूभयत. स्मृता. ॥ ( मनु. १–४७ )

**दोन प्रकारचें शौच**—१ शुद्ध शौच व २ लौकिक शौच.

"शुद्धशौच इतिशेष मृज्जलाभ्या तु लौकिकम्" (मैत्रेयि. उ. २।८)

**दोन प्रकार शिक्षकांचे**— १ विद्वान् पण शिकविण्याची कला नसलेला व २ शिकविण्याची कला चांगली जाणणारा. या दोन्ही गुणांनीं युक्त असा शिक्षक श्रेष्ठ होय

> श्लिष्टा क्रिया कस्यचिदात्मसस्था सक्रातिरन्यस्य विशेषयुक्ता ।
> यस्योभय साधु स शिक्षकाणा धुरि प्रतिष्ठापयितव्य एव ॥
> ( मालविकाग्निमित्र १।१६ )

**दोन प्रकार संकेताचे**—१ पारिभाषिक व २ ईश्वरनिर्मित.
( न्यायकोश )

**दोन प्रमुख हेतु विज्ञानाभ्यासाचे** –१ जिज्ञासा व २ व्यावहारिक लाभाची अपेक्षा. ( विज्ञान इतिहास )

**द्विविध कर्म**—( अ ) १ सचित व प्रारब्ध. ( आ ) १ दैव व पित्र्य; ( इ ) प्रवृत्त व निवृत्त; ( ई ) १ शुभ व २ अशुभ. ( स. को. )

२. वारकरी म्हटला म्हणजे तो कोणत्याहि वयाचा व जातीचा असो एकमेकास दोन्ही पायावर हात व मस्तक ठेवून नमस्कार करावयाचा असा साम्प्रदायिक संकेत आहे.

३. वारकरी भजनाचा प्रारंभ "रूप पहातां लोचनीं" याच अभंगानं करावयाचा असतो.

४. नामसप्ताहात वीणा खाली ठेवावयाचा नसतो.

## वैदिक संकेत

१. वेद हे अपौरुषेय आहेत.

२. गुरुजवळ अध्ययन केल्याविना विद्या प्राप्त होत नाही.

३. महिन्यातल्या दोन अष्टम्या, दोन चतुर्दश्या, पौर्णिमा व अमावास्या असे सहा दिवस वेदाध्ययनास वर्ज्य मानिले आहेत.

४. मृत्यूनंतर पूर्व जन्म घ्याच्या आधीच्या काळात जीवात्मा ज्याचा आश्रय करतो त्यास लिंग देह म्हणतात.

५. वेदाक्षराचा उच्चार हाहि एक प्रकाराचा वायु आहे. त्याला बाह्य वायुपासून पीडा होऊ नये म्हणून वेदवेत्ते ब्राह्मण वारा सुटला असता वेदाध्ययन करीत नाहीत. ( म. भा. शांति अ. ३२८ )

६. सवर्षांची योग्य तऱ्हेने उपासना करून मनुष्याने त्याचा लय यज्ञामध्ये करावा असा रुद्राचा संकेत आहे. ( माऊली मासिक )

७. वेदाध्ययन इतिहास व पुराण ह्यांच्या साह्याने करावे.

"इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत्" ( म. भा. आदि १-६७ )

८. प्रथारम्भी कार्यसिद्धि व्हावी म्हणून श्रीगणेशाचे मंगलरूप आठवावे व त्यास तसेच गुरु व माता पिता यास नमन करावे असा वैदिक संप्रदायाचा संकेत आहे.

## वैद्यकीय संकेत

१. वैद्याने शत्रुमित्र याचा विचार न करिता रोगचिकित्सा व उपाय करावा.

## व्यावहारिक संकेत

१. वरिष्ट न्यायालयाचा निवाडा, वैद्याचें प्रमाणपत्र व स्थापत्य विशारदाचा अंदाज या तीन गोष्टींत पुनर्विचार नाहीं.

२. जिज्ञासूवृत्तीनें व निरहंकारपणें विचारल्याविना कोणी कोणास उपदेश करू नये.

३. लिलावांत एखाद्या वस्तूचें मूल्य तीन वार म्हणून पुकारलें म्हणजे तो लिलाव पूर्ण झाला असे समजावयाचें म्हणजे एखाद्या गोष्टीचा त्रिवार उच्चार ही पूर्णतादर्शक निश्चिति.

५. अतृप्ति हा मानवी मुलाला मिळालेला अतिकर्कश निर्दय शाप आहे.

६. आपण विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर त्वरित पाहिजे असल्यास जोडकार्ड लिहावें.

## वृत्तपत्रीय संकेत

१. विश्वासानें मिळविलेल्या गुप्त वातम्याचें उगमस्थान प्रकट करावयाचें नसतें.

२. एक परमेश्वर आणि दुसरा वृत्तपत्र संपादक कधींच चुकत नाहींत.

## व्याकरणशास्त्र

१. कोणत्याही वस्तूचा निर्देश करावयाचा झाल्यास प्रथमा विभक्ति योजावी असा वैयाकरणाचा संकेत आहे. "निर्देशे प्रथमा प्रोक्ता"

## शिष्ट संकेत

१ आपली गुरुभक्ति इतरांवर लादावयाची नसते.

२. बैठकींत गप्पा गोष्टींत उपस्थितास अनुलक्षून कांहीं अप्रिय बोलावयाचें नसतें अथवा ओरखाडे घ्यावयाचे नसतात.

## शास्त्रसंकेत

१. पंचमहाभूताच्या अन्योन्य मिश्रणानें द्रव्य ज्यात् निर्माण होतें तेव्हा ज्यात जे महाभूत आधिक्यानें असेल त्याच्या नावानें तें द्रव्य संबोधावयाचें असा शास्त्र संकेत आहे. उदा. पार्थिव आग्नेय इ.

## शिकार संकेत

१. शिकारीत नर मारावा पण मादी मारू नये. माकड वा वानर या प्राण्याची हत्या करावयाची नसते.

## शैक्षणिक संकेत

१ प्रादेशिक भाषा हीच राजभाषा असली तरी जनतेला प्राथमिक शिक्षण तिच्या मातृभाषेतूनच दिले गेले पाहिजे असा शैक्षणिक संकेत आहे. ( केसरी ८ जुलै १९६० )

## सामाजिक संकेत

१. स्त्रीच्या तोंडात कुठलेहि गुपित राहात नाही.

२. समाजामध्ये स्त्रीपुरुषांनी परस्पराचा सन्मान करणे झाल्यास पुष्पमाला हातात द्यावी. गळ्यात घालू नये.

३. वर ज्येष्ठ, वधूहि ज्येष्ठ आणि मासहि ज्येष्ठ असा त्रिवेणी संगम विवाहास वर्ज्य मानला आहे.

४. अनियामक दलाचा धडाकाद एकला असता साहाय्यासाठी सर्वांनी अविलंबे यावें असा मानल्याचा संकेत.

५. गाढ झोपलेल्या माणसास उठवणें झाल्यास त्याला सावकाशपणेंच जागे करावें.

६. नवरानायकोची बोलणीं चोरून ऐकणारास वटवाघळाचा जन्म येतो म्हणतात.

७. विवाह कंकण सुटेपर्यंत वधुवरांनीं मातापिता, गुरु, विप्र व देव यांजेरीज कोणासही वंदन करू नये. कारण तोपर्यंत ते लक्ष्मीनारायण स्वरूपी असतात.

८. मंगल कार्याचे प्रसंगीं स्वागताचें चिन्ह म्हणून मातीचा घडा भरून ठेवतात. याला पूर्णकुंभ म्हणतात. स्वागतासाठीं हृदय प्रेमानें भरलेलें आहे असा संकेत.

९. श्रेष्ठ पुरुष जसे वागतात तसेच इतर लोकही आचरण करतात.

"यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः । " ( भ. गी. )

१०. स्त्रीवर सहसा हत्यार चालवूं नये.

११. आवड आणि लाज, व्यसन आणि शीण, वेड आणि समजसपणा यांचें साहचर्य असत नाहीं. ( ज्ञा. )

१२. गृहप्रवेशाच्या वेळीं धान्यानें भरलेलें मापटें वधूनें आपल्या उजव्या पायानें लवडावयाचें असतें.

१३. मानवी आयुष्य १०० वर्षे श्रुतींत सांगितलें असलें तरी साधारण मर्यादा साठच कल्पिली असल्यामुळें षष्ठ्यब्दिपूर्तीचा समारंभ करण्याचा प्रघात आहे.

१४. चंद्राच्या एकापासून बारा पावलापर्यंत प्राणी सृष्टीची गर्भावस्था कल्पिली आहे. ( ऋतुचक्र )

१५. तरुण स्त्रीची ओढणी ( पदर ) डोक्यावर असली पाहिजे असा संकेत आहे, तशी ती डोक्यावर असणें विनयलक्षण मानलें आहे. ( कला आणि कलास्वाद )

### साम्प्रदायिक संकेत.

१. सिद्धगुरु करतील तोच आचारधर्म असा संकेत त्या त्या पंथांत मानला जातो.

### सामुद्रिक शास्त्र संकेत

१. ज्याच्या पोटच्या मोठ्या त्याला भरकावें लागत. असा सामुद्रिक शास्त्राचा एक संकेत आहे. ( व्यासपर्व )

### सौजन्य संकेत

१. पंक्तींत भोजनसमयीं सर्वांचें जेवण झाल्याविना पंक्तींतून उठूं नये.

२. रस्त्यानें जातांना पुढील माणसाचें कांहीं रस्त्यावर पडलें तर त्याचें लक्ष वेधावें.

३. एखाद्याविषयीं मरणोत्तर अनुदार उद्गार काढूं नयेत.

## संगीत शास्त्रातील संकेत

१. दीप राग गायिल्याने दिवे लागतात.

२. हिंदोल राग गायिल्याने झोपाळा आपोआप हालू लागतो.

३. बागश्री रागाच्या ध्वनिमुद्रिका रोज ऐकणारीं झाडे अधिक बहरतात.

४. दीपक रागाच्या गायनाला गवई वर्ज्य मानतात.

५. संगीताने नाग मनमुग्ध होतात.

६. हरणे पक्षी वगैरे आकर्षित होतात.

७. नेत्रातून जलधारा सुरू होतात.

८. धार काढण्याचे वेळीं गाईंना मधुर स्वर ऐकवले तर त्या अधिक दूध देतात. ( मनोहर डिसेंबर १९५९ )

९. मेघ मल्हार राग आळवला म्हणजे पाऊस पडतो.

१०. साधना हा महींतरा अघोरीच असली पाहिजे असा एक मूर्ख संकेत रूढ आहे. ( संगीताची घराणी )

## हस्तसामुद्रिक

१. हातावरील रेषानुसार परिस्थिती घडावी असा हस्तसामुद्रिक शास्त्राचा संकेत आहे.



# पुरवणी



## २

**दोन गोष्टी अखंड चालणाऱ्या** — (अ) १ जनन आणि २ मरण " पुनरपि जनन पुनरपि मरण " (शंकराचार्य स्तोत्र). (आ) १ काळ आणि २ सावकाराचे व्याज. (विरळ)

**दोन प्रकारचें वृद्धत्व** — १ ज्ञानानें-ज्ञानवृद्ध आणि २ पुष्कळ वयानें —वयोवृद्ध.

**दोन प्रकार वृक्षाचे** — १ फूल न येता फळ देणारे व २ फुलें व फळें देणारे.

अपुष्पाः फलवन्तो ये ते वनस्पतयः स्मृताः ।
पुष्पिणः फलिनश्चैव वृक्षास्तूभयतः स्मृताः ॥ (मनु. १–४७)

**दोन प्रकारचें शौच**—१ शुद्ध शौच व २ लौकिक शौच.

" शुद्धशौच इतिशेय मृज्जलाभ्यां तु लौकिकम् " (मैत्रेयि. उ. २।८)

**दोन प्रकार शिक्षकांचे**— १ विद्वान् पण शिकविण्याची कला नसलेला व २ शिकविण्याची कला चांगली जाणणारा. या दोन्ही गुणांनी युक्त असा शिक्षक श्रेष्ठ होय

श्लिष्टा क्रिया कस्यचिदात्मसंस्था संक्रातिरन्यस्य विशेषयुक्ता ।
यस्योभयं साधु स शिक्षकाणां धुरि प्रतिष्ठापयितव्य एव ॥

(मालविकाग्निमित्र १।१६)

**दोन प्रकार संकेताचे**—१ पारिभाषिक व २ ईश्वरनिर्मित.

(न्यायकोश)

**दोन प्रमुख हेतु विज्ञानाभ्यासाचे** –१ जिज्ञासा व २ व्यावहारिक लाभाची अपेक्षा. (विज्ञान इतिहास)

**द्विविध कर्म**—(अ) १ संचित व प्रारब्ध. (आ) १ दैव व पित्र्य; (इ) प्रवृत्त व निवृत्त; (ई) १ शुभ व २ अशुभ. (स. को.)

**दाघाचे पावित्र्य स्वयंसिद्ध**—१ गगाजल व २ अग्नि.

" तीर्थादक च वन्हिश्च नान्यत शुद्धिमहत " ( भवभूति )

**दोन मोठीं पातकें**—१ दुष्ट मनी असलेला राजा ( शासनाधिकारी ) २ अशा अधिकाऱ्याच्या आश्रयाला राहणे.

पातकाना समस्ताना द्वे परे तात पातक ।
एक दु सचिवो राजा द्वितीय च तदाश्रय ॥ ( भाजप्रबन्ध )

# ३

**तीन अंगें धर्माचीं**—१ तत्वज्ञान, २ पुराण व ३ विधि व अनुष्ठान. कोणत्याहि धर्माची अशा तीन अग असतात. ( सावजनीन धर्म-स्वरूप व साधना )

**तीन अर्थवाद**—१ अनुवाद, २ गुणवाद व ३ भूतार्थवाद.

**तीन आद्य आचार्य लेखन ( लिपी ) कलेचे** — १ ब्रह्मा — ब्राह्मीलिपि,-डावीकडून उजवीकडे लिहिली जाणारा, २ खरोष्ठ खरोष्ठी उजवीकडून डावीकडे लिहिली जाणारा व ३ त्स-की-चित्रलिपि वरून खाली लिहिली जाणारा पहिले दोन भारतात व तिसरा चीनमध्ये होऊन गेला ब्रह्मा आणि खरोष्ठ यानी आपल्या लिपि देवलोकापासून प्राप्त करून घेतल्या व त्स कीनें आपली लिपी पक्षी आदिच्या पदचिन्हावरून बनविली. (भा मा लिपिमाला)

**तीन ऋणें ( व्यावहारिक )** — ( आ ) १ कौटुंबिक, २ सामाजिक आणि ३ राष्ट्रीय.

**तीन गुण कीर्तनास आवश्यक** — १ ताल, २ नृत्य व गान (गायन) ( कीर्तन पद्धति )

**तीन गुण वैश्याचे** — १ शेती, २ गोरक्षण आणि ३ वाणिज्य-व्यापार-क्रय विक्रय ( भ गी. १८-४४ )

**तीन गोष्टी जगात व्यर्थ** — ( १ ) अप्रगल्भाचा विद्या ( २ ) कृपणाजवळचा धन ( ३ ) भित्र्या माणसाचे बळ.

अप्रगल्भस्य या विद्या कृपणस्य च यद्धनम्।
यच्च बाहुबल भीरोव्यर्थमेतत् त्रय भुवि ॥ ( भाजप्रबंध )

**तीन प्रकार आगम ग्रंथाचे** — १ शैवागम, २ शाक्तागम व ३ वैष्णवागम.

**तीन प्रकार मोठेपणाचे** — १ जन्मसिद्ध, २ कमाविलेले व ३ वळेच चिकटविलेला. (Twelth Night)

**तीन प्रकार शिवनृत्याचे** — १ संध्या नृत्य, २ ताण्डव नृत्य व ३ नदन्त नृत्य (कला आणि कलास्वाद)

**तीन प्रकार सताचे** — १ व्यावहारिक सत, २ प्रातिभासिक सत व ३ पारमार्थिक सत (विवेक चिंतामणि)

**तीन प्रकार हास्याचे** — (अ) १ अगहास्य, २ काव्यहास्य व ३ नेपथ्यहास्य (भ ना. अ. २१) (आ) १ दृष्टिहास्य-नुसत्या नजरेनें -विद्वान् माणस, २ दतहास्य-दात दाखवून-मध्यम माणसे व ३ अकाड ताडव करून-अधम माणस. सत्पुरुष जे आहेत ते फारसे हसत नाहींत

**तीन सभा** — १ देव अथवा देवकी सभा—देवतेचे कीर्तन चालतें, २ दैत्य सभा-सर्व तामसी प्रकार चालतात व ३ मानुष्य सभा-देवपूजन -शास्त्र चर्चा चालते ती. गोंधळीवाङ्मय-(पराग जून १९४८)

**तीन साधनें ज्ञानाचीं** — १ सहज प्रवृत्ति, २ तर्कबुद्धि व ३ अत. स्फूर्ति वा अपरोक्षानुभूति (सार्वजनीन धर्म-स्वरूप व साधना)

**तीन लक्षणें आप्ताचीं** (यथार्थ वक्ता)—१ कर्तव्य दक्ष, २ नि-पक्षपाती व ३ सामान्य (मु.)

(**तिघाना आवरण्याचीं तीन साधनें**—१ हत्ती-साखळदंड किंवा अंकुश २ घोडा-लगाम ३ स्त्री-हृदय—

आलाने गृह्यते हस्ती वाजी वल्गासु गृह्यते ।

हृदये गृह्यते नारी . ॥ (मृच्छकटिक १-५०))

**त्रिरत्न**—१ बुद्ध, २ धर्म व ४ सघ. या तीन्हींच्या समुच्चयास त्रिरत्न म्हणतात.

**त्रिविध योगपट्टक** (वस्त्र)— १ व्याघ्रांबर, २ मृगाजिन आणि ३ कार्पास वस्त्र.

त्रिविध योगपट्टकमाद्य व्याघ्राजिनोद्भवम् ।
द्वितीय मृगचर्माख्य तृतीय तन्तुनिर्मितम् ॥ ( सु. )
ध्यान समयीं वापरावयाचे तीन वस्त्र प्रकार.

# ४

**चतुर्विध शिष्य**—१ आतशिष्य, २ अगशिष्य, ३ स्थानशिष्य व ४ सद्भावशिष्य.

आत अग स्थान । आणि सद्भाव म्हणोन ।
ऐसे चतुर्विध शिष्य भिन्न । परिक्रमे (वि. चितामणि प्रथम परिच्छेद)

**चार अनार्य व्यवहार**—१ मृषावाद, २ पिशुन वाचा, ३ परुष वाचा व ४ व्यर्थ बडबड.

**चार अधिष्ठानें**—१ प्रज्ञाधिष्ठान, २ सत्याधिष्ठान, ३ त्यागाधिष्ठान व ४ उपशमाधिष्ठान ( दीघनिकाय )

**चार कारणांनी चार गोष्टींचा विनाश**—१ कलहानें घरें, २ अपशब्दानें मैत्री, ३ शिथिल राज्यव्यवस्थेनें राष्ट्र आणि ४ दुष्कृत्यामुळें माणसाची कीर्ति —

कलहान्तानि हर्म्याणि कुवाक्यान्त च सौहृदम् ।
कुराज्यान्तानि राष्ट्राणि कुकर्मान्त यशो नृणाम् । सु.

**चार गोष्टी एकट्याला निषिद्ध**—१ मिष्टान्नभोजन, २ कार्यविचार, ३ प्रवास आणि ४ इतर लोक झोपले असता एकट्यानें जागणें.

म. भा. उद्योग ३३–४६

**चार गंगा**—१ द्विजगंगा–गोदावरी, २ क्षत्रिय गंगा–भागीरथी, ३ वैश्यगंगा–नर्मदा व शूद्रगंगा–कावेरी—

हे जोंव जरा वेगळाले । परी गगन त्यात सगळें ।
भेदरूप राहिले । शब्द नुसते व्यवहारात ( गोदामहात्म्य )

**चार गोष्टी मृतवत्**—१ दरिद्री मनुष्य २ अराजक झालेलें राष्ट्र, ३ अनधी विप्राकरवीं करवेलें श्राद्ध, ४ दक्षिणा न देता करवेलें धार्मिक कृत्य

**चार खाणी माणसांच्या** — १ आपलपोटे, २ प्रपंचस्वार्थी, ३ जातिपक्षीय आणि ४ समाजपक्षीय ( सुविचार-स्मरणी )

**चार गोष्टी कोठूनहि घ्याव्यात**—

विषादप्यमृत ग्राह्य अमेध्यादपि काञ्चनम् ।
नीचादप्युत्तमाविद्या स्त्रीरत्न दुष्कुलादपि ॥ ( सु. )

१ अमृत—विषाच्या सान्निध्यात असले तरी
२ सुवर्ण—अशुचि पदार्थांत पडले तरी
३ विद्या—नीच माणसापासूनदेखील चांगली विद्या.
४ स्त्रीरत्न—दुष्कुलात जन्म असला तरी देखील.

**चार गोष्टी कोरीव लेखाला प्रामाण्य आणणाऱ्या**—१ कालाचा उल्लेख गणितदृष्ट्या जुळला पाहिजे, २ स्थलाचा उल्लेख वस्तुस्थितीस धरून, ३ लेखातील वंशावळ इतर प्रमाणभूत लेखांशी जुळली पाहिजे आणि ४ तत्कालीन प्रामाणिक लेखातील कल्पना, शब्दसमुच्चय, निरूढे याचा उपयोग.

—दक्षिण महाराष्ट्राच्या इतिहासाचीं साधनें

**चार नृत्य प्रकार वाली नृत्याचे**—१ लेगाग नृत्य—तीन लहान मुलींनीं मिळून केलेले नृत्य. २ जागर नृत्य—दहा मुले व दहा मुली अशा वीस जणांनीं मिळून केलेले, ३ कवियर नृत्य—बसूनच केले जातें व ४ केचक अथवा वानर नृत्य ( स्त्री नोव्हेंबर १९६३ )

**चार प्रकार चित्राचे** ( कल्पनागम्य )—( अ ) १ आदर्शवादी, कल्पनावादी, २ अलंकारिक वा मौघणिक, ३ रूढीवादी व ४ प्रतीकवादी ( कला आणि कलास्वाद ) ( आ ) १ वस्तुनिष्ठ, २ इंद्रियगम्य, ३ सुलभित व ४ उत्स्फूर्त किंवा स्वाभाविक ( चित्रकला-एक शैक्षणिक माध्यम )

**चार प्रकार प्रेमाचे**—१ लालन प्रेम, २ वात्सल्य प्रेम, ३ सख्य प्रेम व ४ माधुर्य प्रेम. ( श्री ज्ञानेश्वर गूढार्थ दीपिका खंड ३ )

**चार प्रकार स्तोत्रांचे**—१ द्रव्य स्तोत्र, २ कर्मस्तोत्र, ३ विधिस्तोत्र आणि ४ अभिजन स्तोत्र.

द्रव्यस्तोत्र कर्मस्तोत्र विधिस्तोत्र तथैव च ।
तथैनाभिजनस्तोत्र स्तोत्रमेतच्चतुर्विधम् ( न्यायकोश )

**पंच द्रष्टे**—१ गृत्समद, २ मेधावी, ३ कण्व, ४ वसिष्ठ व ५ भारद्वाज. या पच द्रष्टयानी मगलमूर्ति ब्रह्मणस्पति हे प्रतीक भारतीय सस्कृतीला प्रथम सादर केले ( रोहिणी सप्टेंबर १९५८ )

**पंच प्राण ( विनोदाचे )**—१ शब्द, २ कल्पना, ३ परिस्थिति, ४ प्रसग व ५ स्वभाव. ( हास्यकारण आणि मराठी सुवासिका )

**पंचविध प्रभुत्व**—१ कुलप्रभुत्व, २ ज्ञानप्रभुत्व, ३ दानप्रभुत्व, ४ स्थान प्रभुत्व व ५ अभय प्रभुत्व ( वत्सुरत्नकोश )

**पाच कारणे वा प्रयोजने कर्मांच्या उत्पत्तीची व फलाची**—१ मन, २ वाचा, ३ देह, ४ इद्रियें व ५ जीव. कर्मांच्या उत्पत्तीची ही पाच कारणे होत तीच कर्मांचा कारणे म्हणजे कर्मांची प्रयोजनें अर्थात् फळें होत.

( प्रसाद आक्टोबर १९६३ )

**पांच गुण बुद्धीचे**—१ इष्टानिष्ट गोष्टींचा निर्णय करता येणे, २ निश्चय, ३ समाधान, ४ निर्णय व ५ ज्ञान.

इष्टानिष्टविपत्तिश्च व्यवसायः समाधिता ।
सशयः प्रतिपत्तिश्च बुद्धेः पञ्च गुणान्विदु ॥ ( म. भा. मोक्षधर्म )

**पाच गोष्टी दीर्घकाल संध्या केल्यामुळे प्राप्त होणाऱ्या**—१ दीर्घायुष्य, २ प्रज्ञा, ३ यश, ४ कीर्ति व ५ ब्रह्मतेज ( मनु ) ( मानवता पूर्ति साधन व सध्योपासना )

**पाच गोष्टी पत्रव्यवहारांत महत्वाच्या**— १ अचूकता, २ सपूर्ण आशय, ३ असदिग्धता, ४ थोडक्यात पण मुद्देसूद ५ सभ्यता. ( ( Good Drafting )

**पाच गोष्टींचे प्रकटीकरण ( शिवनृत्याचे )**—१ निर्मिति, २ स्थिति, ३ सहार, ४ तिरोधान व ५ अनुग्रह ( कला आणि कलास्वाद. )

**पाच गोष्टी शत्रूच्या बाबतीतहि निषिद्ध**—१ युद्धाला उभा नसलेल्याचा वध, २ परस्त्रीवर हात टाकणे, ३ ब्रह्मवित्ताची लूट, ४ सरसकट अपहार व ५ स्त्रियांची चोरी.

*अयुद्धमानस्य वधः दाराभयः कृतघ्नता ।*
*ब्रह्मवित्तस्य चादान नि.शेषकरण तथा ॥*
*स्त्रियामोषः पविस्थान दस्युष्वेतद्धि गर्हितम्* ( म. भा. शान्ति. अ. १३४

याप्रमाणे छत्रपती शिवाजी महाराजाचे आचरण व तशीच राजाज्ञा होती असा इतिहास आहे.

**पांच लक्षणें सभ्यांचीं**—१ सूक्ष्मदृष्टी असलेला, २ पक्षपातरहित, ३ विचारी, ४ वक्तृत्व असलेले व ५ न्यायी.

सभ्यास्तु विबुधैर्ज्ञेया ये दिदृक्षान्विता जनाः ।
मध्यस्थाः सावधानाश्च वाग्मिनो न्यायवेदिनः । ( आदि भरत )

**पांच प्रकार ग्रह संमेलनाचे**—१ समोह, २ समाज, ३ कोश, ४ सन्निपात व ५ समागम ( वराहमिहिराचार्य–अष्टग्रहीचा आसूड )

**पांच प्रकार प्रस्तावनेचे**—१ आशीर्वादात्मक, २ अवतरणात्मक, ३ असंबद्ध, ४ अतिशयोक्त व ५ अतिविशाल. ( खर्डेघाशी )

**पांच प्रकार सुखान्तिकेचे** ( Comedy )—१ कल्पनारम्य, २ स्वभाव प्रधान, ३ प्रसंगनिष्ठ, ४ प्रहसनात्मक आणि ५ सुखदु:खान्तिका अथवा मिश्र सुखान्तिका. ( हास्यकारण आणि मराठी सुखान्तिका )

**पांच संपदा**—१ जाति संपदा, २ भोग संपदा, ३ आरोग्य संपदा, ४ शील संपदा व ५ दृष्टि संपदा. ( दीघनिकाय )

**पाच सुखेच्छाकला**—१ नम्रता, २ प्रियवादित्व, ३ धैर्य, ४ शांति व ५ वैराग्य या पाच कला सुखाखातर आहेत. ( चा. चिं. )

**पांच जण ब्रह्माचे भीतीनें कार्य प्रवण** ( वेदान्त )—१ वायु, २ सूर्य, ३ अग्नि, ४ इंद्र व ५ मृत्यु हे पाचही ब्रह्माच्या भीतीनें आपापलीं कामें करतात. ( तैत्तिरीय उपनिषद् ).

# ६

**सहा घटक अन्नाचे** — १ पिष्ट पदार्थ, २ स्निग्ध पदार्थ ३ नैट्रोजनयुक्त पदार्थ (प्रोटीन्स), ४ क्षार, ५ पाणी व ६ जीवनसत्वें. ( विज्ञानपरिचय )

**सहा अवस्था प्रीतीच्या** — १ प्रेम, २ मान, ३ प्रणय, ४ स्नेह, ५ राग व ६ अनुराग.

प्रेमा मानः प्रणय स्नेहो रागोऽनुरागः — इत्युक्तेः ॥

**चार प्रकारच्या लोकांना वश करण्याचे चार मार्ग**—१ लोभी–धनानें, २ क्रुद्ध–हात जोडून, ३ मूर्ख–त्याच्या कलानें व ४ पंडित–खरेपणानें.

लुब्धमर्थेन गृह्णीयात्क्रुद्धं चाञ्जलिकर्मणा ।
मूर्खं छन्दानुवृत्तेन याथातथ्येन पण्डितम् ॥ (सु.)

**चार प्रकार सृष्टीचे**—१ संकल्पोद्भव, २ दर्शनोद्भव, ३ स्पर्शोद्भव, व ४ मैथुनजन्य.

संकल्पाद्दर्शनात्स्पर्शात्पूर्वेषां सृष्टिरुच्यते ।
दक्षात् प्राचेतसादूर्ध्वं सृष्टिर्मैथुनसम्भवा ॥

सृष्टीचे आरंभी पहिल्या तीन प्रकारांनीं निर्मिति होत असून दक्षापासून मैथुनजन्य संतति निर्माण होऊं लागली म्हणजे दक्ष हा पहिला प्रजापति. (मत्स्य पुराण)

**चार प्रकार ज्ञानाचे**—१ शब्दज्ञान, २ अपरोक्षज्ञान, ३ सामान्यज्ञान व ४ विशेषज्ञान. (ज्ञानप्रबोध)

**चार प्रकार तीर्थांचे**—१ दैवी, २ राक्षसी, ३ ऋषिज व ४ मानवी.

ब्रह्म बोले त्यावर । तीर्थांचे ते प्रकार चार
दैवी राक्षसी साचार । ऋषिज आणि मानवी (गोदामाहात्म्य)

**चार प्रकारचे वाक्यदोष**—१ भ्रम, २ प्रमाद, ३ विप्रलिप्सा–विपरीत अर्थ सांगण्याची इच्छा व ४ करणापाटव–अशुद्ध उच्चार वा बोबडेपणा. (न्यायकोश)

**चार प्रवाह वेदान्ताचे** — १ शुद्धद्वैत, २ विशिष्टाद्वैत, ३ शुद्धाद्वैत व ४ केवलाद्वैत. (स्वामी विवेकानंद)

**चार प्रकार योगाचे** — कर्मयोग, २ भक्तियोग, ३ राजयोग व ४ ज्ञानयोग (सार्वजनीन धर्म स्वरूप व साधना)

**चार प्रकार रंगभूमीचे** — १ साधारण नेहमींचा, २ शृंगारिक, ३ कृत्रिम बाह्यरूप व ४ कुक्षणित (Plaslie) (रंगभूपा शास्त्र)

**चार प्रसंगानंतर स्नान आवश्यक** — १ अंगाला तेल लावल्यावर, २ प्रेतयात्रेस जाऊन आल्यावर, ३ मैथुनानंतर आणि ४ क्षौर विधिनंतर. अशावेळीं स्नान न करणारा मनुष्य चांडाळ समजला जातो.

**चार वलें** — १ वीयबल, २ स्मृतिबल, ३ समाधिबल व ४ प्रज्ञाबल (दाघनिकाय)

**चार धर्मस्कंध** — १ शीलस्कंध, २ समाधिस्कंध, ३ पुण्यस्कंध व ४ विमुक्तिस्कंध.

**चार भावना** — १ मैत्री भावना, २ प्रमोद भावना, ३ कारुण्य भावना, व ४ माध्यस्थ्य भावना (धर्मामृत)

**चार मूळ गोत्रें** — १ अङ्गिरा, २ कश्यप, ३ वसिष्ठ व ४ भृगु.

मूल गोत्राणि चत्वारि समुत्पन्नानि भारत ।
अङ्गिरा. कश्यपश्चैव वसिष्ठो भृगुरेव च ॥ (म. भा. शांति. अ. २९८)

**चार मूलभूत गोष्टी स्थिर राज्याला अत्यावश्यक** — १ सुबुद्ध नेतृत्व, २ शासकीय पात्रता, ३ समान आर्थिक संधि, ४ राष्ट्रीय सहकार्य.

राष्ट्रपति डॉ. राधाकृष्णन्, केसरी ५-११ ६३.

**चार विशेषणें आत्म्याचीं** — १ सत्, २ चित्, ३ आनंद व ४ अद्वैत

**चार विशेषणें अनात्म्याचीं** — १ असत्, २ जड, ३ दुःख आणि ४ द्वैतत्व (वि. चंद्रोदय दर्शन)

**चार संवाद -श्री रामचरितमानसांतर्गत**-१ काकभुशुंडि-काकगरुड-संवाद, २ उमा-शंभु-संवाद, ३ याज्ञवल्क्य भरद्वाज संवाद व ४ श्री तुलसीदास-आणि त्यांचे श्रोते. हे चार संवाद म्हणजे श्रीरामचरितमानस (काव्य) सरोवराचे चार घाट होत. यांत चार कल्पांतील रामावताराचें वैशिष्ट्य दाखविलें आहे.

अतिसुंदर संवादवर विरचित बुद्धि विचारि ।
तें या पावन सुभग सरिं घाट मनोहर चारि (गूढार्थचंद्रिका)

## ५

**पंच दृष्टांत**—१ शुक्तीवर रजतप्रतीति, २ दोरीवर सर्पप्रतीति, ३ स्थाणूमध्यें पुरुष प्रतीति, ४ आकाशामध्यें नीलता व ५ मरुभूमीवर जल प्रतीति. (वि. चंद्रोदय दर्शन)

**सहा दुर्गुण**—१ आळस, २ निद्रा, ३ भय ४ तृष्णा, ५ क्रोध व ६ काम हे सहा दुर्गुण नाहीसे करण्याकरिता पुढचे दात समांतर रेषेत सारखे करण्याचा एक प्रथा वाली बगात आहे. ( स्त्री नोव्हेंबर १९६३ )

**सहा प्रकार भक्तीचे**—१ श्रद्धाभक्ति, २ नैष्ठिक भक्ति, ३ अवधान भक्ति, ४ अनुभव भक्ति, ५ आनंदभक्ति आणि ६ रसरस भक्ति. ( विवेक चिंतामणि द्वितीय परिच्छेद )

**सहा प्रमुख वर्ग अन्न पदार्थांचे** ( त्यातील वर्ग्क द्रव्याप्रमाण )—१ पिष्टप्रधान, २ नत्रप्रधान,—अंकुरित धान्यें, कंदमूळांतील जीवनरस इ. ३ स्नेहप्रधान–दूध वगैरे, ४ शर्करा प्रधान–फळातील रस ५ शर्कराम्ल प्रधान–आम्ल फळातील जीवनरस व ६ क्षार प्रधान–फळभाजी पालेभाजी इ.

( कौटुंबिक स्वास्थ्यातून जागतिक शान्ति )

**सहा प्रकार स्वागताचे**—१ नुसतें नसविणें–बसा म्हणणें, २ हाताला धरून बसविणे, ३ जवळ बसविणे, ४ हाताला धरून जवळ बसविणे, ५ अति-जवळ बसविणें व ६ हाताला धरून अति जवळ बसविणें. यानें प्रेम व आदर यांचें प्रमाण प्रदर्शित केले जातें. ( गूढार्थ चंद्रिका )

## ७

**सप्ततीर्थे** — १ भगवद्भक्त, २ गुरु, ३ माता, ४ पिता, ५ पात, ६ पत्नी व ७ स्वतःचे शुचिर्भूत आचरण. हीं सप्ततीर्थे होत ( पद्म–भूमिखंड )

**सात गुण क्षत्रियाचे** — १ शौर्य, २ तेज, ३ धैर्य, ४ दक्षता, ५ रणशूरत्व, ६ दातृत्व आणि ७ ईश्वर भाव–नियामकशक्ति (भा.गी.१८–४३)

**सात प्राकृत भाषा** — १ मागधी, २ अवंतिजा, ३ प्राच्या, ४ शूरसेनी, ५ अर्धमागधी, ६ बाल्हीका व ७ दाक्षिणात्या

मागध्यवंतिजा प्राच्या शूरसेनार्धमागधी ।
बाल्हीका दाक्षिणात्या च सप्तभाषा प्रकीर्तिता. ॥ ( म. ना. )

**सात मोक्षकला** — १ विवेकसहित प्रेम, २ शांति, ३ तृष्णात्याग, ४ संतोष, ५ एकांतवास, ६ आत्मज्ञान व, ७ परब्रह्मज्ञान ( चातुर्य चिंतामणि )

**सात शीलकला** — १ सत्संग, २ ब्रह्मचर्य, ३ पवित्रता, ४ गुरुसेवा, ५ सदाचार, ६ निर्मल-शास्त्र-ज्ञान व ७ यशप्रेम (चा. चि )

## ८

**अष्ट आनंद** — १ विषयानंद, २ ब्रह्मानंद, ३ वासनानंद, ४ मुख्यानंद, ५ निजानंद, ६ आत्मानंद, ७ अद्वैतानंद, आणि ८ विद्यानंद (विवेक चिंतामणि)

**आठ कारणें वस्तूचे ज्ञानास बाधक** — १ अतिदूरता, २ अति जवळ, ३ इंद्रियदोष, ४ चित्तैकाग्र्याचा अभाव, ५ सूक्ष्मता, ६ अडथळे, ७ अन्य वस्तूचे प्राबल्य व ८ तत्सम वस्तूशी मिश्रण (सांख्यकारिका ७)

**आठ गुण कमलपुष्पाचे** — १ सौंदर्य, २ कोमलता, ३ प्रसन्नता-प्रफुल्लता, ४ सुगंध, ५ मधुरता, ६ स-रसता, ७ तेजस्विता व ८ अलिप्तता हे आठ गुण सूक्ष्म निरीक्षकास दिसतात (गूढार्थचंद्रिका)

**आठ गोष्टी प्रलयकाळीं होणाऱ्या** — १ कुलपर्वत हालणें, २ धूम केतू, ३ संवर्तकादि मेघ जमणें, ४ उल्कापात, ५ अशनिपात, ६ रुधिरवृष्टि, ७ उत्तुंग जललहरी, ८ सर्वदिशा गडद अंधकारमय होतात

बाणभट्ट कादंबरी टीका

**आठ धर्मकला** — १ प्राणिमात्रावर दया, २ परोपकार, ३ दान, ४ क्षमा, ५ समानभाव, ६ सत्य, ७ उदारता व विनय (चातुर्य चिंतामणि)

**आठ प्रकार मरुताचे (वायु)** — १ गगन, २ स्पर्शन, ३ वायु, ४ अनिल, ५ मरुत, ६ प्राण ७ प्राणेश ८ जीव

> गगनः स्पर्शनो वायुरनिलो मारुतस्तथा ।
> प्राणः प्राणेशजीवौ च मरुतोऽष्टौ प्रकीर्तिताः । नु

**आठ प्रकारचे गुरू**—१ बोधक, २ वेधक, ३ निषिद्ध, ४ काम्य, ५ सूचक, ६ वाचक, ७ कारक व ८ विहित असे आठ प्रकार. (विवेक चिंतामणि प्रथम परिच्छेद)

**आठ प्रकार लाचलुचपतीचे पण नावे वेगळालीं**—१ बादशहा अथवा मुख्य सत्ताधीश-पत्रकर्ता-खंडणी. २ प्रधान-नजर, ३ सरकारी

खात्यावरील मुख्य व्यवस्थापक–दप्तूर–वहिवाट, ४ खात्याचे सचिव–शुकराना–आभार प्रदर्शन, ५ कारकून–तहरीर–मज्कूर ६ मुफ्ती (धर्म खात्याचा मुख्य) मेहराना––कृपा, ७ सरकारी अधिकारी–जरीन–वाचन आणि स्वार शिपाई–सजावलान–दटेली. अशा प्रकारचे विशिष्ट शब्द व संकेत दोनशे वर्षांपूर्वी निजामुल्मुल्काच्या राज्यात वापरात होते अशी एक आख्यायिका आहे.

( विडा रंगतो असा )

**आठ स्थानें वर्णोच्चाराचीं**—१ उर, २ कंठ, ३ शिर, ४ जिव्हामूल, ५ दात, ६ नाक, ७ ओठ आणि ८ तालु, हीं वर्णोच्चाराचीं आठ स्थानें होत.

> अष्टौस्थानानि वर्णानामुरः कण्ठः शिरस्तथा ।
> जिव्हामूल च दन्ताश्च नासिकोष्ठौच तालुच ॥

## ९

**नऊ गुण ब्राह्मणाचे**—१ शम, २ दम, ३ तप, ४ शौच, ५ क्षमावान, ६ आर्जव, ७ ज्ञान, ८ विज्ञान आणि ९ आस्तिक्यबुद्धि. ( भ. गी. १८ ४२ )

⟨ **नऊ संख्या विशेष**—( आ ) १ पासून ९ पर्यंत अंक नऊ हा सर्वश्रेष्ठ. कितीही मोठी संख्या असली तरी तिच्यातील सर्व अंकाची बेरीज नऊ पेक्षा कमीच येते. उदा. १८७८ = २४ = ६. संख्येत इतर कोणताच अंक नसेल तरच बेरीज ९ येईल. उदा. ९९९९ = ३६ = ९ अशा रीतीने नऊ हा अंक पूर्ण निर्विकार आहे. १ पासून ८ पर्यंतचा कोणत्याही अंकाचा असा स्वभाव नाहीं. ( गूढार्थ चंद्रिका ) ⟩

**दहा फायदे शिकारीपासून होणारे**—१ श्रेष्ठ व्यायाम, २ कफक्षय–करनारा, ३ मेदोपकर्ष–चरबी कमी होणे, ४ सत्वसहत्व–विविध ऋतु व

क्षुत्पिपासा सहनशीलता वाढते, ५ पिकांचे व हिंस्र पशुपासून इतर प्राणिमात्राचे संरक्षण, ६ स्थलपथशल्यशोधन–हिंस्र प्राणीमात्राच्या वधानं मार्गातले अडथळे दूर करणें, ७ भूप्रदेशाचें निरीक्षण, ८ सत्त्वज्ञान–प्राणीमात्राच्या भावनांचा अभ्यास, ९ वन्यजमातींचा विश्वास संपादन व १० उत्साहशक्ति–शौर्यादि गुणांची वृद्धि (दशकुमारचरित)

(दहा जणांकडे जाताना रिक्त हस्तें जाऊ नये—१ अग्निहोत्र, २ गृह, ३ क्षेत्र, ४ मित्र, ५ भार्या, ६ सुत, ८ शिशु–कोणताही ल्हान मुलगा, ९ राजा व १० देवता.

अग्निहोत्रं गृहं क्षेत्रं भार्यां सुतं शिशुम्।
रिक्तपाणिर्न पश्येत राजानं देवतां गुरुम्॥ (सु.)

# ११

अकरा गणधर (प्रमुख शिष्य) महावीराचे—१ गौतम (इंद्रभूति), २ अग्निभूति, ३ वायुभूति, ४ शुचिदत्त, ५ सुधर्म, ६ माडव्य, ७ मौर्यपुत्र, ८ अकंपन, ९ अचल, १० मेदार्य आणि ११ प्रभास हे मूळचे ब्राह्मण व क्षत्रिय असून त्यांनी श्रीमहावीराकडून जैन धर्माची दीक्षा घेतली व त्यांनीं जैन धर्मतत्त्वाचा प्रचार केला (अरिष्टनेमि पुराण संग्रह–हरिवंश)

चौद्धधर्मात मानिली आहेत. त्यांस "द्वादशनिदान" म्हणतात. ( भारतीय तत्त्वज्ञान )

**बारा महिन्यांतील बारामूर्ती ( श्रीविष्णूच्या ) बारा जातींचीं फुलें व फळें अनुक्रमें**—१ विष्णु ( अशोक–डाळिंब ), २ मधुसूदन ( मोगरा–नारळ ), ३ त्रिविक्रम ( पाटली–आंबा ), ४ श्रीधर ( कळंब–फणस ), ५ हृषिकेश ( करवीर–खजूर ), ६ पद्मनाभ ( जाई–ताडफळ ), ७ दामोदर ( मालती–रायआवळा ), ८ केशव ( सूर्यकमळ–बेलफळ ), ९ नारायण ( चंद्रविकासी कमळ–नारिंग ), १० माधव ( जुई–सुपारी ), ११ गोविंद ( उंडली–कवंद ) आणि १२ ? ( जायफळ ) स्कद २. ४४ ( म्रा. च. को. )

**बारा स्थानें वर्णोच्चाराचीं**—१ छाती, २ कंठ, ३ शिर ( तोंडातील मूर्धन्य स्थान ), ४ जिव्हा, ५ दांत, ६ नाक, ७ ओंठ आणि ८ तालु हीं आठ आणि आत्मा, बुद्धि, मन व सर्व शरीरभर असणारा जठराग्नि हीं चार वर्णप्रेरक बीजस्थानें अशा बारा स्थानांच्या संस्कारामुळें वर्णोच्चार होतो. ( वाग् विज्ञान )

## १४

**चौदा प्राचीन निरुक्त ग्रंथकार**—१ आग्रायण, २ औपमन्यव, ३ औदुम्बरायण, ४ और्णवाभ, ५ कात्थक्य, ६ क्रौष्टकि, ७ गार्ग्य, ८ गाल्व, ९ तैटीकि, १० वार्ष्यायणि, ११ शाकपूणि, १२ स्थौलाष्ठीवि, १३ शतबलाक्ष आणि १४ यास्क. निरुक्तं चतुर्दश प्रभेदम् ( दुर्गवृत्ति १–१३ )

## १६

**सोळा लिपी भारतांत प्रचलित असलेल्या** — १ देवनागरी, २ गुरुमुखी, ३ गुजराथी, ४ ओडीया, ५ आसामी, ६ बंगाली, ७ तेलगु, ८ कन्नड, ९ तामीळ, ११ मल्याळम्, १२ अरबी, १३ फारसी, १४ उर्दू, १५ मोडी व १६ रोमन.

## १७

सतरा प्रकार रास नृत्याचे— १ सलामी, २ साधी हातजोडी, ३ सीधी गुलदहिया, ४ मोरपंखी, ५ मोरछल, ६ खेवा, ७ हातजोडी चक्कर, ८ गुल्दहिया चक्कर, ९ चंद्रमुखी, १० सूरजमुखी, ११ आफ्ताबमुखी, १२ चौघडा १३ चौमुरट, १४ ताज्मुबारक, १५ साठी जोडा, १६ पल्टा आणि १७ कुजगलिया.

( कौतुल्मुबारक–वाजिद–अलीशहा )

## २०

वीस उपभोगाचे विषय — १ घर ( वास्तु ), २ स्नान, ३ पादपीठ, ४ ताम्बूल, ५ विलेपनउटी, ६ वस्त्र, ७ पुष्प, ८ अलंकार, ९ आसन, १० पंखा, ११ सभास्थान, १२ पुत्र, १३ अन्न, १४ पेय पदार्थ, १५ पादमर्दन, १६ यान–वाहन, १७ छत्र, १८ शय्या, १९ सुगंधी धूप, आणि २० स्त्री. ( अभिलषितार्थ चिन्तामणि, भाग १ ला. )

# ३६

**छत्तीस पाखडें** — १ वासुदेव, २ दिर्डीगाण, ३ गाधळी, ४ डफगाणे, ५ बहिरा, ६ जोगी, ७ वाळसतोष, ८ वैरागी, ९ डाकुल्या जोशी, १० आधळा, १२ पागुळ, १२ मुका, १३ कैकाडी, १४ चौरी म्हणजे हिजडा, १५ मुडा, १६ कापडी, १७ वैद्य, १८ चाटे, १९ माग, २० माड, २१ मराडी, २२ नानक, २३ ठाकूर, २४ वाघ्या, २५ गारोडी, २६ बहुरूपी, २७ भुत्या, २८ चित्रकथी, २९ दरवशी, ३० तुनडीवाला ३१ वारागना, ३२ पुराणीक, ३३ गवई, ३४ ज्योतिषी ३५ मानभाव आणि ३६ ब्राह्मण ( दशन प्रकाश )



पुरवणी परिशिष्ट

# संकीर्ण

### अध्यात्मिक संकेत

ॐ हा ईश्वराचा वाचक म्हणजे संकेत आहे. ( प्रसाद नवंबर १९६३ )

### कामशास्त्र संकेत

पुष्ट, भरदार पोटऱ्या उघड्या दिसल्या कीं नायिका प्रेमविव्हल होतात.
( खडेघाशी )

### तंत्रशास्त्र संकेत

दृष्याला अदृष्ट व ज्ञेयाला अज्ञेय हे नेहमीच आधारभूत व अधिष्ठानभूत असतें. ( हिमालय–दर्शन )

### काव्य संकेत

" रघुवंश " चे अध्ययनाची सुरवात दुसऱ्या सर्गापासून करावयाची असते. प्रथम सर्गात नंदिनीचा शाप असल्यामुळे अध्ययनास योग्य नाहीं असें परंपरा गत मानलें जातें,

### धार्मिक संकेत

{ रामायण ग्रंथ घरीं वाचावयाचा नसतो. तसेंच महाभारतातील आरण्यक पर्व. तसें केल्यास अनेक संकट उत्पन्न होतात असे मानले आहे.

रामायण पुराण सांगताना तेथेच एक रिकामा पाट मांडून ठेवण्याची प्रथा आहे. अदृश्य रुपानें श्री मारुतीराय तेथें रामकथा एकत बसतात अशी समजूत आहे. )

मातापित्याना प्रदक्षिणा घातली कीं पृथ्वी प्रदक्षिणेचे फल मिळते असे शास्त्र आहे एतद्विषयीं श्रीगणेशाची एक पौराणिक कथाहि आहे.

श्वेत मदार हा वृक्ष एकवीस वर्षे वाढला तर त्याच्या मुळीची आपोआप गणेशमूर्ता तयार होते म्हणतात. ( सिद्धचरत्न )

## नाट्य संकेत

सुखान्तिके ( Comedy ) मध्यें दुःख तीव्र स्वरूपात असू नये वा दाखवू नये असा एक संकेत आहे. ( हास्यकारण आणि मराठी सुखान्तिका )

## विविध संकेत

सगळेच स्पष्ट करून दाखविल्यानें साहित्य-विचारातील व्यञ्जनेला म्हणजे सूचकतेला बाध येतो असा पूर्व सूरींचा संकेत आहे ( खंडेकर )

काल जें महत्त्वाचें वाटलें तें आज सामान्य वाटावें हा जीवनाचा एक अलिखित संकेत आहे. ( अभिषेक )

सफरचंदाचे झाडाचे पहिले फळ जर एखाद्या बहुप्रसवा मातेनें खाल्लें तर त्या स्त्रीची प्रसवशक्ति त्या झाडात उतरते असें बोहेमिया या देशात समजतात.
( विज्ञान इतिहास )

आनंदात भागीदार मिळाले म्हणजे तो वाढतो आणि दुःखात भागीदार मिळाले म्हणजे दुःख कमी होते.

ज्यानें देऊळ बांधलें त्यानेंच शिखर बांधू नये तें काम इतर कोणाकरिता शिल्लक ठेवावें. कोणत्याहि गोष्टींत अतिरेक त्याज्यच.

विनयानें, जिज्ञासुवृत्तीनें व निरहंकारानें विचारल्याविना कोणी कोणास उपदेश करू नये. परंतु कर्तव्य असेल तेथ परिणामाकडे न पाहाता उपदेश केलाच पाहिजे. ( गूढार्थचंद्रिका ) " नापृष्ट कस्यचित् ब्रूयात् " ( मु. )

मध्यम श्रमानें काम करणाऱ्या निरोगी माणसास रोज सुमारें ३००० ते ३५०० कॅलरीज उष्णता उत्पन्न होईल इतकें अन्न पोटात गेल्यास सकस पौष्टिक पदार्थ पोटात गेले असें समजण्याचा संकेत रूढ झालेला आहे. ( विज्ञान परिचय—लोकसत्ता ७।७। ३ )

न्यायाचें नसेल तेव्हां बारामती मापानें मोजावें व लोकसना ननवावें हा लोकशाही राजकारणातील प्रतिष्ठित संकेत आहे.

( श्री. न. वि. गाडगीळ, दसरी २६।१।६८ )

# संदर्भ ग्रंथ–सूचि


## ( १ ) वेदादि

१ ऋग्वेद
२ यजुर्वेद
३ अथवण वेद
४ नासदायसूक्त भाष्य
५ माध्यदिनीय आन्हिकसूत्रावली
६ श्रीसूक्त
७ ब्रह्मसूत्र शारीरभाष्य
८ तैत्तिरीय आरण्यक
९ सुप्रभेदागम
१० जामदग्न्य धनुर्वेद

## ( २ ) उपनिषदें

१ ईशावास्य
२ प्रश्न
३ मुण्डक
४ माण्डूक्य
५ तैत्तरीय
६ ऐतरेय
७ छादोग्य
८ बृहदारण्यक
९ श्वेताश्वतर
१० मैत्रेयी
११ शतपथ
१२ केन
१३ कठ
१४ योगचूडामणि
१५ कैवल्य

## ( ३ ) धर्मशास्त्र

१ मनुस्मृति
२ याज्ञवल्क्य स्मृति
३ हारीतस्मृति
४ धमसिंधु
५ आश्वलायन गृध्यसूत्र
६ सस्कार कौस्तुभ
७ गौतम धमसूत्र
८ पराशर स्मृति
९ दक्षस्मृति
१० व्यासस्मृति
११ गायत्री पुरश्चरण पद्धति
१२ निरुक्त
१३ बौद्धायन गृह्यसूत्र
१४ History of Dharmshatra

## ( ४ ) वेदान्तशास्त्र–सस्कृत

१ श्रीमद्‌भगवद्गीता
२ शिवगीता
३ श्रीमद्‌ गौडपाद कारिका
४ विवेकचूडामणि
५ पचदशी
६ योगवासिष्ठ
७ पाडव गीता
८ श्रीराम गीता
९ पचीकरण
१० अवधूत गीता
११ श्रीगुरु गीता

### (५) इतर संस्कृत ग्रंथ

१ नीतिशतक
२ वैराग्यशतक
३ विदुर नीति
४ सिद्धांत कौमुदी
५ शाकुंतल
६ रघुवंश
७ मालविकाग्निमित्र
८ सुभाषितरत्न भांडागार
९ सार्थ महाभारत
१० सार्थ भागवत
११ काव्यप्रकाश
१२ आदि पुराण
१३ कालिका पुराण
१४ शुक्र नीति
१५ कामंदकीय नीति
१६ कुमारसंभव
१७ कौटिल्य अर्थशास्त्र
१८ वात्सायन कामसूत्र
१९ व्याकरण महाभाष्य
२० राघव पाण्डवीय
२१ विक्रम चरितम्
२२ ऋग्वेदी ब्रह्मकर्म
२३ प्रमाण साहस्री
२४ वृहत्स्तोत्ररत्नाकर
२५ सिद्धांत शिरोमणि
२६ कृषि पाराशर
२७ युक्तिकल्पतरू
२८ द्वैतसिद्धात पउरी
२९ पाणिनि शिक्षा
३० बुधभूषण

### (६) भक्तिशास्त्र

१ नारद भक्तिसूत्र
२ नामचिंतामणि
३ कुलार्णव तंत्र
४ सतचर्चा
५ भक्तिरसायन
६ भक्तिसारामृत
७ विष्णुसहस्रनाम

### (७) शास्त्र वेदांत मराठी

१ गीतारहस्य
२ श्रीज्ञानेश्वरी
३ श्री दासबोध
४ तुकाराम गाथा
५ गुरुचरित्र
६ हरिवरदा
७ अमृतानुभव
८ एकनाथी भागवत
९ चतुःश्लोकी भागवत
१० विचारसागररहस्य
११ सकलसंत गाथा
१२ सिद्धांतबोध

### (८) पुराण ग्रंथ

१ स्कंद पुराण
२ विष्णु पुराण
३ पद्म पुराण
४ शिव पुराण
५ वामन पुराण

६ ब्रह्म पुराण
७ अग्नि पुराण
८ नारद पुराण
९ गरुड पुराण
१० लिंग पुराण
११ कर्म पुराण
१२ वराह पुराण
१३ मार्कंडेय पुराण
१४ मत्स्य पुराण
१५ विष्णु धर्मोत्तर पुराण
१६ देवी भागवत
१७ भविष्य पुराण

(९) रामायणें

१ वाल्मीकि रामायण
२ अध्यात्म रामायण
३ आनंद रामायण
४ भावार्थ रामायण

(१०) योगशास्त्र

१ पातंजल योग
२ हठयोग प्रदीपिका
४ शिवस्वरोदय
५ सौंदर्यलहरी

(११) वैद्यशास्त्र

१ माधव निदान
२ योग रत्नाकर
३ चरक संहिता
४ सुश्रुत संहिता
५ वाग्भट
६ भावप्रकाश
७ शालिग्राम निघंटु
८ रसेंद्र चूडामणि
९ राजनिघंटु
१० अष्टांग संग्रह

(१२) ज्योतिषशास्त्र

१ ज्योतिर्मयूख
२ सुलभ ज्योतिषशास्त्र
३ तुमचा हात तुमचें भाग्य
४ राहु केतु ग्रहणें
५ पंचांगांतील ज्योतिषशास्त्र

(१२) कोश-ग्रंथ

१ महाराष्ट्र ज्ञानकोश
२ महाराष्ट्र शब्दकोश
३ दुर्बोध शब्दार्थकोश
४ महाराष्ट्र वाक्संप्रदाय कोश
५ सरस्वती कोश
६ हंस कोश
७ वज्रकोश
८ अमरकोश
९ प्राचीन चरित्र कोश
१० प्राचीन ऐतिहासिक कोश
११ न्यायकोश
१२ आदर्श हिंदी श-कोश
१३ गीर्वाण लघुकोश
१४ महाराष्ट्र व्यायाम ज्ञानकोश
१५ भगवद्गीता साक्षात्कार दर्शन
१६ संस्कृतिकोश.

### (१४) हिंदी ग्रंथ

कल्याण विशेषांक

१ नारी अंक
२ हिंदु संस्कृतिक
३ स्कंद पुराणांक
४ गीतांक
५ देवी भागवतांक
६ योगांक
७ उपनिषदांक
८ मानवता अंक
९ ईश्वरांक
१० मानसांक
११ श्रीरामचरित मानस
१२ नारद पुराणांक
१३ संतांक
१४ श्रीकृष्ण अंक
१५ *कबीर दोहावली*
१६ कल्याण साधनांक
१७ तीर्थांक
१८ साधनांक

### (१५) इतर

१ पुरुषार्थबोधिनी भ. गी.
२ विवेक *चिंतामणि*
३ गूढार्थचंद्रिका
४ रामविजय
५ पांडवविजय
६ मार्तंडिंड
७ *गजाननविजय*
८ सिद्धरामपुराण
९ *भक्तिसारामृत*
१० दासगणु समग्र ग्रंथ
११ हितोपदेश
१२ पंचतंत्र
१३ बौद्धदर्शन
१४ अंकशास्त्र
१५ रत्नकरंडक
१६ वृद्ध चाणक्य
१७ सुफी संप्रदाय
१८ आर्या रामायण
१९ अथर्व वेद अनुवाद मराठी
२० समग्र सावरकर वाङ्मय
२१ केळकर निबंधमाला
२२ तत्वनिज बोध विवेक
२३ पंचग्रंथी
२४ श्रीशैवागम आणि ज्ञानेश्वर
२५ *मणिकांचन*
२६ तंत्रवार्तिक
२७ *योगीश्वर याज्ञवल्क्य*
२८ साधुसंतांचा देवयान पथ
२९ वीरशैव प्रदीपिका
३० अशोक ते कालिदास
३१ भारतीय दर्शन संग्रह
३२ प्राचीन हिंदी शिल्पशास्त्रसार
३३ भारतीय मर्दनशास्त्र
३४ श्री गुरुदत्तयोग
३५ शिवलिंगोपासना
३६ विचार चंद्रोदयदर्शन
३७ मुक्तेश्वर महाभारत

३८ विष्णुसहस्रनाम
३९ श्रीदत्तस्तव पदामृत
४० भूदानगंगा भाग ६
४१ प्रश्नोत्तर रत्नमालिका
४२ चाणक्य नीतिसार
४३ अनंगरंग
४४ वल्लभ संप्रदाय
४५ ज्ञानेश्वरी गूढार्थ दीपिका
४६ रत्नाकर
४७ व्याकरणशास्त्र
४८ शंकराचार्य चरित्र
४९ Pathway to God
५० कुरल
५१ विश्वदर्शन नासदीय नीराजन
५२ Wisdom of India
५३ चंडमहात्म्य
५४ मानव धर्मसार
५५ योग चिंतामणि
५६ शिवभारत
५७ दिव्यजीवन खंड २ रा

विविध वृत्तपत्र व नियतकालिकें

संकेत-कोशाचें सूक्ष्म अवलोकन केल्यास वरील सूचीत नसलेले अनेक ग्रंथ आधारास घेतलेले आढळतील.

— समाप्त —

## Appreciation

Dr. T. G. Mainkar
M A. Ph. D. D Lit
Fergusson College, Poona 4

I have gone through 'Sanket Kosa' compiled by Shri S. S. Hanamante, with great interest and I heartily congratulate the author for his excellent achievement which amply reveals his wide reading, industry and patience. Containing as it does, useful and interesting information on various matters, the kosa is bound to be of immense use to both the scholar and the layman alike. Here is much that everyone ought to know. Shri Hanamante has made every effort to make his new edition of the kosa more useful and as complete as possible by several additions Such kosas, which in one place contain so much information are indeed the layman's guides to scholarship and the fact that this kosa has in a very short period ran into another edition speaks for both its utility as well as its appreciation by the public What has struck me is the fact that Shri Hanamante carried out the compilation of this work in an environment and atmosphere not quite congenial for research work of this type. A Kosa of this kind and standard compiled by a servant of the railways, will remain for a long time, a source of inspration to many, no doubt.

Fergusson College,
Poona 4 11-2-64

T. G. Mainkar.

# अभिमत

## १

श्री. हणमते द्वारा संपादित संकेत–कोश का द्वितीय संस्करण प्रकाशित देखकर मुझे बड़ी प्रसन्नता हो रही है। यह संकेत–कोश सांस्कृतिक भारतीय जीवन का संक्षिप्त कोश है, जो विशेष रूपसे संख्याके माध्यम से प्रस्तुत किया गया है। इसमें साहित्यिक, धार्मिक और सामाजिक ज्ञान अपने रूपमें संकलित है। एक से लेकर एक सौ आठ तक की संख्याओं में कितनी विशिष्ट बातें भारतीय जीवन की समाविष्ट हो सकती हैं, इसका अनुमान हम इस कोश से लगा सकते हैं। यह भारतीय साहित्य के अध्येताओं के लिए तो मूल्यवान वस्तु हैही, इसके अतिरिक्त भारत–तत्त्व ( Indology ) में रुचि रखनेवाले विदेशी जिज्ञासुओं के लिए भी यह एक उपयोगी वस्तु है।

इस संकेत–कोश के परिशिष्ट भी अपना महत्त्व रखते हैं जिनमें लेखकने कतिपय प्रतीकों और कवि–प्रसिद्धीयों को भी समाविष्ट किया है। द्वितीय संस्करण प्रथम संस्करण का लगभग दुगुना है। निश्चय है कि इसमें प्रथम संस्करण की अपेक्षा सामग्री भी दुगुनी एकत्र की गयी है। इस प्रयास के लिए इसके संग्रह कर्ता श्रीहणमतेजी हमारे साधुवाद तथा बधाई के पात्र हैं।

पुणें विद्यापीठ<br>
दि. २७ दिसंबर १९६३

डॉ भगीरथ मिश्र.<br>
अध्यक्ष हिंदी विभाग

२

अशा प्रकारचे संकेत मिळविण्यासाठी प्राचीन व अर्वाचीन वाङ्मय धुंडाळण्याचे जे अविरत कष्ट करावे लागतात त्याची ज्यांना कल्पना आहे त्यांनाच श्री. हणमते यांनी अनेक वर्षे केलेल्या परिश्रमाचे महत्त्व कळू शकेल. अति प्राचीन काळातील वेदोपनिषदापासून अगदीं अत्याधुनिक असे पाश्चात्य वाङ्मय संशोधून श्री हणमते यांना जिज्ञासू व अभ्यासक यांच्यासाठीं हा संकेत–कोश संपादित करण्याचे जे अभूतपूर्व कार्य एकट्यानें तडीला लावलें आहे त्याबद्दल त्यांना धन्यवाद द्यावे तेवढे थोडेच आहेत.

पुणें विद्यापीठ
दि. २१ जानेवारी १९६४

डॉ शं गो. तुळपुळे
प्रमुख मराठी विभाग

३

संस्कृत वाङ्मयात अगणित संख्यावाचक रूढ आहेत. त्या सर्वांची यादी स्वरूपात मांडणी करून हे अतिशय किचकट व कष्टाचे काम श्री हणमते यांनी पार पाडले. या आवृत्तींत आणखी अधिक मोलाची भर घालून त्यांनी संकेत कोश अधिक उपयुक्त केला आहे. प्रत्येक नोंदलेल्या संकेताचा मूळ आधार दिला आहे कोशातील नोंदी वारकाईनें चाळीत असतांना ग्रंथकर्त्याच्या सूक्ष्म निरीक्षणाचा, व्यासंगाची व अपार वाचनाची कल्पना येते नवीन आवृत्तींत अनेक नवीन संकेत असून माहिती अचूक दिली आहे. शेवटीं संकीर्ण संकेत कटपयादि सांकेतिक मापापद्धति, शब्दसंकेत इतर संकीर्ण संकेत इत्यादि माहिती दिली आहे.

पंडित, वक्ते, लेखक व सामान्यजन या सर्वांना सारखाच उपयोगी पडेल अशा तऱ्हेच्या या संकेतकोशाची परिवर्धित सुधारून वाढविलेली आवृत्ति तयार केल्याबद्दल श्री. हणमते यांचें मन पूर्वक अभिनंदन व त्यांना हार्दिक धन्यवाद

सदाशिव पेठ, पुणें २
दि. २५।१२।१९६३

डॉ. व. ग राहूरकर
संपादक 'एकता' व
'भारतवाणी' संस्कृत (पाक्षिक)